भारत-गौरव-ग्रंथमाला—पुष्प ११२ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## अष्टम खंड.

द्रोणपर्व, अ० १२१-२०२. कर्णपर्व, अध्याय १-७४.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
—भ. गी., अ. ४, ३८.

लेखक :
आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री
भालचंद्र शंकर देवस्थळी.

क्षमा प्रशस्यते लोके न तु पापोऽर्हति क्षमाम् ।
क्षमावन्तं हि पापात्मा जितोऽयमिति मन्यते ॥ पृ. २३२.

अतिक्रान्तं हि यत्कार्यं पश्चाच्चिन्तयते नरः ।
तच्चास्य न भवेत्कार्यं चिन्तया च विनश्यति ॥ पृ. ३३८.

शके १८५५. ] किंमत ४ रुपये [ सन १९३३.

# कै० आचार्यभक्त विष्णुशास्त्री बापट.

विद्या तपो वा विपुलं धनं वा,
सर्वं ह्येतद् व्यवसायेन शक्यम् ॥

—म. भा. १२, १२०, ४५.

कोणताहि देश ऊर्जितावस्थेला येण्यास विद्या, सदाचरण आणि धन यांची प्रामुख्यत्वेंकरून आवश्यकता असते. ह्या तिन्ही गोष्टी साध्य होण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे दृढ व्यवसाय अर्थात् उद्योग हेंच एक होय. ह्या उद्योगाचा आश्रय करून जे कोणी कीर्तिमंदिराच्या उच्च शिखरावर चढले, त्यांत कै. विष्णुशास्त्री बापट यांची गणना अवश्य केली पाहिजे. कै. बापटशास्त्री यांची कीर्ति बरेच दिवसांपासून आम्ही ऐकत होतों, पण 'महाभारताचे सुबोध मराठी भाषांतरा'चे संपादक झाल्यामुळें त्यांचा आमचा निकटचा संबंध जडला व पुढें पुढें तो विशेषच जिव्हाळ्याचा होत गेला. शुद्ध भाषा, प्रौढ वाक्यरचना व थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ साधणें या गुणांनीं त्यांची लेखनपद्धति सर्वांस अत्यंत प्रिय झाली, म्हणून त्यांच्याच हातून भारतभाषांतराचें काम तडीस जाईल, असा आम्हांला मोठा भरंवसा होता. परंतु ईश्वरी योजना निराळी असल्यामुळें निर्घृण काळानें शास्त्रीबुवांस आमच्यांतून ओढून नेलें. शास्त्रीबुवांच्या निधनानें आमचेंच केवळ नव्हे, तर निखिल महाराष्ट्राचें आणि विशेषतः संस्कृत विद्येचें जें नुकसान झालें आहे, तें कधींहि भरून येण्यासारखें नाहीं.

शास्त्रीबुवांचें चरित्र आजच्या तरुण पिढीस अत्यंत उद्बोधक असल्यामुळें तें आम्ही येथें थोडक्यांत देत आहों. त्यांचा जन्म राजापुर तालुक्यांत धाऊलवल्ली येथें २२–५–१८७१ रोजीं झाला. अगदीं लहानपणीं–वयाच्या आठव्या वर्षी–पितृनिधनामुळें ते रामदुर्ग संस्थानांत आपल्या चुलत्यांकडे शिक्षणाकरितां गेले. तेथें मराठी शिक्षण संपवून इंग्रजी शिक्षणासाठीं ते शिरोळ व मिरज येथें आपल्या आजोळीं येऊन राहिले. अशाप्रकारें इंग्रजी सातवीपर्यंतचा अभ्यास झाल्यावर त्यांनीं कराची कँटोनमेंट स्टेशनवर सिग्नलरची जागा पत्करिली. पुढें आपल्या अंगच्या सुशीलता, मनमिळाऊपणा आणि मुख्यत्वें उद्योगशीलता या गुणांनीं ते तेथेंच असिस्टंट स्टेशनमास्तरच्या पदावर चढले. याच सुमारास अशी एक गोष्ट घडून आली कीं, जिच्या योगानें त्यांचा सर्व आयुष्यक्रम पार बदलून गेला. प्रो. डायसन् नांवाच्या एका जर्मन तत्त्ववेत्त्याचें 'शांकर फिलॉसफी' या विषया-

वरील व्याख्यान त्यांनीं ऐकिलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान समजून घेण्याची त्यांना उत्कट इच्छा झाली आणि ती इतकी वाढली कीं आपल्या नोकरीचा राजीनामा देऊन ते वांईचे सुप्रसिद्ध कै० भाऊशास्त्री लेले यांजकडे धर्मशास्त्राच्या अध्ययनाकरितां येऊन राहिले. वांईस त्यावेळीं प्रज्ञानंदस्वामी म्हणून एक वेदांती होते, त्यांकडे शास्त्रीबुवांनीं आचार्यांच्या भाष्याचा अभ्यास केला. पुढें कांहीं वर्षें गेल्यावर शास्त्रीबुवा मुंबईस आले व तेथें त्यांनीं स्वतंत्र लेखनाचा व्यवसाय आरंभिला. नंतर त्यांनीं दहा वर्षें सिंध-हैद्राबाद येथील गिडुमल संस्कृत पाठशाळेंत मुख्याध्यापकाचें काम केलें. इ. स. १९१२ त ते हैद्राबादेहून पुण्यास येऊन कायमचे राहिले. पुण्यास आल्यावर त्यांनीं लेखनाचें काम मोठ्या नेटानें केलें. त्यांनीं ‘ ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला ’ हें मासिक आणि ‘ आचार्य ’ हें पाक्षिक सुरू केलें. शिवाय दशोपनिषदादि प्रस्थानत्रयीचीं सभाष्य भाषांतरेंहि त्यांनीं प्रसिद्ध केलीं. अशा रीतीनें आजवर त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांची किंमत जवळजवळ साठ हजारांवर होत आहे. त्यांना ग्रंथ-प्रकाशनासाठीं सर विठ्ठलदास ठाकरसी व लेडी ठाकरसी यांच्याकडून मोठी मदत झाली आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे शास्त्रीबुवांच्या उद्योगशीलतेचें परम कौतुक वाटतें व उद्योगप्रिय मनुष्य काय करूं शकणार नाहीं, हाहि विचार मनांत उद्भवतो. शास्त्रीबुवा शांकरमतानुयायी असल्यामुळें त्यांनीं लोकमान्यांच्या गीतारहस्याचें खंडन केलें आहे. इ. स. १८२५ त त्यांनीं ‘ आचार्यकुल ’ ही संस्था स्थापन केली. तींत ते विद्यार्थ्यांना प्रस्थानत्रयीचें शिक्षण देत असत. दीड वर्षामागें त्यांना पक्षघाताचा झटका आला. तेव्हांपासून त्यांची प्रकृति थोडीथोडी बिघडत जात होती. तरीहि त्यांनीं विद्यार्थ्यांचें अध्यापन, ग्रंथलेखन व वाचन हीं चालू ठेवलीं होतीं. अखेर मरणदिवशींहि (२०–१२–३२) सकाळीं नित्याप्रमाणें नऊ वाजतां त्यांनीं विद्यार्थ्यांचे पाठ घेतले, मासिकाच्या प्रुफांचें निरीक्षण केलें आणि स्नानास गेले, तों त्यांच्या हातांतील तांब्या पडून ते बेशुद्ध झाले व त्यांतच दुपारीं अडीच वाजतां त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! त्यांच्या निधनानें सनातन धर्माचा व शांकरसंप्रदायाचा अभिमानी पुरुष नाहींसा झाला. ते जरी सनातनी धर्माचे कट्टे अभिमानी होते, तरी सर्वांशीं त्यांचें मित्रत्वाचें नातें होतें. त्यांच्या अंत्यविधीचे वेळीं सर्व मतांचे बरेच लोक जमले होते व त्यांचीं शास्त्रीबुवांच्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो !

प्रकाशक.

# विषयानुक्रमणिका.



## ७ द्रोणपर्व ( पुढें चालू ).



### जयद्रथवधपर्व ५. पृ. १–९५.

---

## घटोत्कचवधपर्व ६. पृ. ९५–१९४.

---

## द्रोणवधपर्व ७. पृ. १९४–२१९.

---

## नारायणास्त्रमोक्षपर्व ८. पृ. २२०–२६१.

---

## कर्णपर्व ८.

---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



### अष्टम खंड.

### ७ द्रोणपर्व—( पुढें चालू )



### जयद्रथवधपर्व ५.



#### अध्याय १२१ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ युद्धवृत्तान्तकथन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, त्या प्रचंड सैन्याचें कदन करून सात्यकि अर्जुनाकडे चालला असतां माझ्या निर्लज्ज पुत्रांनीं काय केलें तें मला सांग. पार्थतुल्य सात्यकीशीं युद्धांत गांठ पडली असतां त्या मुमुर्षु कौरवांनीं धैर्य कसें धरलें ? त्याचप्रमाणें इतर क्षत्रिय व युद्धांत पराभूत झालेले योद्धे यांनीं पुढें काय केलें ? माझे पुत्र जिवंत असतां त्या सर्वांचें उल्लंघन करून सात्यकि अर्जुनाकडे कसा गेला ? तें मला कथन कर.

हे संजया, एका वीरानें अनेक महारथांचा पराभव केल्याचा हा अद्भुत वृत्तान्त मीं तुझ्या मुखानें ऐकला व ज्याअर्थीं एकट्या सात्वतानें रणांगणांत अनेक महारथांचा वध केला, त्याअर्थीं माझ्या मंदभाग्य पुत्रांचें दैवच विपरीत आहे, असें मला वाटतें. सर्व पांडव तर दूरच राहिले, पण एकट्या सात्यकीलाच माझें सैन्य पुरें पडणार नाहीं, असेंच दिसतें. खरोखर, हा वृष्णिवीर युद्धनिपुण द्रोणाचाहि पराभव करून, पशुगणांचा संहार करणाऱ्या सिंहाप्रमाणें माझ्या पुत्रांचा क्षय करील !

कृतवर्मादि दक्षतेनें युद्ध करणाऱ्या अनेक योद्ध्यांना सात्यकीचा वध करतां आला नाहीं, यावरून तो वीर माझ्या पुत्रांना जिंकील यांत संशय नाहीं. पूर्वी धनंजयानेंहि या शिनिपुंगवासारखा पराक्रम केलेला नाहीं.

( २ ) संजय—हे भारता, तुझें दुर्मन्त्रित्व व दुर्योधनाची दुष्कृति यांचें फल मी तुला सांगतों, तें लक्षपूर्वक ऐक. तुझ्या पुत्राच्या आज्ञेप्रमाणें संशप्तक युद्धाविषयीं क्रूर संकेत करून पुनः परत फिरले. तेव्हां दुर्योधनादि तुझे पुत्र तीन सहस्र अश्वसादी, शक, कांबोज, तंगण, अंबष्ठ, पैशाच, बर्बर व हातांत पाषाण धारण करणारे क्रूर पार्वतीय हे सर्व, पन्नास पन्नास लोकांचा संघ करून अग्नीवर झडप घालणाऱ्या शलभाप्रमाणें सात्यकीवर तुटून पडले.

इतक्यांत अनेक महारथी व असंख्य पदाति यांनीं शंभर महारथ, हजार गज, दोन हजार अश्व यांसह सात्यकीवर चाल केली. दुःशासनानें ' याचा वध करा ' अशी सर्वांना प्रेरणा करीत सात्यकीला प्रतिबंध केला. त्यावेळीं तो एकटा सात्यकि अनेकांशीं युद्ध करीत होता. त्यानें असंख्य सैन्याचा संहार केला. सहस्रावधि गजांचा व जातिवंत अश्वांचा क्षय केला. नानादेशांत जन्म पावलेल्या विविध जातींच्या अगणित पदातींना यमालयीं पाठविलें.

याप्रमाणें सात्यकीनें त्या दस्यूंना ग्रस्त केलें असतां दुःशासन त्या योद्ध्यांना म्हणाला—

" हे अधर्मज्ञ वीरहो, तुम्ही क्षात्रधर्म जाणत नाहीं का ? असे युद्धपराङ्मुख होऊं नका. युद्ध करा. पलायन कां करतां ? "

नंतर त्या भग्न झालेल्या सैन्याकडे पाहून दुर्योधन पाषाणांनीं युद्ध करणाऱ्या पार्वतीयांना प्रेरणा करीत म्हणाला—" हे वीरहो, तुम्ही पाषाणयुद्धांत कुशल अहां, हें सात्यकीला ठाऊक नाहीं, शिवाय तो पाषाणयुद्धांत अनभिज्ञहि आहे. यास्तव युद्धाची इच्छा करणाऱ्या त्याचा तुम्ही वध करा. भिऊं नका. सात्यकीप्रमाणेंच सर्व कौरवांनाहि अश्मयुद्धाचें ज्ञान नाहीं. तुम्ही निःशंकपणें त्याच्यावर चाल करा. त्या शैनेयापासून तुम्हांला यत्किंचितहि अपाय होणार नाहीं."

हे महाराज, दुर्योधनाचें हें वचन ऐकतांच अश्मयुद्ध करणारे ते सर्व पर्वतवासी पार्थिव सात्यकीवर धांवले. त्यांनीं हत्तीच्या मस्तकाएवढ्या प्रचंड पाषाणांचा सात्यकीवर वर्षाव केला. तुझ्या पुत्रानें ज्यांना प्रेरणा केली आहे

अशा दुसऱ्याहि योद्धयांनीं सर्व दिशा अडवून धरल्या. याप्रमाणें त्या शैलवासी वीरांनीं शिलायुद्ध आरंभिलें असतां सात्यकीनें त्यांच्यावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव चालविला व त्या पार्वतेयांच्या पाषाणांचें आपल्या सर्पतुल्य बाणांनीं चूर्ण करून टाकलें.

त्यावेळीं त्या पाषाणांचें जें चूर्ण वर उडालें, तें प्रदीप्त झालें व खद्योतांच्या संघाप्रमाणें भासलें. त्या प्रदीप्त चूर्णानें बहुतेक सैन्य दग्ध झालें व मृत होऊन भूमीवर पडलें. तेव्हां सर्वत्र एकच हाहाकार झाला. त्यानंतर पांचशें शूर योद्धयांनीं मोठाल्या शिला हातीं घेतल्या. परंतु सात्यकीनें त्यांच्या बाहूंचा छेद करतांच ते भूमीवर पडले. तें पाहून दुसरे लक्षावधि वीर पुढें सरसावले, परंतु त्यांचेहि बाहु तुटून पडल्यावर ते पाषाण त्यांच्या हातांतच राहिले व देह मात्र गतप्राण होऊन खालीं पडले. एकव्या सात्यकीनें त्या पाषाणयोधी वीरांचा संहार केला, हा केवढा चमत्कार !

नंतर अवशिष्ट राहिलेले योद्धे एकत्र जमून सात्यकीवर अश्मवृष्टि करूं लागले. पोलादी शस्त्रें व शूल धारण करणारे तंगण, दरद, खश, लंपाद व पुलिंद आपापल्या शस्त्रांचा प्रहार करूं लागले. परंतु सात्यकीनें नाराच बाणांनीं त्यांच्या शस्त्रांचाहि छेद केला. त्या पर्वतप्राय शिला भग्न होत असतां, अंतरिक्षांत त्यांचा घोर शब्द होऊं लागला. तो भयंकर निनाद ऐकून रथ, अश्व व गज भयभीत होऊन पळूं लागले. अश्मचूर्णानें अंग विदीर्ण होऊन नर, गज व अश्व भुंग्यांच्या दंशाप्रमाणें विव्हल झाले. जिवंत असलेल्या गजांचीं मस्तकें भग्न होऊन तीं रक्तानें सिक्त झाल्यामुळें ते युयुधानाच्या रथाकडे वळे-नातसे झाले.

हे नृपश्रेष्ठा, पर्वकालीं होणाऱ्या सागराच्या शब्दाप्रमाणें सात्यकीनें ग्रस्त केलेल्या तुझ्या सैन्यांतून आर्त स्वर ऐकूं आला. तो प्रचंड ध्वनि ऐकून द्रोणाचार्य सारथ्याला म्हणाला—"हा सात्वतश्रेष्ठ सात्यकि रणांत अतिशय क्रुद्ध झाला असून कौरवसैन्याचा अनेक प्रकारें विध्वंस करीत आहे. यास्तव जेथून हा ध्वनि ऐकूं येत आहे, तेथें माझा रथ ने. युयुधान यावेळीं पाषाणयोधी योद्धयांशीं युद्ध करीत असावा. हे शीघ्रगामी अश्व पहा ! ते वायुवेगानें पळत असून रथ्यांना दूर नेत आहेत. शस्त्रहीन व कवचहीन झालेले योद्धे जाग-जागीं पडलेले दिसत आहेत. या युद्धांत सारथ्यांसहि त्या वेगवान् अश्वांचें नियमन करतां येत नाहीं."

शस्त्रधारण करणाऱ्यांतील श्रेष्ठ आचार्यांचें हें वचन ऐकून सारथि म्हणाला " हे आयुष्मन्, कौरवसैन्य दाहीदिशांत पळत आहे. योद्धे पराभूत होऊन इतस्ततः धांवत आहेत. पांचाल व पांडव एकत्र जमून आपल्यावरच चाल करून येत आहेत. यास्तव या प्रसंगीं येथेंच रहाणें उचित आहे किंवा तेथें जाणें अधिक श्रेयस्कर आहे, याचा योग्य विचार करून काय तें ठरवावें. सात्यकि आतां पुष्कळ दूर गेला आहे."

याप्रमाणें सारथि भारद्वाजांस सांगत आहे, तोंच सात्यकि असंख्य योद्धयांना गतप्राण करीत पुढें चाललेला दृष्टीं पडला. तेव्हां युयुधानाकडून वध पावणारे तुझे योद्धे सात्यकीचा रथ सोडून द्रोणसैन्याच्या आश्रयार्थ धांवत सुटले आणि दुःशासनहि पूर्वी ज्या वीरांसह सात्यकीकडे परत वळला होता, त्यांसह तोहि आतां भयभीत होत्साता द्रोणसैन्याकडे पळत सुटला. ७. ५. १२१.

---

## अध्याय १२२ वा.

[ १ दुःशासनाचा उपहास. २ आचार्यांचा पराक्रम. ३ पार्षताचा पराभव. ]

( १ ) संजय—दुःशासनाचा रथ आपल्या समीपच स्थित झाल्याचें पाहून द्रोणाचार्य त्याला म्हणाला—हे दुःशासना, हे सर्व रथी कां बरें पळत आहेत! राजा दुर्योधन कुशल आहेना? सैंधव जिवंत आहे ना? बा धार्तराष्ट्रा, तूं राजपुत्र आहेस, राजाचा भ्राता आहेस व तुला यौवराज्याभिषेकहि झालेला आहे. तुझ्यासारख्यानें युद्धांतून असें पलायन करावें का! अरे, पूर्वी द्यूताच्या प्रसंगीं तूं द्रौपदीला जीं दुर्वचनें बोलला होतास तीं तुला स्मरतात का!

" तूं द्यूतांत जिंकली गेली आहेस, आतां तूं आमची दासी होऊन आम्ही सांगूं तीं कामें कर. तूं माझ्या ज्येष्ठ भ्रात्याचीं वस्त्रें नेण्याचें काम करीत जा. पांडव तुझे पति नाहींत. ते सर्व षण्ढतिलासमान पुरुषार्थहीन झाले आहेत."

दुःशासना, पूर्वी अशा प्रकारचीं निंद्य भाषणें करून आतां कां पळतोस! पांडव व पांचाल यांच्याशीं स्वतःच वैर करून, आतां एकटा सात्यकि युद्धाला आला असतां तुला भय कां वाटावें? द्यूताच्या प्रसंगीं तूं जेव्हां हातांत अक्ष ( फांसे ) घेतलेस, तेव्हां तेच पुढें दारुण सर्पासारखे शर होतील, हें तुझ्या लक्षांत आलें नाहीं. पांडवांविषयीं अप्रिय भाषण व विशेषतः द्रौपदीचे क्लेश यांच्या मुळाशीं तूंच आहेस.

अरे, त्या वेळचा तुझा तो मान, दर्प, पराक्रम व सर्व वल्गना आज कोठें गेल्या ! पार्थांना सर्पाप्रमाणें क्रुद्ध करून आतां तूं कोठें पळणार ! तुझ्यासारखा कर्कश भ्राता पलायनपरायण झाल्यावर दुर्योधनराजा, भारतीसेना व हें समग्र राज्य हीं सर्व शोचनीय होतील. भयार्त होऊन भग्न झालेल्या या सेनेचें स्वबाहुबलाचा आश्रय करून रक्षण करणें, हेंच यावेळीं तुझें मुख्य कर्तव्य आहे. पण तूं तर भीतीनें युद्ध सोडून शत्रूला आनंद देत आहेस !

हे शत्रुसूदना, तूं सैन्याचा नायकच जर युद्धांतून पलायन करूं लागलास, तर अशा भीरूचा आश्रय करून कोणता योद्धा रणांत उभा राहील ! एकट्या सात्वताशीं युद्ध करतांना जर तुझी बुद्धि अशी पलायन करण्यास प्रवृत्त झाली, तर तूं अर्जुन, भीमसेन व माद्रेय यांना जेव्हां समरांगणांत पहाशील, तेव्हां काय करशील ! फाल्गुनाचे शर युद्धामध्यें सूर्य किंवा अग्नि यांच्यासारखे जाज्वल्य असतात. ज्यांना भिऊन तूं पळत आहेस ते सात्यकीचे बाण त्याच्या तुल्य नाहींत.

हे वीरा, सत्वर जा आणि गांधारीच्या उदरांत प्रवेश कर. त्यावांचून समग्र पृथ्वीतलावर तुझें जीवित सुरक्षित राहील, असें मला वाटत नाहीं.

तूं जर पलायनाचाच निश्चय केला असशील तर धर्मराजाला ही समग्र पृथ्वी शमानेंच अर्पण कर. स्वैर सुटलेल्या सर्पाप्रमाणें ज्यांची गति आहे, असे पार्थाचे शर जोंवर तुझ्या देहांत रुतले नाहींत, तोंवर पांडवांशीं संधि कर. संग्रामांत तुझ्या शंभर भ्रात्यांचा वध करून महात्म्या पार्थांनीं जोंवर राज्य घेतलें नाहीं, तोंवर तूं त्यांच्याशीं शम कर. जोंवर धर्मराज व श्रीकृष्ण क्रुद्ध झाले नाहींत, तोंवर पांडवांशीं शम कर. जोंपर्यंत भीमसेनानें तुझ्या प्रचंड सेनेचें आलोडन करून तुझ्या भ्रात्यांचें कदन केलें नाहीं, तोंपर्यंत पांडुपुत्रांशीं संधि कर.

हे दुःशासना, तुझ्या त्या ज्येष्ठ भ्रात्याला भीष्मानें मागेंच सांगितलें होतें कीं, पांडव युद्धांत अजेय आहेत, यास्तव त्यांच्याशीं तूं शम कर. परंतु मंदमति दुर्योधनानें तें ऐकलें नाहीं. यास्तव तूं आतां युद्धाचाच निश्चय करून दक्षतेनें पांडवांशीं युद्ध कर. जेथें सात्यकि उभा आहे, तेथें सत्वर जा. तूं तेथें नसल्यामुळें भारतीसैन्य भयभीत होईल. अरे, स्वतःच्या यशासाठीं तरी सत्यपराक्रमी सात्यकीशीं युद्ध कर.

हे महाराज, आचार्यानें याप्रमाणें उपहास केला असतां दुःशासन त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून किंबहुना त्याचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें करून जेथें सात्यकि होता, तेथें निघून गेला व रणांतून निवृत्त होणाऱ्या म्लेच्छ सैन्याला थांबवून त्यासह सात्यकीवर धांवून गेला.

( २ ) इकडे रथिश्रेष्ठ द्रोणहि क्रुद्ध होऊन मध्यम गतीनें पांचाल व पांडव यांच्यावर धांवला. त्या आचार्यानें पांडवांच्या सैन्यांत प्रवेश करून सहस्रावधि योद्धयांना पळवून लावलें. नंतर त्या रथिश्रेष्ठानें पांडव, पांचाल व मत्स्य यांचें कदन आरंभिलें. याप्रमाणें भारद्वाज शत्रुसैन्याचा पराजय करीत असतां पांचाल-पुत्र वीरकेतूनें त्याचें निवारण केलें. त्यानें द्रोणावर, त्याच्या सारथ्यावर व ध्वजावर अनेक बाण सोडले. परंतु द्रोणाचार्यानें त्या वीरकेतूकडे नुस्तें पाहि-लेंहि नाहीं, हें केवढें आश्चर्य !

हे महाराज, रणांत द्रोणाचा निरोध झाल्याचें पाहून धर्मराजाच्या जयाची इच्छा करणारे पांचाल चोहोंबाजूंनीं त्याच्यावर धांवले. परंतु त्यांच्या असंख्य शस्त्रांचा नाश करून तो आचार्य महामेघांचा नाश करणाऱ्या वायूप्रमाणें शोभला. नंतर त्यानें एक अतिशय घोर बाण सोडून वीरकेतूला गतप्राण केलें. तेव्हां त्याचा रक्तानें सिक्त झालेला मृतदेह गिरिशिखरावरून पडणाऱ्या महा-वृक्षाप्रमाणें रथावरून खालीं पडला.

हे भारता, तो महाबलाढ्य धनुर्धर मृत होऊन पडतांच क्रुद्ध झालेल्या पांचालांनीं द्रोणाला वेढा दिला. चित्रकेतु, सुधन्वा, चित्रवर्मा व चित्ररथ हे भ्रात्याच्या वधानें क्रोधसंतप्त झाले. वर्षा-ऋतूंतील मेघाच्या जलधारांप्रमाणें त्यांनीं भारद्वाजावर शरवृष्टि चालविली. ते महारथी द्रोणावर अनेकप्रकारें प्रहार करूं लागले. तेव्हां द्रोणानें अतिशय क्रुद्ध होऊन त्या कुमारांस तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. त्यावेळीं द्रोणाच्या शरांनीं त्रस्त झालेले ते राजपुत्र भ्रान्त झाले. त्यांना काय करावें तें कळेना.

त्यांची ती स्थिति पाहून द्रोणाचार्यानें हंसतच त्यांचे अश्व व सारथि यांचा वध करून त्यांना विरथ केलें आणि वृक्षाचीं फुलें जशीं सहज खुडावीं तशीं त्या कुमारांचीं शिरकमलें तीक्ष्ण बाणानें तोडून टाकिलीं. तेव्हां देवा-सुरांच्या युद्धांत दानव जसे गतप्राण होऊन पडत, तसे ते तेजस्वी राजपुत्र रथांतून खालीं पडले. याप्रमाणें सहज लीलेनें त्या कुमारांचा वध करून तो भारद्वाज आपलें सुवर्णपृष्ठाचें अजिंक्य धनुष्य रणांगणांत फिरवूं लागला.

हे महाराज, आपले देवतुल्य भ्राते पडल्याचें पाहून धृष्टद्युम्नाचें मन अतिशय उद्विग्न झालें. त्याच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. नंतर तो अतिशय क्षुब्ध होऊन द्रोणाचार्यांकडे वळला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या पार्षतानें शरांनीं द्रोणाच्या रथाला आवृत करून त्याचा निरोध केला आहे, हें पहातांच तुझ्या सैन्यांत हाहाकार उडाला. याप्रमाणें पार्षतानें जरी त्याला प्रतिबंध केला तरी द्रोणाचार्य यत्किंचित्‌हि व्यथा पावला नाहीं, तो हंसत हंसतच युद्ध करीत होता.

नंतर धृष्टद्युम्नानें आचार्यांच्या वक्षःस्थलावर नव्वद बाण सोडून त्यास विद्ध केलें. तेव्हां त्या मर्मांतक प्रहारानें भारद्वाजास मूर्छा येऊन तो रथांतच पडला. आचार्यांची तशी अवस्था पहातांच महापराक्रमी पार्षतानें हातांतील धनुष्य बाजूला ठेवून आपलें खड्ग उपसलें व तो पांचाल आपल्या रथांतून उतरून द्रोणाच्या रथावर चढला. ज्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले आहेत, असा तो द्रुपदपुत्र जों आचार्यांचें मस्तक त्याच्या देहापासून वेगळें करण्याच्या विचारांत आहे तोंच द्रोणाचार्य देहभानावर येऊन त्यानें आपलें धनुष्य हातीं घेतलें !

धृष्टद्युम्न आपला प्राण घेण्याच्या इच्छेनें इतका समीप आला आहे, हें पाहून भारद्वाजानें वैतस्तिकनामक शर त्यावर सोडिले. हे बाण समीपस्थ शत्रूचा वध करीत असतात. त्या बाणांचा प्रयोग करून द्रोणानें धृष्टद्युम्नाला विद्ध केलें. तेव्हां त्या पार्षताचा आवेश भग्न झाला व तो द्रोणाच्या रथांतून उडी टाकून स्वतःच्या रथावर चढला व आपलें प्रचंड धनुष्य घेऊन द्रोणावर शरवृष्टि करूं लागला. त्यावेळीं त्या दोघांचें जें तुमुल युद्ध जुंपलें, तें त्रिभुवनाची इच्छा करणाऱ्या इंद्र-प्रऱ्हादांच्या युद्धाप्रमाणें अद्भुत होतें. त्या दोघांहि युद्धकुशल वीरांचा तो अद्भुत संग्राम पाहून श्रेष्ठ क्षत्रिय, सर्व सैनिक व इतर भूतसंघ त्यांचा गौरव करूं लागले व पांचाल धृष्टद्युम्नाशीं युद्ध करणारा द्रोण लवकरच आमच्या वश होईल अशी गर्जना करूं लागले.

( ३ ) इतक्यांत द्रोणानें वृक्षावरून जसें फळ पाडावें त्याप्रमाणें पार्षताच्या सारथ्याचें मस्तक तोडून त्वरेनें खालीं पाडविलें. सारथि नाहींसा होतांच त्याचे अश्व रथ घेऊन इतस्ततः धावूं लागले. तें पाहून महापराक्रमी द्रोणानें पांचाल व सृंजय यांना शरवृष्टीनें त्रस्त करून पळवून लावलें. याप्रमाणें त्यांचा पराभव करून तो यशस्वी आचार्य पुनः आपल्या व्यूहांत येऊन

उभा राहिला. तें पाहून पांडवांना द्रोणाला जिंकण्याचा उत्साह राहिला नाहीं. ७. ५. १२२.

---

## अध्याय १२३ वा.

[ १ दुःशासन-सात्यकियुद्ध. २ दुःशासनाचा पराजय. ]

(१) संजय—राजा, इकडे दुःशासन जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें शरवृष्टि करीत सात्यकीवर धांवला व त्यानें त्यावर असंख्य बाणांची वृष्टि केली. पण तो शिनिश्रेष्ठ यत्किंचित्हि कंपित न होतां मैनाकपर्वताप्रमाणें निश्चल राहिला आणि तुझ्या सैन्यावर बाणांचा वर्षाव करूं लागला. त्यानें आपल्या सिंहनादानें दश-दिशा निनादित केल्या. तेव्हां दुःशासनाचे अनुयायी त्याची उपेक्षा करून स्वतःचा जीव घेऊन पळत सुटले. तथापि दुःशासन मात्र भ्रान्त न होतां सात्यकीवर निर्भयपणें शरांची वृष्टि करीत होता. त्यानें सात्यकीचे अश्व व सारथि यांस विद्ध करून शंभर बाणांनीं त्यालाहि विद्ध केलें आणि प्रचंड सिंहनाद केला.

हे महाराज, तुझ्या पुत्राची ती गर्जना ऐकून सात्यकि अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें आपल्या शरजालानें दुःशासनाचा रथ, सारथि व ध्वज आच्छादून टाकिला. मक्षिकादि कीटक समीप आले असतां ऊर्णनाभि (षटपद-कोळी) जसा आपलें जाळें पसरून त्या कीटकाला बद्ध करून टाकितो, तसें सात्यकीनें दुःशासनाला शरजालांनीं बद्ध केलें.

दुःशासन असंख्य शरांनीं विद्ध झाला आहे, हें पहातांच दुर्योधनानें त्रिगर्तांस युयुधानाच्या रथाकडे जाण्याची आज्ञा केली. तेव्हां तीन हजार युद्ध-विशारद त्रिगर्त सात्यकीच्या समीप आले. त्या क्रूर योद्धयांनीं आपल्या रथ-समुदायांनीं सात्यकीच्या रथाला वेढा दिला. तथापि ते सात्यकीच्या समीप येत असतां अग्रभागीं असलेले पांचशें वीर त्या शैनेयाच्या बाणांनीं गतप्राण झाले व प्रचंड झंझावातानें जसे पर्वतावरून वृक्ष पडावे, तसे भूमीवर पडले. हे महाराज, कर्दमांत रुतलेल्या गजांप्रमाणें त्या वीरांना कोणी त्राता न दिस-ल्यामुळें बिळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें ते सर्व योद्धे मोठ्या स्वरेनें द्रोणाच्या रथाकडे पळाले.

याप्रमाणें पांचशें वीरांचा वध केल्यानंतर सात्यकि सावकाश अर्जुनाच्या रथाकडे निघाला. तेव्हां दुःशासनानें त्याच्यावर बाणवृष्टि केली. पण सात्यकीनें उलट शर सोडून त्याचें धनुष्य तोडून टाकिलें व तो हंसतच अर्जुनाकडे जाण्यास निघाला. तें पाहून दुःशासन संतापला आणि त्यानें त्याचा प्राण घेण्याच्या इच्छेनें 'सर्वपारसवी'-नामक शक्ति त्याच्यावर सोडिली. पण तुझ्या पुत्राच्या त्या घोर शक्तीचा सात्यकीनें एका शरानेंच छेद केला. तेव्हां तुझ्या पुत्रानें दुसरें धनुष्य घेऊन सात्यकीला विद्ध केलें.

त्यावेळीं सात्यकि अतिशय चवताळला. त्यानें तुझ्या पुत्राला मोहित करून अग्निज्वालेसारख्या प्रदीप्त शरांनीं त्याचें वक्षःस्थल विद्ध केलें व त्या दोघांचें दारुण युद्ध जुंपलें. सात्यकीनें दुःशासनाचे कांहीं बाण सहन केल्यावर तीक्ष्ण शरांनीं त्याचे अश्व व सारथि यांना गतप्राण केलें. नंतर त्याचें धनुष्य, हस्तकवच, ध्वज व रथशक्ति यांचा छेद केला व शेवटीं दोन्ही पार्ष्णिसारथ्यांस यमालयीं पाठविलें.

( २ ) याप्रमाणें तुझ्या पुत्राचें धनुष्य तुटून रथ भग्न झाला. अश्व व सारथिहि गतप्राण झाले. हें पहातांच त्रिगर्तांच्या सेनापतीनें त्याला आपल्या रथांत घालून दूर नेलें. त्यावेळीं सात्यकीनें क्षणमात्र त्याचा पाठलाग केला. पण भीमसेनाची प्रतिज्ञा स्मरून त्याच्या वधाचा विचार सोडून दिला. हे राजन्, भीमसेनानें तुझ्या सर्व पुत्रांचा वध करण्याची सभेंत प्रतिज्ञा केली आहे, हें तुला अवगत असेलच. अशा प्रकारें दुःशासनाला जिंकून तो प्रतापवान् सात्यकि धनंजयाच्या मार्गाला मोठ्या त्वरेनें अनुसरला. ७. ५. १२३.

---

## अध्याय १२४ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न व संजयाचें उत्तर. २ प्रश्नपूर्वक दुर्योधनाच्या पराक्रमाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, सात्यकीचें निवारण करील, असा कोणीच महारथ माझ्या सैन्यांत नव्हता का ? महेंद्रानें केलेल्या दानवांच्या पराभवाप्रमाणेंच इंद्रतुल्य पराक्रमी सात्यकीनें माझ्या सैन्याचा पराजय केला ना ! त्या एकट्या सत्यपराक्रमी वीरानें अनेक सैनिकांचें कदन केलें ना ! किंवा तो वीर ज्या मार्गानें गेला, तो मार्ग शून्य तर नव्हता ना ! अनेक महान् महान्

थोडें युद्ध करीत असतांना त्या विपुलांच्या हातून तो एकटा महारथ कसा निसटला ! तें मला सांग.

संजय—हे महाराज, या संग्रामांत तुझ्या चतुरंग सैन्यानें आपली पराकाष्ठा केली. त्यांनीं प्रलयकालाप्रमाणें तुमुल युद्ध केलें. प्रतिदिवशीं जेव्हां तुझ्या सैन्यसमूहाची गणना होत असे तेव्हां अशा प्रकारचा सैन्यसमूह पृथ्वी- तलावर पूर्वी कधींहि एकत्र जमला नसेल, असें मला वाटलें.

तेथें जमलेले देव आणि चारण हेंहि म्हणत असत कीं, पृथ्वीतलावर हा शेवटचाच सैन्यसमूह आहे. हे राजन्, जयद्रथवधाच्या दिवशीं द्रोणाचार्यांनें असा दुर्गम व्यूह रचिला होता, तसा पूर्वी कोठेंहि व कधींहि दृष्टीं पडला नसेल. समुद्राच्या लाटा उसळत असतां जसा भयंकर ध्वनि होत असतो, तसा परस्परांवर प्रहार करणाऱ्या त्या सैन्यसंघाचा प्रचंड शब्द कानीं येत होता. वीरांच्या गर्जना ऐकून अंगावर रोमांच उभे रहात होते.

हे मारिषा, त्यानंतर भीमसेन, धृष्टद्युम्न, माद्रेय व युधिष्ठिर यांनीं मोठ्यानें गर्जना करीत सैनिकांना अशी आज्ञा केली—" हे वीरहो, सत्वर चला, प्रहार करा, सात्यकि व अर्जुन शत्रुसैन्यांत शिरले आहेत. त्यांना जयद्रथाच्या रथापर्यंत निर्विघ्नपणें जाऊन पोंचूं द्या. "

याप्रमाणें सैनिकांना आज्ञा करून ते पुनः म्हणाले—" या दोघांच्या अभावीं कौरव कृतार्थ होतील आणि आपण जिंकले जाऊं, यास्तव तुम्ही सर्व एकत्र जमून सागराला क्षुब्ध करणाऱ्या पवनाप्रमाणें या बलार्णवाला क्षुब्ध करा. "

भीमसेन व पांचाल यांनीं अशी प्रेरणा केली असतां तें सर्व सैन्य आपल्या प्रिय प्राणांचाहि लोभ सोडून शत्रुसेनेवर तुटून पडलें. ते स्वर्गाची इच्छा करणारे वीर युद्धामध्यें शस्त्रप्रहारानें मृत्यु पावण्यास तत्पर झाले होते. मित्रकार्या- पुढें त्यांना स्वतःच्या जीवितांचेंहि महत्त्व वाटत नव्हतें. महद्यशाची आकांक्षा बाळगणारे कौरव वीरहि युद्धाच्या इच्छेनें उभे होते. त्या दोन्ही सैन्यांचें भया- वह तुमुल युद्ध जुंपलें.

इकडे सात्यकि जेव्हां त्या सर्व सैन्याला जिंकून अर्जुनाकडे चालला त्यावेळीं त्याच्या कवचावर सूर्याचे किरण पडल्यामुळें त्याची प्रभा सैनिकांच्या नेत्रांना दीपवीत होती. याप्रमाणें पांडवांचा शत्रूला जिंकण्याचा फार मोठा प्रयत्न

थाकला असतां दुर्योधनानें त्या प्रचंड सैन्याचें मंथन करून घोर संग्राम आरंभिला. त्यावेळीं सर्व भूतांचा महान् क्षय झाला.

( २ ) धृतराष्ट्र—हे संजया, याप्रमाणें माझीं सैन्यें पळून चाललीं असतां व दुर्योधन संकटांत सांपडला असतां त्यानें युद्धाला पाठ दाखविली नाहीं ना ? महायुद्धामध्यें एकट्या दुर्योधनाचें अनेक वीरांशीं युद्ध व्हावें, हें मला तर विपरीतच भासत आहे. हे सूता, तो माझा ज्येष्ठ पुत्र पृथ्वीचा अधिपति आहे. तो अतिशय सुखांत वाढलेला आहे आणि लक्ष्मीचा त्याच्यावर वरदहस्त आहे. तो नरपति अनेकांची गांठ पडली असतां युद्धपराङ्मुख तर झाला नाहीं ना ?

संजय—हे भारता, तुझ्या पुत्राचा अनेकांशीं आश्चर्यकारक संग्राम कसा झाला, तो वृत्तान्त लक्षपूर्वक ऐक.

राजा, कमलयुक्त सरोवराला तुडविणाऱ्या मत्त गजाप्रमाणें दुर्योधनानें पांडवसैन्याचें मर्दन केलें. तुझ्या पुत्रानें आपल्या सैन्याला त्रस्त केल्याचें पाहून भीमसेनादि पांडव व पांचाल मोठ्या वेगानें त्याच्यावर धांवून आले व त्यांचें दुर्योधनाशीं घनघोर युद्ध जुंपलें. दुर्योधनानें पांडवांच्या श्रेष्ठ श्रेष्ठ वीरांवर असंख्य बाणांची वृष्टि चालविली. तेव्हां क्रुद्ध झालेल्या धर्मराजानें दोन अर्धचंद्राकार बाण सोडून त्याच्या धनुष्याचा छेद केला व दहा अस्त्रयुक्त बाण त्याच्यावर सोडले. ते दुर्योधनाच्या कवचाला स्पर्श करून भूमींत शिरले. तें पाहून वृत्रवधाच्या वेळीं इंद्राच्या भोंवतीं जमणारे देव व महर्षि यांच्याप्रमाणें सर्व पांडव व पांचाल युधिष्ठिराच्या सभोंवार जमले.

हे राजन्, नंतर तुझ्या पुत्रानें दुसरें धनुष्य घेतलें व 'थांब थांब' असें म्हणत तो युधिष्ठिरावर चालून गेला. त्या वेळीं पांचाल मोठ्या हर्षानें तुझ्या पुत्रावर धांवले. परंतु मेघांचा निरोध करणाऱ्या पर्वताप्रमाणें दुर्योधनाचें रक्षण करणाऱ्या द्रोणाचार्यांनें त्यांचें निवारण केलें. त्यावेळीं पांडवांचा व तुझ्या पुत्रांचा दारुण संग्राम झाला. त्यांचें तें घोर युद्ध रुद्राच्या क्रीडेप्रमाणें प्राण्यांचा संहार करणारें व अंगावर रोमांच आणणारें होतें.

इतक्यांत जेथें अर्जुन होता, त्या बाजूनें फार मोठा कोलाहल ऐकूं आला. अर्जुन व कौरववीर यांच्या लोमहर्षणकर गर्जना आणि भारतीसेनेच्या मध्यभागीं असलेला सात्यकि व व्यूहाच्या मुखाशीं असलेला द्रोण यांचे प्रचंड

सिंहनाद यांनीं दाही दिशा दुमदुमून गेल्या आणि त्या क्रुद्ध झालेल्या महारथांचा दारुण संग्राम प्रवृत्त झाला. ७. ५. १२४.

---

## अध्याय १२५ वा.

[ १ द्रोणपराक्रम. २ बृहत्क्षत्राचा वध. ३ धृष्टकेतूचा वध. ४ जरासंधपुत्राचा वध. ५ क्षत्रधर्म्याचा वध. ६ चेकितानाचा पराभव. ]

( १ ) संजय—हे महाराज, अपराह्णकालीं पुनः फार मोठा संग्राम झाला. द्रोण व सोमक यांचें युद्ध जुंपून पर्जन्यासारखा प्रचंड निर्घोष होऊं लागला. आचार्य आपला रथ मध्यमवेगानें चालवीत पांडवांवर चालून गेला. तुझ्या पुत्रांचें प्रिय व हित करण्यांत तत्पर असलेला द्रोण रणांगणांत जणुकाय क्रीडाच करीत होता.

( २ ) त्यावेळीं केकयांचा ज्येष्ठ भ्राता महारथ बृहत्क्षत्र द्रोणावर धांवला. त्यानें गंधमादनपर्वतावर वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें द्रोणाला शरवृष्टीनें अतिशय पीडा दिली. तेव्हां त्रस्त झालेल्या आचार्यानें त्याच्यावर तीक्ष्ण बाण सोडिले, पण बृहत्क्षत्रानें हंसतच त्यांचा छेद केला. त्याचें तें हस्तलाघव पाहून तुझे सैनिक विस्मित झाले. बृहत्क्षत्राचें तें दुष्कर कर्म पाहून द्रोणानें दुर्जय ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. पण केकयानें उलट ब्रह्मास्त्रानेंच तें शांत केलें. तेव्हां द्रोणानें त्याच्यावर नाराच बाण सोडिला. तो बाण बिळांत शिरणाऱ्या कृष्णसर्पाप्रमाणें बृहत्क्षत्राच्या कवचाचा भेद करून भूमींत शिरला.

नंतर भारद्वाजानें बृहत्क्षत्राचे चार अश्व व सारथि यांचा वध करून त्याचा ध्वज व छत्र यांचा छेद केला आणि शेवटीं एका बाणानें त्याचें हृदय विदीर्ण करून त्याला यमसदनीं पाठविलें.

( ३ ) याप्रमाणें बृहत्क्षत्र गतप्राण होऊन पडतांच शिशुपालाचा पुत्र क्रोधसंतप्त झाला व सारथ्यास म्हणाला—"हे सारथे, हा कवचधारी द्रोण केकयपांचालसैन्याचा संहार करीत आहे, तेथें सत्वर चल."

त्याची ती आज्ञा ऐकतांच त्या सूतानें आपल्या कांबोज देशांतील जातिवंत अश्वांना प्रेरणा केली व धृष्टकेतूला द्रोणाच्या रथासमीप आणिलें. तेव्हां तो धृष्टकेतु अग्नीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें द्रोणावर तुटून पडला. निजलेल्या व्याघ्राला जसें डंवचावें, तसें त्यानें द्रोणावर शर सोडून त्याला क्षुब्ध

केलें. त्या बलाढ्य वीराचें हें साहस पाहून आचार्यांनें एकाच बाणानें त्याचें धनुष्य तोडून टाकिलें. पण त्या शिशुपालपुत्रानें लगेच दुसरें धनुष्य घेऊन पुनः द्रोणावर शरवृष्टि चालविली. त्याचा तो उत्साह पाहून द्रोणानें हंसतच चार बाणांनीं त्याचे अश्व व एका बाणानें सारथि यांना गतप्राण केलें.

त्यावेळीं त्या चैद्यानें आपली गदा हातांत घेऊन रथांतून उडी टाकली व चवताळलेल्या भूजंगीप्रमाणें ती आचार्यांवर फेंकली. ती लोखंडाची जड गदा कालरात्रीप्रमाणें आपल्याकडे येत आहे, हें पहातांच भारद्वाजानें सहस्रावधि तीक्ष्ण बाण सोडून त्या गदेचे तुकडे करून टाकिले. ती दारुण गदा भग्न होऊन जेव्हां खालीं पडली, तेव्हां भूमीहि कंप पावली.

आपल्या गदेचा नाश झालेला पाहून अमर्षी धृष्टकेतूनें सुवर्णानें अलंकृत केलेली उज्ज्वल शक्ति व तोमर द्रोणावर फेंकला. पण आचार्यांनें त्यांचाहि नाश केला व धृष्टकेतूच्या वधार्थ एक अतिशय तीक्ष्ण बाण सोडला. तो अति वेगवान् बाण धृष्टकेतूचें कवच व हृदय यांचें विदारण करून पद्मवनांत शिरणाऱ्या हंसाप्रमाणें धरणीवर पडला. क्षुद्र पतंगाला ग्रासणाऱ्या बुभुक्षित चाषपक्ष्याप्रमाणें द्रोणानें धृष्टकेतूला ग्रस्त केलें.

याप्रमाणें तो चेदिपति वध पावला असतां त्याच्या दिव्यास्त्रवेत्त्या पुत्रानें आपल्या पित्याच्या सेनेचें आधिपत्य स्वीकारलें. पितृवधामुळें तो अतिशय क्रुद्ध झाला होता. परंतु एखादा बलाढ्य वाघ घोर अरण्यांतील मृगशिशूला जसा यमालयीं पाठवितो, त्याप्रमाणें द्रोणानें त्यालाहि हंसतच परलोक दाखविला.

( ४ ) हे भारता, याप्रमाणें पांडवांच्या वीरांचा क्षय होत आहे, हें पाहून जरासंधाचा शूर पुत्र द्रोणावर चालून गेला आणि सूर्याला झांकून टाकणाऱ्या मेघाप्रमाणें त्या बलाढ्य राजपुत्रानें द्रोणाला शरांनीं आच्छादित केलें. त्याचें तें हस्तलाघव पाहून द्रोणानें त्याच्यावर सहस्रावधि बाणांची वृष्टि केली व शेवटीं सर्व क्षत्रियांच्या समक्ष त्याचा वध केला. काल येतांच सर्व प्राण्यांचा संहार करणाऱ्या अंतकाप्रमाणें द्रोण त्या संग्रामांत पुढें येणाऱ्या सर्व वीरांचे प्राण हरण करीत होता. द्रोणाच्या पराक्रमापुढें पांचाल थरथरां कांपूं लागले. पांचाल भयभीत झाल्याचें पहातांच चेदी, सृंजय व काशि-कोसल हर्षभरानें भारद्वाजावर धांवून आले. 'द्रोणाचा वध करा, द्रोणाचा प्राण घ्या' अशी गर्जना करीत ते सर्वजण आचार्यांवर तुटून पडले.

याप्रमाणें द्रोणाला यमसदनीं पाठविण्याचा यत्न करणारे ते सर्व वीर आपली पराकाष्ठा करीत असतां भारद्वाजानें त्यांस–विशेषेंकरून चेदिदेशांतील योद्ध्यांस तीक्ष्ण बाणांनीं यमसदनीं पाठविलें. त्या वीरांचा क्षय होत आहे, हें पहातांच पांचालांचा थरकांप झाला. द्रोणाचें तें दुष्कर कर्म पाहून ते भीमसेन व धृष्टद्युम्न यांस मोठमोठ्यानें हांका मारूं लागले.

ते वीर म्हणाले—अहो, या ब्राह्मणानें दुश्चर तप आचरिलें आहे. त्याचप्रमाणें हा द्विजश्रेष्ठ क्रुद्ध होऊन क्षत्रियपुंगवांना रणामध्यें दग्ध करीत आहे. धर्मयुद्ध हें क्षत्रियांचें कर्म असून तपश्चर्या हें ब्राह्मणांचें कर्म आहे. परंतु हा भारद्वाज तपस्वी असून कृतास्त्रहि आहे. तो आम्हांला केवळ दृष्टिक्षेपानेंच दग्ध करून टाकील. या द्रोणरूपी अग्नींत अनेक क्षत्रियवीर दग्ध झाले आहेत. कोणी कितीहि बलाढ्य असो, उत्साही असो किंवा पराक्रमी असो. हा महातेजस्वी आचार्य त्या सर्वांस मोहित करून आमच्या सैन्याचा संहार करीत आहे.

( ५ ) हे मारिषा, त्यांचें हें भाषण ऐकून क्षत्रधर्मा पुढें सरसावला व त्यानें अतिशय क्रुद्ध होऊन एका अर्धचंद्र बाणानें द्रोणाचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां द्रोण अधिकच चवताळला, त्यानें दुसरें धनुष्य धारण केलें, त्याला एक तीक्ष्ण बाण जोडला व त्या बाणानें क्षणार्धांत क्षत्रधर्म्याला गतप्राण करून भूमीवर पाडविलें. तो धृष्टद्युम्नाचा पुत्र मृत होऊन पडतांच पांडवांचीं सर्व सैन्यें थरथरां कापूं लागलीं.

( ६ ) नंतर महाबलाढ्य चेकितान द्रोणावर चालून आला. त्यानें द्रोणाच्या सारथ्याला व अश्वांना विद्ध केलें. तेव्हां द्रोणानें त्याचा ध्वज पाडविला, त्याला विद्ध केलें व त्याच्या सारथ्याचा वध केला. सारथि मृत होऊन पडतांच त्याचे अश्व रथ घेऊन इतस्ततः धांवूं लागले. इतक्यांत द्रोणानें त्यांनाहि गतप्राण केलें. याप्रमाणें चेकितानाला विरथ करून त्या भारद्वाजानें चेदि, पांचाल व सृंजय यांना उधळून लाविलें.

हे महाराज, ज्याचे शुभ्र केस कानावर लोंबत आहेत व ज्याचें वय चारशें वर्षांचें आहे, ( म्ह० जो अतिशय वृद्ध झाला आहे, ) तो श्यामवर्ण द्रोणाचार्य एखाद्या सोळा वर्षांच्या तरुणाप्रमाणें त्या रणांगणांत संचार करीत होता. तो शत्रुसूदन द्रोण निर्भयपणें त्या रणांगणांत इतस्ततः फिरत असतां वज्रहस्त वासवाप्रमाणें भासला.

त्यावेळीं बुद्धिमान् द्रुपदराजा म्हणाला—"व्याघ्र जसा क्षुद्र मृगांचा वध करितो, त्याप्रमाणें हा लुब्ध होऊन क्षत्रियांचा संहार करीत आहे. ज्याच्या लोभामुळें हे सर्व श्रेष्ठ क्षत्रिय मृत होऊन पडले आहेत तो दुर्मति पापी दुर्योधन क्लेशमय लोकांना प्राप्त होईल. हे शेकडों वीर बलि दिलेल्या वृषभांप्रमाणें भूमीवर पडले आहेत व श्रृगालादि त्यांचें भक्षण करीत आहेत."

हे महाराज, असें बोलून तो अक्षौहिणीपति द्रुपद पांडवांचा पुरस्कार करून द्रोणावर धांवून गेला. ७. ५. १२५.

---

## अध्याय १२६ वा.

[ १ युधिष्ठिराची चिंता. २ भीम-युधिष्ठिर संवाद. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें पाडवांच्या सैन्याचा पराभव झाला असतां पांडव, पांचाल व सोमक तेथून दूर पळाले. द्रोणानें गर्जना करीत युगान्ताप्रमाणें लोमहर्षण युद्ध सुरू केलें. पंचालांची संख्या कमी होऊं लागली व पांडवांच्या सैन्याचा क्षय होऊं लागला. तें पाहून धर्मराजाला अतिशय चिंता वाटूं लागली. त्यानें अर्जुनाला पहाण्यासाठीं दश-दिशांत दृष्टि फिरविली. परंतु अर्जुन व माधव हे दोघेहि त्याच्या दृष्टीं पडले नाहींत. गांडीवाचा टण-त्कारहि कानीं येईनासा झाला. तेव्हां तर त्याचें मन अतिशय अस्थिर झालें. वृष्णिश्रेष्ठ सात्यकिहि न दिसल्यामुळें त्याला स्वास्थ्य वाटेनासें झालें. ते दोघे नरोत्तम न दिसल्यामुळें त्याच्या मनाची शांति नाहींशी झाली.

युधिष्ठिरानेंच सात्यकीला अर्जुनाच्या रक्षणार्थ पाठविलें असल्यामुळें, तोहि जेव्हां त्याला दिसेनासा झाला, तेव्हां त्या उदार मनाच्या धर्मराजाच्या मनांत लोकापवादाचें भय उत्पन्न झालें. तो मनांत असें म्हणूं लागला कीं, मित्रांना अभय देणाऱ्या या सत्यप्रतिज्ञ सात्यकीला मीं अर्जुनाच्या साह्यार्थ पाठविलें खरें. पण त्यामुळें मीं एकाच्या जागीं दोन संकटें मात्र ओढवून घेतलीं. आतां मला सात्यकीचा शोध केला पाहिजे व अर्जुनाचीहि वार्ता आणविली पाहिजे. अर्जुनाच्या रक्षणार्थ मीं सात्यकीला पाठविलें; पण आतां सात्यकीच्या शोधार्थ कोणाला पाठवूं! मीं जर एकट्या धनंजयाचाच शोध चालविला तर लोक मला दूषण देतील.

'युधिष्ठिरानें आपल्या भ्रात्याचा शोध केला, पण सात्यकीची उपेक्षा केली' अशा लोकापवादाचें मला अतिशय भय वाटतें. यास्तव वृकोदराला महात्म्या सात्यकीच्या शोधार्थ पाठवावें, हें बरें. अर्जुनावर माझें जेवढें प्रेम आहे, तेवढेंच सात्यकीवरहि आहे. खरोखर शैनेयावर मीं हा फार मोठा भार टाकला. तो महाबलाढ्य वीरहि मित्रप्रेमामुळें व कांहींसें, माझा मान ठेवण्यासाठींहि सागरांत प्रवेश करणाऱ्या मकराप्रमाणें या भारतीसेनेंत शिरला. त्या धीमान् वृष्णिवीराशीं युद्ध करणाऱ्या व युद्धांतून निवृत्त न होणाऱ्या शूरांचा शब्द ऐकूं येत आहे. यास्तव ते दोघे महारथ ज्या बाजूला गेले आहेत, तेथेंच भीमानेंहि जावें, असें मला वाटतें.

सांप्रतच्या प्राप्तकालीं भीमसेनाला तेथें पाठविण्याचा मीं दृढ निश्चय केला आहे. भीमसेनाला या भूलोकीं कोणतीच गोष्ट असह्य नाहीं. रणामध्यें सर्व धनुर्धरांचे प्रहार सहन करण्यास तो समर्थ आहे. ज्या महात्म्याच्या बाहुबलाचा आश्रय करून आम्ही सर्व वनांतून सुरक्षित बाहेर पडलों व युद्धांत जिंकलों गेलों नाहीं, तो भीमसेन सात्वताकडे गेला असतां रणांगणांत सात्वत व फाल्गुन हे दोघे सनाथ होतील.

वस्तुतः शस्त्रविशारद वासुदेव त्या उभयतांचें रक्षण करीत असतां त्यांच्याविषयीं चिंता वहाण्याचें कारण नाहीं. परंतु मला स्वतःच्या समाधानासाठीं त्याला अवश्य पाठविलें पाहिजे. यास्तव मी भीमसेनाला सात्यकीच्या मागोमाग जाण्यास सांगतों. त्यायोगें सात्यकीविषयीं मीं आपलें कर्तव्य केलें, असें समजेन.

(२) याप्रमाणें मनांत निश्चय करून धर्मराज युधिष्ठिर आपल्या सारथ्याला 'मला भीमाकडे ने' असें म्हणाला. युधिष्ठिराची ती आज्ञा ऐकतांच अश्वशिक्षाविशारद सारथ्यानें त्याचा सुवर्णानें भूषविलेला रथ मोठ्या त्वरेनें भीमाजवळ नेला. वृकोदराजवळ जाऊन पोंचतांच आतां आपल्याला कोणतें प्राप्तकाल कर्तव्य केलें पाहिजे, हें मनांत येऊन तो खिन्न झाला व भीमास हांक मारून म्हणाला.

युधिष्ठिर—"हे भीमसेना, ज्यानें केवळ एका रथानें देव, गंधर्व व दैत्य यांना जिंकलें, तो तुझा भ्राता धनंजय कुशल असल्याचें कांहींच चिह्न मला दिसत नाहीं."

याप्रमाणें चिंतातुर होऊन समीप आलेल्या धर्मराजाचें हें वचन ऐकून भीमसेन त्याला म्हणाला—" हे राजेंद्रा, तुला अशाप्रकारें खेद झालेला आम्हीं कधीं पाहिला नव्हता किंवा ऐकलाहि नव्हता. उलट पूर्वी आम्ही जेव्हां दुःखाकुल होत असूं, तेव्हां तूंच आम्हांला धीर देत होतास. हे मानदा ऊठ, ऊठ. मीं काय करावें याची मला आज्ञा कर. मला कोणतेंच कार्य अशक्य नाहीं. यास्तव हे कुरुश्रेष्ठा, मला आज्ञा कर. व्यर्थ दुःख करूं नकोस."

भीमसेन असें बोलला असतां ज्याचें मुख म्लान झालें आहे व नेत्र अश्रूंनीं भरले आहेत, असा युधिष्ठिर कृष्णसर्पाप्रमाणें दीर्घ निःश्वास सोडून म्हणाला—हे भीमा, ज्याअर्थी वासुदेवाच्या पांचजन्याचा निःस्वन ऐकूं येत आहे, त्याअर्थी तुझा भ्राता धनंजय युद्धांत हत होऊन पडला असावा आणि हा जनार्दन युद्ध करीत असावा, असें मला वाटत आहे. अरे, ज्याच्या पराक्रमावर पांडव जिवंत राहिले आहेत व संकटप्रसंगीं इंद्राच्या आश्रयाला जाणाऱ्या देवांप्रमाणें आम्ही ज्याच्याकडे जात होतों, तो शूर अर्जुन सैंधवाला गांठण्याच्या इच्छेनें भारतीसेनेंत शिरला आहे. त्याचें तें गमन कायमचेंच झालें, तो आतां परत येईल, असें मला वाटत नाहीं. अरे अरे, तो माझा श्यामवर्ण गुडाकेश मत्त गजासारखा पराक्रमी होता. ज्याचें नांव ऐकतांच शत्रूची भीति वाढत असे तो पार्थ माझ्या या शोकाचें निमित्त आहे.

बा वृकोदरा, तुझें कल्याण असो, सात्यकि व अर्जुन यांच्या विचारानें माझें मन पुनः पुनः शोकाकुल होत आहे. हविर्द्रव्यानें वृद्धिंगत होणाऱ्या अग्नीप्रमाणें माझा शोक वाढत आहे. पार्थाच्या अस्तित्वाचें कांहींच चिह्न दिसत नाहीं. त्यामुळें माझा विषाद दूर होत नाहीं.

यास्तव बा भीमा, तुला जर माझें वचन मानणें हें तुझें कर्तव्य वाटत असेल, तर जेथें अर्जुन व सात्यकि गेले आहेत, तेथें तूंहि जा. तूं धर्मज्ञ आहेस व मी तुझा ज्येष्ठ भ्राता आहें. माझें वचन मानणें, हें तुझें कर्तव्य आहे, तुला धनंजयापेक्षां सात्यकीचें महत्त्व अधिक वाटलें पाहिजे. कारण केवल माझें प्रिय करण्यासाठींच तो महात्मा त्या दुर्गम मार्गानें गेला आहे. बा पार्था, उभय कृष्णार्जुन व सात्यकि यांचें कुशल आहे, असें दिसतांच तूं मोठ्यानें सिंहनाद कर. मी तें त्यांच्या स्वास्थ्याचें चिह्न समजेन. ७. ५. १२६.

---

## अध्याय १२७ वा.

[ १ भीमाची कौरवसेनेंत जाण्याची सिद्धता. २ भीमाचें शत्रुसैन्यांत गमन. ]

( १ ) **भीमसेन**—हे धर्मराजा, पूर्वी ब्रह्मदेव, महेश, इंद्र व वरुण हे ज्या रथांत बसून गेले होते, त्याच श्रेष्ठ रथांतून आतां कृष्णार्जुन गेले आहेत. त्या उभयतांच्या जीवितास यत्किंचित्‌हि भय नाहीं. तथापि तुझी आज्ञा शिरसा मान्य करून रणांगणांत जाण्यास हा मी निघालोंच. तूं शोक करूं नको. त्यांची गांठ पडतांच मी तुला सूचना देईन.

**संजय**—हे धृतराष्ट्रा, असें बोलून बलाढ्य भीमसेनानें युधिष्ठिरास धृष्टद्युम्न व इतर सुहृद् यांच्या स्वाधीन केलें, त्याचें अत्यंत दक्षतेनें संरक्षण करण्याविषयीं त्यांस पुनः पुनः सांगून तो जाण्यास निघाला. जाण्यापूर्वी तो धृष्टद्युम्नाला म्हणाला—"हे महाबाहो, अनेक यत्न करून धर्मराजाला धरून नेण्याची द्रोणाची प्रतिज्ञा तुला ठाऊकच आहे. यास्तव येथें राहून राजाचें संरक्षण करण्याची जेवढी आवश्यकता आहे, तेवढी रणांगणांत अर्जुनाकडे जाण्याची नाहीं. तथापि धर्मराजाचें वचन नाकारण्याची माझी इच्छा नाहीं. केवळ त्याच्या आज्ञेसाठीं मी त्या मुमुर्षु सैंधवाकडे जात आहें व जेथें तो सात्वत व अर्जुन आहे तेथें मी निश्चयानें जाऊन पोंचेन. कोणतीहि शंका न घेतां धर्मराजाचें वचन मान्य करणें, हें आपलें कर्तव्य आहे. यास्तव मी येथून जातों. पण तूं आज अतिशय सावध राहून धर्मराजाचें संरक्षण कर. राजाचें संरक्षण हेंच युद्धांतील श्रेष्ठ कर्तव्य आहे."

भीमाचें हें भाषण ऐकून धृष्टद्युम्न म्हणाला—"हे पार्था, मी तुझी सर्व मनीषा पूर्ण करीन. तूं कांहीं काळजी करूं नको. निःशंकपणें जा. या धृष्टद्युम्नाचा वध केल्यावांचून द्रोणाला धर्मराजाचा निग्रह करतां येणें कदापि शक्य नाहीं."

हे महाराज, याप्रमाणें धर्मराजाला धृष्टद्युम्नाच्या स्वाधीन करून भीमसेनानें ज्येष्ठ भ्रात्याला अभिवादन केलें व तो फाल्गुनाकडे जाण्यास निघाला. त्यावेळीं धर्मराजानें त्याला आलिंगन दिलें, त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व त्याला अनेक शुभ आशीर्वाद दिले.

नंतर भीमानें ब्राह्मणांना पूजनादि सत्कारांनीं संतुष्ट करून त्यांना प्रदक्षिणा घातली. अग्नि, धेनु, सुवर्ण, दूर्वा, गोरोचन, दूध, अक्षता व दहीं या आठ

मंगलकारक पदार्थांना स्पर्श केला आणि कैलातक मद्य प्राशन केलें. तेव्हां त्याचा उत्साह द्विगुणित झाला. मदानें नेत्र आरक्त झाले. नंतर ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन केलें.

त्यावेळीं वृकोदराला विजयसूचक शुभशकुन होऊं लागले. त्याच्या मनांत विजयानंदकारक विचार येऊं लागले. अनुलोम वायु वाहून त्याचा जय प्रदर्शित करूं लागले. त्यानंतर महाबलाढ्य भीमसेनानें अंगांत कवच चढवून शुभ कुंडलें धारण केलीं. त्या पांडुपुत्राचें तें लोहमय कवच कृष्ण-वर्णाचें असून त्यावर चित्र-विचित्र सोनेरी नक्षी काढलेली होती. त्यामुळें भीमाच्या अंगावरील तें दृढ कवच विद्युद्युक्त मेघांप्रमाणें चमकत होतें. त्या कुंतीकुमारानें पीत, रक्त, कृष्ण व शुभ्र वर्णाचीं वस्त्रें आपल्या अंगाभोंवतीं गुंडाळलीं असून मानेवर कंठत्राण धारण केलें होतें. त्यामुळें तो इंद्रधनुष्यानें युक्त असलेल्या मेघांप्रमाणें शोभत होता.

हे राजा, भीमसेन तुझ्या सैन्याकडे जाऊं लागला असतां पांचजन्याचा घोर निर्घोष पुनः कानीं आला. तो त्रैलोक्याला कंपित करणारा भयंकर शब्द ऐकून युधिष्ठिर भीमाला म्हणाला—" बा भीमा, वासुदेवानें वाजविलेला हा श्रेष्ठ शंख आपल्या प्रचंड ध्वनीनें सर्व पृथ्वी व अंतरिक्ष निनादित करीत आहे. त्यावरून सव्यसाची फार मोठ्या संकटांत सांपडला असून कृष्ण कौरवांशीं युद्ध करीत असावा, असेंच मला वाटतें. अरे अरे, आज आर्या कुंती, द्रौपदी, सुभद्रा व सर्व बांधव यांवर अशुभ प्रकार पहाण्याचा प्रसंग खरोखरच ओढ-वणार, असें दिसत आहे. यास्तव बा वृकोदरा, तूं अर्जुनाकडे सत्वर जा. सात्यकि व अर्जुन माझ्या कसे दृष्टीं पडतील, या चिंतेनें मला दिशा व उपदिशा यांचेंहि भान नाहींसें झालें आहे. "

( २ ) हे महाराज, याप्रमाणें ज्येष्ठ भ्रात्यानें ' जा, सत्वर जा ' अशी आज्ञा केली असतां तो महाप्रतापवान् पांडुपुत्र मोठ्या उत्साहानें शत्रुसैन्यांत शिरला. ज्येष्ठ भ्रात्यानें कनिष्ठ भ्रात्याच्या रक्षणार्थ पाठविलेला तो भीमसेन तलत्राण व धनुष्य धारण करून शत्रूवर धांवून गेला. त्यानें दुंदुभि वाजवून प्रचंड सिंहनाद केला, शंखध्वनि व धनुष्याचा टणत्कार यांनीं शत्रूंना भयभीत करून सोडलें. शत्रुसैन्याला त्रस्त करीत भीमसेन चालला असतां इंद्राला अनुसरणाऱ्या देवांप्रमाणें पांचाल व सोमक त्याच्या मागोमाग निघाले.

त्यांना पहातांच तुझ्या वीरांनीं त्यांचें निवारण केलें. दुःसह, दुःशल, चित्रसेन, कुंडभेदी, विविंशति, दुर्मुख, विकर्ण, शल, विंद, अनुसुमुख, दीर्घबाहु, सुदर्शन, वृंदारक, सुहस्त, सुषेण, दीर्घलोचन, अभय, रौद्रकर्मा, सुवर्मा व दुर्विमोचन हे वीर आपले अनुचर व सैन्य यांसह भीमावर तुटून पडले. त्या सर्वांनीं त्याला वेढून टाकिलें. तेव्हां त्या कुंतीपुत्रानें त्यांचें एकवार लक्षपूर्वक निरीक्षण केलें व क्षुद्र श्वापदांवर झडप घालणाऱ्या बलाढ्य सिंहाप्रमाणें तो त्यांच्याकडे वळला.

तेव्हां त्या वीरांनीं सूर्यास झांकून टाकणाऱ्या मेघांप्रमाणें अनेक महा अस्त्रांनीं भीमाला आच्छादित केलें. तथापि त्या शूर पांडवानें त्यांचें निवारण केलें व त्या वीरांचें उल्लंघन करून द्रोणसैन्याकडे गमन केलें. द्रोणसैन्याच्या अग्रभागीं गजसेना होती. तिच्यावर त्यानें शरांची वृष्टि केली व अल्पावकाशांतच तें गजसैन्य उधळून लाविलें. तेव्हां ते सर्व विह्वल झालेले हत्ती चीत्कार करीत इतस्ततः पळत सुटले.

नंतर भीमसेन पुनः द्रोणसैन्यावर चालून गेला. पण आचार्यानें सागराच्या वेलेप्रमाणें त्याचें निवारण केलें. त्या द्विजश्रेष्ठानें भीमाच्या ललाटावर एकच बाण मारला, तेव्हां तो वायुपुत्र किरणयुक्त सूर्याप्रमाणें शोभला. अर्जुनाप्रमाणें भीमहि आपला सन्मान करील, असें समजून आचार्य त्याला म्हणाला—" हे भीमा, तूं जरी अतिशय बलाढ्य आहेस, तरी मला जिंकल्यावांचून तुला कौरवसेनेंत प्रवेश करतां येणें शक्य नाहीं. तुझा पराक्रमी भ्राता माझ्या अनुमतीनेंच आंत गेला आहे. त्यालाहि जर स्वपराक्रमाच्या बलावर सैन्यांत प्रवेश करतां आला नाहीं तर तुला माझ्या सैन्यांत शिरतां येणें अगदीं अशक्य आहे. "

आचार्यांचें हें वचन ऐकून भीम निर्भयपणें उभा राहिला. क्रोधानें त्याचे नेत्र आरक्त झाले होते. तो तत्काल द्रोणाला तुच्छतेनें म्हणाला—" हे ब्रह्मबंधो, अर्जुनाला तुझी अनुमति घेण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. त्याला प्रतिबंध करील, असा या भूलोकीं कोण आहे ? तो महात्मा इंद्राच्या सैन्यांतहि प्रवेश करील. अरे त्यानें पूज्यभावानें तुझा सत्कार केला असेल. पण हे आचार्य, हा कांहीं दयाळु अर्जुन नाहीं. हा तुझा वैरी भीमसेन आहे !

वस्तुतः तूं आमचा आचार्य आहेस. त्यामुळें आम्हांला पितृतुल्य किंवा ज्येष्ठ भ्रात्यासमान पूज्य आहेस व आम्ही तुला पुत्रवत् आहों. खरोखर आम्ही

असेंच मानून तुझ्यापुढें हात जोडून उभे रहातों. परंतु आज तुझ्या वचनावरून विपरीत प्रकार दृग्गोचर होत आहे. तूं जर स्वतःला आमचा शत्रु समजत असशील, तर तसेंच कां होईना! शत्रूला उचित असेंच कर्म हा भीमसेन आज करून दाखवील."

असें बोलून भीमानें यमाच्या कालदंडाप्रमाणें असलेली आपली गदा गरगर फिरवून ती मोठ्या वेगानें द्रोणावर फेंकली आणि रथांतून खालीं उडी टाकून त्याचे अश्व, सारथि व ध्वज यांसह रथाचा नाश केला आणि वृक्षांचा विध्वंस करणाऱ्या वायूप्रमाणें अनेक योद्धयांना चिरडून टाकिलें. तेव्हां तुझ्या पुत्रांनीं पुनः त्या रथिश्रेष्ठास वेढलें.

इकडे द्रोणाचार्य दुसऱ्या रथावर आरूढ होऊन व्यूहद्वारावर येऊन उभा राहिला. क्रुद्ध झालेल्या भीमानें तुझ्या पुत्रांना जर्जर केलें. तेव्हां दुःशासन चवताळला व त्यानें पांडुपुत्राचा वध करण्याच्या इच्छेनें 'सर्वपारसवी-'नामक तीक्ष्ण रथशक्ति त्याच्यावर सोडली. तथापि भीमानें त्या प्रचंड शक्तीचे मार्गांतच तुकडे करून टाकले. तें पाहून सर्व लोकांना अतिशय आश्चर्य वाटलें.

नंतर संतप्त झालेल्या भीमसेनानें कुंडभेदी, सुशेण व दीर्घनेत्रा यांना तीनच बाणांनीं परलोकीं पाठवून दिलें. कौरवांचें यश वाढविणारा वृंदारक तुझे पुत्र युद्ध करीत असतां त्यांच्या समक्ष भीमाच्या बाणानें गतप्राण होऊन पडला. त्या वीरानें आणखीं तीन बाण सोडून अभय, रौद्रकर्मा व दुर्विमोचन या तुझ्या तिघां पुत्रांचा वध केला.

याप्रमाणें भीमसेनानें तुझ्या पुत्रांचा संहार चालविला असतां कौरवसेनेनें त्याला चोहोंकडून वेढून टाकिलें व वर्षा-ऋतूंतील मेघांप्रमाणें वृकोदरावर शरांचा वर्षाव चालविला. परंतु पर्वत जसा पाषाणांचीहि वृष्टि सहज सहन करितो, तसा भीमानें तो शरवर्षाव लीलेनें सहन केला. नंतर त्या बलाढ्य कौंतेयानें विंदानुविंद व तुझा पुत्र सुवर्मा यांस यमलोकीं पाठवून दिलें. त्यांच्या पाठोपाठच तुझ्या सुदर्शनपुत्राला गतप्राण केलें आणि क्षणार्धांत सर्व रथसैन्याला उधळून दिलें.

हे महाराज, भीमसेनानें असा संहार चालविला असतां रणांगणांत पराजय पावलेले तुझे पुत्र आपल्या रथघोषानें सर्व दिशा निनादित करीत व श्वापदांप्रमाणें आक्रोश करीत भीमाच्या भयानें पळत सुटले. तेव्हां वृकोदर त्यांचा

पाठलाग करीत त्यांना विद्ध करूं लागला. त्यावेळीं ते वीर भीमास सोडून आपले अश्व रणांगणांतून दूर नेत तेथून पळ काढूं लागले.

भीमानें कौरववीरांचा पराभव करून मोठ्यानें सिंहनाद केला, दंड थोपटले, तलशब्द केला, मोठमोठ्या योद्धयांस भयभीत केलें, अनेकांना गतप्राण केलें व नंतर द्रोणसैन्यावर वेगानें चाल केली. ७. ५. १२७.

---

## अध्याय १२८ वा.

[ १ भीमसेनाचा पराक्रम. २ युधिष्ठिराचा संतोष. ]

( १ ) संजय—हे महाराज, रथसैन्याचें उल्लंघन करून आलेल्या भीमाचें निवारण करण्यासाठीं द्रोणानें हंसतच त्याच्यावर शरवृष्टि केली. पण आचार्यांचे ते बाण जणुकाय प्राशनच करीत तो धार्तराष्ट्रांवर धांवून गेला. तेव्हां तुझ्या पुत्रांनीं प्रेरणा केलेल्या नृपालांनीं त्याचें चोहोंबाजूंनीं निवारण केलें. तथापि भीमानें यत्किंचित्‌हि भ्रांत न होतां आपली अतिशय दारुण गदा गरगर फिरवून वेगानें शत्रुसैन्यावर फेंकली व प्रचंड सिंहनाद केला.

वृकोदरानें वेगानें फेंकलेल्या त्या गदेनें तुझ्या सैन्याला विदीर्ण करून टाकिलें. आपल्या भीषण शब्दानें समग्र पृथ्वीला निनादित करणारी ती गदा जणुंकाय प्रज्वलित झाल्याप्रमाणें भासत होती. तिनें तुझ्या पुत्रांना भयभीत केलें. तिच्या सभोंवार तेजाचें वर्तुळ प्रकाशत होतें. अशाप्रकारची ती देदीप्यमान गदा महावेगानें येत आहे, हें पहातांच तुझे सर्व पुत्र आक्रोश करीत पळत सुटले. त्या गदेचा तो प्रचंड निःस्वन ऐकून पदाति चालतां चालतां पडले, रथी रथांतून खालीं आले व गदाधर भीम तुझ्या सैनिकांचें मर्दन करीत सुटला. त्यावेळीं व्याघ्राच्या वासानेंच पळणाऱ्या मृगांप्रमाणें तुझें सैन्य रणांगणांतून पळून गेलें. तुझ्या सैन्याला उधळून लावून भीमसेन पक्षिराज गरुडाप्रमाणें मोठ्या वेगानें त्या सैन्यांतून निघून गेला.

हे प्रभो, याप्रमाणें भीम पराक्रम गाजवीत असतां द्रोण त्याच्या संमुख येऊन उभा राहिला. त्या भारद्वाजानें भीमाचें निवारण केलें व त्या दोघांचें देवासुरांच्या संग्रामाप्रमाणें युद्ध जुंपलें. द्रोणानें पांडवांच्या सहस्रावधि योद्धयांचा संहार चालविला आहे, हें पाहून वृकोदर अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें रथा-

वरून उडी टाकली, नेत्र मिटले व तो पायांनींच द्रोणाकडे निघाला. आपले दोन्ही हात वक्षःस्थलावर दृढ धरून तो वीर मन किंवा वायु यांच्या गतीनें निघाला. त्यावेळीं द्रोणानें सारखा शरांचा वर्षाव चालविला होता. पण एखादा वृषभ जसा पर्जन्यवृष्टींत निश्चलपणें उभा रहातो, तसा तो नरर्षभ शरवृष्टि सहन करीत निर्भयपणें पुढें चालला. त्या बलाढ्य पांडवानें द्रोणाच्या रथापाशीं येऊन त्याचा रथदंड हातीं धरला व तो रथच उचलून दूर भिरकावून दिला.

भीमानें द्रोणाला दूर फेंकून दिलें असतां त्या आचार्यानें दुसऱ्या रथावर आरूढ होऊन तो रथ मोठ्या वेगानें व्यूहद्वाराकडे वळविला. ज्याचा उत्साह भग्न झाला आहे, असा तो आचार्य पुनः व्यूहद्वाराकडे परत येत आहे, हें पाहून भीमानें मोठ्या त्वरेनें त्याच्या रथाची धुरा धरली व तोहि रथ दूर फेंकून दिला. याप्रमाणें त्या क्रुद्ध वायुपुत्रानें आठ वेळां द्रोणाचे रथ सहज लीलेनें दूर उडवून दिले.

नंतर तो बलाढ्य भीम निमिषार्धांत आपल्या रथावर चढला. त्याचें हें अतिमानुष कर्म पाहून तुझे सर्व वीर आश्चर्यानें थक्क झाले. भीमसेन रथारूढ होतांच त्याच्या सारथ्यानें अश्वांना प्रेरणा केली व रथ तेथून काढून तुझ्या पुत्रांच्या सैन्याकडे चालविला. तेथें हार्दिक्य व कृतवर्मा यांच्या प्रमुखत्वाखालीं असलेल्या भोजसेनेला पराभूत करून तो तिच्यांतूनहि पार पडला. भोजसैन्याचें अतिक्रमण केल्यावर दरद व म्लेच्छ यांच्याहि सेनांचा पराभव करून तो पुढें निघाला. तेव्हां तेथें युद्ध करीत असलेला सात्यकि त्याच्या दृष्टीं पडला.

त्या शैनेयाला पहातांच भीमसेनानें आपला रथ वेगानें पुढें नेला. तेव्हां अर्जुनहि सैंधववधार्थ युद्ध करीत असल्याचें त्यानें पाहिलें. ते दोघे महारथी दिसतांच भीमसेनानें प्रचंड गर्जना केली. तो मेघगर्जनेसारखा भीमाचा सिंहनाद पार्थ व वासुदेव यांच्या कानीं पडला. तेव्हां त्याला पहाण्याच्या इच्छेनें त्या दोघांनींहि मोठ्यानें गर्जना केल्या आणि मत्त वृषभाप्रमाणें प्रचंड शब्द करीत वृकोदराकडे गमन केलें.

( २ ) हे महाराज, भीमसेन व धनंजय यांचा शब्द ऐकतांच धर्मराजाला अतिशय संतोष झाला. त्यांचा शब्द कानीं पडतांच त्याची चिंता नाहींशी

झाली व त्यानें पार्थाला युद्धांत जय मिळावा, असा आशीर्वाद दिला. मदोन्मत्त भीमाची गर्जना ऐकून धर्मज्ञ धर्मराज स्वतःशींच हंसला व मनांत म्हणाला—“ बा भीमा, तूं मज ज्येष्ठ भ्रात्याचें वचन मान्य करून रणांगणांतून मला सूचना दिलीस. खरोखर तूं ज्याचा शत्रु असशील, तो रणांगणांत कदापि विजयी होणार नाहीं. सत्यपराक्रमी सात्यकि व धनुर्धर धनंजय जिवंत आहेत, हें महद्भाग्य होय. कृष्णार्जुनांच्या गर्जना मला ऐकूं येत आहेत, हें केवढें सुदैव. ज्यानें रणांत इंद्राला जिंकून अग्नीला तृप्त केलें तो माझा फाल्गुन जिवंत आहे. ज्याच्या बाहुबलाच्या आश्रयानें आम्ही जिवंत राहिलों आहों, तो पार्थ विद्यमान आहे ही दैवाची कृपाच म्हणावयाची ! ज्या सव्यसाचीनें मत्स्यनगरींत गोग्रहणाच्या वेळीं सर्व कौरवांस जिंकलें, देवांनाहि दुर्जय असलेल्या निवातकवचांचा एका धनुष्यानें पराभव केला, चौदा हजार केकयांचा केवल आपल्या बाहुबलावर निःपात केला, दुर्योधनाला मुक्त करण्यासाठीं गंधर्वराजावरहि अस्त्रप्रयोग केला, तो मला अतिशय प्रिय असलेला भ्राता आज जिवंत राहिला, हा खरोखरच दैवयोग होय.

त्या धनुर्धरानें पुत्रशोकानें संतप्त होऊन दुष्कर कर्म करण्याची प्रतिज्ञा केली आहे. तो धनंजय युद्धांत सिंधुपतीचा वध करील काय ! वासुदेव ज्याचें रक्षण करीत आहे, तो पार्थ सूर्यास्तापूर्वी आपली प्रतिज्ञा पूर्ण करून मला भेटेल काय ! दुर्योधनाच्या हितांत रत असलेला सैंधव आज फाल्गुनाच्या हातून वध पावून शत्रूंना आनंद देईल काय ! अर्जुनानें युद्धांत जयद्रथाचा वध केल्याचें पाहून दुर्योधन आमच्याशीं शम करण्यास येईल काय ! भीमसेनानें रणांत धार्तराष्ट्रांचा संहार केलेला पाहूनहि दुर्योधनाला पश्चात्ताप होणार नाहीं काय ! मोठमोठ्या वीरांचें निधन व भीष्माचा अंत यांच्या योगानें तरी आमचें वैर नष्ट होईल काय ! अवशिष्ट राहिलेल्या लोकांच्या जीवितासाठीं तरी दुर्योधन शम करणार नाहीं काय !”

हे राजन्, याप्रमाणें कृपाळु अंतःकरणाचा युधिष्ठिर मनांत विचार करीत असतां दुसरीकडे घनघोर युद्ध चाललें होतें. ७. ५. १२८.

---

## अध्याय १२९ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ कर्णाचा पराजय. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, याप्रमाणें तो महाबलाढ्य भीमसेन मेघगर्जनेसारखा सिंहनाद करीत असतां माझ्या पक्षांतील कोणत्या वीरांनीं त्याचें निवारण केलें ! क्षुब्ध झालेल्या भीमापुढें युद्धांत उभा राहील, असा एकहि पुरुष मला या त्रैलोक्यांत दिसत नाहीं. कृतान्तकालासारखी गदा फिरविणाऱ्या भीमाला संग्रामांत तोंड देईल, असा कोणताच वीर मला आढळत नाहीं. तो वृकोदर रथावर रथ आपटून त्यांचें चूर्ण करून टाकितो. गजावर गज फेंकून त्यांना विदीर्ण करून सोडितो. त्याच्यापुढें कोणता योद्धा उभा राहूं शकेल! साक्षात् इंद्रहि त्याच्या पुढें येण्यास धजणार नाहीं. मग इतरांची काय कथा ?

भीमसेन क्रोधसंतप्त होऊन माझ्या पुत्रांचें कदन करीत असतां दुर्योधनाच्या हितांत तत्पर असलेले कोणते वीर पुढें सरसावले ! बा सूता, मला त्या भीमाचें जितकें भय वाटतें, तितकें अर्जुन, कृष्ण, सात्यकि किंवा धृष्टद्युम्न यांचेंहि वाटत नाहीं. यास्तव माझ्या पुत्रांना दग्ध करणाऱ्या या भीमरूपी प्रदीप्त अग्नीचें कोणीं निवारण केलें, तें मला सांग.

( २ ) **संजय**—हे राजन्, बलाढ्य भीमसेन भयानक गर्जना करीत असतां महाबलवान् कर्णहि तशाचप्रकारें प्रचंड गर्जना करीत त्याच्यावर धांवून गेला. त्या राधेयानें आपलें सामर्थ्य प्रकट करण्यासाठीं आपलें प्रचंड धनुष्य आकर्ण ओढलें व वायूचा निरोध करणाऱ्या पर्वताप्रमाणें भीमसेनाचा मार्ग अडवून धरला. तेव्हां वैकर्तनाला पुढें आलेला पहातांच भीमसेनहि चवताळला व त्याच्यावर तीक्ष्ण बाण सोडूं लागला. कर्णानेंहि उलट शरांचा वर्षाव चालविला.

याप्रमाणें त्या दोघां भ्रात्यांचा संग्राम चालला असतां इतर योद्धे स्वस्थ राहून पाहूं लागले. त्यावेळीं तें तुमुल युद्ध पाहूनच त्यांचा थरकांप झाला. त्यांचीं गात्रें शिथिल झालीं व ते भयभीत झाले. भीमाच्या सिंहनादानें पृथ्वी व अंतरिक्ष निनादित झालें. तो घोर शब्द ऐकून कांहीं क्षत्रियांचीं धनुष्यें खालीं पडलीं, कोणाचीं शस्त्रें गळून पडलीं व कित्येक नर केवल भीती-

नेंच गतप्राण होऊन पडले. गजाश्वादि वाहनें जागच्याजागींच भयार्त होऊन देहधर्म करूं लागलीं. घोर दुश्चिन्हें होऊं लागलीं. गृध्र, कंक, बलाका इत्यादि पक्ष्यांनीं अंतरिक्ष भरून गेलें.

इकडे कर्ण व भीम यांचें तुमुल युद्ध चालू असतां त्या उभयतांनीं परस्परांवर विपुल बाण सोडिले व त्या दोघांनींहि त्यांचा छेद चालविला. असा बराच वेळ परस्परांच्या शरांचा छेद केल्यावर भीमानें कर्णाचें धनुष्य तोडून टाकिलें. पण त्या राधेयानें तत्काल दुसरें नवें धनुष्य घेऊन भीमावर शरवृष्टि चालविली. तेव्हां त्या चवताळलेल्या वायुसुतानें सूर्यपुत्राच्या हृदयावर तीन तीक्ष्ण बाण सोडिले, त्यावेळीं तो वैकर्तन तीन शिखरांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें शोभला व धातुस्राव करणाऱ्या गैरिकपर्वताप्रमाणें त्याच्या क्षतांतून रक्तस्राव होऊं लागला.

याप्रमाणें विद्ध झालेला कर्ण कांहींसा भ्रान्त झाला. पण त्यानें तत्काल स्वतःला सांवरून भीमावर बाणांची वृष्टि चालविली. धनुर्धर कर्ण अशाप्रकारें पीडा देत असतां भीमानें त्याच्या धनुष्याची दोरी तोडून टाकिली. सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडविलें आणि चारी अश्वांना गतप्राण केलें. तेव्हां विरथ झालेल्या कर्णानें मोठ्या त्वरेनें वृषसेनाच्या रथांत उडी टाकिली.

अशा प्रकारें कर्णाचा पराभव करून भीमानें मेघगर्जनेप्रमाणें प्रचंड सिंहनाद केला. त्याची ती गर्जना ऐकतांच भीमानें कर्णाला पराभूत केलें असावें, असें निश्चयानें समजून धर्मराज अतिशय संतुष्ट झाला. पांडवसेनेंत शंखनाद होऊं लागला. त्यावेळीं शत्रुसैन्यांतील शंखनाद ऐकून तुझ्या सैनिकांनींहि मोठ्यानें शंख वाजविले. त्या शब्दांनीं हर्षयुक्त झालेला युधिष्ठिरहि मोठ्यानें सिंहनाद करूं लागला.

इतक्यांत अर्जुनानें गांडीवाचा टणत्कार केला व कृष्णानेंहि पांचजन्य वाजविला. परंतु भीमसेनाच्या गर्जनेपुढें त्यांचा ध्वनि लोपून गेला. वृकोदराची ती दारुण गर्जना सर्व सैन्यांत दुमदुमून राहिली. नंतर भीम व कर्ण दोघेहि अस्त्रप्रयोग करून परस्परांस विद्ध करूं लागले. कर्णानें आरंभीं मृदु स्वरूप ठेवलें होतें; पण भीमानें आरंभापासूनच उग्र स्वरूप धारण केलें होतें. ७. ५. १२९.

---

## अध्याय १३० वा.

[ १ दुर्योधन-द्रोणसंवाद. २ दुर्योधनयुद्ध. ]

**( १ ) संजय**—हे महाराज, इकडे अर्जुन, सात्यकि व भीमसेन हे तिघेहि पांडववीर सिंधुपतीकडे गेले असतां तुझें सैन्य भयभीत झालें. तुझा पुत्र दुर्योधन विचारमग्न झाला व मोठ्या त्वरेनें आपल्या वेगवान् रथांतून द्रोणाकडे आला. त्यावेळीं त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. तो अतिशय संभ्रमानें द्रोणाच्या समीप येऊन म्हणाला—"हे आचार्य, अर्जुन, भीम व सात्यकि मोठाल्या सैन्यांचें उल्लंघन करून सिंधुराजाच्या समीप जाऊन पोंचले. त्यांचें कोणीहि निवारण करूं शकलें नाहीं. तेथेंहि ते अद्यापि युद्ध करीत असून त्यांपैकीं कोणाचाहि पराजय झालेला नाहीं.

हे मानदा, अर्जुनानें जरी तुझें अतिक्रमण केलें असलें तरी सात्यकि व भीम हेहि तुझें उल्लंघन कसें करूं शकले! त्या तिघांनीं आपला पराभव करावा, ही गोष्ट समुद्रशोषणाप्रमाणेंच आश्चर्यकारक आहे! 'धनुर्विद्येंत पारग असलेले द्रोणाचार्य युद्धांत कसे जिंकले गेले?' असें सर्व लोक बोलत आहेत. तुझा पराजय सर्वांना अश्रद्धेय वाटत आहे. ज्याअर्थी पांडवांच्या तीन रथिश्रेष्ठांनीं तुझें उल्लंघन केलें, त्याअर्थी आज मज भाग्यहीनाचा नाश होणार, हेंच खरें.

हे गुरो, अशा स्थितींत तुझ्या मनांत काय आहे, तें तरी मला सांग. आतांपर्यंत जें झालें तें होऊन गेलें. पण यापुढें काय करावें त्याचा मनःपूर्वक विचार कर. सिंधुराजाच्या रक्षणासाठीं आतां आपण काय केलें पाहिजे याचा चांगला विचार करून सत्वर तशी योजना कर."

**द्रोण**—बा दुर्योधना, मीं पुष्कळ विचार करून पाहिला. परंतु सांप्रत आपलें कोणतें कर्तव्य आहे तें मी सांगतों ऐक. पांडवांचे तीन रथी ज्याअर्थी पुढें निघून गेले आहेत, त्याअर्थी त्यांचें भय पुढल्या बाजूला आहे व त्यांच्या सैन्याचें भय मागच्या बाजूला आहे. तथापि जेथें कृष्णार्जुन युद्ध करीत आहेत, तेथेंच अधिक भय आहे. पांडवांनीं या भारतीसेनेला मागून-पुढून वेढलें आहे. अशावेळीं 'सैंधवाचें रक्षण' हेंच मी आपलें मुख्य कर्तव्य समजतों.

जयद्रथ क्रुद्ध अर्जुनाला पाहून भयभीत झाला आहे. यास्तव आपण त्याचें अगोदर संरक्षण केलें पाहिजे. ते दोघे युयुधान व वृकोदर सैंधवाकडेच

गेले आहेत. बाबारे, शकुनीच्या बुद्धीनें उद्भवलेलें हें द्यूतच आज प्राप्त झालें आहे. सभेमध्यें तुमचा जय झाला नव्हता किंवा पांडवांचा पराजयहि झाला नव्हता. पण आज मात्र या युद्धांत जयापजय व्हावयाचा आहे. यास्तव दुर्योधना, जेथें ते सर्व राजे आपल्या जीवावर उदार होऊन जयद्रथाचें रक्षण करीत आहेत, तेथें तूं सत्वर जा आणि त्या सर्व रक्षकांचें रक्षण कर. मी येथेंच राहून इतर सर्वांस परलोकीं पाठवितों व पांडव, सृंजय व पांचाल यांना व्यूहाच्या प्रवेशद्वारांतच अडवून धरतों.

( २ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें द्रोणानें सांगितलें असतां दुर्योधन त्याच्या आज्ञेप्रमाणें घोर कर्मास उद्युक्त होऊन आपल्या अनुयायांसह निघून गेला. त्यावेळीं कृतवर्म्यानें ज्यांना पूर्वी निवृत्त होण्यास लावलें होतें, ते पांडवांचे दोघे चक्ररक्षक पांचाल युधामन्यु व उत्तमौजा बाहेरच्या बाजूनें सैन्यावर चालून आले व अर्जुनाकडे जाण्यास निघाले. अर्जुन तुझ्या सेनेंत शिरला असतां सेनेच्या एका बाजूचा भेद करून त्यांनीं आंत प्रवेश केला.

याप्रमाणें ते व्यूहभेद करून आंत येत असतां दुर्योधनानें त्यांना पाहिलें व तो मोठ्या त्वरेनें त्यांचें निवारण करण्यास पुढें सरसावला आणि त्या क्षत्रियश्रेष्ठांचें मोठ्या निकराचें युद्ध जुंपलें. दुर्योधनानें युधामन्यूचे अश्व, सारथि, धनुष्य व ध्वज यांचा छेद केला. तेव्हां युधामन्यु अतिशय चवताळला. त्यानें तुझ्या पुत्राच्या वक्षःस्थलावर तीस बाण सोडिले. उत्तमौजानें त्याच्या सारथ्याचा वध केला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या दुर्योधनानेंहि उत्तमौजाचे चारहि अश्व व दोन्ही पार्ष्णिसारथि यांना यमालयीं पाठविलें.

पण तो विरथ झालेला उत्तमौजा यत्किंचित्‌हि भ्रांत झाला नाहीं. त्यानें मोठ्या त्वरेनें आपल्या भ्रात्याच्या रथावर उडी मारली आणि युधामन्यूच्या रथांतून दुर्योधनावर शरवृष्टि चालविली. त्यानें प्रथम विपुल बाणांनीं दुर्योधनाच्या अश्वांना गतप्राण केलें व त्याचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां दुर्योधन अश्वहीन झालेल्या रथांतून खालीं उतरला व हातांत गदा घेऊन त्या पांचालावर धांवला.

तो कौरव क्रुद्ध होऊन आपल्याकडे धांवून येत आहे, हें पहातांच युधामन्यु व उत्तमौजा हे दोघेहि पांचाल मोठ्या त्वरेनें आपल्या रथांतून खालीं उतरले. इतक्यांत दुर्योधनानें आपल्या गदाघातानें त्यांचा रथ,अश्व व ध्वज या सर्वांचें

चूर्ण करून टाकिलें. याप्रमाणें पांचालांच्या रथाचा नाश करून तुझा तो परंतप पुत्र मद्रपतीच्या रथावर चढला आणि ते दोघे पांचाल भ्राते दुसऱ्या रथांवर आरूढ होऊन अर्जुनाकडे जाण्यास निघाले. ७. ५. १३०.

---

## अध्याय १३१ वा.

[ १ कर्ण-भीमयुद्ध. २ कर्णाचा पराजय. ]

**( १ ) संजय**—हे महाराज, तो लोमहर्षण संग्राम चालू असतां सर्व सैन्यें अतिशय पीडित झाल्यामुळें व्याकुल झालीं होतीं. त्यावेळीं दुसरीकडे वनामध्यें एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजावर तुटून पडतो, तसा राधेय भीमावर धांवून गेला.

धृतराष्ट्र—बा संजया, कर्ण व भीम हे दोघे बलाढ्य योद्धे अर्जुनाच्या रथासमीपच युद्ध करीत असतां त्यांचा तो संग्राम कसा झाला ! कर्णाला तर भीमानें पूर्वींच जिंकलें होतें, मग पुनः त्या दोघांचें युद्ध कसें जुंपलें ! भीमहि कर्णावर चालून जाण्यास कसा धजला ! तो पृथ्वीतलावरील श्रेष्ठ महारथी आहे. भीष्म व द्रोण या दोघां धनुर्धरांना वजा केलें असतां धर्मराज तर महारथी कर्णावांचून दुसऱ्या कोणत्याहि वीरास भीत नाहीं. त्या महाबलाढ्य राधेयाचा पराक्रम स्मरून त्या महात्म्याला कित्येक वर्षें रात्रीं स्वस्थपणानें झोंपहि येत नव्हती. त्या सूतपुत्राशीं युद्ध करण्याचें भीमानें साहस तरी कसें केलें !

तो वैकर्तन ब्राह्मणांची सेवा करणारा असून युद्धांतून परत न फिरणारा अजिंक्य वीर आहे. त्या वीराग्रणीला भीमसेन आपला भ्राता आहे, हें पूर्वींच कळलें आहे. युद्धाच्या पूर्वीं जो शमाचा उपक्रम झाला, ( उद्योगपर्व ) त्यावेळीं कुंतीनें कर्णाची भेट घेऊन तो पांडवांचा ज्येष्ठ भ्राता आहे, हें गुह्य त्याला सांगितलें होतें आणि अर्जुनावांचून ते चारी भ्राते त्याला अवध्य आहेत, असेंहि त्यानें कुंतीला वचन दिलें होतें. त्या कुंतीवचनाचें स्मरण असतांना कर्ण भीमाशीं युद्ध करण्यास कसा सज्ज झाला ! तो स्वभावतः अतिशय दयाळु आहे.

हे सूता, पूर्वीं कर्णानें केलेलें वैर स्मरणाऱ्या भीमानें त्याच्याशीं कसें युद्ध केलें ! दुर्योधनाला नेहमीं आशा वाटत असते कीं, कर्ण पांडवांना जिंकील.

माझ्या त्या मूढ पुत्राची सर्व जयाशा कर्णावर अवलंबून आहे. त्या राधेयानें भीमाशीं कसा काय संग्राम केला ? तें मला सांग. या सूतपुत्रामुळेंच उद्भवलेल्या अनेक अनर्थांचें स्मरण ठेवून भीमानें त्याच्याशीं कसें युद्ध केलें ?

पराक्रमी कर्णानें केवल एका रथानें समग्र पृथ्वी पादाक्रांत केली. तो कवचकुंडलांसह उत्पन्न झाला होता. पण त्या उदार मनाच्या महात्म्यानें त्यांचेंहि दान करून टाकिलें, त्यानें वृकोदराशीं कसें युद्ध आरंभिलें ! हे संजया, तूं वर्णनकुशल आहेस ! यास्तव त्या दोघांचा संग्राम कसा झाला व त्यांत कोणाचा विजय झाला, तें सर्व मला तत्त्वतः कथन कर.

संजय—हे राजा, भीमसेन रथिश्रेष्ठ राधेयाला सोडून जेथें कृष्णार्जुन होते, तेथें जाण्यास निघाला होता. पण राधेयानें त्याला अडवून त्याच्यावर शरवृष्टि आरंभिली आणि आपल्या प्रफुल्ल कमलाप्रमाणें असलेल्या कमलवदनानें त्याला स्मितपूर्वक आह्वान केलें.

कर्ण—हे भीमा, तुझ्या वैऱ्यांनीं तुझ्या युद्धाचा प्रकार स्वप्नांतहि पाहिला नाहीं. तुला पार्थाकडे जाण्याची जरी इच्छा असली तरी मला पाठ कां दाखवितोस ! कुंतीच्या पुत्राला हें शोभत नाहीं. यास्तव माझ्या संमुख उभा रहा व मजवर शरांचा वर्षाव कर.

संजय—कर्णानें रणांगणांत केलेलें हें आह्वान भीमाला सहन झालें नाहीं. तो अर्धमंडलाकार वळण घेऊन मागें वळला व कर्णाशीं युद्ध करूं लागला. त्यावेळीं कर्ण अंगांत कवच चढवून द्वैरथयुद्धासाठीं सज्ज झाला होता. त्याच्यावर वृकोदरानें शरवृष्टि चालविली. कर्णाचा वध करून या सर्व वैराचा अंत करावा, असें मनांत आणून त्यानें कर्णाला विद्ध केलें, त्याच्या अनुचरांचा संहार केला आणि त्याचाहि वध करण्याच्या इच्छेनें घोर बाणांची वृष्टि चालविली.

(२) तथापि मत्तगजाप्रमाणें ज्याची गति आहे, अशा भीमाच्या शरवृष्टीला दिव्यास्त्रवेत्त्या कर्णानें अस्त्रमायेनें ग्रासून टाकिलें. तो वैकर्तन विद्येनें श्रेष्ठ होता, बलाढ्य होता, महाधनुर्धर होता व पराक्रमीहि होता. रणांगणांत द्रोणाचार्यासारखा संचार करीत तो हंसतच भीमावर धांवून गेला. कर्णाचें तें आसुरि हास्य भीमाला सहन झालें नाहीं. तो क्रोधानें संतप्त झाला. त्याचे नेत्र आरक्त झाले व गजेंद्राला जसें अंकुशानें टोंचावें त्याप्रमाणें त्यानें सर्व वीरांच्या समक्ष कर्णाच्या वक्षःस्थलावर वत्सदंत बाण सोडला. नंतर चित्र-विचित्र कवच धारण केलेल्या त्या राधेयाला अनेक बाणांनीं विद्ध केलें.

तेव्हां कर्णानें वृकोदराच्या वेगवान् अश्वांना पांच पांच बाणांनीं विद्ध केलें. एका निमिषार्धांत भीमाचा रथ, ध्वज व सारथि या सर्वांस बाणांनीं आच्छादित केलें व वृकोदराच्या दृढ कवचाचाहि भेद केला. परंतु कर्णाच्या बाणांनीं यत्किंचित्‌हि भ्रान्त न होतां भीम कर्णाच्या समीप गेला. त्याच्या सर्पतुल्य बाणांनीं तो जरी विद्ध झाला होता, तरी व्यथित झाला नाहीं. त्या दोघां भ्रात्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. परंतु कर्ण त्याच्याशीं मृदु युद्ध करीत होता व भीम पूर्ववैर स्मरून अतिशय क्रोधानें त्याच्यावर उग्र बाण सोडीत होता. तो अमर्षी पांडव कर्णानें पूर्वी केलेला अवमान विसरला नव्हता.

राजा, त्या समरांगणांत भीमाचें सर्वांग शरांनीं भरून गेलें होतें. त्याचें सर्व शरीर रक्तानें माखल्यामुळें वसंतऋतूंतील प्रफुल्ल अशोकवृक्षासारखें शोभलें. तथापि कर्णाचा तो पराक्रम भीमाला सहन झाला नाहीं. त्यानें सर्पतुल्य विषारी पंचवीस बाण कर्णावर सोडले व त्याचें मर्मस्थान विद्ध केलें. नंतर हंसतच त्याच्या धनुष्याचा छेद केला, चारी अश्वांना गतप्राण केलें, सारथ्याला परलोकीं पाठवून दिलें व कर्णाच्या वक्षःस्थलावर तीक्ष्ण बाण सोडिले. तेव्हां मेघांचा भेद करून बाहेर पडणाऱ्या सूर्यकिरणांप्रमाणें ते शर कर्णाचा भेद करून भूमीवर पडले. त्यामुळें धनुष्यहीन व विरथ झालेला तो कर्ण शरपीडित होत्साता अतिशय विव्हल झाला व दुसऱ्या रथाकडे पळाला. ७. ५. १३१.

---

## अध्याय १३२ वा.

[ १ भीम व कर्ण यांच्या युद्धाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, श्रेष्ठ धनुर्धर व साक्षात् शंकराचा शिष्य, असा जो भार्गवराम, तो कर्णाचा गुरु आहे. शिवाय कर्ण स्वतः अस्त्रविद्येंत गुरूच्याच तुल्य आहे. शिष्यत्वाला अनुकूल असे गुण त्याच्या अंगीं वास करीत आहेत. एकंदरींत कर्ण गुरूपेक्षांहि अधिक पराक्रमी आहे. असें असतां त्या कौंतेयानें त्याला सहज कसें जिंकलें !

ज्याच्या जीवावर माझे पुत्र जयाची आशा करीत आहेत, तो कर्ण भीमसेनापासून विमुख होऊन पळाल्याचें पहातांच दुर्योधन काय म्हणाला ! प्रज्वलित अग्नितुल्य वृकोदर रणांत संचार करीत असतां कर्णानें पुढें काय केलें ? तें मला सांग.

संजय—हे महाराज, त्यानंतर कर्ण योग्यप्रकारें सज्ज केलेल्या दुसऱ्या रथावर आरूढ झाला व प्रक्षुब्ध सागराप्रमाणें भीमावर धांवून आला. त्या-वेळीं त्या क्षुब्ध झालेल्या अधिरथ पुत्राला पाहून 'आतां भीम अग्निमुखांतच पडला' असें तुझे वीर समजले. कर्ण धनुष्याचा टणत्कार व भैरव तलशब्द करीत भीमावर तुटून पडला. तेव्हां भीम व कर्ण या दोघांचें पुनः तुमुल युद्ध जुंपलें. परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें ते आपल्या आरक्त नेत्रांनीं जणुंकाय एकमेकांस दग्धच करीत होते. ते दोघेहि सर्पांप्रमाणें उष्ण निःश्वास टाकीत होते. त्यांनीं चवताळलेल्या दोन व्याघ्रांप्रमाणें परस्परांवर झडप घातली व दारुण युद्ध आरंभिलें.

हे राजश्रेष्ठा, अमर्षी भीमसेनाच्या मनांत त्यावेळीं अक्षद्युत, वनवास आणि विराट नगरींतील दुःख मूर्तिमंत उभें राहिलें. तुझ्या पुत्रांनीं हरण केलेलीं त्यांचीं रत्नमय समृद्ध राष्ट्रें, तूं व तुझ्या पुत्रांनीं त्यांना दिलेले असह्य क्लेश; कुंतीला पुत्रांसह दग्ध करण्याचा दुर्योधनाचा संकेत; सभेमध्यें दुरात्म्यांनीं द्रौपदीचें केलेलें विडंबन; दुःशासनानें केलेलें तिचें केशग्रहण आणि कर्णानें केलेलीं कठोर भाषणें हें सर्व तो मानी भीमसेन विसरला नव्हता.

त्याचप्रमाणें दासीभावानें द्रौपदीकडे पहाणाऱ्या तुझ्या पुत्रांनीं त्या साध्वीला राजसभेंत तुझ्या समक्ष उच्चारलेलीं 'तूं अन्य पति वर, हे पांडव आतां तुझे पति नाहींत, हे सर्व षण्ढतिलोपम असून आतां तर नरकांत पडले आहेत,' इत्यादि दुर्वचनें आणि पांडव कृष्णाजिनें पांघरून वनवासास निघाले असतां कर्णानें तुझ्या समक्ष त्यांना केलेलीं दुरुत्तरें, या सर्वांचें भीमसेनाला त्यावेळीं स्मरण झालें. ऐश्वर्यापासून च्युत होऊन विषमस्थितीला प्राप्त झालेल्या संकट-ग्रस्त पांडवांना तृणवत् लेखून तुझ्या पुत्रांनीं केलेल्या वल्गना आणि बाल्या-वस्थेपासून सोसावीं लागलेलीं दुःखें, हे सर्व प्रसंग शत्रुघ्न भीमसेनाच्या दृष्टीपुढें उभे राहिले व तो स्वतःच्या जीवितावरहि उदार होऊन कर्णाला जिंकण्यास सज्ज झाला.

शत्रुतापन भीमाचें कर्णाशीं घनघोर युद्ध जुंपलें आहे, हें पहातांच त्याच्यावर हा विशेष भार पडत आहे, असें कृष्णार्जुनांस वाटलें. त्यावेळीं त्या बलाढ्य योद्धयांच्या संग्रामांत गतप्राण होऊन पडलेल्या प्राण्यांच्या राशी पडल्या.

१ येथील युद्धाच्या वर्णनाचा संक्षेप केला आहे.

होत्या, तुझ्या सैनिकांचा भयंकर क्षय होत होता आणि ती रणभूमि मृत-देहांनीं व्याप्त झाली होती. ७. ५. १३२.

---

## अध्याय १३३ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ कर्णाच्या युद्धाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—बा संजया, ज्याच्या हस्तलाघवाविषयीं प्रसिद्धि आहे, त्या कर्णाबरोबर भीमानें ज्याअर्थीं समरांत युद्ध केलें त्याअर्थीं त्याचा पराक्रम अद्भुत असावा, असेंच मला वाटतें. अरे, यक्ष, असुर, मानव यांसह सर्व शस्त्रें धारण करणाऱ्या देवांचेंहि निवारण करण्यास जो वीर समर्थ आहे, त्या वैकर्तनानें भीमाला कसें जिंकलें नाहीं ! तो पांडव विजयश्रीनें रणांगणांत कसा प्रकाशूं शकला ! त्या दोघांनीं प्राणांचा पण लावून कसें युद्ध केलें तें मला सांग. या संग्रामांतील जयापजय त्यांच्या या युद्धावरच अवलंबून आहे.

हे सूता, कर्णाच्या आनुकूल्यामुळेंच माझ्या दुर्योधन पुत्रानें रणांत गोविंद व सात्यकि यांसह पांडवांना जिंकण्याचा उत्साह धरला. परंतु वृकोदरानें कर्णास अनेक वेळां जिंकल्याचें ऐकून माझी मति भ्रान्त झाली आहे. माझ्या पुत्राच्या या अन्यायामुळें कौरव नष्ट होणार, असेंच मला वाटतें. बा संजया, हा कर्ण महापराक्रमी पांडवांना जिंकूं शकेल, असें मला वाटत नाहीं. आतां-पर्यंत कर्णानें पांडवांशीं जेव्हां जेव्हां युद्ध केलें, तेव्हां तेव्हां पांडवांनींच त्याला जिंकलें आहे.

हे पांडव इंद्रासह सर्व देवांनाहि अजिंक्य आहेत, पण माझा मंदमति पुत्र दुर्योधन तें जाणत नाहीं. माझ्या त्या मूढ पुत्रानें पांडवांच्या धनेश्वरासारख्या संपत्तीचें हरण केलें, हा त्यानें फार मोठा अपराध केला. मधाच्या मोहाला बळी पडणारास खोल प्रपात दिसत नसतो. तशीच दुर्योधनाची स्थिति झाली आहे. त्यानें महात्म्या पांडवांचें राज्य कपटानें हरण केलें व तो मूर्ख मी पांडवांना जिंकलेंच आहे, असें समजून अद्यापि त्यांचा वारंवार अवमान करीत असतो.

बा संजया, मीहि पुत्रस्नेहानें मोहित होऊन अविचारानें वागलों व धर्मांत स्थित असलेल्या पांडवांशीं कपट केलें. युधिष्ठिर दीर्घदर्शी आहे. त्याचें अंतः-करण उदार आहे. तो भ्रातृप्रेमानें प्रेरित होऊन शमाला सिद्ध झाला, एवढ्या-वरूनच त्याला दुर्बल समजून माझे पुत्र त्याच्याविरुद्ध गेले. पूर्वींचीं तीं सर्व

दुःखें स्मरून भीमसेन कर्णाशीं निकरानें युद्ध करीत आहे. यास्तव परस्परांच्या वधाची इच्छा करणारे कर्ण व भीम यांनीं कसें युद्ध केलें तें मला सविस्तर सांग.

( २ ) संजय—हे महाराज, परस्परांचे प्राण घेण्यास उद्युक्त झालेल्या दोन मत्त वनगजांप्रमाणें त्या दोघां बलाढ्य भ्रात्यांचा संग्राम झाला. त्या दोघांनींहि परस्परांवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली. एकमेकांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं. सारथ्यांचा वध केला. इंद्राच्या वज्राप्रमाणें प्रचंड शक्ति सोडल्या, परंतु त्यांतील कोणीच कोणाला हार गेला नाहीं. ते वृषभांप्रमाणें गर्जना करीत होते. दंताग्रांनीं प्रहार करणाऱ्या मत्त गजांप्रमाणें एकमेकांवर बाणांचे प्रहार करीत होते, प्रचंड शंखनाद करीत होते आणि परस्परांकडे पाहून उपहासानें हास्य करीत वारंवार निर्भर्त्सना करीत होते.

याप्रमाणें बराच वेळ त्यांचें दारुण युद्ध झालें. नंतर भीमसेनानें पुनः एकदा कर्णाचे अश्व व सारथि यांना गतप्राण करून त्याला विरथ केलें व त्याचें धनुष्यहि तोडून टाकिलें. तेव्हां बाणजालानें व्यथित झालेला कर्ण क्षणभर भ्रांत झाला. त्याची ती असहाय स्थिति दुर्योधनाच्या लक्षांत आली व तो अतिशय क्रोधानें दुर्जयाला म्हणाला—" हे दुर्जया, कर्णाच्या साह्यार्थ जा. भीमसेन त्याला ग्राशीत आहे. त्या मूढाचा पराभव कर व कर्णाचें बल वाढीव."

दुर्योधनाची ही आज्ञा ऐकतांच तुझा पुत्र दुर्जय 'ठीक आहे' असें बोलून भीमावर धांवून गेला. त्यानें भीमाचे अश्व व सारथि यांस अनेक बाणांनीं विद्ध करून भीमावरहि सात शर सोडिले. तेव्हां खवळलेल्या भीमानें दुर्जयाच्या मर्मस्थलाचा भेद करून त्याचे अश्व व सारथि यांसह त्याला यमलोकीं पाठवून दिलें. तेव्हां तुझा पुत्र भूमीवर पडून चिरडला गेला असतां सर्पाप्रमाणें विव्हळला व हात-पाय झाडूं लागला. तेव्हां कर्णानें दुःखार्त होऊन स्फुंदतच त्याला प्रदक्षिणा घातली.

नंतर उग्रकर्म्या भीमानें कर्णालाहि विरथ केलें व त्याला असंख्य बाण आणि शस्त्रांचे प्रहार यांनीं जर्जर करून सोडलें. याप्रमाणें तो अतिरथ कर्ण शरार्त झाला होता, तरीहि भीमाला सोडून गेला नाहीं. ५. ७. १३३.

---

१ येथील वर्णनाचा संक्षेप केला आहे.

## अध्याय १३४ वा.

[ १ कर्णाचें पलायन. ]

( १ ) संजय—हे महाराज, भीमानें जरी कर्णाला विरथ करून जिंकलें, तरी तो वीर तत्काल दुसऱ्या रथावर आरूढ होऊन भीमाशीं युद्ध करण्यास उभा राहिला. तेव्हां पुनः त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. कर्णानें भीमाच्या वक्षः-स्थलावर तीक्ष्ण बाण सोडून त्याला विद्ध केलें. भीमानेंहि कर्णावर अनेक बाण सोडले. परंतु केवल बाणांनीं कार्य भागत नाहीं, असें पाहून त्या पांडवानें आपली षट्कोनी वज्रप्राय गदा सूतपुत्रावर फेंकली. तेव्हां असुरांचा संहार करणाऱ्या इंद्राच्या वज्राप्रमाणें त्या गदेनें कर्णाच्या चारहि अश्वांचा वध केला. नंतर भीमानें दोन शरांनीं त्याचा ध्वज खालीं पाडविला व सारथ्यालाहि गतप्राण केलें.

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें पुनः विरथ झालेला कर्ण आपल्या धनुष्याचा टण-त्कार करीत विमनस्क स्थितींत क्षणभरच उभा राहिला. तथापि त्यावेळींहि त्यानें अद्भुत पराक्रम प्रकट केला. विरथ असतांहि त्यानें शत्रूचें निवारण केलें. कर्ण विरथ होऊन रणांगणांत एकटाच युद्ध करीत आहे, हें पहातांच दुर्योधन दुर्मुखाला म्हणाला—“ हे दुर्मुखा, भीमानें या कर्णाला विरथ केलें आहे. पहा ! त्या महारथास तूं दुसरा रथ नेऊन दे. ”

दुर्योधनाची ही आज्ञा कानीं पडतांच दुर्मुख भीमाचें निवारण करीत त्वरेनें कर्णाकडे निघाला. सूतपुत्र कर्णाच्या साह्यार्थ दुर्मुख येत आहे, हें पहा-तांच वायुपुत्राला फारच हर्ष झाला. तो आनंदानें जिभल्या चाटूं लागला व तो बलाढ्य पांडव कर्णाचें निवारण करीत दुर्मुखाकडे वळला. त्यानें आपला रथ दुर्मुखाच्या समीप नेऊन तीक्ष्ण नतपर्व बाणांनीं त्याला क्षणार्धांत यम-लोकीं पाठवून दिलें.

दुर्मुखाचा वध होतांच कर्ण त्याच्याच रथावर आरूढ झाला व सहस्ररश्मि सूर्याप्रमाणें रणांगणांत प्रकाशूं लागला. दुर्मुखाच्या मर्मस्थलांचा भेद होऊन तो रक्तानें माखला होता, त्याचा तो मृतदेह पाहून वैकर्तनाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. तो क्षणमात्र स्तब्ध होऊन उभा राहिला. नंतर त्यानें मृत होऊन पडलेल्या दुर्मुखाला प्रदक्षिणा घातली व दीर्घ निःश्वास सोडले. त्याला कांहीं सुचेनासें झालें.

कर्ण शोकातिरेकानें भ्रांत झाला आहे, ही संधि साधून भीमानें गार्ध्रपत्र-युक्त चौदा बाण त्याच्यावर सोडले. ते शर कर्णाच्या सुवर्णानें भूषित केलेल्या कवचाचा भेद करून दश-दिशांत शोभूं लागले. कालप्रेरित क्रुद्ध भुजंगाप्रमाणें ते रक्तप्राशन करणारे बाण कर्णाच्या शरीरांत शिरले, त्याच्या रक्तानें सिक्त झाले व त्वरेनें वसुंधरेंत प्रविष्ट झाले. त्यावेळीं अर्धे बिळांत व अर्धे बाहेर असलेले चवताळलेले प्रचंड नाग जसे शोभतात, तसे ते भूमींत प्रवेश कर-णारे रक्तानें सिक्त झालेले बाण भासले.

नंतर राधेयानें भीमावर चौदा बाण सोडून त्याला विद्ध केलें. ते बाण क्रौंचपक्ष्याला टोंचणाऱ्या पत्ररथ पक्ष्याप्रमाणें वृकोदराच्या डाव्या हाताचा भेद करून भूमींत शिरले. तेव्हां सूर्यास्ताच्या वेळीं प्रकाशणाऱ्या किरणा-प्रमाणें ते चमकूं लागले. त्या बाणांनीं भीम विद्ध झाला असतां पर्वतांतून वहाणाऱ्या जलप्रवाहाप्रमाणें त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. परंतु त्यामुळें व्यथित न होतां त्या वायुसुतानें गरुडाप्रमाणें वेगवान् शर सोडून त्या सूतपुत्राला त्याच्या सारथ्यासह विद्ध केलें. भीमाच्या त्या तीक्ष्ण बाणांनीं कर्ण अतिशय विह्वल झाला व भयभीत होत्साता अश्वांना प्रेरणा करून मोठ्या त्वरेनें रणांगणांतून दूर पळाला. याप्रमाणें त्या वैकर्तनाचा पूर्ण-पणें पराभव करून भीमसेन आपलें धनुष्य विस्फारून शत्रूला हुताशनाप्रमाणें दग्ध करीत रणांगणांतच उभा राहिला. ७. ५. १३४.

---

## अध्याय १३५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयानें त्यालाच दिलेला दोष. ३ भीमपराक्रमाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, ज्याअर्थीं कर्णाला युद्धामध्यें भीमाचा परा-भव करतां आला नाहीं त्याअर्थीं दैवच बलवत्तर आहे, असेंच मानावें लागतें. निरर्थक पौरुषाला धिक्कार असो. कर्ण युद्धामध्यें कृष्णासह सर्व पांडवांना जिंकण्याचा उत्साह बाळगीत आहे. ‘याच्यासारखा वीर मीं या लोकीं कोठेंहि पाहिला नाहीं’ अशा वल्गना मीं दुर्योधनाच्या तोंडून अनेकदा ऐकल्या आहेत. तो माझा मंदमति पुत्र मला वारंवार सांगत असे कीं, कर्ण अतिशय बलाढ्य, शूर व श्रेष्ठ धनुर्धर आहे. तो कधींहि क्लांत होत नाहीं. या राधेयाचें

साह्य असल्यावर देवहि मला जिंकण्यास समर्थ नाहींत, मग या दुर्बल पांड-वांची काय कथा !

हे सूता, निर्विष भुजंगाप्रमाणें कर्ण जिंकला गेला व रणांगणांतून पळाला, हें पाहून दुर्योधन काय म्हणाला ! अग्नींत पडणाऱ्या पतंगाप्रमाणें युद्धांत अननुभवी एकट्या दुर्मुखाला ज्याअर्थीं त्यानें पुढें केलें, त्याअर्थीं त्याची मति मोहित झाली असावी. अश्वत्थामा, शल्य, कृप व कर्ण हे सर्व एकत्र जमूनहि भीमाच्या पुढें उभे राहण्यास समर्थ झाले नाहींत. भीमाचें दहा हजार हत्तींचें बल त्यांना अवगत आहे. त्याचा पराक्रमहि ते जाणतात. तेव्हां ज्याला यम, काल किंवा अंतक यांचीच उपमा शोभेल, अशा त्या क्रूरकर्मी वायुपुत्राला त्यांनीं कां बरें कोपवावें ! पण कर्णाला आपल्या बाहुबलाचा दर्प असल्यामुळें त्यानें भीमाचा अवमान करून त्याच्याशीं युद्ध केलें; परंतु असुरांना जिंकणाऱ्या पुरंदराप्रमाणें ज्या पांडवानें त्यालाहि युद्धांत जिंकलें, त्याला जिंकण्यास कोण समर्थ आहे !

जो बलाढ्य वीर द्रोणाचार्यांस त्रस्त करून एकटाच निर्भयपणें माझ्या सैन्यांत शिरला व धनंजयाकडे जाण्यास निघाला, त्या योद्ध्याशीं युद्ध कर-ण्यास कोण धजणार आहे ! वज्र उगारलेल्या इंद्रापुढें उभें रहाण्याचें जसें दैत्यांना धैर्य होत नाहीं, तसेंच भीमापुढें उभें रहाण्याचें कोणी साहस करणार नाहीं. यमपुरींत गेलेला मानवहि कदाचित् परत येऊं शकेल, पण भीमाच्या पुढें गेलेला योद्धा कदापि जिवंत रहाणार नाहीं. जे अविचारी व मूढ आहेत, तेच अग्नीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें भीमावर धांवून जातात.

बा संजया, कौरवसभेंत सर्व सदस्यांच्या समक्ष भीमानें केलेली धार्त-राष्ट्रांच्या वधाची प्रतिज्ञा स्मरून व आतां त्यानें केलेला कर्णाचा पराजय पाहून दुःशासन आपल्या ज्येष्ठ भ्रात्यासह भीमापासून दूर पळाला असेल ! ‘कर्ण, दुःशासन व मी असे तिघे मिळून आम्ही पांडवांना युद्धांत जिंकूं.’ अशा वल्गना करणारा दुर्योधन आज कर्ण भीमाकडून विरथ होऊन पूर्णपणें पराभूत झाला आहे, हें पाहून पूर्वीं केलेल्या कृष्णाच्या उपमर्दाबद्दल तो खरोखर पश्चात्ताप पावला असेल ! भीमानें रणांगणांत आपल्या भ्रात्यांचा वध केल्याचें पाहून तो माझा मूढ पुत्र कृतापराधाविषयीं लज्जित झाला असेल !

बा सूता, तो वृकोदर साक्षात् कृतान्त कालच आहे. प्रचंड आयुधें धारण

करणाऱ्या त्याच्या पुढें कोणता वीर उभा राहील! वडवानलांत सांपडलेला मानवहि त्यांतून बाहेर पडेल, पण भीमाच्या हातीं लागलेला प्राणी जिवंत सुटणार नाहीं. संजया, बाबा, या भीमाप्रमाणेंच सर्व पांडव, पांचाल, श्रीकृष्ण व सात्यकी हे सर्वहि युद्धांत चवताळले असतां ते स्वतःच्या जीवाचीहि पर्वा करीत नाहींत. खरोखर आतां मात्र माझ्या पुत्रांच्या जीवितावर फार मोठें संकट ओढवलें आहे, यांत संशय नाहीं.

(२) संजय—हे महाराजा, महत्संकट प्राप्त झाल्यावर शोक करण्यांत काय अर्थ आहे! ज्यासाठीं तूं आतां शोकाकुल होत आहेस, त्या जगताच्या विनाशाला तूंच कारणीभूत झाला आहेस. पुत्राच्या वचनावरून तूंच हें महद्वैर वाढविलें आहेस. मरणोन्मुख मनुष्य जसें पथ्यकर औषधाचें ग्रहण करीत नाहीं, तद्वत् तुला अनेकप्रकारें विदुरादि आम्ही सर्व सांगत असतांहि तूं आमच्या हितवचनाचा स्वीकार केला नाहींस. हे नरोत्तमा, तूं ज्या कालकूट विषाचें स्वतःच प्राशन केलें आहेस तें पचविणें अतिशय दुष्कर आहे. यास्तव आतां त्याचें फल तुला भोगलेंच पाहिजे. युद्ध करणाऱ्या महाबलाढ्य योद्धयांविषयीं तूं कुत्सित कल्पना करीत आहेस, यास्तव त्यांनीं रणांगणांत कसें शौर्य गाजविलें, तें मी तुला सांगतों. ऐक.

( ३ ) हे महाराजा, भीमानें कर्णाचा पराजय केला हें तुझ्या पांच अमर्षी पुत्रांना सहन झालें नाहीं. दुर्मर्षण, दुःसह, दुर्मद, दुर्धर व जय हे पांच भ्राते चित्र-विचित्र कवचें धारण करून त्या पांडवावर धांवून गेले. त्यांनीं वृकोदराला चोहोंबाजूंनीं परिवेष्टित केलें व शलभांच्या संघाप्रमाणें त्याच्यावर शरांची वृष्टि चालविली. त्यांनीं शरसंघांनीं दश-दिशा व्यापून टाकिल्या. तुझे ते देवतुल्य रूपवान् कुमार भीमावर तुटून पडले असतांहि भीम भ्रांत झाला नाहीं. त्यानें हंसत-हंसतच त्यांच्याशीं प्रतियुद्ध आरंभिलें.

तुझे पुत्र भीमसेनावर चालून गेले, हें पहातांच कर्ण परत फिरला व तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागला. कर्णाला पहातांच भीमसेन मोठ्या त्वरेनें त्याच्याकडे वळला. तुझ्या पुत्रांनीं त्याचें निवारण केलें असतांहि तो थांबला नाहीं. त्या धार्तराष्ट्रांनीं त्याच्यावर नतपर्व शरांचा वर्षाव चालविला. तथापि वृकोदरानें पंचवीस बाण सोडून त्या पांची शूर कुमारांना त्यांचे अश्व व सारथि यांसह यमसदनीं पाठवून दिलें. तेव्हां चित्र-विचित्र पुष्पांनीं युक्त असलेले

महावृक्ष वायूनें भग्न होऊन जसे भूमीवर पडावे, तसे त्या वीरांचे मृतदेह रथांतून खालीं पडले.

याप्रमाणें भीमानें कर्णास शरांनीं आच्छादित करून तुझ्या पुत्रांना गतप्राण केलें असतां त्याचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. नंतर त्या वृकोदरानें कर्णाचा तीक्ष्ण बाणांनीं निरोध केला असतां तो आपले आरक्त नेत्र विस्फारून भीमाकडे पाहूं लागला. तेव्हां भीमानेंहि आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत त्याच्याकडे क्रोधानें अवलोकन केलें. ७. ५. १३५.

---

## अध्याय १३६ वा.

[ १ कर्णाचें पलायन. २ धार्तराष्ट्रांचा वध. ३ भीमपराक्रम. ]

( १ ) संजय—हे नृपश्रेष्ठा, तुझे पुत्र युद्धांत पडले, हें पाहून कर्णाला अतिशय क्रोध आला. तो जीवावर उदार झाला. ज्याअर्थी आपल्या समक्ष भीमसेनानें त्यांचा वध केला, त्याअर्थी त्यांच्या वधाचा दोष आपल्याकडेच येतो, असें तो समजला व भीमावर मोठ्या वेगानें चालून गेला. तेव्हां त्या दोघांचें पुनः एकदा निकराचें युद्ध जुंपलें. कर्णानें अनेक बाणांचा वर्षाव करून भीमाला विद्ध केलें व भीमानें पूर्व वैर स्मरून कर्णाला त्रस्त केलें, त्याचें धनुष्य तोडून टाकिलें, अश्वांचा वध केला व पुनः पुनः मोठ्यानें हास्य केलें.

इतक्यांत वैकर्तनानें दुसरें धनुष्य धारण केलें, पण भीमानें क्षणार्धांत तेंहि भग्न केलें. तेव्हां प्रचंड शब्द करीत तें खालीं पडलें. तें पाहून कर्ण अतिशय क्रुद्ध झाला. तो रथांतून मोठ्या त्वरेनें खालीं उतरला. त्यानें आपली प्रचंड गदा हातीं घेतली व ती मोठ्या वेगानें भीमावर फेंकली. पण ती महा गदा आपल्याकडे येत आहे, हें पहातांच भीमानें सर्व सैन्याच्या समक्ष आपल्या शरांनीं तिचे तुकडे करून टाकिले.

नंतर सूतपुत्राच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या वायुसुतानें त्याच्यावर असंख्य बाण सोडिले. पण कर्णानें तीक्ष्ण शर सोडून त्याच्या बाणांचें निवारण केलें आणि भीमसेनाच्या दृढ कवचाचाहि भेद केला. तेव्हां भीम अधिकच खवळला. त्यानें कर्णावर नऊ नतपर्व बाण सोडले. त्या बाणांनीं कर्णाचें कवच भग्न करून त्याचा उजवा हात विद्ध केला व वारुळांत शिरणाऱ्या सर्पाप्रमाणें भूमींत प्रवेश केला.

हे राजन्, याप्रमाणें भीमाच्या बाणांनीं आच्छादित होत असतां तो राधेय पुनः युद्धपराङ्मुख झाला. तो सूतपुत्र युद्धापासून परावृत्त होऊन पायांनींच पळत सुटला आहे, हें पाहून दुर्योधन आपल्या योद्ध्यांना म्हणाला—" हे वीरहो, तुम्ही सर्व मोठ्या दक्षतेनें चोहोंबाजूंनीं कर्णाच्या रथाकडे सत्वर चला."

( २ ) ज्येष्ठ भ्रात्याची ही आज्ञा ऐकतांच उपचित्र, चित्राक्ष, चारुचित्र, शरासन, चित्रायुध व चित्रवर्मा हे तुझे विचित्र युद्ध करणारे पुत्र तीक्ष्ण शरांचा वर्षाव करीत भीमावर धांवले. भीमहि त्यांच्याकडे वळला व त्यानें एकेका बाणानेंच त्या सर्वांना परलोकीं पाठवून दिलें. तेव्हां तुझे ते महारथी पुत्र तत्काल गतप्राण होऊन वायूनें भग्न होऊन भूतलावर पडणाऱ्या वृक्षांप्रमाणें खालीं पडले.

( ३ ) हे राजा, तुझ्या पुत्रांचा अशाप्रकारें संहार झाल्याचें पाहून कर्णाचें मुख अश्रूंनीं भिजून गेलें. त्याला विदुरवचनाचें स्मरण झालें व तो पराक्रमी वीर दुसऱ्या रथावर आरूढ होऊन पुनः भीमावर चालून गेला. त्या दोघांचें पुनः दारुण युद्ध जुंपलें. त्यांनीं परस्परांस तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. त्या दोघांनींहि आपल्या अंगाला रक्तचंदनाची उटी लावली होती. त्यांतच शरांनीं विद्ध होऊन त्यांचें अंग रक्तानें सिक्त झालें होतें. त्यामुळें ते दोघेहि वीर उदय पावलेल्या चंद्र-सूर्यांप्रमाणें भासले, क्रोधानें नेत्र आरक्त करून ते दोघे भ्राते इंद्र व बलि यांच्यासारखें युद्ध करीत होते.

हे महाराज, त्यावेळीं त्या दोघांहि वीरांनीं अद्भुत पराक्रम प्रकट केला. भीमसेनानें कर्णाला अनेकदा विरथ करून त्याचा पराभव केला, हें पाहून कृष्णार्जुन, सात्यकि, उत्तमौजा व युधामन्यु यांस हर्ष वाटत होता. परंतु त्याचवेळीं त्या शूर पांडवाचें बाहुबल, धैर्य व पराक्रम पाहून तुझे पुत्र खिन्न झाले. ७. ५. १३६.

---

## अध्याय १३७ वा.

[ १ कर्णाचा उद्वेग. २ भीम-कर्णयुद्ध ३ धृतराष्ट्रपुत्रांचा वध. ४ विकर्णाच्या वधाविषयीं भीमाचा शोक. ]

( १ ) **संजय**—हे प्रभो, एका मत्त गजाला दुसऱ्या मत्त गजाची गर्जना जशी सहन होत नाहीं, त्याचप्रमाणें भीमानें केलेला टणत्कार व तलशब्द

कर्णाला सहन झाला नाहीं. त्या राधेयानें क्षणमात्र भीमाच्या दृष्टिआड उभें राहून तुझ्या पुत्रांच्या मृतदेहांचें निरीक्षण केलें. भूमीवर पडलेल्या त्या कुमारांच्या शवांकडे पाहून त्याचें अंतःकरण द्रवलें व नेत्र अश्रूंनीं भरून आले. त्यानें दुःखित मनानें दीर्घ निश्वास सोडले व तो वीर पुनः भीमाच्या पुढें स्थित झाला. सर्पवत् सुस्कारे टाकणारा तो वैकर्तन वृकोदरावर शरवर्षाव करीत असतां किरणयुक्त आदित्याप्रमाणें शोभत होता.

( २ ) हे महाराज, सूर्यकिरणांनीं पर्वत जसा व्यापावा, तसा वृकोदर कर्णाच्या शरांनीं आच्छादित झाला. कर्णाच्या धनुष्यापासून सुटलेले सुवर्णपुंखयुक्त शर अंतरिक्षांतून वेगानें येत असतां ते हंसांच्या संघाप्रमाणें भासले. त्या अधिरथानें आपल्या आकाशगामी बाणांनीं समग्र आकाश व्यापून टाकिलें. त्याचा तो वेग जरी असह्य होता, तरी भीमसेन यत्किंचित्‌हि भ्रान्त झाला नाहीं. त्यानेंहि कर्णाला बाणांनीं झांकून टाकिलें. भीमाचा त्या वेळचा पराक्रम पाहून तुझे वीर त्याची प्रशंसा करूं लागले. चारण हृष्ट झाले. भूरिश्रवा, कृपाचार्य, अश्वत्थामा, शल्य, जयद्रथ, उत्तमौजा, सात्यकि, युधामन्यु व कृष्णार्जुन हे कौरव-पांडवांकडील दहा महारथ 'धन्य धन्य' अशी गर्जना करूं लागले.

याप्रमाणें त्या दोघांचा दारुण संग्राम चालला असतां तुझा पुत्र दुर्योधन मोठ्या संभ्रमानें पुढें झाला व म्हणाला—" हे नृपाल, राजपुत्र आणि सुहृदहो, विशेषतः माझ्या भ्रात्यांनो, तुमचें कल्याण असो; भीमसेनापासून कर्णाचें रक्षण करण्यासाठीं सत्वर निघा. त्या पांडवाचे शर राधेयाचा प्राण घेत आहेत, पहा. यास्तव त्या वीराच्या रक्षणाचा सत्वर यत्न करा."

( ३ ) दुर्योधनाची ही आज्ञा ऐकतांच त्याचे सात सहोदर मोठ्या त्वरेनें बाहेर पडले व भीमाचें निवारण करूं लागले. प्रलयकालीं सोमाला ग्रासणाऱ्या सप्त ग्रहांप्रमाणें त्या कुमारांनीं भीमाला पीडिलें. तेव्हां वृकोदर अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें सात तीक्ष्ण शर धनुष्याला जोडले आणि पूर्ववैर स्मरून त्यांच्यावर मोठ्या त्वेषानें सोडिले. ते प्राणघातक तीक्ष्ण शर तुझ्या पुत्रांचे प्राण हरण करून अंतरिक्षांत उडाले. तुझ्या पुत्रांचीं हृदयें विदीर्ण करून ते सुवर्णपुंखयुक्त बाण आकाशांत संचार करणाऱ्या गरुडाप्रमाणें भासले. ते रत्नजडित बाण तुझ्या कुमारांचें रक्त प्राशन करून अंतरिक्षांत झळकत होते.

हे महाराज, शत्रुंजय, शत्रुसह, चित्र, चित्रायुध, दृढ, चित्रसेन व विकर्ण हे तुझे सात पुत्र मर्मस्थानें विदीर्ण होऊन हत झाले. पर्वताच्या तुटलेल्या कड्यावरील महावृक्ष हत्तीनें मोडले असतां जसे भूमीवर पडतात, तसे तुझे ते बलाढ्य पुत्र गतप्राण होऊन रथांतून खालीं पडले. तुझा पुत्र विकर्णहि वध पावला, हें पाहून भीमाला अतिशय खेद झाला. तो त्याला अतिशय प्रिय होता.

( ४ ) भीमसेन शोकाकुल होऊन असा विलाप करूं लागला—"बा विकर्णा, मी सर्व धार्तराष्ट्रांचा रणांत संहार करीन, अशी प्रतिज्ञा करून बसलों आहें, त्यामुळें माझ्या हातून तुझा वध झाला. मीं माझ्या प्रतिज्ञेचें पालन केलें व क्षत्रधर्माप्रमाणें तुला युद्धांत मृत्यु आला. युद्धनीति अतिशय कठोर आहे. तूं नृपतींच्या विशेषतः आमच्या हिताविषयीं तत्पर होतास. त्यामुळें एकाप्रकारें न्यायानें व दुसऱ्या प्रकारें अन्यायानें तुझ्यासारख्या तेजस्वी वीराचा वध झाला आहे. बा धार्तराष्ट्रा, भीष्मासारख्या बुद्धिमान् व बृहस्पतितुल्य अलौकिक वीरालाहि कालवश व्हावें लागलें. तेथें इतरांची काय कथा! युद्ध अतिशय निष्ठुर आहे, हीच गोष्ट खरी."

संजय—राजा, भीमानें कर्णाच्या समक्ष तुझ्या पुत्रांचा वध करून प्रचंड सिंहनाद केला. जणुंकाय त्या वीरानें आपला विजयच त्या नादानें ध्वनित केला. पराक्रमी भीमाचा तो सिंहनाद ऐकून धर्मराज हृष्ट झाला. त्यानें अनेक रणवाद्यें वाजवून आपल्या भ्रात्याचा गौरव केला. याप्रमाणें भीमानें सिंहनादाच्या रूपानें जें विजयचिह्न दर्शविलें त्याचा स्वीकार करून तो धर्मराजा मोठ्या हर्षानें सर्वशस्त्रविशारद द्रोणावर चालून गेला.

हे महाराज, या युद्धांत भीमानें तुझ्या एकतीस पुत्रांचा वध केला. तेव्हां गतप्राण होऊन पडलेल्या आपल्या त्या भ्रात्यांना पाहून दुर्योधनाला विदुरवचनाचें स्मरण झालें. 'विदुराच्या त्या श्रेयस्कर वचनाचें सत्यत्व आतां माझ्या प्रत्ययाला येत आहे' असा विचार मनांत येऊन तो विमनस्क झाला. त्याला आपलें कर्तव्य सुचेनासें झालें.

हे धृतराष्ट्राजा, तुझा मंदमति पुत्र व कर्ण या दोघांनीं द्यूतप्रसंगीं पांचालीला दुर्वचनें ऐकविलीं. राधेयानें तर तुझ्या पुत्रांच्या व तुझ्याहि समक्ष द्रौपदीवर कठोर वाक्प्रहार केले. 'हे कृष्णे, पांडव नष्ट झाले, ते शाश्वत

नरकाला प्राप्त झाले. आतां तूं दुसरा पति वर ' असें जें तो सूतपुत्र तुझ्या व सर्व कौरवांच्या समक्ष वारंवार बोलला, त्याचें हें फल प्राप्त झालें आहे. त्याचप्रमाणें तुझ्या मूढ पुत्रांनीं महात्म्या पांडवांना ' षण्ढतिलादि ' जीं दुरुत्तरें ऐकविलीं, त्यांचाच हा परिणाम सांप्रत तुला भोगावा लागत आहे.

भीमानें तेरा वर्षें मनांत ठेवलेला क्रोधाग्नि आतां प्रज्वलित झाला आहे. त्याच्याच प्रखर ज्वालेनें तुझे पुत्र दग्ध होऊन मृत्युमुखीं पडत आहेत. विदुरानें तुला व तुझ्या पुत्रांना परोपरीनें उपदेश केला. पण तो तुम्हीं ऐकला नाहीं. आज तुम्हांला त्याचें हें फल भोगावें लागत आहे.

हे राजा, तूं वृद्ध व विचारी आहेस. तुला कार्याकार्याचें यथार्थ ज्ञान आहे. तथापि तूंहि आपल्या सुहृज्जनांचें हितवचन ऐकलें नाहींस. तेव्हां आतां दैवच बलवत्तर आहे, असें मानणें भाग आहे. तुझ्या पुत्रांच्या नाशाला तूंच कारण झाला आहेस. यांत तुझाच अधिक अपराध आहे. यास्तव आतां शोक करून काय उपयोग !

नृपश्रेष्ठा, विकर्ण हत झाला. चित्रसेनहि युद्धांत पडला. दुसरेहि तुझे बलाढ्य पुत्र मृत्युमुखीं पडले. तुझे जेवढे पुत्र भीमाच्या दृष्टीं पडले, त्या सर्वांचा त्यानें संहार केला. भीम आणि कर्ण यांच्या सहस्रावधि बाणांनीं सैन्यें दग्ध होत असतां अतिशय दारुण दृश्य दिसत होतें; पण हे राजेंद्रा, केवल तुझ्यासाठीं मी तें पहात होतों. ७. ५. १३७.

---

## अध्याय १३८ वा.

[ १ समरांगणाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—बा संजया, तूं म्हणतोस तेंच खरें. माझाच मुख्य अपराध आहे. त्याचेंच फल मला आज शोकसागरांत लोटीत आहे. असो. झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. गतगोष्टीचा पश्चात्ताप करण्यांत काय अर्थ आहे ! आतां यापुढें मात्र मी माझें कर्तव्य करीन. संजया, माझ्या अपराधामुळें उद्भवलेला हा वीरांचा क्षय कसा झाला, हें मला सांग. मी तो वृत्तान्त स्वस्थ चित्तानें ऐकतों.

**संजय**—हे राजन्, कर्ण व भीम हे दोघेहि पराक्रमी वीर परस्परांस विद्ध करीत निकरानें युद्ध करूं लागले. त्यांच्या धनुष्यांपासून सुटणाऱ्या

सहस्रावधि शरांनीं त्या सैन्यास सागरापेक्षांहि अधिक क्षुब्ध केलें. चोहोंबाजूंनीं येणारे ते सर्पतुल्य भयंकर शर सैन्याच्या मध्यभागीं पडत होते व तुझ्या सैन्याचा निःपात करीत होते.

गज, अश्व व नर यांच्या मृत देहांनीं व्यापलेलें तें रणांगण वायूनें भग्न होऊन पडलेल्या वृक्षांनींच आच्छादित झाल्याप्रमाणें भासत होतें. भीमाच्या धनुष्यापासून सुटलेल्या शरांनीं विद्ध होणारे योद्धे भीतीनें रणांगणांतून पलायन करीत होते. भीम व कर्ण यांच्या वेगवान् बाणांनीं सिंधु, सौवीर व कौरव यांचीं सैन्यें त्रस्त झालीं व दूर पळालीं. ज्यांतील अश्व, रथ व गज विदीर्ण झाले आहेत व मुख्य मुख्य वीर हत झाले आहेत, अशीं तीं सैन्यें भीम व कर्ण यांना सोडून दाही दिशांत पळत सुटलीं. 'ज्याअर्थीं कर्ण व भीम यांच्या शरांनीं आमच्याच सेनेचा नाश होत आहे, त्याअर्थीं देवच पांडवांच्या जयेच्छेनें आम्हांला मोहित करीत आहेत' असें म्हणत तुझे ते भयार्त झालेले योद्धे बाणकक्षेच्या पलीकडे जाऊन त्या दोघांचें अद्भुत युद्ध पहात उभे राहिले.

राजा, त्यावेळीं तेथें रक्ताची भयंकर नदीच निर्माण झाली होती. ती भीरूंचें भय व शूरांचा हर्ष वाढविणारी होती. योद्ध्यांचे रत्नजडित अलंकार व गजाश्वांचीं विविध भूषणें सर्वत्र पसरल्यामुळें तें रणांगण नक्षत्रयुक्त आकाशाप्रमाणें शोभत होतें. त्या दोघां शूर भ्रात्यांचें अचिंत्य व अतिमानुष युद्ध पाहून सिद्ध-चारण विस्मित झाले. अग्नीला वायूचें साह्य झालें असतां जसा त्याचा प्रभाव तृणावर दिसून येतो, त्याचप्रमाणें कर्ण व भीम यांच्या त्या समागमाचा युद्धांत भयंकर परिणाम जाणवूं लागला. असंख्य ध्वज व रथ भग्न झाले, अश्व, गज व नर हत झाले आणि वीरांचा संहार झाला. दोन मत्त गजांची झुंज लागली असतां वनाचा जसा नाश होतो, तसें मेघजालासारखें दिसणारें तुझें सैन्य उध्वस्त झालें. कर्ण व भीम यांनीं सर्व सैन्याचें मर्दन चालविलें. ७. ५. १३८.

---

१ नदीचें रूपक अनेकदा येऊन गेल्यामुळें तें येथें गाळलें आहे.

## अध्याय १३९ वा.

[ १ कर्ण व भीम यांचें निकराचें युद्ध. २ कर्णानें केलेली भीमाची निर्भर्त्सना. ३ भीमाचें समर्पक उत्तर.]

**(१) संजय**—हे महाराज, नंतर भीम व कर्ण या दोघांहि बलाढ्य योद्धयांचें घनघोर युद्ध जुंपलें. त्यांनीं परस्परांवर घोर शक्ति फेंकल्या, गदाप्रहार केले व शरांचा वर्षाव केला. भीमानें कर्णाला अनेकदा विरथ केलें, त्याचीं धनुष्यें तोडलीं; पण प्रत्येक वेळीं तो वैकर्तन दुसरें धनुष्य घेऊन व दुसऱ्या रथावर आरूढ होऊन पुनः पुनः भीमाशीं युद्ध करण्यास सज्ज झाला. पराभव पावून युद्धपराङ्मुख होणाऱ्या त्या राधेयानें पुनः रणांगणांत परत येऊन युद्ध आरं-भावें, असा प्रकार दीर्घकाल चालला होता.

त्यांच्या असंख्य बाणांनीं अंतरिक्ष व्यापून गेलें. सूर्यप्रकाश येईनासा झाला. वायूचा निरोध झाला आणि आकाश शरजालांनीं आच्छादित झाल्यामुळें कांहीं कळेनासें झालें. त्यावेळीं सूतपुत्र भीमाच्या पराक्रमाची उपेक्षा करीत त्याच्या सन्निध जाऊन पोंचला. कर्ण शर सोडीत असतां ते भीमाच्या बाणां-वर घर्षण पावून त्यांतून अग्नि उत्पन्न झाला व त्याचे विस्फुलिंग सर्वत्र उडूं लागले.

नंतर कर्णानें भीमाच्या वधाकांक्षेनें तीन सोनेरी बाण मोठ्या वेगानें सोडले. पण भीमानें तत्काल शर सोडून त्या बाणांचे अंतरिक्षांतच तुकडे करून टाकिले आणि ‘ थांब, थांब ’ अशी गर्जना केली. हे महाराज, त्यावेळीं परस्परांच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या राधेय-कौंतेयांचा पराक्रम पहाण्या-साठीं योद्धे आपलें युद्ध थांबवून स्वस्थ उभे राहिले. देवर्षि, सिद्ध व गंधर्व यांनीं ‘ धन्य धन्य ’ म्हणून प्रशंसोद्गार काढले आणि विद्याधरांच्या संघांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली.

याप्रमाणें त्यांचें अतिमानुष युद्ध चाललें असतां भीमानें अस्त्रप्रयोग आरं-भिला. परंतु कर्णानें त्या सर्व अस्त्रांचें अस्त्रमायेच्या योगानें ग्रहण केलें. क्रुद्ध झालेल्या कर्णानें भीमाचा भाता, धनुष्य व प्रत्यंचा यांचा छेद केला. अश्वांच्या रश्मि तोडून टाकिल्या, त्याच्या अश्वांचा वध केला आणि सारथ्यावरहि पांच तीक्ष्ण बाण सोडिले. तथापि तो चपल सारथि मोठ्या त्वरेनें युधामन्यूच्या

१ येथील युद्धाचें सर्व पाल्हाळिक वर्णन सोडलें आहे.

रथावर चढला. नंतर अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या वैकर्तनानें हंसतच भीमाचा ध्वज व पताका यांचा छेद करून तीं खालीं पाडविलीं.

त्यावेळीं धनुष्यरहित झालेल्या त्या महाबाहु पांडवानें रथशक्ति घेतली व ती मोठ्या वेगानें कर्णाच्या रथावर फेंकली. परंतु कर्णानें त्या उल्केप्रमाणें प्रकाशणाऱ्या शक्तीचे मार्गांतच तुकडे केले. तेव्हां ती दहा ठिकाणीं भग्न झालेली शक्ति खालीं पडली. शक्ति व्यर्थ झाल्याचें पाहून भीमानें आपली ढाल कर्णावर उडविली. पण कर्णानें अनेक प्रदीप्त शरांनीं त्या ढालीचाहि नाश केला. तेव्हां विरथ झालेला वृकोदर अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें आपलें चकचकीत खड्ग राधेयावर फेंकलें. त्या प्रचंड तलवारीनें कर्णाचें सज्ज असलेलें धनुष्य तोडून टाकलें व अंतरिक्षांतून पडणाऱ्या क्रुद्ध भुजंगाप्रमाणें ती भूमीवर पडली.

धनुष्य भंग होतांच कर्णानें तत्काल दुसरें धनुष्य धारण केलें व भीमावर शरांचा वर्षाव चालविला. तेव्हां बलाढ्य भीमसेनानें कर्णाचें मन व्यथित करीत आकाशमार्गानें उड्डाण करून त्याच्यावर झडप घातली. विजयेच्छु भीमाचें हें अद्भुत कृत्य अवलोकन करितांच कर्णानें आपलें अंग संकुचित केलें व त्याला फसविलें. राधेय भयविह्वल होऊन रथोपस्थावर अंग चोरून निजला आहे, हें पाहून तो पांडव त्याचा ध्वज भग्न करून भूतलावर उतरला. सर्पाला धरणाऱ्या गरुडाप्रमाणें भीमानें कर्णावर झडप घालून त्याला रथांतून उचलण्याचा जो यत्न केला, तो पाहून सर्व कौरव आणि चारण यांनीं त्याची प्रशंसा केली.

त्यानंतर परस्परांशीं स्पर्धा करणारे ते दोघे महाबलाढ्य नरश्रेष्ठ ग्रीष्मऋतूच्या अंतीं गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें एकमेकांवर तुटून पडले. त्या दोघां अमर्षी वीरांचा देव-दानवांप्रमाणें संग्राम सुरू झाला. त्यांच्या त्या दारुण युद्धांत भीमाचीं सर्व शस्त्रें नष्ट झालीं. कर्ण जेव्हां त्याच्या अंगावर धांवून आला त्यावेळीं भीम आयुधहीन झाला होता. तो विरथ होता आणि साह्यरहित होता. तथापि तो पांडव भ्रान्त झाला नाहीं. जवळच अर्जुनानें संहार केलेल्या असंख्य गजांची पर्वतप्राय राशी पडली होती. तेथें भीमसेन कर्णाच्या रथाचा मार्ग चुकविण्यासाठीं वळला व त्या गजराशीचा आश्रय करून रथदुर्गांत शिरला. त्यानें स्वतःचे प्राण वांचविण्यासाठीं कर्णावर चाल केली नाहीं.

त्या परपुरंजय वायुपुत्रानें क्षणमात्र विचार केला व अर्जुनाच्या बाणांनीं मृत होऊन पडलेल्या त्या गजराशींतून एक प्रचंड मृतगज उचलला आणि महौषधियुक्त द्रोणाचल उचलून घेणाऱ्या वायुसुत हनुमानाप्रमाणें तो निश्चल उभा राहिला. परंतु कर्णानें भीमाच्या हातांत तो उगारलेला हत्ती पहातांच शरवृष्टि करून त्याला दूर उडवून दिलें. भीमसेनानें पुनः मृतगजांचे हस्तपादादि अवयव, रथचक्रें, मृत अश्व आणि दुसरेंहि जें कांहीं भूतलावर पडलेलें त्याच्या हातीं लागलें, तें सर्व उचललें व तो तें कर्णावर मोठ्या वेगानें फेंकूं लागला. तथापि त्यानें फेंकलेल्या त्या सर्व वस्तूंचे कर्णानें तीक्ष्ण शरांनीं क्षणार्धांत तुकडे करून टाकिले.

नंतर भीमानें अतिशय दारुण वज्रगर्भ[1] मूठ आंवळून कर्णाचा प्राण घेण्याचें मनांत आणलें. इतक्यांत अर्जुनाच्या प्रतिज्ञेचें त्याला स्मरण झालें. सव्यसाचीनें कर्णवधाची जी प्रतिज्ञा केली होती, त्या प्रतिज्ञेचें रक्षण करण्यासाठीं त्या धर्मापेक्षी पांडुनंदनानें त्याचा वध केला नाहीं.

त्यावेळीं कर्णानेंहि भीमाला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. त्याच्या शराघातानें व्याकुल झालेल्या त्या पांडवाला क्षणमात्र मूर्च्छा आली. तथापि कुंतीचें वचन स्मरून त्या सूतपुत्रानें भीमाचा वध केला नाहीं. तो भीमाच्या समीप धांवत गेला व आपल्या उग्र धनुष्यानें त्याच्यावर प्रहार करूं लागला. धनुष्याचा स्पर्श होतांच भीमसेन चवताळलेल्या सर्पाप्रमाणें उठला व त्याचें तें धनुष्य मोडून त्यानें कर्णाच्या मस्तकावर प्रहार केला.

( २ ) भीमानें ताडन करतांच कर्णाचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले. तो विकट हास्य करीत भीमाला म्हणाला—" हे मूढा, तूं पौरुषहीन असावास, असेंच मला वाटतें. तूं यत्किंचित्‌हि अस्त्रज्ञान संपादन केलेलें नाहींस. यास्तव जा, युद्ध करूं नको. अरे खादाडा, जेथें बहुविध भक्ष्य, भोज्य व पेय पदार्थ विपुल असतील, तेंच स्थान तुला योग्य आहे. हे मूर्खा, तुझें युद्धांत कांहीं काम नाहीं. फल-मूलाशन करावें, व्रत-नियम आचरावे व वनांत रहावें हेंच तुझ्यासारख्या दुर्मतीला उचित ! तूं युद्धविशारद नाहींस. वृकोदरा, कोठें युद्ध व कोठें मुनित्व ! यास्तव तूं वनांत जा.

---

१ वज्रगर्भ म्हणजे आंगठा आंत घेऊन मूठ आंवळणें, यालाच मराठींत ठोंसा असें म्हणतात.

बाबारे, तूं युद्धाच्या उपयोगी नाहींस. तुम्ही वनवासप्रिय आहां. गृहांतील बल्लव, भृत्य, दास, इत्यादि सेवकजनांवर क्रुद्ध होऊन भोजनार्थ त्यांना ताडन करावें, एवढेंच तुला अवगत आहे, किंवा तूं मुनिवेष धारण करून फलाशन करावेंस. यास्तव तूं वनांत निघून जा. तेथें तुला फल-मूलाशन करतां येईल आणि अतिथिपूजनांतहि तूं कुशल आहेस. हे वृकोदरा, तूं शस्त्र चालविण्यास समर्थ नाहींस, असेंच मी समजतों."

संजय—राजा याप्रमाणें कर्णानें भीमाच्या कौमारावस्थेंत घडलेलें सर्व रूक्ष व अप्रियवृत्त त्याला ऐकविलें. तेथें अंग संकुचित करून स्थित असलेल्या भीमाला त्यानें धनुष्याच्या टोकानें पुनः डंवचलें व हंसत हंसत म्हटलें— "बा भीमा, तूं इतरांशीं संग्राम करावास, पण माझ्यासारख्याशीं युद्ध करूं नयेस. माझ्याशीं युद्ध करणाराची अशीच किंबहुना याहूनहि अधिक दुरवस्था होत असते. तूं कृष्णार्जुनांच्या आश्रयाला जा. ते तुझें रक्षण करतील. किंवा तूं आपल्या गृहीं निघून जा. हे कौंतेया, तूं बालक आहेस. तुला युद्धाशीं काय करावयाचें आहे !"

( ३ ) कर्णाचें तें वचन ऐकून भीम हंसला व सर्वांना ऐकूं जाईल, अशा उच्च स्वरानें अतिशय दारुण शब्द बोलला.

भीम—हे दुष्कुलसंभव दुष्टा, मीं तुला अनेकदा जिंकलें असतां व्यर्थ आत्मप्रौढि कशाला सांगत आहेस ! पुरातन लोकांनीं साक्षात् इंद्राचाहि जय-पराजय झालेला पाहिलेला आहे. मग इतरांची काय कथा ! ये, माझ्याशीं द्वंद्वयुद्ध कर. म्हणजे महाबलाढ्य व महाभोगी कीचकाप्रमाणेंच सर्व राजांच्या समक्ष तुलाहि मी गतप्राण करितों."

संजय—हे राजन्, भीमसेनाचा मनोदय कळून येतांच त्या महाबुद्धिमान् कर्णानें सर्व धनुर्धरांच्या समक्ष त्याच्याशीं युद्ध करण्याचें थांबविलें आणि तो युद्धापासून उपरम पावला. याप्रमाणें कर्णानें भीमाला विरथ करून सात्यकि व अर्जुन यांच्या समक्ष त्याची निर्भर्त्सना केली. ती पार्थाला सहन झाली नाहीं. श्रीकृष्णानें प्रेरणा करितांच पार्थानें कर्णावर तीक्ष्ण शर सोडिले. गांडीवापासून सुटलेले ते बाण क्रौंचपक्ष्यावर झडप घालणाऱ्या हंसाप्रमाणें कर्णाच्या शरीरांत शिरले. याप्रमाणें अर्जुनाच्या सर्पतुल्य शरांनीं कर्णाला भीमापासून दूर केलें असतां तो राधेय अर्जुनाच्या बाणांनीं त्रस्त होऊन रथारूढ झाला आणि मोठ्या त्वरेनें भीमापासून दूर पळून गेला.



**भीम**—कर्णा, ये; माझ्याशीं द्वंद्वयुद्ध कर. म्हणजे महाबलाढ्य कीचकाप्रमाणें सर्व राजांच्या समक्ष तुलाहि मी गतप्राण करितों.

[ द्रोणपर्व, अ० १३९, पृ० ४८. ]

त्यानंतर भीमहि सात्यकीच्या रथावर चढला व सव्यसाचीला अनुसरला. त्यावेळीं अर्जुनाचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. त्यानें कर्णाचा पाठलाग केला व त्याच्यावर एक तीक्ष्ण शर सोडिला. तो वेगवान् बाण भुजंगावर झडप घालणाऱ्या गरुडाप्रमाणें अंतरिक्षांतून कर्णावर येऊं लागला. इतक्यांत महारथ अश्वत्थाम्यानें त्याला धनंजयाच्या भयापासून मुक्त करण्याकरितां त्या बाणाचा वरच्यावरच छेद केला.

तें पाहून अर्जुन अधिकच क्रुद्ध झाला, त्यानें त्या द्रौणीवर चौसष्ट शर सोडले व त्याला म्हटलें—" पळूं नको, उभा रहा. "

परंतु पार्थाच्या शरांनीं विद्ध झालेला तो द्रोणपुत्र मत्तगजांनीं व्याप्त असलेल्या कौरवसैन्यांत शिरला. तेव्हां पार्थानें रणांगणांतील सर्व धनुष्यांचा शब्द आपल्या गांडीवाच्या टणत्कारानें लोपवून टाकिला. पार्थानें अश्वत्थाम्याचा पाठलाग करून त्याच्या सर्व सैन्याला आपल्या तीक्ष्ण शरांनीं पळवून लाविलें. त्या इंद्रात्मजानें गजाश्व व नर यांनीं युक्त असलेल्या तुझ्या सैन्याचा निःपात केला. ७. ५. १३९.

---

## अध्याय १४० वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ अलंबुषवध. ४ धार्तराष्ट्रांचें सात्यकीशीं युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, माझें उज्ज्वल यश दिवसेंदिवस नष्ट होत चाललें आहे. माझ्या पक्षांतील अनेक योद्धे हत होऊन पडले आहेत. यावरून आतां विपरीत काल प्राप्त झाला आहे, असेंच दिसतें. कर्ण व अश्वत्थामा रक्षण करीत असतां जेथें देवांचाहि प्रवेश होणें शक्य नाहीं, त्या सैन्यांत आज क्रोधसंतप्त झालेल्या धनंजयानें प्रवेश करून माझ्या योद्ध्यांचा संहार चालविला आहे. कर्ण व द्रौणि या दोघां अमितपराक्रमी वीरांहूनहि अर्जुन अधिक पराक्रमी आहे. त्याला कृष्ण, सात्यकि व भीमसेन यांचें साह्य मिळालें आहे, हें ऐकल्यापासून गृह दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें, शोकाग्नि माझ्या देहाचा दाह करीत आहे.

बा सूता, आज सैंधवासह सर्व नृपाल मृत झाले, असेंच मला वाटतें. किरीटीचा एवढा अक्षम्य अपराध करून ते कसे जिवंत राहणार !

पांडवांचें अप्रिय करणारे ते क्षत्रिय पार्थाच्या दृष्टिकक्षेंत येतांच तो त्यांचा निश्चयानें नाश करील. सैंधव आतांपर्यंत या लोकांतून गेला असावा, असेंच माझें अनुमान आहे. यास्तव त्यांचें युद्ध कसें झालें, तें मला तत्त्वतः कथन कर. कमलवनाचें निर्दालन करणाऱ्या मत्तगजाप्रमाणें, ज्या एकट्या वृष्णि-वीरानें धनंजयासाठीं माझ्या प्रचंड सैन्याचें मर्दन केलें, त्याच्या पराक्रमाचें वर्णन ऐकण्यास मी फार उत्सुक झालों आहें. तूं वर्णन करण्यांत कुशल आहेस. तस्मात् तो वृत्तान्त मला सांग.

( २ ) संजय—हे राजन्, कर्णानें पीडिलेला भीमसेन वीरांमधून चालला आहे, हें पहातांच सात्यकीनें आपला रथ त्याच्या मागोमाग नेला. त्यावेळीं तो शैनेय मेघाप्रमाणें गर्जना करीत होता, सूर्याप्रमाणें ताप देत होता व आपल्या दृढ धनुष्यानें तुझ्या सैन्याला कंपित करीत होता. रणांगणांत गर्जना करीत संचार करणाऱ्या त्या शिनिश्रेष्ठाचें निवारण करण्यास तुझ्याकडील कोणीहि वीर समर्थ झाला नाहीं.

परंतु अलंबुषराक्षस मात्र सात्यकीवर धांवून आला. तेव्हां त्या दोघांचें जसें घोर युद्ध जुंपलें, तसें तें पूर्वी कधींहि झालें नव्हतें. समरांगणाला शोभ-विणाऱ्या त्या दोघांचा अपूर्व संग्राम पहात दोन्ही पक्षांतील योद्धे तटस्थ उभे राहिले.

( ३ ) अलंबुषानें सात्यकीचा अनादर करून त्याच्यावर दहा शर सोडले, पण सात्यकीनें ते मार्गांतच तोडून टाकिले. तेव्हां क्रुद्ध झालेल्या त्या राक्षसानें अग्नितुल्य तीन बाणांनीं शैनेयाच्या कवचाचा भेद केला व चार तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या अश्वांचा वध केला. त्यावेळीं विष्णुतुल्य पराक्रमी असलेला शिनिश्रेष्ठ सात्यकि अधिकच क्षुब्ध झाला. त्यानें तत्काल चार वेगवान् शर सोडून त्या राक्षसाच्या चारी अश्वांना गतप्राण केलें, अग्नितुल्य शरानें सार-थ्याचा वध केला व तीक्ष्ण शर सोडून अलंबुषाचें पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी व कुंडलयुक्त शिरकमल देहापासून वेगळें करून तें खालीं पाडविलें.

( ४ ) हे महाराज, याप्रमाणें त्या अलंबुषाचा वध करून तो यदुश्रेष्ठ सात्यकि तुझ्या सैन्याचें निवारण करीत अर्जुनाच्या मागोमाग निघाला. तो वृष्णिवीर आपल्या मागें येत आहे; हें पाहून अर्जुनाला संतोष झाला. अभ्र-पटलाचा नाश करणाऱ्या वायूप्रमाणें तो शैनेय कौरवसैन्याचा संहार करीत

चालला होता. त्याचे ते सिंधुदेशांतील जातिवंत कामगामी अश्व त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला घेऊन चालले होते.

इतक्यांत दुःशासनादि तुझे पुत्र व इतर वीर एकत्र जमून सात्यकीवर धांवून गेले. त्यांनीं शैनेयाला चोहोंबाजूंनीं परिवेष्टित करून त्याच्यावर शर-वर्षाव चालविला. तथापि त्या सात्वतश्रेष्ठानें बाणजाल पसरून त्यांचें निवारण केलें व अग्नितुल्य शरांनीं दुःशासनाच्या अश्वांना परलोकीं पाठवून दिलें. त्या नरश्रेष्ठाचा तो पराक्रम पाहून कृष्णार्जुनांस अतिशय हर्ष झाला. ७. ५. १४०.

---

## अध्याय १४१ वा.

[ १ सात्यकीचें अर्जुनाकडे गमन. २ सात्यकिप्रशंसा. ३ पार्थाची चिंता. ]

( १ ) संजय—हे महाराज, तो रथिश्रेष्ठ सात्यकि अवश्य त्या कामांत त्वरा करणारा होता. तो वीर धनंजयाच्या विजयेच्छेनें दुःशासनावर चाल करण्यास उद्युक्त झाला व कौरवांच्या अपार सेनासमुद्रांत शिरला. तेव्हां त्रिगर्तदेशांतील धनुर्धरांनीं त्याचें निवारण केलें. सुवर्णध्वजांनीं युक्त असलेल्या त्या वीरांनीं आपल्या रथसमुदायांनीं सात्यकीला वेढून टाकिलें व त्याच्यावर बाणांचा वर्षाव चालविला.

परंतु त्या पन्नास राजपुत्रांचा पराभव करून तो शिनिश्रेष्ठ भारतीसेनेच्या मध्यभागीं येऊन स्थित झाला. त्यावेळीं त्या शैनेयाचा अद्भुत संचार आमच्या दृष्टीं पडला. तो पश्चिमेकडे दिसतो न दिसतो इतक्यांत पूर्वेकडे जाई, पहातां पहातां दक्षिण व उत्तर या दिशांत दृग्गोचर होई व क्षणार्धांत उपदिशांत दृष्टीं पडे. सिंहाच्या गतीनें संचार करणारा तो वीर रणांगणांत जणुंकाय नृत्यच करीत होता. त्याचा तो पराक्रम पाहून त्रिगर्तवीर परत फिरले. अंकुशानें जसें गजाला परत फिरवावें, त्याप्रमाणें त्रिगर्त व अन्य देशांतील योद्धे यांनीं सात्यकीला शरवृष्टीनें निवृत्त करण्याचा यत्न केला. पण क्षणार्धांतच त्यांचें युद्ध संपवून तो शिनिपुंगव कलिंगाकडे वळला.

कलिंगाशीं युद्ध करून त्या दुर्गम सेनेंतूनहि तो पार पडला व जलांत पोहणारा मनुष्य श्रांत होऊन जसा भूमीवर येतो, तसा तो सात्यकि अर्जुना-जवळ जाऊन पोंचला. तेव्हां अर्जुन सुरक्षित आहे, हें पाहून सात्यकीला अतिशय समाधान वाटलें.

( २ ) शैनेय येत आहे, हें पाहून केशव पार्थाला म्हणाला—"हे अर्जुना, हा पहा सत्यपराक्रमी सात्यकि तुझ्या मागोमाग येत आहे. हा वीर तुझा सखा व शिष्य असून त्यानें सर्व कौरववीरांस तृणासमान मानून विजय मिळविला आहे. पार्था, तुला प्राणांहूनहि प्रिय असलेला हा शिनिश्रेष्ठ कौरवांना त्रस्त करून येथेंच येत आहे. त्या अस्त्रवेत्त्या वीरानें धर्मराजाचें प्रिय करण्यासाठीं कौरवांच्या श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धयांचा संहार करून तुझ्याकडे आपला रथ वळविला आहे. त्या महारथानें कौरवसैन्यांत दुष्कर कर्म केलें. द्रोणाचार्यादि अनेक महारथांशीं केवल एका रथानें युद्ध केलें आणि त्यांच्या दुस्तर सैन्याचें उल्लंघन केलें.

हे कौन्तेया, या शैनेयानें केवल स्वबाहुबलाचा आश्रय करून शत्रुसैन्याला दुभंग केलें. धर्मराजाच्या आज्ञेनें तो महात्मा येथें येत आहे. कौरवसेनेंत त्याच्या तुल्य एकहि योद्धा नाहीं. वृषभांच्या समूहांतून निर्भयपणें जाणाऱ्या सिंहाप्रमाणें हा वृष्णिसिंह कौरवसेनेंतून पार पडून तुझ्याकडे येत आहे. पहा! त्यानें सहस्रावधि भूपालांच्या कमलवदनांनीं हें समरांगण व्यापून टाकिलें आहे. भ्रात्यांसह दुर्योधनाचा पराजय केला व जलसंधाचा वध केला. त्यानें रक्ताची नदीच निर्माण केली. कौरवांना तृणवत् दूर उडवून दिलें आणि तो महाबलवान् सात्यकि मोठ्या त्वरेनें तुझ्या दर्शनार्थ इकडेच येत आहे."

( ३ ) कृष्णाचें हें वचन ऐकून कौन्तेय हृष्ट झाला व म्हणाला—"हे केशवा, सात्यकि मजकडे येत आहे खरा, पण मला कांहीं तें प्रिय वाटत नाहीं. कृष्णा, धर्मराजाचा कांहींच वृत्तान्त कळत नाहीं. सात्यकि येथें निघून आला, त्यामुळें मला धर्मराजाच्या जीविताविषयीं शंका वाटूं लागली आहे. त्याचें संरक्षण करण्यास हा महाबलाढ्य वीरच कायतो समर्थ आहे. परंतु हा धर्मराजाला एकटेंच सोडून माझ्या मागोमाग कां बरें येत आहे!

हे वासुदेवा, तिकडे धर्मराज द्रोणाच्या हातीं सांपडला नाहीं ना! इकडे जयद्रथाचा वध झाला नाहीं आणि हा भूरिश्रवा तर सात्यकीवर चालून येत आहे. अशा वेळीं हा सर्व भार मज एकट्यावरच येऊन पडला आहे. यास्तव मला प्रथम राजाचें कुशलवृत्त समजून घेऊन सात्यकीचें रक्षण केलें पाहिजे. जयद्रथवधाचें तर मुख्य कर्तव्य आहेच. परंतु क्षणोक्षणीं सूर्य पश्चिमेकडे जात चालला आहे, सात्यकि श्रांत झालेला दिसत असून तो अधीर झाला आहे. त्याचे अश्व व सारथि क्लान्त झाले आहेत.

उलटपक्षीं भूरिश्रवा श्रांत झाला नसून साह्यसंपन्न आहे. अशा स्थितींत सात्यकि युद्धांत सुरक्षित कसा रहाणार ! हे कृष्णा, कौरवांचा अपार सैन्य सागर तरून येणारा हा महारथ या गोष्पदतुल्य युद्धांत नाश तर नाहींना पावणार ? भूरिश्रव्याच्या संग्रामांत सात्यकि जिवंत राहील ना !

हे केशवा, धर्मराजानें आचार्यांचें भय सोडून सात्यकीला माझ्याकडे पाठवून दिलें, हें योग्य झालें नाहीं, असें मला वाटतें. आमिषावर झडप घालण्यास टपलेल्या आकाशगामी श्येनपक्ष्याप्रमाणें द्रोण धर्मराजाला धरण्याची संधि पहात आहे. यास्तव हे कृष्णा, धर्मराज कुशल असेलना !" ७. ५. १४१.

---

## अध्याय १४२ वा.

[ १ भूरिश्रवा-सात्यकिसंवाद. २ त्यांचा संग्राम. ३ सात्यकीचा पराभव. ४ भूरिश्रव्याचा बाहुच्छेद. ]

(१) संजय—हे राजन्, तो युद्धदुर्मद सात्यकि मोठ्या त्वरेनें येत आहे, हें पाहून भूरिश्रवा क्रोधानें त्याच्यावर धांवला व शैनेयाला म्हणाला—" तूं आज माझ्या दृष्टीं पडलास हें मोठें भाग्य होय. आज माझा मनोरथ पूर्ण होणार. तूं जर रणांगण सोडून पळून गेला नाहींस, तर माझ्या हातून जिवंत सुटत नाहींस. तुला आपल्या शौर्याविषयीं अतिशय अभिमान आहे, पण आज मी युद्धांत तुझा वध करून सुयोधनाला संतुष्ट करीन.

हे दाशार्हा, केशवार्जुन आज तुला माझ्या बाणांनीं दग्ध होऊन धरणीवर पडलेला पहातील. माझ्या हातून तुझा वध झालेला ऐकून ज्यानें तुला येथें पाठविलें तो धर्मराज लज्जित होईल. रक्तानें सिक्त व गतप्राण झालेला तूं जेव्हां भूतलावर शयन करशील, तेव्हां धनंजयाला माझा पराक्रम कळून येईल. पूर्वीं देवासुरांच्या संग्रामांत बलीशीं युद्ध करणाऱ्या इंद्राप्रमाणें तुझ्याशीं संग्राम करावा, अशी माझी फार दिवसांची मनीषा होती. यास्तव आज मी तुझ्याशीं घोर युद्ध करीन आणि माझें वीर्य, बल व पौरुष तुझ्या प्रत्ययास आणून देईन.

हे सात्वता, इंद्रजितास गतप्राण करणाऱ्या रामानुज लक्ष्मणाप्रमाणें तूं आज माझ्या हातून हत होशील. एकदा तूं मृत झालास कीं, कृष्णार्जुन व

धर्मराज यांचा निरुत्साह होऊन ते युद्ध सोडून देतील. हे माधवा, तूं ज्या योद्धयांना गतप्राण केलें आहेस, त्यांच्या स्त्रियांना आज मी तुझी पाद्यपूजा करून आनंद देईन. सिंहाच्या हातीं सांपडलेल्या क्षुद्र मृगाप्रमाणें तूं माझ्या चक्षूंच्या कक्षेंत आल्यावर जिवंत सुटणार नाहींस."

हे महाराज, भूरिश्रव्याच्या या वल्गना ऐकून युयुधान हंसला व त्यानें त्याला असें प्रत्युत्तर दिलें—"हे कौरवेया, मी संग्रामांत कधींहि त्रस्त होत नसतों. केवल वाग्जालानें मला भयभीत करणें शक्य नाहीं. जो कोणीं मला शस्त्ररहित करण्यास समर्थ असेल, तोच युद्धांत माझा वध करूं शकेल. जो कोणीं मला युद्धांत जिंकील, तो सर्वदा शत्रूंचा संहार करून युद्धांत विजयी होईल.

हे वीरा, वृथा प्रलाप करण्यांत काय अर्थ आहे ! तुला जो कांहीं पराक्रम करावयाचा असेल, तो करून दाखीव. शरत्कालीन मेघांप्रमाणें तुझी ही निष्फल गर्जना ऐकून मला हंसूं येत आहे. तूं ज्याची फार दिवसांपासून इच्छा करीत होतास त्या युद्धाचा समय आज प्राप्त झाला आहे. तुझ्याशीं युद्ध करण्याविषयीं माझें मन अतिशय उत्सुक झालें आहे. यास्तव हे पुरुषाधमा, आज तुझा वध केल्यावांचून मी समरांगणांतून परत फिरणार नाहीं."

( २ ) हे धृतराष्ट्र महाराज, याप्रमाणें त्या दोघां नरश्रेष्ठांनीं परस्परांवर वाक्प्रहार केले व नंतर ते दोघेहि क्षुब्ध झालेले वीर एकमेकांवर तुटून पडले. करिणीसाठीं एकमेकांवर प्रहार करणाऱ्या दोन मत्त गजांप्रमाणें परस्परांशीं स्पर्धा करणाऱ्या त्या दोघांचें युद्ध जुंपलें. त्यांनीं मेघतुल्य शरवृष्टि आरंभिली.

सौमदत्तीनें सात्यकीला शरांनीं झांकून टाकिलें, पण त्या शिनिश्रेष्ठानें अस्त्रमायेच्या योगानें त्या शरांचा अंतरिक्षांतच छेद करून टाकिला. प्रतिस्पर्ध्यास नखांनीं विदीर्ण करणाऱ्या व्याघ्रांप्रमाणें, किंवा दंताग्रांनीं परस्पर प्रहार करणाऱ्या हत्तींप्रमाणें ते दोघे वृष्णि व कुरू यांच्या कुलांची यशोवृद्धि करणारे वीर रथशक्तीच्या योगानें परस्परांस त्रस्त करूं लागले. प्राणांचा पण लावून द्यूत खेळणाऱ्या त्या योद्धयांनीं परस्परांच्या अवयवांना क्षतयुक्त केलें. त्यांचे देह रक्तानें माखून गेले.

त्या दोघां बलाढ्य धनुर्धरांनीं एकमेकांच्या अश्वांचा वध केला. धनुष्यांचा छेद केला. रथांतून उतरून खड्गयुद्ध केलें. त्यांनीं भ्रान्त, उद्भ्रान्त, आविद्ध-

१ यांचें वर्णन पूर्वी सविस्तर दिलेलें आहे. भीष्मपर्व पृ. १५ पहा.

प्लुत, संपात इत्यादि अनेक प्रकारचीं मंडलें घेतलीं व आपलें हस्तलाघव आणि युद्धप्रावीण्य प्रकट केलें. नंतर त्यांनीं द्वंद्वयुद्ध आरंभिलें. त्यांतहि त्यांनीं आपलें सर्व प्रकारचें युद्धनैपुण्य व्यक्त केलें. त्या महाबलाढ्य वीरांनीं बत्तीस प्रकारच्या युद्धांचें अवलंबन करून त्या सर्व प्रकारांनीं उत्कृष्ट युद्ध केलें.

इतक्यांत सात्यकि शस्त्ररहित झाला आहे, हें पाहून वासुदेव अर्जुनाला म्हणाला "हे पांडवा, धनुर्धरांतील श्रेष्ठ सात्यकि रणांगणांत विरथ होऊन युद्ध करीत आहे. तो वीर तुझ्या मागोमाग भारतीसेनेला दुभंग करून आंत शिरला आहे. त्यानें कौरवांच्या श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धयांशीं युद्ध करून त्यांचा पराजय केला व श्रांत होऊन तो येथें येत असतां भूरिश्रव्यानें त्याला मार्गांतच गांठून त्याच्याशीं युद्ध आरंभिलें, हें योग्य झालें नाहीं."

त्यानंतर एका मत्त गजानें दुसऱ्या मत्त गजाला जसें आपटावें, त्याप्रमाणें भूरिश्रव्यानें सात्यकीला वर उचलून रथस्थ कृष्णार्जुनांच्या समक्ष भूमीवर आदळलें. तें पाहून कृष्ण अर्जुनाला म्हणाला—"हे धनंजया, हा सात्वतश्रेष्ठ सौमदत्तीच्या हातीं सांपडला आहे. दुष्कर पराक्रम करून श्रांत झालेला हा वीर भूमीवर पडला आहे. यास्तव बा पार्था, आपल्या शिष्याचें सत्वर रक्षण कर. हा सात्यकि तुझ्यासाठीं या यज्ञशील भूरिश्रव्याच्या हातीं सांपडणार नाहीं, अशी त्वरित योजना कर."

अर्जुन हृष्ट चित्तानें म्हणाला—वासुदेवा, मदोन्मत्त गजाला खेळविणाऱ्या सिंहाप्रमाणें हा कुरुसिंह भूरिश्रवा सात्यकीशीं क्रीडा करीत आहे, पहा.

( ३ ) संजय—हे भारता, याप्रमाणें कृष्णार्जुनांचें संभाषण चाललें असतां पांडवसैन्यांत हाहाकार उडाला. महाबाहु भूरिश्रव्यानें सात्यकीला भूमीवर आपटलें व हत्तीला ओढून नेणाऱ्या सिंहाप्रमाणें त्याला कांहीं अंतरावर फरफटत ओढून नेलें, कोशांतून खड्ग उपसलें, सात्यकीचे केस धरले, त्याच्या वक्षःस्थलावर पदाघात केले आणि तो त्याचें कुंडलयुक्त मस्तक त्याच्या देहापासून वियुक्त करणार, इतक्यांत सात्यकि कुंभाराच्या चक्राप्रमाणें आपलें मस्तक, भूरिश्रव्यानें केश धरलेले असतांहि त्याच्या हातासह गरगरां फिरवूं लागला.

याप्रमाणें भूरिश्रवा सात्यकीला अत्यंत क्लेश देत आहे, हें पाहून कृष्ण पुनः पार्थाला म्हणाला—"हे महाबाहो अर्जुना, हा तुझा शिष्य सात्यकि,

तुझ्यातुल्य श्रेष्ठ धनुर्धर आहे. पण तो आज भूरिश्रव्याच्या हातीं पूर्णपणें सांपडला आहे, पहा ! ज्याअर्थीं सत्यपराक्रमी सात्यकीला भूरिश्रवा रणांत मृतप्राय करूं शकतो, त्याअर्थीं पराक्रम व्यर्थच म्हणावा लागतो."

कृष्णाचें हें वचन ऐकून पार्थ भूरिश्रव्याच्या शौर्याचा गौरव करीत मनांत म्हणाला—"हा भूरिश्रवा रणांत जणुंकाय क्रीडाच करीत असल्याप्रमाणें सात्यकीला फरफटत ओढीत आहे व कौरवांची कीर्ति वृद्धिंगत करीत आहे. त्याचा पराक्रम मला पुनः हर्ष देत आहे. हा वृष्णिवीराचा प्राण घेणार नाहीं. पण प्रचंड हत्तीस ओढीत नेणाऱ्या सिंहाप्रमाणें त्याचें आकर्षण करीत आहे."

याप्रमाणें मनांत भूरिश्रव्याची प्रशंसा करून अर्जुन वासुदेवाला म्हणाला—"हे माधवा, जयद्रथावर पूर्ण दृष्टि ठेवावी लागत असल्यामुळें मला सात्यकीकडे लक्ष देतां येत नाहीं. तथापि या यादवासाठीं मी हें दुष्कर कर्महि करितों."

( ४ ) असें बोलून वासुदेवाच्या वचनांत स्थित असलेल्या त्या पांडवानें आपल्या धनुष्याला एक तीक्ष्ण बाण जोडून तो वेगानें सोडला तेव्हां आकाशांतून च्युत झालेल्या महोल्केप्रमाणें पार्थाच्या हातून सुटलेल्या त्या बाणानें भूरिश्रव्याच्या बाहुभूषणानें शोभणाऱ्या खड्गयुक्त बाहूचा छेद केला. ७.५.१४२.

---

## अध्याय १४३ वा.

[ १ भूरिश्रव्यानें केलेली अर्जुनाची निर्भर्त्सना. २ अर्जुनाचें प्रत्युत्तर. ३ भूरिश्रव्याचा वध. ]

( १ ) संजय—हे राजन्, शुभ अंगद व खड्ग यांनीं युक्त असलेला भूरिश्रव्याचा बाहु भूमीवर पडतांच सर्व लोकांना अतिशय खेद वाटला. प्रहार करण्यास उद्युक्त झालेल्या त्या बाहूचा अदृश्य अर्जुनानें छेद करतांच तो पंचमुखी नागाप्रमाणें मोठ्या वेगानें भूमीवर पडला. अर्जुनानें आपला यत्न व्यर्थ घालविला, हें पाहून कौरवाग्रणी भूरिश्रवा सात्यकीस सोडून अर्जुनाची निर्भर्त्सना करूं लागला.

भूरिश्रवा—हे कौन्तेया, मी अन्यत्र युद्ध करण्यांत गढून गेलों असतां, तुझ्याकडे माझें लक्षहि नव्हतें. माझें अनवधान पाहून तूं माझ्या बाहूचा छेद

केलास; हें खरोखर अतिशय निर्दयपणाचें कृत्य केलें आहेस. अरे, 'भूरिश्रवा काय करीत असतां मीं त्याचा युद्धांत वध केला' असें तूं युधिष्ठिराला सांगशील ! तुला ही विद्या शिकविली तरी कोणीं ? साक्षात् इंद्रानें, महेश्वरानें, द्रोणाचार्यानें, कीं कृपानें !

हे पार्था, तूं स्वतःला अस्त्रधर्मज्ञ समजतोस, जगांतील श्रेष्ठ वीर म्हणवितोस आणि आपल्या बरोबर युद्ध न करणारावर रणांत प्रहार करतोस ! हे धर्मकोविदा, प्रमत्त–संज्ञाशून्य, भ्यालेला, विरथ झालेला, शरणार्थी व संकटग्रस्त अशा योद्ध्यावर थोर अंतःकरणाचे वीर प्रहार करीत नसतात. असत्पुरुषच अशा नीच आचरणाचें सेवन करीत असतात. अशा प्रकारचें हें पापकर्म तूं कसें आचरिलेंस !

हे धनंजया, सज्जनाला सत्कर्मच सुकर असतें व अनार्यकर्म त्याच्या हातून घडत नसतें, असें म्हणतात. तथापि हे नरव्याघ्रा, मनुष्य ज्या सत् किंवा असत् सहवासांत असतो व ज्या शुभ किंवा अशुभ कार्यांत प्रवृत्त होतो, त्याला अनुसरून त्याची वृत्ति बनत असते. हाच नियम तुझ्या ठिकाणींहि दिसून येत आहे.

तूं राजकुलांत उत्पन्न झालेला आहेस, विशेषतः कुरुवंशांत तुझा जन्म झालेला आहे. तूं सच्छील व सदाचरणी आहेस. असें असतां आज तूं क्षत्रधर्माचें अतिक्रमण कसें केलेंस ! अरे, सात्यकीसाठीं असलें निंद्य कर्म करण्याची ही तुझी बुद्धि दिसत नाहीं. हें कृष्णाचें मत दिसतें. तुझ्या मनांत हा पापी विचार येणें संभवत नाहीं. अन्यत्र युद्धमग्न असलेल्या गैरसावध योद्ध्यावर प्रहार करून त्याला संकटांत टाकण्यास कृष्णसख्यावांचून दुसरा कोण उद्युक्त होणार ! हे पार्था, व्रात्य, क्लिष्ट कर्मे करणारे आणि स्वभावतःच निंद्य अशा या वृष्णि-अंधकांना तूं प्रमाण तरी कसा मानतोस !

( २ ) अर्जुन—हे प्रभो, मनुष्य जरेनें ग्रस्त होऊं लागला, म्हणजे त्याची बुद्धिहि जीर्ण होत जाते, असें जें म्हणतात, त्याचें सत्यत्व आज माझ्या प्रत्ययाला आलें. तूं जें कांहीं बोललास त्यांत कांहींच तथ्य नाहीं. तूं संग्रामांतील धर्म जाणत आहेस. सर्व शस्त्रविशारद आहेस. मग सर्व जाणत असूनहि हृषीकेशाला व मला व्यर्थ दूषणें कां देतोस ! माझ्या हातून अधर्म घडणार नाहीं, हें जर तूं जाणतोस तर व्यर्थ असा मोहित कां होतोस !

हे राजन्, आपापले भ्राते, आप्त, स्वजन, पिता, पुत्र, स्नेही व बांधव, या सर्व परिवारांसह क्षत्रिय स्वतःच्या बाहुबलाच्या आश्रयानें युद्ध करीत असतात. यास्तव माझा प्रिय शिष्य व आप्त अशा सात्यकीची मीं उपेक्षा कशी करावी! तो वीर आमच्यासाठीं प्राणावर उदार होऊन युद्ध करीत होता. रणांगणांत माझा उजवा हातच असलेल्या युद्धदुर्मद सात्यकीचें रक्षण करणें, हें माझें कर्तव्यच आहे.

हे नराधिपा, रणामध्यें स्वतःच्या जीवाचें रक्षण करूं नये, पण आपल्या-साठीं जे युद्धांत नियुक्त झाले असतील त्यांचें रक्षण अवश्य करावें. अशा योद्धयांचें रक्षण केलें तरच त्यांच्याकडून राजाचें संरक्षण होत असतें. यास्तव माझ्या समक्ष सात्यकीचा वध होत असतां मी तटस्थ राहून केवळ पहात राहीन तर त्याच्या वियोगानें फार मोठा अनर्थ ओढवेल व मला पातक लागेल. तस्मात् मीं त्याचें रक्षण केलें. असें असतां तूं मजवर व्यर्थ कां बरें कोपतोस!

हे राजन्, तूं दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां मीं तुजवर प्रहार केला, असा जो तूं मला दोष देत आहेस, त्याविषयीं माझें मत भिन्न आहे. तूं कवच धारण करून रथारूढ होतास आणि धनुष्याची दोरी ओढून शत्रूशीं युद्ध करीत होतास, त्यावेळीं मीं तुजवर प्रहार केला. हा गंभीर सैन्यसागर रथ, गज, पदाति इत्यादिकांनीं आकुल झालेला आहे. आपलें व शत्रूचें सैन्य एकमेकांत मिसळून गेलें आहे. अशा वेळीं सात्यकि युद्धांत गुंतला असतां, एकानें एका-शींच युद्ध करणें कसें संभवतें!

हे वीरा, हा सात्यकि अनेक वीरांशीं युद्ध करून व महारथांना जिंकून श्रांत झाला आहे. त्याचे अश्व क्लान्त झाले आहेत, मन त्रस्त झालें आहे व देह शस्त्रप्रहारांनीं क्षतयुक्त झाला आहे. अशा स्थितींत तुझ्या हातीं सांपड-लेल्या सात्यकीस युद्धांत जिंकून तूं स्वतःचा पराक्रम अधिक मानीत आहेस. असहाय स्थितींत असलेल्या सात्यकीच्या मस्तकावर खड्गप्रहार करण्यास तूं उद्युक्त झालास, तेव्हां अशा संकटांत सांपडलेल्या सात्यकीची कोण उपेक्षा करील! तुला स्वसंरक्षण करतां आलें नाहीं, यास्तव तूं स्वतःलाच दोष दे. हे वीरा, तुला स्वतःचेंच संरक्षण जर करतां येत नाहीं, तर मग तुझ्या आश्र-याला असलेल्या लोकांचें रक्षण तूं कसें करणार!

**संजय**—हे महाराज, अर्जुनाचें हें भाषण ऐकून महापराक्रमी भूरिश्रवा सात्यकीला सोडून रणांत प्रायोपवेशन करून बसला. त्या महायशस्वी महात्म्यानें डाव्या हातानें दर्भ पसरले आणि ब्रह्मलोकप्राप्तीच्या इच्छेनें प्राणांचें वायूमध्यें संक्रमण केलें. तो मुनि दृष्टि सूर्यामध्यें स्थिर करून व मनाला जलांत प्रसन्न करून महोपनिषादाचें ध्यान करीत योगयुक्त झाला.

तेव्हां सर्व सैनिक कृष्णार्जुनांची निंदा करूं लागले व त्या पुरुषश्रेष्ठाची प्रशंसा करूं लागले. याप्रमाणें कृष्णार्जुनांची निंदा चालली असतां, त्यांनीं यत्किंचित्‌हि अप्रिय शब्द उच्चारला नाहीं. किंवा भूरिश्रवाहि आपली स्तुति ऐकून हृष्ट झाला नाहीं. तथापि तुझ्या पुत्रांचे ते शब्द पार्थाला सहन झाले नाहींत. तो भूरिश्रव्याचें तें वचन ऐकून विमनस्क झाला, त्यानें स्वस्थ चित्तानें विचार केला व आक्षेपपूर्वक भूरिश्रव्याशीं बोलूं लागला.

**अर्जुन**—माझ्या पक्षांतील कोणताहि योद्धा, माझ्या बाणाच्या कक्षेंत असतांना शत्रूकडून वध पावणें शक्य नाहीं, हें माझें महाव्रत सर्व नृपालांना अवगत आहे. यास्तव हे यूपकेतो, विचार कर. व्यर्थ मला दोष देऊं नको. धर्म न जाणतां दुसऱ्याला दोष देणें योग्य नाहीं. तूं जेव्हां त्या वृष्णिवीराचा वध करण्यास उद्युक्त झालास, त्यावेळीं तुझ्या हातांत शस्त्र होतें. तुझ्या शस्त्रयुक्त बाहूचा मीं छेद केला आहे. धर्मानें निंद्य मानलेलें कृत्य मीं केलेलें नाहीं. हे तात, विरथ, कवचहीन, निःशस्त्र व बाल अशा अभिमन्यूचा वध कोणत्या धार्मिकाला प्रशंसनीय वाटेल !

अर्जुन असें बोलला असतां भूरिश्रव्यानें आपलें मस्तक वांकवून भूमीला स्पर्श केला आणि आपल्या डाव्या हातानें उजवा हात अर्जुनाकडे उडवून दिला. पार्थाचें तें वचन ऐकल्यावर तो भूरिश्रवा अधोमुख होऊन स्तब्ध बसला.

तेव्हां अर्जुन त्याला पुनः म्हणाला—हे शलाग्रजा, माझी धर्मराजावर जेवढी प्रीति आहे, बलाढ्य भीमसेन व नकुल-सहदेव हे मला जेवढे प्रिय आहेत, तेवढाच तूंहि मला प्रिय आहेस. तूं औशीनर शिबीप्रमाणें पुण्यवानांच्या लोकीं गमन कर. महात्म्या कृष्णाची व माझी तुला पूर्ण अनुमति आहे.

त्यावेळीं वासुदेवहि त्याला म्हणाला—हे भूपाला, तूं सतत अग्निहोत्र चालविणारा आहेस. माझे जे सद्यःप्रकाशित विमल लोक आहेत, त्यांची ब्रह्मदेवादिकहि इच्छा करीत असतात. त्या लोकीं तूं सत्वर जा आणि मत्तुल्य होऊन गरुडाच्या पाठीवर आरूढ हो.

संजय—हे महाराज, इकडे सौमदत्तीच्या हातांतून सुटलेला सात्यकिहि खड्ग घेऊन उठला आणि त्या महात्म्याचा शिरश्छेद करण्याच्या इच्छेनें पुढें सरसावला. अगोदरच ज्या महात्म्याला अर्जुनानें मृतप्राय करून टाकिलें होतें, त्या विपुल दक्षणा देणाऱ्या भूरिश्रव्याचा वध करण्यास सात्यकि उद्युक्त झाला. भुजाचा छेद झाल्यामुळें तो शुंडाशून्य गजाप्रमाणें दीन होऊन बसला होता.

( ३ ) अशा स्थितींत सात्यकि जेव्हां त्या सौमदत्तीचा वध करण्यासाठीं पुढें झाला, तेव्हां सर्व सैन्यें भयभीत होऊन आक्रोश करूं लागलीं. लोक त्याची निंदा करूं लागले. उदार मनाच्या कृष्णार्जुनांनींहि त्याचें निवारण करण्याचा यत्न केला. भीमसेन, उत्तमौजा, युधामन्यु, अश्वत्थामा, कृपाचार्य, कर्ण, वृषसेन व जयद्रथ यांनींहि त्याचा निषेध केला. तथापि सात्यकीनें त्या कोणाकडेहि लक्ष न देतां आक्रोश करणाऱ्या सैन्यांची उपेक्षा करून त्या व्रतधारण करून बसलेल्या नृपतीचा वध केला.

सौमदत्तीच्या बाहूचा अर्जुनानें छेद केला होता. तो महात्मा रणांगणांत प्रायोपवेशन करून बसला होता. अशा स्थितींत सात्यकीनें त्या भूरिश्रव्याच्या मस्तकाचा खड्गानें छेद केला. तेव्हां त्याच्या या कृत्यामुळें सैन्यें सात्यकीची प्रशंसा करीनातशीं झालीं. अर्जुनानें ज्याला अगोदरच मृतप्राय करून सोडलें होतें, त्याचाच सात्यकीनें शिरश्छेद केला.

तो भूरिश्रवा सहस्राक्ष इंद्रतुल्य होता. तो रणांगणांत प्रायोपवेशन करून बसला असतां वध पावला, हें पाहून सिद्ध, चारण व मानव यांसह विस्मित झालेले देव त्याची प्रशंसा करूं लागले. तुझ्या पक्षांतील सैनिक अनेक प्रकारें प्रलाप करूं लागले. कोणी म्हणाले—"यांत सात्यकीचा अपराध नाहीं. भवितव्यच तसें होतें. यास्तव तुम्ही व्यर्थ कोपूं नका. क्रोध मनुष्याचें दुःख अधिक वाढवीत असतो. वीराच्या हातूनच त्या महात्म्याचा अंत होणार होता. तसें घडून आलें. त्याविषयीं आतां विचार करण्यांत काय अर्थ आहे ! सात्यकीच्या हातून त्याला मृत्यु यावा, असें धात्याचें विधिलिखितच असेल."

हे सर्व प्रवाद ऐकून सात्यकि म्हणाला—हे अधार्मिक योद्धयांनो, धर्माचें पांघरूण घेऊन तुम्ही मला ' वध करूं नको, वध करणें योग्य नव्हे ' इत्यादि धर्मवाद सांगत अहां. पण तुम्हीं जेव्हां अल्पवयी सौभद्रबाळाला निःशस्त्र करून युद्धांत त्याचा वध केलात, तेव्हां तुमचा धर्म कोठें गेला होता !

मी अशाच एका कोणत्या तरी निंदेच्या प्रसंगीं प्रतिज्ञा केली आहे कीं, रणांगणांत मी जिवंत असतां जो कोणी क्रोधानें मजवर पादाघात करील, तो माझा शत्रु मुनिव्रत धारण करून जरी बसलेला असला, तरीहि मला वध्यच आहे. शिवाय हा भूरिश्रवा एका भुजानें मजवर प्रत्याघात करण्याची संधि पहातच होता. तुम्ही हें सर्व प्रत्यक्ष आपल्या नेत्रांनीं पहात असतांना त्याला मृत झालेला म्हणतां, हें तुमच्या बुद्धीचें लाघव आहे.

प्रतिज्ञेचें पालन करणाऱ्या पार्थानें मला पाहूनहि त्याचा सखड्ग हात तोडून टाकला. त्यामुळें मी फसलों गेलों. भवितव्याप्रमाणें सर्व घडून येत असतें. हें सर्व दैवाचें चेष्टित आहे. अशा तुमुल युद्धांत त्याचा वध झाला यांत अधर्माचरण तें काय घडलें ! पूर्वीं या भूलोकीं वाल्मीकि मुनीनें असा एक श्लोक गायलेला आहे. " हे प्लवङ्ग, 'स्त्रिया अवध्य आहेत' असें तूं म्हणतोस खरें, तथापि नित्य व्यवसायी मनुष्यानें शत्रूंना पीडाकारक असें जें जें असेल, तें तें अवश्य केलेंच पाहिजे."

संजय—हे महाराज, सात्यकि असें बोलला असतां त्या कौरवपुंगवांनीं त्याला कांहींहि उत्तर दिलें नाहीं. त्यांनीं मनांतून त्याची प्रशंसा केली. भूरिश्रव्यानें पूर्वीं असंख्य दक्षिणा दिली होती. श्रेष्ठ प्रतीचे यज्ञयाग करून त्यांतील मंत्रांनीं तो पावन झालेला होता. अरण्यवासी मुनीप्रमाणें तो कीर्तिमान् होता. त्या महात्म्याचा तेथें झालेला वध कोणालाहि रुचला नाहीं.

हे राजा, त्या नृपालाच्या मस्तकावरील केस नीलवर्णाचे होते. नेत्र पारव्यासारखे रक्तवर्ण होते. अशा प्रकारचें त्याचें तें शिरकमल हविर्गृहांत ठेवलेल्या मेध्य अश्वाच्या मस्तकासारखें शोभलें. तो भूरिश्रवा तीक्ष्ण शस्त्रानें वध पावल्यामुळें पावन झाला. त्यानें अनेक याचकांच्या इच्छा पूर्ण केल्या होत्या. अशा प्रकारचा वरद सौमदत्ति त्या धारातीर्थीं देह ठेवून श्रेष्ठ धर्माच्या योगानें भूलोक व स्वर्गलोक यांचें आक्रमण करून परम गतीला प्राप्त झाला. ७.५. १४३

---

## अध्याय १४४ वा.

[ १ भूरिश्रवोत्पत्तिकथन. २ वृष्णिप्रशंसा. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, द्रोण, कर्ण, विकर्ण व कृतवर्मा यांच्यासारख्या धनुर्धरांसहि ज्याचा पराभव करतां आला नाहीं व जो युधिष्ठिरापाशीं

प्रतिज्ञा करून कौरवांचा सेनासागर तरून गेला, त्या सात्यकीला भूरिश्रव्यानें धरून भूमीवर कसें लोळविलें असावें ?

संजय—राजा, या शैनेयाची व भूरिश्रव्याची उत्पत्ति कशी झाली, तो वृत्तान्त मी तुला सांगतों. ऐक. तो वृत्तान्त ऐकलास म्हणजे तुझी ही शंका दूर होईल.

हे महाराज, अत्रिऋषीचा 'सोम'-नामक एक पुत्र होता. त्याला 'बुध-' नांवाचा पुत्र झाला. बुधाचा पुत्र पुरूरवा. तो महेंद्रतुल्य तेजस्वी होता. पुरूरव्याचा पुत्र आयु आणि आयूचा पुत्र नहुष. देवर्षिसंमत ययातिराजा हा नहुषाचाच पुत्र होय. ययातीला देवयानीच्या ठिकाणीं झालेल्या ज्येष्ठ पुत्राचें नांव 'यदु' असें होतें. त्या यदूच्या वंशांत देवमीढ जन्म पावला. देवमीढाचा पुत्र त्रैलोक्यसंमत यादव 'शूर'-या शूराचा पुत्र शौरि. हाच वसुदेव होय. हा अप्रतिम धनुर्धर कार्तवीर्यासारखा पराक्रमी होता. याच कुलांत शिनि उत्पन्न झाला.

हे राजा, याच सुमारास देवकनृपतीनें आपल्या कन्येचा स्वयंवर आरंभिला. त्या स्वयंवरार्थ सर्व क्षत्रिय तेथें जमले होते. त्यावेळीं शिनीनें सर्व भूपालांस जिंकून देवकीला वासुदेवासाठीं आपल्या रथांत बसविलें. त्या रथस्थ देवीला पाहून महा तेजस्वी सोमदत्ताला शिनीचें तें कृत्य सहन झालें नाहीं. त्या दोघांचें युद्ध जुंपलें व अर्धा दिवस त्या उभयतां वीरांचें आश्चर्यकारक युद्ध झालें. शेवटीं शिनीनें सोमदत्ताला भूमीवर पाडविलें, खड्ग उपसलें व त्याची शिखा धरून सभोंवार असलेल्या सहस्रावधि नृपतींच्या समक्ष त्यावर लत्ताप्रहार केला. पण शेवटीं त्याच्यावर दया करून त्याला जिवंत सोडून दिलें.

हे मारिषा, शिनीनें अशी दुरवस्था केली असतां सोमदत्त क्रोधवश झाला. त्यानें महादेवाची आराधना करून त्याला प्रसन्न केलें. तेव्हां त्या वरद प्रभूनें संतुष्ट होऊन त्याला वर मागण्यास सांगितलें. त्यावेळीं सोमदत्तीनें 'हे भगवन्, रणांगणांत शिनिपुत्राला पाहून त्याच्यावर पदाघात करील, असा पुत्र मला प्राप्त व्हावा' असा वर मागितला.

तेव्हां 'ठीक आहे, तुझा मनोरथ पूर्ण होईल' असें बोलून महादेव अंतर्धान पावला. त्या वरप्रदानाच्या प्रभावानें सोमदत्ताला भूरिदक्षिण पुत्र प्राप्त झाला. तोच हा भूरिश्रवा होय. त्यानें शिनीच्या पुत्रास सर्व सैन्यासमक्ष भूमीवर पाडवून लत्ताप्रहार केला. राजा, याप्रमाणें हा पूर्ववृत्तान्त मीं तुला कथन केला.

( २ ) हे महाराज, कोणताहि श्रेष्ठ वीर सात्यकीला रणांत जिंकूं शकणार नाहीं. रणांगणांत लब्धलक्ष्य व चित्रयोधी अनेक योद्धे आहेत. ते देव-दानव-गंधर्वांसहि जिंकण्यास समर्थ आहेत. ते परक्याच्या वश न होतां स्वपराक्रमानें विजय मिळवीत असतात. तथापि मला या भूलोकीं वृष्णितुल्य एकहि वीर दिसत नाहीं. त्याच्यासारखा बलाढ्य योद्धा पूर्वीं झाला नाहीं, सांप्रत विद्यमान नाहीं किंवा पुढें होणार नाहीं. हे वृष्णि आपल्या ज्ञातिबांधवांचा कदापि अवमान करीत नाहींत. त्यांच्या आज्ञेंत वागतात. देव, दानव, गंधर्व, यक्ष, उरग किंवा राक्षस यांतील कोणीहि वृष्णिवीरांस जिंकण्यास समर्थ नाहींत, मग मानवांची काय कथा ! ब्रह्मद्रव्य, गुरुद्रव्य किंवा ज्ञातिधन यांचा ते केव्हांहि अपहार करीत नाहींत. ते आपद्ग्रस्तांचे रक्षणकर्ते आहेत. संपन्न असूनहि निरभिमानी आहेत. ते ब्राह्मणभक्त व सत्यवादी आहेत. ते समर्थांचा अवमान करीत नाहींत. दीनांचा उद्धार करीत असतात. ते देवभक्त दान्त व उदार दाते असून कदापि आत्मश्लाघा करीत नाहींत.

एखादा मनुष्य मेरुपर्वतहि उचलूं शकेल, महासागर तरून जाईल; परंतु तो वृष्णिसेनेचा पराभव करूं शकणार नाहीं. वृष्णिवीरांशीं गांठ पडल्यावर त्याला त्यांचें उल्लंघन करून जातां येणें शक्य नाहीं. हे प्रभो, याप्रमाणें तुझ्या संशयाचें मीं निरसन केलें आहे. यांत सर्व दोष तुझाच आहे. ७. ५. १४४.

---

## अध्याय १४५ वा.

[ १ युद्धाविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ दुर्योधनाचें कर्णाला प्रोत्साहन. ४ कर्णाचें उत्तर. ५ तुमुल युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, प्रायोपवेशन करून बसलेल्या भूरिश्रव्याचा वध झाल्यावर पुनः कसें युद्ध झालें ? तें मला सांग.

( २ ) संजय—हे प्रभो, भूरिश्रव्यानें परलोकीं गमन केलें असतां महाबाहु अर्जुन वासुदेवाला म्हणाला—"हा जयद्रथ युद्धांत तीन प्रकारच्या धर्मांचें अवलंबन करीत असतो, असें म्हणतात. ते तीन धर्म कोणते म्हणशील, तर सांगतों, ऐक. युद्ध करतां करतां वध झाल्यास तत्काल स्वर्ग प्राप्ति होते, हा एक धर्म. युद्धांतून पलायन करीत असतां हत झाल्यास नरकप्राप्ति होत असते, हा धर्मांचा दुसरा प्रकार. किंवा माझ्या भयानें तो जर स्वदेशीं प्रयाण करील,

तर त्याच्या यशोरूपी शरीराचा नाश होईल, हा तिसरा प्रकार. यास्तव जोंवर तो सैंधव प्रथमधर्माचा आश्रय करून युद्धाभिमुख स्थित आहे, तोंवरच त्याचा वध करणें उचित आहे. तस्मात् अश्वांना सत्वर प्रेरणा कर आणि जेथें तो जयद्रथ स्थित आहे, तेथें रथ ने.

हे पुंडरीकाक्षा, माझी प्रतिज्ञा सफल करण्यास तूंच एक समर्थ आहेस. सूर्य त्वरेनें अस्ताला चालला आहे आणि मी तर या महत्कार्यास उद्युक्त झालों आहें. कौरवांचे हे सर्व महारथ त्या सिंधुपतीचें रक्षण करीत आहेत. यास्तव सूर्यास्ताच्या पूर्वीं माझी प्रतिज्ञा सत्य होईल, अशा योजनेनें अश्वांना प्रेरणा कर.''

हे महाराज, अर्जुनाचें हें वचन ऐकतांच हयहृदयज्ञ वासुदेवानें आपल्या रजततुल्य वेगवान् अश्वांना प्रेरणा करून पार्थाचा तो श्रेष्ठ रथ जयद्रथाकडे चालविला. ज्याचे बाण अमोघ आहेत, तो पार्थ आपल्या वेगवान् अश्वांच्या योगानें जयद्रथाच्या वधासाठीं धांवून येत आहे, हें पहातांच सेनेंतील मुख्य मुख्य वीर त्याच्यावर तुटून पडले.

दुर्योधन, कर्ण, वृषसेन, शल्य, अश्वत्थामा, कृपाचार्य व जयद्रथ इतके वीर एकाच वेळीं अर्जुनावर चालून गेले. जयद्रथ आपल्या संमुख उभा आहे, हें पाहून अर्जुनानें त्याच्यावर चाल केली. त्यावेळीं तो कौंतेय क्रोधानें आरक्त झालेल्या नेत्रांनीं त्याला दग्धच करीत आहे कीं काय, असा भास झाला.

( ३ ) हे महाराज, जयद्रथाच्या वधेच्छेनें अर्जुन पुढें सरसावला आहे, हें पाहून दुर्योधन त्वरेनें कर्णाला म्हणाला—'' हे वैकर्तना, हा खरा युद्धाचा काल आहे. आतां आपलें सामर्थ्य दाखीव. हे महात्मन्, युद्धांत पार्थाच्या हातून जयद्रथाचा वध होणार नाहीं, अशी कांहीं तरी योजना कर. दिवस अगदीं थोडा उरला आहे. यास्तव शरौघानें शत्रूचा विघात कर. हे नरप्रवीरा, एकदा सूर्यास्त होऊन गेला कीं, आपण निःसंशय विजयी होऊं. सूर्यास्तापर्यंतच जयद्रथाचें संरक्षण झालें पाहिजे. एकदा सूर्य अस्ताला गेला कीं अर्जुन आपली प्रतिज्ञा मिथ्या झाल्यामुळें अग्निप्रवेश करील.

हे मानदा, याप्रमाणें अर्जुनानें प्राणत्याग केला कीं, या जगांत तद्विरहित झालेले त्याचे भ्राते क्षणभरहि रहाणार नाहींत. कर्णा, या पांडवांचा एकदा

नाश झाला कीं, आपल्याला शैल-वन-कानन यांसह या वसुंधरेचा निष्कंटक उपभोग घेतां येईल. दैवामुळेंच पार्थाची वृत्ति विपरीत झाली आहे. खरोखर कार्याकार्य न जाणतां त्यानें रणांत ही प्रतिज्ञा केली.

कर्णा, पार्थानें जयद्रथाच्या वधाची ही प्रतिज्ञा केवल स्वतःच्या नाशासाठींच केली आहे. तुझ्यासारखा अजिंक्य वीर जिवंत असतां अर्जुनाला सूर्यास्तापूर्वी जयद्रथाचा वध करतां येणें कसें शक्य आहे! व्यूहाच्या अग्रभागीं मद्रराज शल्य व महात्मा कृप हे दोघे वीर जयद्रथाचें रक्षण करीत असतां अर्जुन त्याचा प्राण कसा घेणार? अश्वत्थामा, दुःशासन व मी त्याचें रक्षण करीत असतां तो कालप्रेरित बीभत्सु सैंधवाचा कसा वध करील! अनेक शूर योद्धे त्याच्या संरक्षणार्थ झटत आहेत व सूर्यहि दूर जात चालला आहे. यावरून जयद्रथ पार्थाच्या हातीं सांपडणार नाहीं, असेंच मला वाटतें. यास्तव बा कर्णा, तूं अश्वत्थामा, शल्य, कृपाचार्य, मी व इतरहि महारथ यांसह परम यत्नानें पार्थाशीं युद्ध कर.''

( ४ ) हे मारिषा, तुझ्या पुत्राचें हें वचन ऐकून राधेयानें त्याला असें प्रत्युत्तर दिलें.

कर्ण—हे कुरुश्रेष्ठा, लक्ष्यवेधी भीमसेनानें अनेक शरजालांनीं मला युद्धांत अतिशय विद्ध केलें आहे. सांप्रत उभें रहाणें भागच आहे, म्हणून मी रणांगणांत उभा आहें. प्रदीप्त बाणांनीं क्षतयुक्त झालेलें माझें शरीर इतकें बधिर झालें आहे कीं, माझ्यानें जागचें हलवतहि नाहीं. तथापि मी यथाशक्ति युद्ध करीन. तुझ्या कार्यासाठींच माझें जीवित आहे. यास्तव मी त्या पांडवश्रेष्ठाला सैंधवाचा वध करतां येणार नाहीं, असा यत्न करीन.

मी तीक्ष्ण शर सोडीत असतां सव्यसाची पार्थ जयद्रथाच्या रथासमीप जाऊं शकणार नाहीं. हितेच्छु व भक्तिमान् मनुष्याला जेवढें कांहीं करतां येणें शक्य आहे, तेवढें सर्व मी आज तुजकरितां करीन. मग जय मिळणें दैवाधीन आहे. तथापि मी तुझें प्रिय करण्यासाठीं आज रणांत माझी पराकाष्ठा करीन. मी स्वतःच्या पुरुषार्थाचा आश्रय करून युद्ध करीन. जय केवल दैवावर अवलंबून आहे. हे राजा, आज माझें व पार्थाचें दारुण युद्ध सर्वांच्या दृष्टीं पडेल.

( ५ ) हे राजेंद्रा, इकडे दुर्योधन व कर्ण यांचें असें संभाषण चाललें असतां तिकडे पार्थानें तीक्ष्ण शरांनीं तुझ्या सैन्याचा संहार चालविला. त्या

पांडवानें शत्रूंच्या योद्धयांचे परिघतुल्य हात तोडून टाकले. रथ भग्न केले. गजारूढ योद्धयांचीं शकलें केलीं व गजाश्वांच्या मृत देहांनीं रणांगण व्यापून टाकिलें. तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें पार्थानें अल्पावकाशांतच सर्व भूमि रक्तानें सिक्त केली.

याप्रमाणें तुझ्या सैन्यांतील श्रेष्ठ श्रेष्ठ वीरांचा वध करून त्या दुर्धर्ष धनंजयानें सैंधवाला गांठलें. त्यावेळीं भीम व सात्यकि त्याचें रक्षण करीत होते व तो वीर रणांगणांत प्रज्वलित अग्नीप्रमाणें प्रकाशत होता. अर्जुनाची ही वीर्यसंपद् तुझ्या पक्षांतील धनुर्धरांना सहन झाली नाहीं.

दुर्योधन, कर्ण, वृषसेन, शल्य, अश्वत्थामा, कृपाचार्य व स्वतः सैंधवहि या सर्वांनीं मिळून केवल एकट्या सैंधवासाठीं किरीटीला वेढून टाकिलें. त्या सर्वांनीं मिळून सैंधवाला पाठीशीं घातलें व अर्जुनाच्या वधेच्छेनें ते वीर त्याच्या सभोंवार जमले. ते सर्व कौरव आरक्त झालेला सूर्य अस्त केव्हां पावतो, याची प्रतीक्षा करीत होते. त्यांनीं आपल्या भुजगोपम बाहूंनीं धनुष्यें वांकवून सहस्रावधि प्रखर बाण अर्जुनावर सोडिले. पण पार्थानें त्यांचे तुकडे करून त्या रथ्यांनाहि विद्ध केलें.

त्यानंतर शारद्वत कृपाचार्य आपला पराक्रम प्रकट करीत अर्जुनाचें निवारण करण्यास पुढें सरसावला. त्यानें अर्जुनावर दहा व कृष्णावर सात बाण सोडिले व जयद्रथाचें रक्षण करीत अर्जुनाच्या मार्गाचा निरोध केला. तें पाहून कौरवांचे सर्वच महारथ आपल्या प्रचंड रथसमूहासह कृपाचार्यांच्या सभोंवार जमले व तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें धनुष्यें सज्ज करून सैंधवाचें रक्षण करूं लागले.

त्यावेळीं अर्जुनाच्या बाहूंचें बल, बाणांचें अक्षय्यत्व व धनुष्याचा प्रभाव दृष्टोत्पत्तीस आला. त्या पांडवानें अश्वत्थामा व कृप यांच्या अस्त्रांचा प्रत्यस्त्रांनीं नाश केला व प्रत्येकावर दहा दहा बाण सोडिले. तेव्हां त्या सर्व वीरांनीं असंख्य बाणांचा वर्षाव करीत पुनः अर्जुनाला समंततः वेढा दिला. त्या सर्वांनीं मिळून त्याच्या भोंवतीं रथांचें दृढ वर्तुळ केलें.

सूर्यास्ताची वाट पहाणाऱ्या त्या वीरांनीं मोठमोठ्यानें गर्जना करीत व आपलीं धनुष्यें हलवीत पर्वतावर वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें सर्व बाजूंनीं शरांची वृष्टि आरंभिली. दिव्यास्त्रांचा प्रयोग केला, पण अजिंक्य अर्जुनानें त्या

सर्वांचें निवारण करून तुझ्या सैन्यांतील मुख्य मुख्य योद्ध्यांचा संहार केला व सैंधवाला गांठलें. तेव्हां सात्यकि व भीमसेन यांच्या समक्ष कर्णानें तीक्ष्ण बाणांनीं त्याचें निवारण केलें. कर्ण आपला प्रतिकार करीत आहे, हें पहातांच धनंजय, सात्यकि व भीम या तिघांनीं त्याच्यावर बाण सोडले व त्या एकट्या वीराचें तिघांशीं युद्ध जुंपलें. तेव्हां सूतपुत्राचें अद्भुत कर्म आमच्या दृष्टीं पडलें.

अर्जुनानें कर्णावर शंभर बाण सोडून त्याचें सर्व शरीर रक्तानें सिक्त करून टाकिलें. तरी त्या प्रतापवान् वीरानें विह्वल न होतां पार्थावर पन्नास शर सोडले. त्याचें तें हस्तलाघव अर्जुनाला सहन झालें नाहीं. त्यानें कर्णाच्या धनुष्याचा छेद करून त्याच्या वक्षःस्थलावर नऊ बाण मारिले. पण कर्णानें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन पार्थाला शरांनीं आच्छादित केलें. अर्जुनानें शलभांना उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें ते सर्व शर निमिषार्धांत उडवून दिले. याप्रमाणें त्यांचे परस्परांवर शराघात सुरू झाले.

शेवटीं धनंजयानें कर्णाच्या वधेच्छेनें एक सूर्यासारखा तेजस्वी बाण त्वरेनें फेंकला. तो बाण पहातांच अश्वत्थाम्यानें प्रखर अर्धचंद्र बाण सोडून त्याचा मार्गांतच छेद केला. तेव्हां त्याचे तुकडे होऊन तो भूमीवर पडला. नंतर त्यांनीं परस्परांस शरसंघांनीं आच्छादून टाकिलें. त्यांच्या बाणांनीं सर्व आकाश भरून गेलें व ते दोघेहि वीर परस्परांस अदृश्य झाले.

अशाप्रकारें अदृश्यावस्थेंतहि ते दोघे पराक्रमी वीर परस्परांस आह्वान करीत युद्ध करीत होते. 'कर्णा, मी पार्थ आहें, उभा रहा व हे फाल्गुना, मी कर्ण आहें थांब' अशा रीतीनें अंगुलिनिर्देश करून ते परस्परांस वाक्शल्यांनीं टोंचीत होते. त्यांचें तें युद्ध अतिशय प्रेक्षणीय झालें. सिद्ध, चारण व पन्नग त्यांची प्रशंसा करूं लागले.

परस्परांच्या वधेच्छेनें युद्ध करणाऱ्या त्या दोघां श्रेष्ठ धनुर्धरांचा तो दारुण संग्राम पाहून दुर्योधन तुझ्या योद्ध्यांस म्हणाला—"हे वीरहो, अतिशय दक्ष राहून मोठ्या यत्नानें कर्णाचें रक्षण करा. अर्जुनाचा वध केल्यावांचून समरांगणांतून परत फिरणार नाहीं, अशी त्यानें आज मजपाशीं प्रतिज्ञा केली आहे."

इतक्यांत कर्णाचा पराक्रम पाहून पार्थानें त्याच्या चारी अश्वांना गतप्राण केलें. सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडविलें व तुझ्या पुत्रांच्या समक्ष

कर्णाला बाणांनीं आच्छादित केलें. अश्व व सारथि हत होऊन कर्ण शरजालांनीं जेव्हां झांकून गेला तेव्हां तो भ्रान्त झाला. त्याला काय करावें, तें सुचेना.

हे महाराज, कर्णाला विरथ झालेलें पाहून अश्वत्थाम्यानें त्याला आपल्या रथावर घेतलें व पुनः त्याचें अर्जुनाशीं युद्ध जुंपलें. शल्य, कृप, कर्ण यांनीं कृष्णार्जुनांवर पृथक् पृथक् शर सोडिले. अर्जुनाची प्रतिज्ञा मिथ्या करण्यासाठीं ते सर्व एकत्र जमून अर्जुनावर प्रहार करूं लागले. तेव्हां पार्थानें वरुणास्त्र प्रकट करून धार्तराष्ट्रांस त्रस्त केलें.

त्यावेळीं त्यांचें पुनः दारुण युद्ध प्रवृत्त झालें. ते सर्व वीर जरी धनंजयावर तुटून पडले होते, तरीहि तो यत्किंचित्‌हि मोहित झाला नाहीं. कारण त्याला कौरवांच्या राज्याची तर इच्छा होतीच, पण त्यांनीं बारा वर्षें भोगावयास लावलेले क्लेश स्मरून तो निकरानें युद्ध करीत होता. त्या सव्यसाचीच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं दश-दिशा व्याप्त झाल्या. तो किरीटमाली आपल्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं शत्रूंचा संहार करूं लागला. तेव्हां सर्व आकाश प्रदीप्त उल्कांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें भासलें.

त्या महायशस्वी पार्थानें कौरवांकडील श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धयांचा त्यांच्या उत्कृष्ट गजाश्वांसह संहार केला व यमराष्ट्राची वृद्धि करणारा तो पार्थ तुझ्या सैन्यास शरवृष्टीनें दग्ध करीत पुढें निघाला. त्या महाधनुर्धरानें तुझ्या असंख्य सैनिकांस निःशस्त्र करून त्यांना गतप्राण केलें व यमलोकीं पाठवून दिलें. ७. ५. १४५.

---

## अध्याय १४६ वा.

[ १ पार्थाचा पराक्रम. २ कृष्णाचा पार्थाशीं संकेत. ३ जयद्रथाचा जन्मवृत्तान्त. ४ जयद्रथवध. ]

( १ ) संजय—हे महाराज, धनंजयानें आपलें गांडीवधनुष्य विस्फारून त्याचा टणत्कार केला असतां इंद्राच्या अशनिस्फोटासारखा घोर शब्द होऊं लागला. तो भयंकर शब्द मृत्यूच्या गर्जनेप्रमाणेंच भासला. तो प्रचंड ध्वनि कानीं पडतांच तुझें सैन्य भयभीत होऊन भ्रान्त झालें. प्रलयकालच्या वायूनें क्षुब्ध झाल्यामुळें ज्यांतील मीन व मकर लीन झाले आहेत अशा समुद्रा-

प्रमाणें तुझा सैन्यसागर त्यावेळीं भासला. धनंजय एकाच वेळीं सर्व दिशांत विविध अस्त्रें प्रकट करीत संचार करूं लागला. त्याचें तें चापल्य व शरसंधानांतील हस्तलाघव पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें.

हे राजन्, नंतर त्या सव्यसाचीनें सर्व भारतवीरांस ग्रस्त करीत इंद्रास्त्र सोडलें. तेव्हां त्या दिव्यास्त्राच्या प्रभावानें अग्निज्वालेसारखे प्रखर शर उत्पन्न झाले. त्या सूर्यरश्मितुल्य प्रदीप्त बाणांनीं आकाश उल्कांनीं व्यापल्याप्रमाणें दुष्प्रेक्ष्य झालें. तेव्हां कौरववीरांनीं आपल्या शस्त्रांनीं सर्वत्र अंधकार पसरविला. त्याच्या नाशाचा मनांत विचार आणणेंहि इतरांना अशक्य होतें, पण अर्जुनानें तमोनुद भास्कराप्रमाणें दिव्यास्त्रमंत्रित शरांनीं त्या तमाचा क्षणार्धांत नाश केला. आपल्या किरणांनीं जलाशयांतील उदकास तप्त करणाऱ्या सहस्ररश्मीप्रमाणें धनंजयानें तुझ्या सैन्याला शरांनीं तप्त केलें. अर्जुनाचे प्रखर बाण मोठ्या त्वरेनें तुझ्या वीरांच्या हृदयांत शिरले आणि स्वतःच्या शौर्याचा अभिमान बाळगणारे तुझे अनेक योद्धे प्रदीप्त अग्नींत पडणाऱ्या शलभाप्रमाणें नाश पावले.

याप्रमाणें शत्रूंचें जीवित व यश या दोहोंचें हरण करीत तो पार्थ साक्षात् मृत्यूप्रमाणें समरांगणांत संचार करूं लागला. त्यानें असंख्य वीरांचीं किरीटकुंडलयुक्त मस्तकें तोडून टाकिलीं; अनेकांच्या आयुधयुक्त बाहूंचा छेद केला. सारथ्यांचे प्रतोद धारण केलेले हात कापून टाकिले. तो इंद्रतुल्य पार्थ एकाच वेळीं सर्व दिशांत अस्त्रें सोडीत होता. धनुष्याचा टणत्कार व तलशब्द करीत होता. रथमार्गांत जणुंकाय नृत्यच करीत होता. त्यावेळीं तो अतिशय प्रेक्षणीय दिसत होता. त्या पांडवाकडे पहाण्याचा पुष्कळ नृपति यत्न करीत होते, पण प्रखर ताप देणाऱ्या माध्यान्हींच्या भास्कराप्रमाणें ते त्याच्या मुखाकडे पाहूंहि शकले नाहींत. इंद्रधनुष्यानें युक्त असलेल्या वर्षाकालीन मेघाप्रमाणें तो किरीटी तेजस्वी व प्रखर शरांच्या समुदायांत शोभत होता.

अर्जुनानें उत्पन्न केलेल्या त्या महाघोर व दुस्तर दिव्यास्त्रसागरांत श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धेहि बुडून गेले. तेथें सैनिकांच्या छिन्न-भिन्न अवयवांच्या राशी पडल्या होत्या. मदोन्मत्त गजांच्या तुटलेल्या शुंडा व मोडलेले दांत इतस्ततः पसरले होते. रथांचें चूर्ण झालें. अनेक मरणोन्मुख झालेले योद्धे निश्चेष्ट पडले व कांहीं विह्वलत होते. तें रणांगण मृत्यूच्या वधक्रीडेचें आवडतें

स्थल झालें होतें. तें पाहून भीरूंचें भय वाढत होतें. जणुकाय तें पशूंचा संहार करणाऱ्या रुद्राचें क्रीडास्थानच झालें होतें. शूरांच्या मुखकमलांनीं व्यापलेली ती भूमि कमलमाला धारण केल्याप्रमाणें शोभत होती. वीरांच्या रत्नजडित भूषणांनीं अलंकृत झालेली ती मही चित्र-विचित्र अलंकार धारण केलेल्या नववधूप्रमाणें भासली.

हे महाराज, अर्जुनानें त्यावेळीं तेथें रक्ताची वैतरणीसारखी घोर नदीच निर्माण केली. रक्ताच्या प्रवाहानें युक्त असलेली ती नदी पाहून भीरु भयभीत होत होते. पार्थाचें तें कृतान्ततुल्य रूप पाहून कौरवहि भीतीनें ग्रस्त झाले. त्या पांडवानें शत्रूंच्या अस्त्रांचा अस्त्रांनींच नाश करून स्वतःचें उग्र स्वरूप प्रकट केलें.

याप्रमाणें दारुण कर्म करून तो इंद्रात्मज इतर श्रेष्ठ रथ्यांचेंहि उल्लंघन करून पुढें निघाला. त्यावेळीं अर्जुनानें जयद्रथाचा वध करण्याच्या इच्छेनें नाराच बाणांनीं महारथांना मोहित करीत त्यांचें अतिक्रमण केलें. नंतर सर्व दिशा व रथी यांना कदंबाच्या पुष्पाप्रमाणें तुच्छ लेखून तो कौन्तेय जयद्रथाकडे धांवला व त्यानें त्याला चौसष्ट बाणांनीं विद्ध केलें.

अर्जुनाला सैंधवाच्या संमुख गेलेलें पहातांच कौरववीर त्याच्या जीविताविषयीं निराश होऊन युद्धपराङ्मुख झाले. त्यावेळीं जो कोणी अर्जुनावर धांवून जाई, तो प्राणान्तक शरांनीं विद्ध होई. महारथ पार्थानें अग्निज्वालोपम बाणांनीं तुझें सैन्य कबंधांनीं व्यापून टाकिलें. तुझ्या चतुरंग सेनेचें उल्लंघन करून पार्थ जयद्रथावर चालून गेला. त्यानें अश्वत्थामा, वृषसेन, कृपाचार्य, शल्य, कर्ण व जयद्रथ यांच्यावर पृथक् पृथक् बाण सोडून प्रचंड सिंहनाद केला.

याप्रमाणें गांडीवधन्व्यानें शरांचा वर्षाव केला असतां सैंधवाला तो सहन झाला नाहीं. अंकुशानें टोंचलेल्या गजाप्रमाणें तो क्रोधसंतप्त झाला. त्यानें पार्थाचे अश्व व ध्वज, श्रीकृष्णासह स्वतः पार्थ यांवर अनेक तीक्ष्ण शर सोडिले, परंतु अर्जुनानें एका क्षणांत त्या शरांचे तुकडे करून टाकिले. एका बाणानें जयद्रथाच्या सारथ्याचा शिरश्छेद केला व दुसरा एक बाण सोडून त्याच्या ध्वजाचा छेद केला. तेव्हां ध्वजदंड मोडून सिंधुपतीचा तो अग्निशिखोपम देदीप्यमान वराहचिह्नांकित ध्वज भूमीवर पडला.

(२) हे प्रभो, इतक्यांत सूर्य त्वरेनें अस्तास चालला आहे, हें पाहून जनार्दन मोठ्या संभ्रमानें म्हणाला—"हे पार्था, या सहा महारथ वीरांनीं या सैंधवाला परिवेष्टित करून त्याचें रक्षण चालविलें आहे आणि जीविताची इच्छा करणारा हा सिंधुराज भीतीनें त्यांच्या मध्यभागीं स्थित आहे व सूर्य अस्त पावत आहे. या सहाजणांना जिंकल्याशिवाय तुला सैंधवाचा वध करितां येणार नाहीं. या प्रसंगीं कपटावांचून गति नाहीं. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, मी सूर्याला आच्छादित करण्याची उपाययोजना करितों. त्याच्या योगानें सूर्य अस्तासच गेला, असें सैंधवाला निश्चयानें वाटेल व तो जीविताकांक्षी सैंधव लपून बसणार नाहीं. तो दुराचारी सिंधुपति तुझ्या विनाशार्थ निश्चयानें पुढें येईल. ही संधि साधून तूं त्याचा वध कर. सूर्यास्त झाला, असें समजून तूं मात्र स्वस्थ बसूं नको."

तेव्हां अर्जुन 'ठीक आहे' असें म्हणाला. नंतर योगेश्वर हरीनें योगाचें अवलंबन करून सूर्याला आच्छादित करण्याकरितां गाढ अंधकार निर्माण केला. अंधकार पसरलेला पहातांच तुझे सर्व योद्धे सूर्यास्त झाला, असें समजून आतां अर्जुनाचा नाश होईल, या आशेनें हृष्ट झाले, तेव्हां जयद्रथहि हर्षयुक्त होत्साता वर मुख करून पाहूं लागला. पण त्याला भास्कर दिसला नाहीं.

जयद्रथ सूर्याकडे पहात आहे, असें पाहून कृष्ण पुनः धनंजयाला असें वचन बोलला—"भरतश्रेष्ठा, हा पहा जयद्रथ तुझी भीति सोडून सूर्याकडे पहात आहे. या दुष्टाच्या नाशाची हीच वेळ आहे. यास्तव सत्वर याच्या मस्तकाचा छेद करून आपली प्रतिज्ञा पूर्ण कर."

हे राजन्, कृष्णानें असें सांगितलें असतां त्या प्रतापी पांडुपुत्रानें सूर्य व अग्नि यांच्यातुल्य प्रखर शरांनीं तुझ्या सैन्याचा संहार केला. त्यानें कृप, कर्ण, दुर्योधन, वृषसेन व जयद्रथ या सर्वांवर तीक्ष्ण बाण सोडिले. तो बलाढ्य पांडुनंदन याप्रमाणें तुझ्या वीरांना विद्ध करून जयद्रथावर धांवला. प्रदीप्त अग्नितुल्य पार्थ इतका समीप येऊन पोंचला, हें पहातांच जयद्रथाच्या रक्षकांना त्याच्या जीविताविषयीं पराकाष्ठेचा संशय वाटूं लागला.

हे महाराज, त्यावेळीं तुझे सर्व विजयेच्छु वीर अर्जुनावर शरांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां शरजालांनीं आच्छादित झालेला तो अजिंक्य पार्थ अतिशय संतप्त झाला. त्यानें तुझ्या सैन्याच्या नाशार्थ बाणांचें जाळेंच पसरलें. तुझ्या योद्ध्यांचा असा संहार होऊं लागला असतां ते भयभीत होऊन सैंधवास

सोडून पळून गेले. ज्याला जेथें मार्ग मिळाला तेथें तो धांवत सुटला. दोन माणसें कांहीं एका मार्गानें एकत्र गेलीं नाहींत.

हे राजा, त्यावेळीं त्या कुंतीपुत्रानें जें अद्भुत कर्म केलें, तसें पूर्वी कधीं झालें नव्हतें व पुढें कधीं होणार नाहीं. पशूंचा संहार करणाऱ्या रुद्राप्रमाणें पार्थानें तुझ्या चतुरंग सेनेचा विध्वंस आरंभिला. अंतरिक्ष धूलीनें आच्छादित झालें. सर्वत्र अंधकार पसरला. त्यामुळें योद्धयांना कांहीं दिसेनासें झालें. आपला कोण व शत्रु कोणता हेंहि ओळखूं येईनासें झालें. त्यांत पार्थाच्या शरांचा मर्मावर प्रहार झाल्यामुळें ते इतस्ततः धावूं लागले. कित्येक धांवतां धांवतां अडखळून पडले. कांहीं तेथेंच बसले. कोणी क्लान्त झाले. याप्रमाणें प्रलयकालासारखें दारुण रणकदन चालू असतां जमिनीचा पृष्ठभाग रक्तानें भिजून गेल्यामुळें वायूनें उडणारी धूलि खालीं बसली.

हे राजा, याप्रमाणें अर्जुनानें घोर शरांनीं तुझ्या सैन्याला त्रस्त करून सैंधवाच्या रक्षकांचा वध केला. अश्वत्थामा, कृप, कर्ण, शल्य, वृषसेन व सुयोधन यांना शरजालांनीं आच्छादित केलें. त्या सव्यसाचीचें हस्तचापल्य विलक्षण होतें. त्या धनुर्धरानें कर्ण व वृषसेन यांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं. शल्याच्या सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडविलें. अश्वत्थामा व कृपाचार्य या दोघांनाहि अतिशय विद्ध केलें.

अशाप्रकारें तुझ्या महारथांस व्याकुल करून पार्थानें एक अग्नितुल्य घोर शर भात्यांतून काढला. तो दिव्य बाण इंद्राशनिसम दारुण असून अस्त्रानें अभिमंत्रित केला होता. विपुल भार सहन करणारा तो प्रचंड बाण गंध पुष्पांनीं पूजन करून ठेवलेला होता. पार्थानें त्या शरावर वज्रास्त्राचा विधिवत् प्रयोग करून तो अभिमंत्रित बाण मोठ्या त्वरेनें गांडीव धनुष्यास जोडला.

हे महाराज, तो अग्नितुल्य तेजस्वी बाण जोडला जात असतां अंतरिक्षांत प्राण्यांचा प्रचंड ध्वनि होऊं लागला. तो शब्द ऐकून जनार्दन पुनः मोठ्या त्वरेनें पार्थाला म्हणाला—"धनंजया, या दुरात्म्या सैंधवाचा सत्वर शिरश्छेद कर. सूर्य अस्ताचलीं जात चालला, पहा. पण जयद्रथवधाच्या आधीं माझें हें वचन ऐक.

( १ ) जयद्रथाचा पिता वृद्धक्षत्र या लोकीं प्रसिद्ध आहे. त्याला दीर्घ कालानें हा पुत्र झाला. तो पुत्र जन्म पावला त्यावेळीं दुंदुभीसारख्या

घनगंभीर स्वरानें अशी आकाशवाणी झाली—'हे मनुष्येंद्रा, तुझा हा पुत्र कुल-शील-मनोनिग्रहादि गुणांनीं तुमच्या उभय वंशास अनुरूप होईल. हा जगद्वंद्य योद्धा निपजेल. शूरांकडून याचा सन्मान होईल. तथापि हा रणांगणांत युद्ध करीत असतां, याचा एक अलक्षित शत्रु क्रुद्ध होऊन याचा शिरश्छेद करील.'

ही भविष्यद्वाणी ऐकून त्या सिंधुपति वृद्धक्षत्रानें पुष्कळ विचार केला आणि पुत्रस्नेहानें प्रेरित झालेल्या त्यानें आपल्या ज्ञातिबांधवांस असें म्हटलें—'हा माझा पुत्र समरांगणांत फार मोठा भार अंगावर घेऊन युद्ध करीत असतां, जो कोणी त्याचें शिर भूमीवर पाडवील त्याचेंहि मस्तक शतधा विदीर्ण होईल यांत संशय नाहीं.'

असें बोलून त्या वृद्ध क्षत्रराजानें जयद्रथाला राज्यावर बसविलें व वनांत जाऊन उग्र तपश्चर्या आरंभिली. सांप्रत तो तेजस्वी वृद्धक्षत्र या स्यमंतपंचकाच्या बाहेर दुरासद तप करीत बसला आहे. यास्तव हे पार्था, तूं युद्धामध्यें जयद्रथाचा शिरश्छेद करून त्याचें तें मस्तक दिव्य अस्त्राच्या योगानें वृद्धक्षत्राच्या मांडीवर नेऊन टाक. तूं वायुपुत्राचा अनुज आहेस, तेव्हां तुला हें अद्भुत कृत्य अशक्य नाहीं. बा अर्जुना, तूं जर कां त्याचें मस्तक भूतलावर पाडविशील, तर तुझेंहि मस्तक शतधा विदीर्ण होऊन पडेल, हें निश्चित जाण. तपश्चर्या करीत बसलेल्या वृद्धक्षत्राच्या लक्षांत येणार नाहीं, अशा रीतीनें तूं दिव्यास्त्रानें हें कृत्य कर. या त्रिभुवनांत तुला कोणतेंहि कृत्य असाध्य नाहीं.''

(४) संजय—हे महाराज, वासुदेवाचें हें भाषण ऐकतांच पार्थानें जयद्रथवधार्थ आपला वज्रतुल्य बाण काढला. तो दिव्यास्त्रयुक्त शर प्रचंड भार सहन करणारा असून पार्थ त्याची सदोदित गंध-पुष्पांनीं पूजा करीत असे. धनंजयानें तो अमोघ बाण सोडतांच गांडीवापासून सुटलेला तो शर श्येनपक्ष्याप्रमाणें त्वरेनें गेला व सैंधवाच्या मस्तकाचा छेद करून वर आकाशांत उडाला. तेव्हां त्या पांडुपुत्रानें सिंधुपतीचें तें मस्तक कंदुकाप्रमाणें बाणांनीं वरच्यावर उडवीत नेलें व त्याचवेळीं सहा महारथांशीं युद्धहि केलें. धनंजयाच्या बाणांनीं तें मस्तक उडवीत स्यमंतपंचकाच्या बाहेर नेलें. तेथें एक महदाश्चर्य आमच्या दृष्टीं पडलें.

हे राजन्, त्यावेळीं तुझा संबंधी वृद्धक्षत्रराजा संध्योपासना करीत बसला होता. त्याच्या मांडीवर जयद्रथाचें तें कुंतल व कुंडलें यांनीं शोभणारें मस्तक अर्जुनानें पाडविलें. तथापि तो राजा त्यावेळीं जप करीत बसलेला असल्यामुळें तें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. जप संपल्यावर तो जेव्हां उठूं लागला, तेव्हां तें मस्तक एकदम भूतलावर पडलें.

याप्रमाणें वृद्धक्षत्राच्या हातून पुत्राचें मस्तक भूमीवर पडतांच त्या राजाचें मस्तकहि शतधा विदीर्ण झालें. हा चमत्कार पाहून सर्व सैन्यें विस्मित झालीं व त्यांनीं कृष्णार्जुनांची प्रशंसा केली.

हे भरतश्रेष्ठा, किरीटीनें सिंधुराजाचा वध केल्यानंतर वासुदेवानें अंधकाराचा नाश केला. तेव्हां तुझे पुत्र व त्याचे अनुयायी यांना ती कृष्णानें पसरलेली माया होती, हें कळून आलें, पण तें सर्व मागाहून त्यांच्या लक्षांत आलें.

हे नृपश्रेष्ठा, याप्रमाणें अमिततेजस्वी पार्थानें तुझ्या आठ अक्षौहिणी सैन्याचा संहार करून तुझ्या जामात्याचा वध केला. जयद्रथाचें निधन दृष्टीं पडतांच तुझे सर्व पुत्र दुःखाश्रु ढाळूं लागले. जयद्रथ हत झाल्याचें पहातांच कृष्णार्जुनांनीं आपले शंख वाजविले. भीम, सात्यकि, युधामन्यु व उत्तमौजा यांनींहि पृथक् पृथक् शंखनाद केला. तो प्रचंड ध्वनि ऐकतांच युधिष्ठिरानें महात्म्या फाल्गुनानें जयद्रथाचा वध केला असावा, हें जाणलें व त्यानें वाद्यांच्या घोषानें आपल्या योद्ध्यांना हर्षित केलें.

नंतर तो धर्मराज युद्धेच्छेनें द्रोणाचार्याकडे वळला व सूर्य अस्तास जात असतां त्यांचा घोर संग्राम प्रवृत्त झाला. सैंधव वध पावल्यामुळें सर्व योद्धे निकरानें युद्ध करूं लागले. जयोन्मदानें पांडव वीर तुझ्या योद्ध्यांवर तुटून पडले व द्रोणाचार्यांशीं युद्ध करूं लागले. अर्जुनहि सैंधवाचा वध केल्यानंतर तुझ्या इतर योद्ध्यांवर चालून गेला. इंद्र जसा दैत्यांस पळवून लावतो, किंवा सूर्य उदय पावतांच अंधकाराचा अनायासानें नाश करितो, तद्वत् त्या किरीटमालीनें आपली प्रतिज्ञा पूर्ण करून तुझ्या योद्ध्यांचा विध्वंस केला. ७. ५. १४६.

---

## अध्याय १४७ वा.

[ १ कृपाचार्याची मूर्च्छा. २ अर्जुनाचा शोक. ३ कर्ण-सात्यकियुद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, सव्यसाचीनें सैंधवाचा वध केला असतां माझ्या योद्ध्यांनीं काय केलें, तें मला सांग.

संजय—हे भारता, रणांत अर्जुनानें सैंधवाला हत केल्याचें पाहून कृपाचार्य क्रोधसंतप्त झाला व अर्जुनावर शरवृष्टि करूं लागला. रथस्थ अश्वत्थामाहि पार्थावर धांवला. ते दोघे रथिश्रेष्ठ दोहोंबाजूंनीं अर्जुनावर तीक्ष्ण बाण सोडूं लागले. त्यावेळीं त्या शराघातांनीं पार्थ अतिशय पीडित झाला तथापि कृपाचार्य गुरु व अश्वत्थामा गुरुपुत्र यांच्या वधाची इच्छा न करणाऱ्या धनंजयानें त्या पूज्यांचा सन्मानच केला. त्यानें अश्वत्थाम्याच्या व कृपाचार्याच्या अस्त्रांचें प्रत्यस्त्रांनीं निवारण केलें व मंदगतीनें त्यांच्यावर बाण सोडिले. तथापि पार्थाच्या त्या बाणांनीं कृपाचार्य विह्वल झाला आणि पार्थशरांनीं पीडित झालेला शारद्वत रथांतच मूर्च्छित होऊन पडला.

त्यावेळीं त्या शरपीडित कृपाचार्याला पाहून 'आपला स्वामी मरण पावला' असें समजून त्याच्या सारथ्यानें रथ दूर नेला. कृपाचार्याचा युद्धांत पराभव झालेला पाहून अश्वत्थामाहि अर्जुनाला सोडून दुसरीकडे निघून गेला.

( २ ) हे महाराज, कृपाचार्य आपल्या बाणांनीं विद्ध होऊन मूर्च्छित होऊन पडला, हें पहातांच पार्थाला अत्यंत विषाद झाला. त्याचें मुख अश्रूंनीं भिजून गेलें. तो शोकाकूल होऊन असें दीनवचन बोलला—

अर्जुन—महाप्राज्ञ विदुरानें या सर्व गुरुद्रोहादिकांचें भवितव्य जाणलें होतें. म्हणूनच त्यानें हा कुलघ्न पापी दुर्योधन जन्म पावतांच धृतराष्ट्राला सांगितलें कीं, या कुलक्षय करणाऱ्या पुत्रास परलोकीं पाठवून दे. सत्यप्रतिज्ञ विदुराच्या त्या वचनाचा आतां प्रत्यय येत आहे.

या दुरात्म्या दुर्योधनामुळेंच मला आज पूज्य भीष्माचार्यांला शरपंजरीं पडलेलें पहावें लागत आहे. धिक्कार असो या क्षात्रधर्माला व बल-पौरुषाला ! अरे अरे, माझ्यासारखा ब्राह्मणद्रोही—विशेषतः आचार्यांशीं द्रोह करणारा अन्य कोणी असेल काय ! हा कृपाचार्य ऋषिपुत्र असून माझा आचार्य आहे ! द्रोणाचार्यांचा परम सखा आहे ! ! पण असें असतांहि आज त्याला माझ्या शरांनीं विह्वल होऊन रथांत निजावें लागलें ना ?

त्या गुरूला पीडा देण्याची माझी इच्छा नव्हती; तरी माझ्या शरांनीं तो अतिशय व्यथित झाला. रथोपस्थावर पडलेल्या या आचार्याला पाहून माझे प्राण व्याकुल होत आहेत. मी अगोदरच पुत्रशोकानें संतप्त झालों आहें. त्यांत शत्रूंच्या शरांनीं मला अधिकच संत्रस्त केलें. अशा मनःस्थितींत कृपाचार्यांची ही दुरवस्था मला पुत्रवधाहूनहि अधिक दुःख देत आहे.

हे कृष्णा, रथांत निश्चेष्ट होऊन पडलेल्या या कृपाचार्यांकडे पहा! जे श्रेष्ठ पुरुष गुरूपासून विद्या संपादन करून त्याच्या कामना पूर्ण करितात, ते देवत्वाला प्राप्त होतात आणि जे दुराचरणी नराधम गुरूपाशीं अध्ययन करून त्याच्याच जीवावर उठतात ते नरकाला जातात. तस्मात् हे माधवा! आज मीं शरवृष्टीनें कृपाचार्यास रथांत पाडून नरकाचेंच साधन केलें आहे.

पूर्वी अस्त्रप्रदानाच्या वेळीं कृपाचार्य मला म्हणाला होता कीं, बा पार्था, गुरूवर कदापि प्रहार करूं नको. पण आज युद्धामध्यें मीं त्या महात्म्या आचार्यावर शरवर्षाव करून त्याच्या आज्ञेचें उल्लंघन केलें. युद्धपराङ्मुख न होणाऱ्या त्या पूज्य गौतमाला नमस्कार असो व त्या साधूवर प्रहार करणाऱ्या मला धिक्कार असो!

( ३ ) संजय—हे प्रभो, याप्रमाणें सव्यसाची विलाप करीत असतां सैंधवाच्या वधानें क्रुद्ध झालेला कर्ण त्यावर धांवून आला. कर्ण अर्जुनाच्या रथावर चालून येत आहे, हें पहातांच युधामन्यु, उत्तमौजा व सात्यकि हेहि त्याच्या साह्यार्थ धांवले.

राधेय येत आहे हें पाहून पार्थ देवकीपुत्राला म्हणाला—"कृष्णा, हा कर्ण सात्यकीच्या रथावर चालून जात आहे. रणांगणांत भूरिश्रव्याचा झालेला वध त्याला सहन झाला नसावा. तो जिकडे जात आहे, तिकडेच रथ ने. म्हणजे हा कर्ण सात्यकीला सौमदत्तीच्या भेटीला पाठवूं शकणार नाहीं. त्याच्या रथाकडे अश्वांना प्रेरणा कर."

अर्जुनाचें हें वचन ऐकून जनार्दनानें त्याला समयोचित उत्तर दिलें—"हे पार्था, एकटा सात्यकि कर्णाला अजेय आहे. त्यांत आणखी द्रुपदपुत्र त्याचे साह्यकर्ते असल्यावर मग तर काय सांगावें! शिवाय पार्था, सांप्रत तुझा कर्णाशीं संग्राम होणें इष्ट नाहीं. त्या वैकर्तनापाशीं उग्र वासवी शक्ति आहे, ती महोल्केसारखी प्रज्वलित आहे. कर्णानें तिचें पूजन करून ती तुझ्यासाठीं

ठेवलेली आहे. यास्तव कर्णाला सात्वताकडे जाऊं दे. या दुरात्म्याचा काल मला ठाऊक आहे. तो समय प्राप्त झाला म्हणजे मी तुला सांगेन. त्यावेळीं तूं तीक्ष्ण शरांनीं त्याला भूतलावर पाडीव.

धृतराष्ट्र—संजया, भूरिश्रवा पडल्यानंतर व जयद्रथाचा वध झाल्यावर कर्ण व सात्यकि यांचा जो संग्राम झाला त्याचा वृत्तान्त मला सांग. विरथ झालेला सात्यकि व त्याचे दोघे चक्ररक्षक पांचालपुत्र कोणाच्या रथावर आरूढ झाले ?

संजय—राजा, ठीक आहे. त्या महायुद्धांत जसें वृत्त घडलें, तसेंच मी तें तुला कथन करतों. तूं स्थिर चित्तानें आपल्या दुराचरणाचा परिणाम श्रवण कर. हे प्रभो, सौमदत्ति उद्यां सात्यकीचा पराभव करणार, हें कृष्णानें आदल्याच दिवशीं जाणलें होतें. कारण तो जनार्दन भूत-भविष्यद्वेत्ता आहे. त्यामुळें श्रीकृष्णानें मनांत विचार केला व आपल्या दारुकाला हांक मारून 'उद्यां प्रातःकालींच माझा रथ सज्ज करून ठेव' अशी आज्ञा केली होती.

राजा धृतराष्ट्रा, देव, गंधर्व, यक्ष, उरग, राक्षस, किंवा मानव यांतील कोणीहि कृष्णार्जुनांस जिंकण्यास समर्थ नाहींत. पितामहादि देव व सिद्ध त्यांचा पराक्रम जाणतात. त्यांचा अतुल प्रभाव आणि युद्धाचा वृत्तान्त सांगतों, तो श्रवण कर.

विरथ झालेल्या सात्यकीवर कर्ण धांवून येत आहे, हें पाहून माधवानें मोठ्यानें शंख वाजविला. तो ध्वनि कानीं पडतांच दारुकानें तो आपल्यालाच संदेश आहे, हें जाणलें आणि आपला सुवर्णध्वजानें शोभणारा रथ त्याच्याकडे नेला. तेव्हां सात्यकि केशवाच्या अनुज्ञेनें त्या अग्नितुल्य देदीप्यमान रथावर आरूढ झाला. त्या रथाला शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक हे इच्छागामी वेगवान् अश्व जोडलेले होते. त्या विमानप्रतिम रथांत बसून तो शैनेय शरांचा वर्षाव करीत कर्णावर धांवला. तेव्हां उत्तमौजा व युधामन्यु हेहि दोघे चक्ररक्षक अर्जुनाचा रथ सोडून कर्णाच्या रथाकडे वळले.

हे महाराज, त्यावेळीं कर्ण व सात्यकि यांचें जें युद्ध झालें, तशाप्रकारचें युद्ध पूर्वीं देव, गंधर्व, असुर किंवा राक्षस यांचें कधीं पृथ्वीवर किंवा स्वर्गांतहि झालें नव्हतें. त्यांचा पराक्रम पाहून विस्मय पावलेलें चतुरंग सैन्य स्वस्थ उभें राहिलें. त्यांतील सर्व योद्धे त्या नरश्रेष्ठांचें युद्ध व दारुकाचें सारथ्य उत्सुकतेनें

पाहूं लागले. विविध मंडलें घेऊन रथ चालविण्याचें त्याचें कौशल्य पाहून अंतरिक्षांत जमलेले देव, दानव व गंधर्व त्याची प्रशंसा करूं लागले आणि कर्ण-सात्यकींचा तो संग्राम दक्षतेनें पाहूं लागले.

हे राजेंद्रा, ते दोघेहि बलाढ्य योद्धे आपापल्या मित्रांसाठीं पराक्रम करीत होते. भूरिश्रवा व जलसंध यांचा वध सहन न झाल्यामुळें कर्णानें सात्यकीस बाणवृष्टीनें झांकून टाकिलें. शोकाकुल झालेला तो राधेय क्रुद्ध सर्पाप्रमाणें उष्ण निःश्वास टाकीत जणुंकाय त्याला दग्धच करीत पुनः पुनः सात्यकीवर धांवून जात होता. कर्ण अतिशय क्रोधसंतप्त झाला आहे, हें पाहून सात्यकिहि मोठ्या वेगानें त्याच्यावर चालून गेला.

ते दोघे अतुल पराक्रमी नरव्याघ्र एकमेकांवर प्रहार करूं लागले. सात्यकीनें सर्व पारसव शरांनीं कर्णाला पुनः विद्ध केलें. एका तीक्ष्ण बाणानें त्याच्या सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडविलें, त्याच्या चारी अश्वांचा वध केला, त्याचा ध्वज तोडून टाकिला व रथ भग्न करून त्याचे सहस्रावधि तुकडे केले. याप्रमाणें दुर्योधनासमक्ष त्याला विरथ केलें.

कर्ण विरथ झालेला पहातांच कर्णाचा पुत्र वृषसेन, मद्राधिप शल्य व अश्वत्थामा यांनीं शैनेयाला चोहोंबाजूंनीं वेढून टाकिलें. तेव्हां भ्रांत झालेल्या इतर सैन्याला काय करावें, हें कळेनासें झालें.

सात्यकीनें कर्णाला विरथ केलेलें पाहून सर्वत्र हाहाकार उडाला. इतक्यांत कर्णहि आपल्या उपकारकर्त्या दुर्योधनाच्या रथावर चढला. तुझ्या पुत्राशीं त्याची बाळपणापासून मैत्री होती. त्यानें राज्यप्रदानाच्या वेळीं केलेली प्रतिज्ञा स्मरून दीर्घ निःश्वास सोडीत तुझ्या पुत्राच्या रथाचा आश्रय केला.

हे पार्थिवा, याप्रमाणें सात्यकीनें कर्णाला विरथ केलें व तुझ्या दुःशासनादि पुत्रांना शराघातांनीं विह्वल केलें. तथापि भीमाच्या प्रतिज्ञेचें रक्षण करण्या-साठीं त्या निग्रही वीरानें त्यांचे प्राण हरण केले नाहींत. अनुद्यूतप्रसंगीं भीमानें तुझ्या पुत्रांच्या वधाची व अर्जुनानें कर्णवधाची प्रतिज्ञा केली होती.

कर्णप्रभृति महारथांनीं सात्यकीच्या वधाचा यत्न केला, पण तें दुष्कर कर्म त्यांना साधलें नाहीं. परलोक व धर्मराजाची प्रीति संपादन करण्याच्या

इच्छेनें एकट्या सात्यकीनें अश्वत्थामा, कृतवर्मा, इतर महारथ व श्रेष्ठ क्षत्रिय या सर्वांस एका धनुष्यानें जिंकिलें. हे राजा, त्या परंतप सात्यकीचा पराक्रम उभय कृष्णांच्या सदृश आहे. त्यानें हंसतच तुझ्या सर्व सैन्यांना जिंकलें. या भूलोकीं एक कृष्ण, दुसरा पार्थ व तिसरा सात्यकि हे तीनच धनुर्धर आहेत. त्यांच्यातुल्य चवथा वीर नाहीं.

धृतराष्ट्र—संजया, रणामध्यें वासुदेवाच्या अजेय रथावर आरूढ झालेल्या व वासुदेवतुल्य पराक्रमी असलेल्या सात्यकीनें कर्णाला विरथ केलें. पण ज्याचा सारथि दारुक आहे, अशा शैनेयाला आपल्या बाहुबलाचा दर्प होता. त्यालाहि दुसऱ्या रथावर आरूढ व्हावें लागलें काय ! सात्यकि शत्रूला असह्य झाला असावा, असें मला वाटतें. संजया, तूं वर्णनकुशल आहेस, यास्तव मला तो सर्व वृत्तांत कथन कर.

संजय—हे राजन्, तेथें घडलेला सर्व वृत्तान्त सांगतों ऐक. दारुकाच्या अनुजानें उत्कृष्ट प्रकारें सज्ज केलेला दुसरा रथ तेथें आणला. त्या रथावर आरूढ होऊन सात्यकि तुझ्या सैन्यावर धांवला आणि दारुकहि स्वेच्छेनेंच केशवाच्या समीप गेला. इतक्यांत कर्णालाहि तुझ्या पक्षांतील लोकांनीं सुसज्ज रथ आणून दिला. तो रथ कुशल सारथ्यानें युक्त होता. त्यावर आरूढ होऊन कर्णानें शत्रूवर चाल केली.

हे महाराज, तूं विचारलेला सर्व वृत्तान्त मीं तुला सांगितला. आतां तुझ्याच अपनयामुळें केवढा क्षय झाला, तो सांगतों ऐक. भीमसेनानें तुझ्या विचित्र-योधी दुर्मुख पुत्रापासून आरंभ करून आतांपर्यंत एकतीस पुत्रांचा वध केला. अर्जुनानें भीष्मापासून व सात्यकीनें भगदत्तापासून आरंभ करून सहस्त्रावधि वीरांना गतप्राण केलें. तुझ्या दुर्मंत्रित्वामुळें हा सर्व संहार झाला. ७. ५. १४७.

---

## अध्याय १४८ वा.

[ १ भीमार्जुनसंवाद. २ कर्णाची निर्भर्त्सना. ३ अर्जुनाचें अभिनंदन. ४ समर-भूमीचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, माझे पुत्र व पांडव यांच्या योद्ध्यांचा असा क्षय होत असतां भीमसेनानें काय केलें ? तें मला तत्त्वतः ऐकूं दे.

संजय—राजा, भीम विरथ झाला असतां कर्णानें त्याच्यावर जे वाक्प्रहार केले, ते मीं तुला सांगितलेच आहेत. त्याचे ते कठोर शब्दप्रहार अमर्षी वृकोदराला सहन झाले नाहींत. तो क्रोधसंतप्त होऊन अर्जुनाला म्हणाला—"हे धनंजया, तुझ्या समक्ष कर्ण मला कशीं दुरुत्तरें बोलला तीं तूं ऐकलींच आहेस. 'मूढ, औदरिक, तूबरक, अकृतास्त्रज्ञ' इत्यादि सर्व दुर्वचनांनीं त्यानें मला संबोधिलें. 'तूं संग्रामकातर बाल आहेस. तूं युद्ध करूं नको.' असें पुनः पुनः बोलून त्यानें माझा उपमर्द केला आहे. जो कोणी माझी अशी निंदा करील तो मला वध्य होईल, अशी तुझ्याच बरोबर मींहि प्रतिज्ञा केली आहे. तिचें मला अवश्य पालन केलेंच पाहिजे. यास्तव हे महाबाहो, माझ्या या वचनाचें स्मरण ठेवून तें सत्य होईल, अशी योजना कर."

( २ ) अमित पराक्रमी भीमसेनाचें तें भाषण ऐकून पार्थ पुढें सरसावला व कर्णास म्हणाला—हे आत्मश्लाघा करणाऱ्या सूतपुत्रा कर्णा, तुझी दृष्टि मिथ्या आहे. तूं अधर्मबुद्धीचा आहेस. मी तुला आतां जें सांगणार आहें तें लक्षपूर्वक ऐक.

हे राधेया, युद्धामध्यें शूरांना जय व पराजय हे द्विविध परिणाम प्राप्त होत असतातच. युद्धांत साक्षात् वासवाचाहि जयापजय अनित्य असतो. त्या देवेंद्राचाहि नित्य जयच होत असतो, असें निश्चित नाहीं, मग मानवांची काय कथा? अरे, सात्यकीनें तुला विरथ करून तुझीं गात्रें विकल करून टाकिलीं होतीं. त्यावेळीं त्याच्या हातून तूं मृत्युमुखींच पडला असतास, पण तूं मलाच वध्य आहेस, हें जाणून त्यानें तुला जिवंत सोडून दिलें.

आतां महाबलाढ्य भीमसेन युद्ध करीत असतां तूं यदृच्छेनें कसें तरी त्याला विरथ करून दुर्वचनें बोललास हा खरोखर अधर्म होय. तुझें हें वर्तन अनार्य माणसालाच शोभण्यासारखें आहे. शूर नरश्रेष्ठ शत्रूला जिंकून कदापि आत्मश्लाघा करीत नाहींत, त्याला दुर्वचनें ऐकवीत नाहींत किंवा वृथा वल्गना करून दुसऱ्याची निंदाहि करीत नाहींत.

हे मूढ सूतजा, तुझी बुद्धि अपरिपक्व आहे, म्हणून तूं असा प्राकृताप्रमाणें वल्गना करून अवाच्य शब्द बोलत आहेस. आर्यव्रतांत स्थित होऊन युद्ध करणाऱ्या भीमसेनाला तूं जीं अप्रिय वचनें ऐकविलींस तें योग्य केलें नाहींस.

सर्व सैन्यें, श्रीकृष्ण व मी पहात असतां, आमच्या समक्ष शूर भीमसेनानें तुला कितीदा तरी विरथ केलें आहे. तथापि त्यानें तुझी यत्किंचित्‌हि निर्भर्त्सना केलेली नाहीं.

ज्याअर्थी तूं वृकोदराला कठोर वचनें ऐकविलींस आणि तुम्हीं सर्वांनीं मिळून माझ्या सौभद्राचा माझ्या परोक्ष वध केलात, त्याअर्थी आतां तूं त्या सर्व अन्यायाचें फल भोग. हे दुर्मते, तूं आत्मनाशार्थच अभिमन्यूचें धनुष्य तोडलेंस. मूढा, मी तुझे भृत्य, पुत्र व बांधव यांसह तुझा वध करीन. तूं आतां महत्संकटांत सांपडला आहेस, यास्तव तूं आपलीं सर्व कार्यें उरकून घे. मी तुझ्या समक्ष वृषसेनाचा वध करीन. दुसरेहि जे नृपति माझ्या संमुख येतील, त्यांचाहि संहार करीन. मी प्रतिज्ञापूर्वक शस्त्र हातीं घेत आहें, पहा. तूं अविचारी व अहंमन्य आहेस. पण तो मंदमति दुर्योधन तुला रणांमध्यें मृत होऊन पडलेला पाहून अतिशय शोकसंतप्त होईल.

संजय—हे महाराज, याप्रमाणें अर्जुनानें कर्णपुत्र वृषसेनाच्या वधाची प्रतिज्ञा केली असतां सर्व रथिश्रेष्ठांत फार मोठा कोलाहल झाला. याप्रमाणें सर्व योद्धयांना व्याकुल करणाऱ्या त्या संग्रामांत महद्भय उपस्थित झालें असतां सहस्ररश्मि अस्ताचलीं गेला.

( ३ ) हे प्रभो, नंतर, प्रतिज्ञेंतून पार पडलेला पार्थ संग्रामाच्या शिरोभागीं स्थित असतां हृषीकेशानें त्याला आलिंगन देऊन म्हटलें—"हे जिष्णो, तूं दुष्कर प्रतिज्ञेंतून पार पडलास हें महद्भाग्य होय. पापी वृद्धक्षत्रहि पुत्रासह नाश पावला, हेंहि मोठें सुदैवच होय. हे भारता, सुयोधनाच्या या प्रचंड सेनेपुढें देवसेनाहि क्षय पावेल. या सैन्याशीं संग्राम करण्यास तुझ्या वांचून अन्य धनुर्धर समर्थ होणार नाहीं. दुर्योधनाच्या पक्षांत त्वत्तुल्य किंबहुना तुजहूनहि अधिक पराक्रमी असलेले अनेक भूपाल एकत्र जमले आहेत. पण तेहि कवचें चढवून सज्ज झालेले योद्धे तुझ्या पुढें आल्यावर जिवंत परत फिरणार नाहींत. तुझा पराक्रम साक्षात् रुद्र, इंद्र, किंवा यम यांच्या तुल्य आहे. तूं एकट्यानें आज रणांत जो पराक्रम दाखविलास, तसा पराक्रम करण्यास अन्य कोणीहि समर्थ नाहीं. धनंजया, तूं जेव्हां दुरात्म्या कर्णाचा त्याच्या अनुयायांसह निःपात करशील व शत्रूला जिंकशील, त्यावेळींहि मी तुझी अशीच प्रशंसा करीन."

अर्जुन—हे माधवा, केवल तुझ्या प्रसादामुळेंच मी या देवांनाहि दुस्तर अशा प्रतिज्ञेंतून पार पडलों. हे केशवा, तूं रक्षक असल्यावर जय मिळाल्यास कांहीं आश्चर्य नाहीं. तुझ्या प्रसादानेंच युधिष्ठिरास ही समग्र पृथ्वी प्राप्त होईल. हे वार्ष्णेया, हा तुझाच प्रभाव आहे व हा विजयहि तुझाच आहे. हे प्रभो, तूंच आमची नित्य वृद्धि करीत असतोस.

( ४ ) पार्थ असें बोलला असतां कृष्णानें अश्वांना प्रेरणा करून त्यांना सावकाश चालविलें व ती विस्तीर्ण भयानक रणभूमि पार्थास दाखवीत म्हटलें—" हे अर्जुना, तुझ्या शरांनीं हत होऊन पडलेले हे नृपाल पहा. ते सर्व युद्धांत विजयी होऊन महद्यशाची इच्छा करणारे बलाढ्य वीर होते. त्यांचीं शस्त्रें व भूषणें इतस्ततः पसरलीं आहेत. कांहीं योद्धे मर्मस्थानें छिन्न-भिन्न होऊन विकल होऊन पडले आहेत. येथें कांहीं क्षत्रिय गतप्राण होऊन पडले आहेत व कित्येक मरणोन्मुख होऊन अद्यापि प्राण धारण करीत आहेत. तथापि त्या सर्वांच्या चर्येवर विलक्षण तेज झळकत असल्यामुळें मृत झालेले नराधिपहि सजीव असल्याप्रमाणेंच भासत आहेत.

त्याचप्रमाणें या सर्व योद्धयांचे विविध प्रकारचे अलंकार, भूषणें व नाना-विध शस्त्रें या रणांगणांत सर्वत्र इतस्ततः कशीं पसरलीं आहेत, पहा. शरत्कालांतील ग्रहांनीं शोभणाऱ्या नभोमंडलाप्रमाणें ही रणभूमि भासत आहे. पार्था, भूमीसाठींच भूपति प्राणत्याग करून भूतलावर पडले आहेत. ते जणुंकाय प्रिय कांतेप्रमाणें या पृथ्वीला आपल्या अंगांनीं आच्छादित करून येथें शयन करीत आहेत.

अर्जुना, हे ऐरावततुल्य प्रचंड गज पहा. त्यांच्या शरीरगतक्षतांतून अद्यापि रक्ताचे प्रवाह चालले आहेत. जणुंकाय हे पर्वत आपल्या दरीमुखांतून गेरूनें लाल झालेलें जलच सोडीत आहेत. हे गंधर्वनगरीच्या आकाराचे रथ पहा. त्यांचे अश्व, सारथि व स्वामी हत होऊन ते ध्वज, कूबर व रथनीड यांसह भग्न होऊन पडले आहेत. हे मृत अश्व विमानासारखे भासत आहेत. हे सर्व पदाति रक्तानें माखले आहेत व भूमीला आलिंगन देऊन शयन करीत आहेत. त्यांच्या हातां-तील धनुष्यें व ढाली तशाच दिसत आहेत.

हे महाबाहो, तुझ्या शरांनीं ज्यांचीं शरीरें विदीर्ण झालीं, त्या योद्धयांकडे पहा. तूं ज्यांचा संहार केलास, ते गज, रथ व अश्व यांनीं हें रणांगण व्यापून

टाकिलें आहे. रक्त, मेद व मांस यांचा कर्दम झाला आहे. हें भीषण दृश्य निशाचर, गोमायु, वृक, श्वान इत्यादि मांसभक्षक प्राण्यांस आनंद देत आहे. या दुष्प्रेक्ष्य रणांगणाचें एकवार निरीक्षण कर. समरांगणांत यशोवृद्धि करणारें हें दुष्कर कर्म एका तुलाच शक्य आहे. किंवा दैत्यदानवांचा संहार करणाऱ्या इंद्रालाच तें सामर्थ्य आहे. तुम्हां दोघां शिवाय अन्य कोणीहि असा पराक्रम करण्यास समर्थ नाहीं."

संजय—याप्रमाणें कृष्ण पार्थाला रणभूमि दाखवीत असतां हृष्ट झालेले त्याचे आप्तजन त्याला येऊन भेटले. त्यावेळीं त्यानें पांचजन्य शंख मोठ्यानें वाजविला. जनार्दन पार्थाला रणभूमीवरील दृश्य दाखवीत अजातशत्रु युधिष्ठिराच्या समीप येऊन पोंचला व त्यानें त्याला जयद्रथवधाचें वृत्त निवेदन केलें. ७. ५. १४८.

---

## अध्याय १४९ वा.

[ १ युधिष्ठिराचा हर्ष. २. श्रीकृष्णाचें स्तवन. ]

( १ ) संजय—हे महाराज, पार्थानें सैंधवाचा वध केल्यामुळें हृष्ट झालेल्या कृष्णानें धर्मपुत्र युधिष्ठिराच्या समीप जाऊन त्याला वंदन केलें व म्हटलें—" हे राजेंद्रा, तुझ्या शत्रूचा वध झाला. तुझें यश वृद्धिंगत झालें, हें मोठें भाग्य होय. तुझा अनुज आपल्या प्रतिज्ञेंतून पार पडला ही केवळ्या आनंदाची गोष्ट आहे. "

कृष्णाचें हें वचन कानीं पडतांच धर्मराजानें हर्षभरानें रथांतून उडी टाकिली. त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले व त्यानें कृष्णार्जुनांस मोठ्या प्रेमानें गाढ आलिंगन दिलें. नंतर त्यानें आपलें कमलासारखें प्रफुल्ल वदन हातानें पुसलें व कृष्णार्जुनांस म्हटलें—" हे कमलनयना, तुझ्या मुखानें ही प्रिय वार्ता ऐकून मला अतिशय आनंद वाटला. समुद्रांत पोहणारा मनुष्य जसा जलांत निमग्न होतो, तसा मी हर्षसागरांत मग्न झालों आहें. हे कृष्णा, बुद्धिमान् पार्थानें हें अत्यंत अद्भुत कर्म केलें. दैवयोगानें तुम्हीं दोघांहि महारथांनीं हा प्रचंड भार आपल्या शिरावरून उतरलात.

( २ ) खरोखर, त्या अधम सैंधवाचा वध झाला, हें फार उत्तम झालें. तूं संरक्षण केल्यामुळेंच अर्जुनाच्या हातून जयद्रथाचा वध झाला. तुझा आश्रय

असलेल्या आम्हांला कोणतेंच कार्य अशक्य नाहीं. हे गोविंदा, तूं सर्व लोकांचा गुरु आहेस. तूं ज्यांचा नाथ आहेस, त्यांना या त्रैलोक्यांत कोणतीच गोष्ट दुष्कर नाहीं. तुझ्या प्रसादानेंच आम्ही शत्रूला जिंकूं. आमचें प्रिय व हित करण्यांत तूं सर्वदा तत्पर आहेस. दैत्यवधप्रसंगीं देवांनीं जसा इंद्राचा आश्रय केला, त्याचप्रमाणें तुझ्या आश्रयानें आम्हीं शस्त्र हातीं घेतलें.

हे जनार्दना, जयद्रथाचा वध देवांनाहि असंभाव्य होता, तें दुसाध्य कर्म फाल्गुन केवल तुझ्या बुद्धिबलाचा आश्रय केल्यानें करूं शकला. हे कृष्णा, मी बालपणापासून तुझीं अमानुष व दिव्य कर्में ऐकत आलों आहें आणि तेव्हांपासूनच 'आपले शत्रु हत होऊन ही पृथ्वी आपल्याला प्राप्तच झाली आहे' असें मी समजत आहें.

हे अरिसूदना, तुझ्याच प्रसादानें इंद्राला पराक्रम प्राप्त झाला व त्याच्या प्रभावानें तो सहस्रावधि दैत्यांचा संहार करून सुरेशत्व पावला. तुझ्याच प्रसादानें हें स्थावर-जंगमात्मक जगत् स्वमार्गांत स्थित होऊन जप-होमादि कर्में करीत असतें. हे नरोत्तमा, पूर्वीं हें समग्र जगत् एकार्णवानें युक्त व तमोमय होतें, तें तुझ्या केवल दृष्टिक्षेपानें अभिव्यक्त होऊन नाम-रूपास प्राप्त झालें. हे हृषीकेशा, तूं सर्व लोकांचा जनक, परमात्मा व अव्यय आहेस. तुला जे यथार्थ जाणतात, ते कदापि मोह पावत नाहींत.

हे पुरुषोत्तमा, तूं सनातन, परम देवदेवेश्वर आहेस. तुला शरण येणारे कदापि मोहित होत नाहींत. तूं आद्यंतरहित, लोककर्ता व अव्यय आहेस. तुझे भक्त सर्व संकटांना तरून जातात. तूं बुद्धीला अगोचर, नित्यसिद्ध, आदिपुरुष व परम श्रेष्ठ आहेस. तुज परमात्म्याला जे प्राप्त होतात, त्यांना परम ऐश्वर्य मिळत असतें. चारी वेद तुझेंच गायन करितात, वेदांत तुझेंच स्तवन केलें जातें. अशा तुज महात्म्याचा आश्रय करून मी परम ऐश्वर्य भोगीन.

हे प्रभो, तूं मायातीत असून परम ऐश्वर्याचा भोक्ता आहेस. तूं तिर्यगीश व नरेश्वर आहेस. तूं तिर्यग्योनींत व मनुष्ययोनींत जन्म घेऊनहि अविकृत रहातोस, त्या तुज परमात्म्याला नमस्कार असो.

आकाशादि सर्व जड पदार्थांच्या भोक्त्या जीवांना निर्माण करणारा जो नियंता ईश्वर, त्यालाहि तूं स्फूर्ति देतोस म्हणून तुला पुरुषोत्तम म्हणतात. तूं रुद्रादि ईशांचा ईश व राजधर्मांचा अधिपति आहेस. हे प्रभो, तुझा उत्कर्ष

होत जावो. तूं सर्वांची उत्पत्ति व प्रलय करणारा आहेस. हे सर्वात्मन् तूं धनंजयाचा सखा, त्याचा हितकर्ता व दुःखनिवारक आहेस. तुला शरण येणारास सुख प्राप्त होत असतें.

हे अनघा, पुराण ऋषि मार्कंडेय तुझें चरित्र जाणतो. त्यानें मला पूर्वीच तुझें माहात्म्य कथन केलें आहे. त्याचप्रमाणें असित, देवल, महातपस्वी नारद आणि पितामह व्यास यांनीं तुला श्रेष्ठ विधाता म्हटलें आहे. तूं तेज, ब्रह्म, सत्य व महत्तम आहेस. तूंच श्रेय व कीर्ति असून जगाचें आदिकारण आहेस. या स्थावर-जंगम जगताचा तूंच स्रष्टा आहेस. प्रलयकालीं तें तुझ्यामध्येंच लीन होतें. हे जगत्पते, वेदवेत्ते जन तुला धाता, अज व अव्यक्त म्हणतात. तूं भूतात्मा, महात्मा, अनंत, विश्वतोमुख व आदिगुह्य आहेस. तुज जगत्पतीला देवहि जाणत नाहींत.

तूं नारायण, परमात्मा, ज्ञानयोगी व मुमुक्षूंचें आश्रयस्थान आहेस. तुझ्या आदिगुणांची आणि इह व परलोकांतील भूत-भविष्यत्कर्मांची गणना करण्यास कोणीच समर्थ नाहीं. तुझ्यासारखा सर्वगुणसंपन्न सुहृद् आम्हांला लाभला आहे, तस्मात् देवांचें रक्षण करणाऱ्या शक्राप्रमाणें तुला आम्ही सर्वप्रकारें रक्षणीय आहों."

युधिष्ठिरानें याप्रमाणें स्तवन केलें असतां महायशस्वी जनार्दनानें त्याला असें अनुरूप उत्तर दिलें—

श्रीकृष्ण—हे युधिष्ठिरा, तुझें उग्र तप, परम धर्म, साधुत्व आणि सरलत्व या गुणांमुळें पापी जयद्रथाचा नाश झाला. तुझ्या शुभाशीर्वादाच्या बलावरच पार्थ सहस्रावधि योद्ध्यांचा संहार करून जयद्रथाचा वध करूं शकला. कर्तृत्व, बाहुबल, स्थिरबुद्धि, अमोघ बुद्धि व चापल्य यांत धनंजयाच्या तुल्य एकहि वीर नाहीं. तुझ्या अनुज्ञेनेंच आज स्वपराक्रमानें रणांत शत्रुसैन्याचा नाश करून सिंधुराजाचा शिरश्छेद केला.

संजय—हे महाराज, नंतर युधिष्ठिरानें अर्जुनाला आलिंगन दिलें. त्याच्या मुखावरून हात फिरविला व त्याला आश्वासन देत म्हटलें—"बा फाल्गुना, इंद्रासह देवांनाहि असाध्य असें महत्कृत्य आज तूं केलेंस. तूं शत्रूचा वध करून

१ येथील पुनरावृत्ति व एकाच अर्थाचीं अनेक विशेषणें गाळलीं आहेत.

आपल्या वरील भार उतरविलास व आपली प्रतिज्ञा सत्य केलीस, ही गोष्ट अतिशय आनंदाची घडली."

याप्रमाणें अर्जुनाला बोलून धर्मराजानें आपला पुण्य-गंधयुक्त हात त्याच्या पाठीवरून फिरविला. तेव्हां ते दोघे महात्मे कृष्णार्जुन धर्मराजाला म्हणाले—"राजा, तुझ्या क्रोधाग्नीनेंच पापी जयद्रथ दग्ध झाला. आम्हांला दुर्योधनाच्या प्रचंड सैन्याचें उल्लंघन करतां आलें. कौरवांचा संहार आजवर झाला, वर्तमान समयीं होत आहे आणि पुढेंहि होईल. तुझ्या क्रोधाग्नीनें ते पूर्वींच हत झाले आहेत. केवल क्रोधयुक्त दृष्टिक्षेपानें नाश करण्यास समर्थ असलेल्या तुला कोपवून तो दुर्मति दुर्योधन आपल्या मित्र-बांधवांसह प्राणांस मुकेल.

हा पितामह भीष्म पूर्वीं देवांसहि अजेय होता, पण तोहि आज केवल तुझ्या कोपानलामुळें शरतल्पावर शयन करीत आहे. तूं ज्यांवर क्रुद्ध होशील ते जरी शत्रूंचा वध करणारे असले तरी त्यांना संग्रामांत विजय दुर्लभ आहे. ते निश्चयानें मृत्युवशच होतील. तूं ज्यांवर कोपतोस त्यांचें राज्य, प्राण, संपत्ति, पुत्र व विविध सौख्यें तत्काल नष्ट होतात. तस्मात् नित्य राजधर्मांत तत्पर रहाणारा तूं ज्याअर्थीं कोपला आहेस, त्याअर्थीं कौरव त्यांचे पुत्र, पशु व बांधव यांसह नाश पावलेच आहेत, असें मी समजतों."

संजय—हे महाराज, त्यानंतर शरांनीं विद्ध झालेले दोघे बलाढ्य महारथ भीमसेन व सात्यकि धर्मराजास वंदन करून पांचाल्यासह त्याच्यापुढें भूमी-वर स्थित झाले. ते दोघे हृष्ट झालेले वीर हात जोडून आपल्यापुढें उभे आहेत, हें पाहून युधिष्ठिरानें त्या दोघांचें अभिनंदन केलें व म्हटलें—" हे शूरांनो, तुम्ही हा दुस्तर सैन्यसागर तरून आलांत हें पाहून मला फार संतोष वाटत आहे. द्रोणरूपी ग्राहानें क्षुब्ध केलेल्या व हार्दिक्यरूपी मकरानें व्यापिलेल्या त्या सेनासमुद्राचें उल्लंघन करणें अतिशय दुष्कर कर्म होतें. त्यांतून तुम्हांला पार पडलेलें पाहून मला फार आनंद वाटत आहे. समग्र पृथ्वींतील सर्व पार्थिव जिंकले गेले व तुमचा विजय झाला, हें महद्भाग्य होय. द्रोण व हार्दिक्य यांचा युद्धांत पराभव झाला हा दैवयोगच म्हटला पाहिजे. तुम्हीं दोघां नरश्रेष्ठांनीं रणांत कर्णाचा पराभव केलात व शल्याला युद्धपराङ्मुख व्हावयास लावलेंत, हें ऐकून मी हृष्ट झालों आहें. तुम्ही दोघेहि युद्धविशारद

व अजिंक्य वीर आहांत. माझ्या आज्ञेंत स्थित असलेल्या तुम्हांला अक्षत परत आलेलें मीं पाहिलें, हें माझें भाग्य होय."

राजा, धृतराष्ट्रा, असें बोलून युधिष्ठिरानें युयुधान व भीमसेन या दोघांना आलिंगन दिलें. त्यावेळीं त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. त्यानंतर पांडवांचें सर्व सैन्य प्रमुदित झालें व तें मोठ्या उत्साहानें पुनः युद्धाला सज्ज झालें. ७. ५. १४९.

---

## अध्याय १५० वा.

[ १ दुर्योधनाचा अनुताप. २ आचार्यांस प्रार्थना. ]

**( १ ) संजय**—हे महाराज, जयद्रथ वध पावला असतां दुर्योधन अतिशय शोकाकुल झाला. त्याचें मुख अश्रूंनीं भरून गेलें. तो अत्यंत दीन झाला. शत्रूंना जिंकण्याचा त्याचा उत्साह नाहींसा झाला. तो खिन्न होऊन भग्नदंष्ट्र सर्पाप्रमाणें दीर्घ निःश्वास सोडूं लागला. समग्र पृथ्वीचा अपराधी असलेला तो तुझा पुत्र दुःखार्त झाला. पार्थ, भीम व सात्यकि यांनीं रणांगणांत केलेलें शत्रुसैन्याचें निर्दलन पाहून तो निस्तेज व कृश झाला आणि त्याचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले.

तो तुझा पुत्र मनांत म्हणाला—खरोखर अर्जुनासारखा योद्धा या समग्र जगतांत नाहीं. द्रोण, कर्ण, अश्वत्थामा किंवा कृपाचार्य हेहि रणांगणांत क्रुद्ध झालेल्या पार्थाच्या पुढें उभे रहाण्यास समर्थ नाहींत. पार्थानें माझ्या सर्व महारथांना जिंकून सैंधवाचा वध केला. पण त्याचें निवारण कोणीहि करूं शकला नाहीं. कौरवांचें महद्बल हत झालें आहे. साक्षात् इंद्रहि त्याचें रक्षण करण्यास समर्थ नाहीं.

ज्यांच्या बाहुबलाचा आश्रय करून आम्ही युद्धांत शस्त्र धरण्यास उद्युक्त झालों, त्यांतील कर्ण पराभव पावला व जयद्रथाचा वध झाला. अच्युत श्रीकृष्णानें शमाची याचना केली असतां ज्याच्या पराक्रमाच्या बलावर मीं त्याला तृणवत् लेखलें, तो कर्णहि या युद्धांत जिंकला जावा ना !

हे राजन्, याप्रमाणें मनांत विचार करून तो अपराधी सुयोधन खिन्न मनानें द्रोणाचार्यांच्या समीप गेला व त्यानें त्यास कौरवांचा क्षय, शत्रूचा विजय व धार्तराष्ट्रांचा पराभव कथन केला.

( २ ) नंतर दुर्योधन म्हणाला—हे आचार्य, मूर्धाभिषिक्त नृपालांचा हा दारुण संहार पहा. माझे शूर पितामह भीष्म यांच्या प्रमुखत्वाखालीं मीं युद्धास आरंभ केला. पण त्या वंचक शिखंडीनें त्यांचा वध केला. तो आपला मनोरथ पूर्ण करून पांचालांसह सैन्याच्या अग्रभागीं स्थित आहे, पहा.

दुसरा आपला दुर्धर्ष शिष्य जयद्रथ. त्या शूराचाहि सव्यसाचीनें सात अक्षौहिणी सैन्यांसह शिरश्छेद केला. याप्रमाणें आमच्या जयाची इच्छा करणारे आमचे सुहृद् यमलोकीं निघून गेले. त्यांचा मी कसा उपकृत होऊं ! मला ही वसुधा प्राप्त व्हावी, अशी इच्छा करणारे हे सर्व वसुधाधिप गतप्राण होऊन भूमीवर शयन करीत आहेत. अरे अरे, मज नीचासाठीं एवढ्या सर्व मित्रांचा क्षय व्हावा ना ? सहस्र अश्वमेधांनींहि मी या महद्दोषापासून पावन होणें शक्य नाहीं. खरोखर मी लुब्ध, पापी व धर्मद्रोही आहें. माझ्याच दुराचरणामुळें हे सर्व विजयेच्छु वीर यमलोकीं गेले.

मित्रद्रोही व दुर्वृत्त असलेल्या मला पृथ्वीनें या पार्थिवांतच कां बरें स्थल दिलें नाहीं ! पितामह भीष्माचा देह रुधिरानें सिक्त होऊन रणांगणांत भूपालांमध्यें पडला असतां मी त्याचें रक्षण करूं शकलों नाहीं. मज अधार्मिक मित्रद्रोही अनार्याला परलोकीं गेलेला अजेय भीष्म काय म्हणेल !

( २ ) हे द्रोणाचार्य, जलसंध माझ्यासाठीं स्वतःच्या प्राणांवरहि उदार होऊन युद्ध करीत होता. त्या महाधनुर्धर अलंबुषाचाहि सात्यकीनें वध केला. कांबोज, अलंबुष व दुसरे अनेक सुहृद् निधन पावले असतां, मला तरी आतां जिवंत राहून काय करावयाचें आहे ! रणांतून पराङ्मुख न होणारे अनेक शूर योद्धे माझ्या कार्यार्थ युद्ध करीत असतां व माझ्या शत्रूंना जिंकण्याचा पराकाष्ठेचा यत्न करीत असतां हत होऊन पडले आहेत. यास्तव आज मी बाहुबलानें त्यांच्या ऋणांतून मुक्त होईन व यमुनेच्या जलांत त्यांचें तर्पण करीन.

हे द्विजश्रेष्ठा, आपण सर्व शस्त्रभृतांमध्यें वरिष्ठ अहां. मी आज इष्टापूर्त, पराक्रम व माझे पुत्र यांची शपथ घेऊन सांगतों कीं, मी रणांगणांत सर्व पांचालांसह पांडवांचा वध करून शांत होईन, किंवा त्यांच्या सलोकतेस तरी प्राप्त होईन. माझ्यासाठीं युद्ध करणारे ते पुरुषश्रेष्ठ रणांमध्यें किरीटीच्या हातून वध पावून जेथें गेले आहेत तेथें मीहि जाईन.

आम्हीं योग्य परामर्ष न घेतल्यामुळें आमचे साह्यकर्ते आमच्या श्रेयासाठीं यत्न करीत नाहींत. ते पांडुपुत्रांचें जसें कल्याण इच्छितात, तसें आमच्या

हितार्थ तत्पर नसतात. हे आचार्य, सत्यप्रतिज्ञ भीष्मानें तर आपल्या हाता-नेंच स्वतःचा मृत्यु ओढवून आणला आणि अर्जुन आपला शिष्य असल्यामुळें आपण आमची उपेक्षा करीत अहां ! आपण लक्ष न पुरविल्यामुळेंच आमचे जयेच्छु अनेक वीर मरण पावले. सांप्रत आमच्या जयाची आकांक्षा बाळग-णारा एकटा कर्णच मला दिसत आहे.

जो[1] मंदमति मनुष्य योग्य परीक्षा न करतां मित्राची कार्यामध्यें योजना करितो, त्याचें तें कार्य नाश पावतें. हे आचार्य, मी मोहानें लुब्ध झालों. धनलोभानें कुटिल व पापी झालेल्या माझ्या कार्याचीहि माझे मित्र म्हण-विणारांनीं अशीच व्यवस्था केली. जयद्रथ, सौमदत्ति, अभीषाह, शूरसेन, शिबि व वसाति हे सर्व मृत झाले आहेत. तस्मात् मीहि मदर्थ प्राणत्याग करणारे ते नरश्रेष्ठ जेथें गेले आहेत, तेथेंच जातों. त्या पुरुषश्रेष्ठांवांचून माझें जीवित व्यर्थ आहे. यास्तव अहो पांडुपुत्रांचे आचार्य, मला अनुज्ञा द्या. ७. ५. १५०.

---

## अध्याय १५१ वा.

[ १ द्रोणाचें दुर्योधनाला प्रत्युत्तर. २ अश्वत्थाम्याला संदेश. ]

( १ ) धृतराष्ट्र—बा संजया, सव्यसाचीनें सिंधुराजाचा वध केला व भूरिश्रवाहि निधन पावला, त्यावेळीं तुमची मनःस्थिति काय झाली ? त्याच-प्रमाणें कौरवांच्या समुदायांत दुर्योधनानें द्रोणापाशीं अनुतापाचे उद्गार काढले असतां तो आचार्य काय म्हणाला ? तें सर्व मला सांग.

संजय—हे भारता, सैंधव व भूरिश्रवा या दोघांना हत झालेलें पाहून तुझ्या सैन्यांत दुःखोद्गार निघाले. तुझ्या पुत्रांच्या दुष्ट संकेतामुळें सहस्रावधि क्षत्रियश्रेष्ठांचा संहार झाला, हें जाणून कौरवांच्या सैन्यांतील ते सर्व वीर दुर्योधनाचा निषेध करूं लागले.

हे महाराज, इकडे दुर्योधनाचे ते उद्गार ऐकून द्रोण विमनस्क झाला, त्यानें क्षणमात्र विचार केला व तो असें आर्त वचन बोलला—

---

१ यो हि मित्रमविज्ञाय याथातथ्येन मन्दधीः ।
मित्रार्थे योजयत्येनं तस्य सोऽर्थोऽवसीदति ॥

द्रोण—बा दुर्योधना, मला असा वाक्शरांनीं कां बरें टोचीत असतोस ! सव्यसाची अर्जुन युद्धांत अजिंक्य आहे, हें मी तुला नेहमीं सांगत आलों आहें ना ? हा किरीटी रक्षण करीत असल्यामुळेंच शिखंडी भीष्माचा वध करूं शकला. एवढ्यावरूनच तुला अर्जुनाचें सामर्थ्य कळावयास पाहिजे होतें. रणामध्यें देव-दानवांसहि अवध्य असलेला भीष्महि ज्याअर्थीं निधन पावला, त्याअर्थीं ही सर्व भारतीसेना नष्ट होणार, हें मला त्याच वेळीं कळून चुकलें होतें.

बाबारे, ज्या शूराला आपण त्रिभुवनांतील श्रेष्ठ पुरुष मानीत होतों, तो भीष्महि हत झाल्यावर आतां आपण कोणाचा विश्वास धरावा ! दुर्योधना, शकुनीनें कौरवसभेंत कपटद्यूतप्रसंगीं जे अक्ष टाकले, ते खरोखर अक्ष नसून शत्रूंना ताप देणारे बाणच होते. तेच हे पार्थाचे तीक्ष्ण शर आतां आपला नाश करीत आहेत. द्यूतप्रसंगीं विदुरानें तुला त्या अक्षांचें स्वरूप सांगितलें होतें. तथापि त्यावेळीं तें तुला रुचलें नाहीं. तो विजयी विदुर महात्मा आहे. तो तुझ्या कल्याणार्थ हितवचन सांगत असतां तूं तें ऐकलें नाहींस, त्याच्या उपदेशाचा अनादर केल्यामुळेंच हा दारुण विनाश प्राप्त झाला आहे.

जो मूढ मनुष्य हितचिंतक सुहृदांच्या पथ्यकर वचनाचा अवमान करून स्वमतानेंच वागतो, तो अल्पावधींतच शोचनीय स्थितीला प्राप्त होत असतो[1]. अरे, ती सत्कुलोत्पन्न पांचाली सद्धर्माचें पालन करणारी आहे. तिचा अपमान करणें सर्वथा अनुचित होतें. तथापि तुम्हीं आमच्या समक्ष तिला राजसभेंत तशाप्रकारें आणलीत. त्या अधर्माचें हें महत्फल तुला आतां प्राप्त होत आहे.

हे गान्धारेया, तुला इहलोकीं जर हें पापाचें फल मिळालें नसतें, तर परलोकीं याहूनहि अधिक क्लेश भोगावे लागले असते. तूं पांडवांना केवल कपटानें द्यूतांत जिंकलेंस व त्यांना अजिनें पांघरून वनवासाला पाठविलेंस. सदोदित पुत्रधर्मानें वागणाऱ्या पांडवांशीं मजवांचून दुसरा कोणता ब्राह्मण म्हणविणारा मनुष्य द्रोह करील बरें !

---

१ योऽवमन्य वचः पथ्यं सुहृदामाप्तकारिणाम् ।
स्वमतं कुरुते मूढः स शोच्यो न चिरादिव ॥

धृतराष्ट्राच्या संमतीनें तूं व शकुनि अशा दोघांनीं मिळून कौरवसभेंत पांडवांना क्रुद्ध केलें, दुःशासनानें त्यांचा तो क्रोधाग्नि प्रदीप्त केला, कर्णानें तोच संवृद्ध केला आणि तूं विदुरवचनाची उपेक्षा करून पुनः पुनः त्याचीच आवृत्तीनें केलीस. त्याचें हें फल आहे. तुम्हीं सर्वांनीं मोठ्या दक्षतेनें जयद्रथाच्या समीप राहून पार्थाला वेढून टाकिलें होतें. असें असतां तुमचा सर्वांचाच पराभव कसा झाला ! तुम्हां सर्वांच्या मध्यभागीं स्थित असतां जयद्रथ कसा हत झाला ! कर्ण, कृप, शल्य व अश्वत्थामा हे जिवंत असतां सैंधवाचा वध कसा झाला ! युद्ध करणारे सर्व पार्थिव सिंधुराजाच्या रक्षणासाठीं स्वपराक्रमाची पराकाष्ठा करीत असतां तुमच्या सर्वांच्या मध्यभागीं असलेल्या सैंधवाचाच शिरश्छेद कसा झाला !

हे दुर्योधना, 'तूं किंवा विशेषतः मी त्याचें अर्जुनापासून संरक्षण करीन' अशी त्या राजाला फार आशा होती. तथापि फाल्गुनापासून त्याचें रक्षण होऊं शकलें नाहीं. आतां ज्याकरितां जिवंत रहावें असें एकहि कार्य मला दिसत नाहीं. शिखंडीसह सर्व पांचालांचा वध होईपर्यंत मी धृष्टद्युम्नाच्या भयार्णवांत बुडालों आहें. अशावेळीं दुःखानें तप्त झालेल्या मला तूं वारंवार वाक्शल्यानें कां टोचीत आहेस !

हे भारता, अक्लिष्ट कर्मे करणाऱ्या सत्यप्रतिज्ञ भीष्माचा सुवर्णमय ध्वज रणांगणांत प्रकाशत नसतां तूं जयाची आकांक्षा तरी कशी करतोस ! महारथांच्या मध्यभागीं स्थित असलेलाहि जयद्रथ हत झाला; भूरिश्रवाहि गतप्राण झाला, तेथें आतां काय अवशिष्ट राहिलें ! सिंधुराजाच्या मार्गांत नसलेला दुर्धर्ष कृप जर जिवंत असेल तर मी त्याचा सत्कारच करीन.

हे धार्तराष्ट्रा, भीष्माचार्य दुष्कर कर्मे करणारा असून इंद्रासह सर्व देवांनाहि अवध्य होता. मीं त्या महात्म्यालाहि जेव्हां तूं व तुझा अनुज दुःशासन यांच्या समक्ष हत झालेलें पाहिलें, तेव्हांच ही पृथ्वी तुला प्राप्त होणार नाहीं, हें जाणलें.

हे दुर्योधना, हीं पहा, पांडव-सृंजयांचीं सैन्यें एकत्र जमून मजवर चालून येत आहेत. यास्तव सर्व पांचालांचा निःपात केल्यावांचून मी अंगांतून हें कवच काढणार नाहीं. आज मी तुझ्या हिताचेंच कर्म करीन.

( २ ) राजा, माझ्या अश्वत्थाम्या पुत्राला सांग कीं, तूं स्वतःच्या जीविताशेनें सोमकांना मोकळे सोडूं नको. तुझ्या पित्यानें उपदेशिलेल्या वचनाचें

पालन कर. आपल्या ठिकाणीं कारुण्य, शांति, सत्य व सरलत्व यांना स्थिर कर. तूं धर्म, अर्थ व काम यांत कुशल आहेस. तथापि धर्म व अर्थ यांना बाध न आणतां नेहमीं धर्मप्रधान कार्येंच करीत जा, असें मी तुला पुनः पुनः सांगत आहें.

आपली दृष्टि व मन यांच्या योगानें विप्रांस संतुष्ट करावें. त्यांचा यथाशक्ति सत्कार करावा. ते अग्नीच्या ज्वालेसारखे आहेत; यास्तव त्यांचें कदापि अप्रिय करूं नये. हे अरिसूदना दुर्योधना, तुझ्या वाक्शरांनीं मी अत्यंत पीडित झालों आहें. यास्तव मी महायुद्धासाठीं या रणांत प्रवेश करीत आहें. तुला सामर्थ्य असलें तर आपल्या सैन्याचें रक्षण कर. हे क्षुब्ध झालेले पांडव व सृंजय रात्रींहि युद्ध करतील.

संजय—हे महाराज, दुर्योधनाला असें बोलून तो तेजस्वी द्रोणाचार्य नक्षत्रांचें तेज क्षीण करणाऱ्या भास्कराप्रमाणें क्षत्रियांच्या तेजाचा लोप करीत पांडव-सृंजयांवर मोठ्या संभ्रमानें चालून गेला. ७. ५. १५१.

---

## अध्याय १५२ वा.

[ १ दुर्योधन-कर्णसंवाद. २ पुनर्युद्धारंभ. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें द्रोणानें प्रेरणा केली असतां क्रोधवश झालेल्या दुर्योधनानें पुनः युद्ध करण्याचें मनांत आणलें. त्यावेळीं तो तुझा पुत्र कर्णाला असें म्हणाला—

दुर्योधन—हे कर्णा, या अर्जुनानें केवल कृष्णाच्या साह्यानें या दुर्भेद्य व्यूहाचा भेद केला. आचार्यांनें रचलेला हा व्यूह देवांनाहि दुर्गम होता. महात्मा द्रोण व तूं जयद्रथाच्या रक्षणासाठीं पराकाष्ठेचा यत्न करीत असतांहि श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धयांच्या समक्ष पार्थानें त्या सैंधवाचा वध केला. हे राधेया, एकट्या सिंहानें जसा वन्य पशूंचा संहार करावा, तसा एकट्या धनंजयानें अनेक प्रमुख पार्थिवांचा निःपात केला, पहा ! महात्म्या द्रोणासह मी भगीरथ यत्न करीत असतांहि त्या इंद्रात्मजानें माझ्या बहुतेक सैन्याचा नाश केला. आतां अगदीं अल्प सैन्य अवशिष्ट राहिलें आहे. बा कर्णा, युद्धामध्यें आचार्य इतके दक्ष असतां अर्जुनानें त्या दुर्भेद्य व्यूहाचा भेद कसा बरें केला ! शेवटीं त्या फाल्गुनानें सैंधवाचा वध करून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली ना !

हे वैकर्तना, हे सर्व इंद्र तुल्य पराक्रमी भूपति अर्जुनाच्या शरांनीं हत होऊन येथें पडले आहेत, पहा! आचार्यांच्या दुर्गम व्यूहांत अर्जुनाचा प्रवेश झाला तरी कसा! किंवा तो फाल्गुन महात्म्या द्रोणाचा अतिशय आवडता शिष्य आहे त्यामुळें त्यानेंच युद्ध न करतां पार्थाला मार्ग दिला नसेल ना, असेंहि माझ्या मनांत येतें. परंतप द्रोणानें एकीकडे जयद्रथाला अभय दिलें व दुसरीकडे पार्थाला व्यूहाचें द्वार मुक्त ठेविलें. काय माझें दुर्दैव आहे, पहा! यापेक्षां आचार्यानें सैंधवाला जर आरंभींच घरीं जाण्याची अनुज्ञा दिली असती तर एवढी प्राणहानि तरी झाली नसती! बा कर्णा, जयद्रथ जीविताशेनें स्वगृहीं जाण्यास निघाला असतां द्रोणानें अभय दिल्यामुळें मींच मूढानें त्याला थांबवून घेतलें. आज रणांगणांत भीमसेनाशीं गांठ पडल्यामुळें आम्हां दुरात्म्यांच्या समक्ष माझ्या चित्रसेनादि भ्रात्यांचा वध झाला!

कर्ण—राजा दुर्योधना, आचार्यांस व्यर्थ दोष देऊं नको. तो महात्मा स्वतःच्या प्राणांचा त्याग करून स्वसामर्थ्यानुसार युद्ध करीत आहे. तो वृद्ध द्विज आपल्या शक्तीच्याहि पलीकडे उत्साहानें शत्रूचें निवारण करीत आहे. असें असतां जर श्वेतवाहन पार्थानें व्यूहभेद करून आंत प्रवेश केला; तर त्यांत आचार्यांचा काय दोष आहे.

अर्जुन कर्तृत्ववान्, दक्ष, तरुण, शूर व अस्त्रज्ञ असून त्याचें हस्तलाघव अप्रतिम आहे. आपल्या बाहुबलाचा दर्प बाळगणारा पार्थ अभेद्य कवचानें युक्त आहे. त्यानें कधींहि जीर्ण न होणारें गांडीव धनुष्य धारण केलें आहे. त्याचा वानरध्वजांकित रथ दिव्यास्त्रांनीं संपन्न असून साक्षात् श्रीकृष्ण त्याच्या अश्वांचें नियमन करीत आहे. अशा श्रेष्ठ रथावर आरूढ झालेल्या पार्थानें तीक्ष्ण शरांचा वर्षाव करून जर द्रोणाचें अतिक्रमण केलें तर तें त्याला शोभण्यासारखेंच आहे!

परंतु हे राजन्, आचार्यांची स्थिति याहून विपरीत आहे. द्रोणाचार्य आतां वृद्ध झाला आहे. तो आतां शीघ्रगतीनें गमन करण्यास व शरक्षेपादि हस्तव्यवसाय चपलतेनें करण्यास असमर्थ झाला आहे. त्यामुळें कृष्णसारथि पार्थ त्याचें उल्लंघन करून गेला, यांत द्रोणाचा कांहीं दोष आहे, असें मला वाटत नाहीं. द्रोण जरी अस्त्रवेत्ता आहे, तरी रणांत त्याला पांडव अजेय आहेत, असेंच मी मानतों. याच कारणानें पार्थ त्या द्विजाचें अतिक्रमण करून व्यूहांत प्रवेश करूं शकला.

हे दुर्योधना, पराभव होणें दैवाधीन आहे. त्यांत द्रोणाचा अपराध आहे, असें मी समजत नाहीं. ज्याअर्थी आपण परम यत्न करीत असतांहि सैंधव हत झाला, त्याअर्थी दैवच बलवत्तर आहे, असें मानावें लागतें. अरे, आपण रणांगणांत पराकाष्ठेचा यत्न करीत आहों, पण आमच्या पराक्रमाचा विघात करून दैव आपल्याला मागें ओढीत आहे, पहा ! [1]दुर्दैवग्रस्त पुरुष जें कार्य करीत असतो, तें त्याचें कार्यच दैवाकडून नष्ट केलें जातें. तथापि व्यवसायी पुरुषानें आपलें कर्तव्य सदोदित निःशंकपणें करीत रहावें. त्यांत सिद्धि मिळणें दैवाधीन आहे.

हे भारता, आपण पांडवांची कपटानें वंचना केली, विषप्रयोग केला, त्यांना जतुगृहांत दग्धहि केलें, कपटद्यूतांत त्यांचा पराभव केला, राज- नीतीला दूर सारून त्यांना वनवासाला पाठविलें, तथापि आपण इतक्या दक्षतेनें केलेले ते सर्व प्रयत्न दैवानें निष्फल करून टाकिले. यास्तव दुर्योधना, आतां तूं दैवाचा आश्रय न करतां उद्योगाचें अवलंबन कर. तूं व पांडव यत्न करीत असतां ज्यांचा यत्न बलवत्तर ठरेल ते विजयी होतील. प्रयत्नानें दैवहि अनुकूल होत असतें.

हे वीरा, पांडवांचाच जय व्हावा, असें त्यांनीं बुद्धिपुरःसर कांहीं सुकृत केलें आहे, किंवा तूं आपला पराजय व्हावा, असें कांहीं पातक मूर्खपणानें आचरिलें आहेस, असें मला तर कांहीं वाटत नाहीं. सुकृत किंवा दुष्कृत हें दैवच ठर- वीत असतें. मनुष्य निद्रित असला तरी त्याचें दैव जागृतच असतें. मनुष्याचें पूर्वीचें जें स्वकृत कर्म तेंच दैव होय. यास्तव यत्नानें दैवाचाहि बाध करतां येणें शक्य आहे.

हे कुरूद्वहा दुर्योधना, युद्धाला जेव्हां आरंभ झाला तेव्हां आपल्या- कडे विपुल सैन्यें व अनेक योद्धे होते. पांडवांच्या पक्षांत तेवढे नव्हते

१ दैवोपसृष्टः पुरुषो यत्कर्म कुरुते क्वचित् ॥
कृतं कृतं हि तत्कर्म दैवेन विनिपात्यते ॥
यत्कर्तव्यं मनुष्येण व्यवसायवता सदा ।
तत्कार्यमविशङ्केन सिद्धिर्दैवे प्रतिष्ठिता ॥
२ दैवं प्रमाणं सर्वस्य सुकृतस्येतरस्य वा ।
अनन्यकर्म दैवं हि जागर्ति स्वपतामपि ॥

तथापि त्या अल्पसंख्यांकांनींच तुमच्या विपुल सैन्याचा क्षय करून बहुतेक योद्धयांचा संहार केला. यावरून इंद्रियांचें अध्यक्षभूत जें विज्ञान–बुद्धिबल तेंच दैव होय, त्यानेंच तुमच्या पक्षांतील वीरांचें शारीरबल जें पौरुष तें नष्ट केलें, असें मला वाटतें.

(२) संजय—हे जनाधिपा धृतराष्ट्रा, याप्रमाणें कर्ण व दुर्योधन अनेकप्रकारें संभाषण करीत असतां, पांडवांचीं सैन्यें त्यांच्या दृष्टीं पडलीं. तेव्हां ते वीरहि पुढें सरसावले. हे राजा, गज व रथ परस्परांशीं भिडले आणि तुझ्या पक्षांतील वीरांचें व पांडुपुत्रांचें पुनः तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. ७. ५. १५२.

येथें पांचवें जयद्रथवधपर्व समाप्त झालें.

---

# घटोत्कचवधपर्व ६.



## अध्याय १५३ वा

[१ दुर्योधनाचें युधिष्ठिराशीं युद्ध. २ दुर्योधनाची मूर्च्छा.]

(१) संजय—हे राजन्, तुझें तें सज्ज झालेलें गजसैन्य पांडवसैन्यावर चारी बाजूंनीं चालत जाऊन त्याच्याशीं लढलें. पांचाल आणि कौरव हे यमनगरीला जाण्याकरितांच कीं काय, परलोकाची दीक्षा घेऊन परस्परांशीं लढूं लागले. शूर शूरांशीं व रथी रथ्यांशीं सशस्त्र भिडले आणि त्यांनीं एकमेकांस विद्ध करून यमसदनीं पाठविलें. भयंकर रक्तस्राव होऊं लागला. मदोन्मत्त हत्ती खवळून जाऊन आपल्या दंष्ट्रांनीं परस्परांस विदारित करूं लागले. महायशाच्या इच्छेनें अश्वसादींनीं अश्वसादींना गांठून तुमुल युद्ध केलें. शेंकडों पराक्रमी पदाति अन्योन्यांस शस्त्रांनीं मारूं लागले. त्यावेळीं गोत्रें, नांवें आणि कुलें यांच्या श्रवणानेंच केवळ पांचाल आणि कुरु आम्हांला ओळखतां येत होते.

हे भारता, याप्रमाणें पांडव लढत असतां दुर्योधन जयद्रथाच्या नाशानें दुःखित झाला व आतां आपणाला मरणच उचित आहे, असा विचार करून शत्रुसैन्यांत शिरला. त्यानें रथघोषानें पृथ्वी दणदणावीत व कांपवीत पांडवांच्या सैन्यावर चाल करून त्याच्याशीं तुमुल युद्ध केलें. त्यामुळें निरुत्साह होऊन त्यानें रणांगणांतून पळ काढण्याचें ठरविलें. तुझा महात्मा व धनुर्धर पुत्र लखलखीत

अग्रांच्या सुवर्णपुंख बाणांचा वेध करूं लागल्यामुळें पांचाल धांवत सुटले आणि पांडवांचे सैनिकहि शरपीडित होऊन पटापट पडूं लागले. हे नराधिपा, त्यावेळीं तुझ्या पुत्रासारखा पराक्रम दुसऱ्या कोणींहि केला नाहीं. सभोंवार प्रफुल्लित कमलांनीं सुशोभित असलेलें सरोवर ज्याप्रमाणें हत्तीनें घुसळून टाकावें, त्याप्रमाणें तुझ्या पुत्रानें समरांगणांत पांडवसेनेचें मंथन केलें. वायु व सूर्य यांमुळें पाणी आटून ज्याप्रमाणें कमलांचें सरोवर निस्तेज होऊन जातें, त्याप्रमाणें ती पांडवांची सेना तुझ्या पुत्राच्या तेजानें अगदीं निष्प्रभ झाली.

हे भारता, तुझ्या पुत्रानें पांडवसेनेचा नाश आरंभिलेला पाहून भीमसेनाला पुरःसरत्व देऊन पांचाल त्यावर धांवून गेले. त्यावेळीं दुर्योधनानें भीमावर, नकुल-सहदेवांवर, विराट-द्रुपदांवर, शिखंडीवर, धृष्टद्युम्नावर, धर्मराजावर आणि केकय व चेदी यांवर पुष्कळ तीक्ष्ण बाण टाकले. त्यानें सात्वतावर व द्रौपदी-पुत्रांवरहि शर सोडून त्यांस विद्ध केलें. तसेंच घटोत्कचाला विद्ध करून सिंहाप्रमाणें गर्जना केली. क्रुद्ध झालेल्या कृतान्ताप्रमाणें आपल्या उग्र शरांनीं त्या महारणांत शेंकडों योद्ध्यांचा हत्तींसह संहार केला. हे राजन्, त्या संग्रामांत तुझ्या पुत्रानें ग्रस्त केलेली पांडवसेना पळूं लागली. त्या वेळीं युद्धभूमीवर सूर्यासमान प्रकाशणाऱ्या कुरुराजाकडे पांडवसैनिक पाहण्यासहि समर्थ झाले नाहींत.

हे राजसत्तमा, नंतर युधिष्ठिर राजा खवळला आणि तुझ्या पुत्राला ठार करण्याच्या इच्छेनें त्या कुरुपतीवर चालून गेला. तेव्हां ते दोघे जयशाली व कुरुकुलोत्पन्न—दुर्योधन व युधिष्ठिर आपापला स्वार्थ साधण्याकरितां त्या रणांगणांत परस्परांस गांठून लढले. दुर्योधनानें नतपर्व बाणांनीं युधिष्ठिरास विद्ध केलें. त्याच्या ध्वजाचा चुराडा केला आणि सारथ्याच्या मस्तकावरहि बाण टाकिले. इतकेंच नव्हे, तर त्या महारथ दुर्योधनानें एका बाणानें युधिष्ठिराचें धनुष्य तोडलें व चार बाणांनीं त्याचे चार घोडे मारून टाकिले !

तेव्हां युधिष्ठिर राजा संतप्त झाला. त्यानें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन वेगानें दुर्योधनाचें निवारण केलें. युधिष्ठिरानें भल्लबाणांच्या योगानें त्याच्या धनुष्याचे तुकडे केले आणि आपल्या तीक्ष्ण शरांनीं त्याला विद्ध केलें. ते बाण त्याच्या मर्मस्थलीं लागले आणि एकमेकांशीं जुळून जमिनींत शिरले. देव जसे

वृत्राच्या वधाकरितां इंद्रासभोंवतीं जमले होते, त्याप्रमाणें सर्व वीर आपापल्या परिवारासह युधिष्ठिराभोंवतीं जमा झाले.

( २ ) हे मारिषा, तेव्हां युधिष्ठिरानें सूर्यकिरणांप्रमाणें देदीप्यमान, अत्युग्र व निवारण करण्यास कठीण असा एक बाण 'हा पहा ठार झालास' असें म्हणून दुर्योधनावर सोडला. त्या बाणानें दुर्योधन विद्ध होऊन रथांतच पडला! मग हे राजेंद्रा, आनंदित झालेल्या पांचालसैन्यांमध्यें सर्वत्र 'राजा दुर्योधनाचा वध झाला' अशी एकच गर्जना झाली. तीबरोबरच बाणांचाहि उग्र ध्वनि ऐकूं येऊं लागला, इतक्यांत द्रोण तेथें येऊन पोंचला. दुर्योधनहि सावध झाला, त्यानें बळकट धनुष्य घेतलें आणि 'उभा रहा, उभा रहा' असें म्हणत तो धर्मराजावर धांवून गेला. जयाची इच्छा करणारे पांचालहि त्यावर चालून आले; परंतु सूर्य प्रचंड वाऱ्यानें आलेले मेघ जसे नाहींसे करितो, त्याप्रमाणें दुर्योधनाचें रक्षण करण्याच्या इच्छेनें द्रोणानें त्यांचें निवारण केलें. राजा, युद्धाच्या इच्छेनें जमलेल्या तुझ्या व शत्रूंच्या लोकांमध्यें भयंकर संग्राम होऊन त्या दोन्ही पक्षांतील बरेच लोक मारले गेले. ७. ६. १५३.

---

## अध्याय १५४ वा.

[ १ रात्रियुद्ध. २ कौरवांच्या सैन्यांत अशुभ चिन्हें. ]

( १ ) धृतराष्ट्र—तो क्रुद्ध आणि बलवान् आचार्य जेव्हां माझ्या मंद आणि आज्ञा न मानणाऱ्या पुत्राशीं भाषण करून पांडवांच्या सेनेंत शिरला व रथांतून संचार करूं लागला, तेव्हां त्याचें पांडवांनीं कसें निवारण केलें? आचार्याशीं झालेल्या महायुद्धांत दक्षिणेकडील सैन्याचें रक्षण कोण करीत होता? शत्रूकडील पुष्कळ लोकांचा वध करून उत्तर बाजूचें रक्षण कोणीं केलें? त्या युद्धेच्छु वीराच्या मागें कोण कोण वीर होते? आणि त्या महारथ्याचे समोर पांडवांचे कोण वीर होते? युद्धांत कधींहि पराभव न पावणारा आचार्य जेव्हां पांचालांत शिरला आणि रथमार्गांमध्यें नाचतच त्यांचें सर्व सैन्य दग्ध करूं लागला, तेव्हां अग्नीसारखा तो पांचालांचा क्रुद्ध महारथी त्याला मारण्यास कसा समर्थ झाला बरें?

संजय—संध्याकाळीं जयद्रथाचा वध झाला असतां अर्जुन धर्मराजाकडे गेला. नंतर तो आणि महाधनुर्धर सात्यकि हे द्रोणावर धांवून आले. तसेंच

युधिष्ठिर व भीमसेन, धीमान् नकुल व दुर्जय सहदेव, ससैन्य धृष्टद्युम्न, केकयांसह विराट, मत्स्य, शाल्व हे आपापल्या सैन्यांसह द्रोणावर चालून आले. पांचालांनीं संरक्षण केलेला धृष्टद्युम्नाचा पिता द्रुपदराजा, तसेंच द्रौपदीचे पुत्र, घटोत्कच, प्रभद्रक व सहा हजार शूर पांचाल हे आपल्या सैन्यासह शिखंडीला पुढें करून द्रोणावर धांवले. पांडवांचे दुसरेहि मोठमोठे महारथी एकत्र होऊन त्या द्विजश्रेष्ठ द्रोणाशीं भिडून युद्धास प्रवृत्त झाले.

हे भरतश्रेष्ठा, त्या शूरांमध्यें अशा प्रकारें रणसंग्राम होत असतां भीरूंना भयंकर, वीरांना अशुभकारक, मृत्यूजवळ जाणारी, गज व मनुष्यें यांचा प्राण घेणारी भयंकर रात्र येऊन ठेपली. त्या घोर रात्रीं चारी बाजूंनीं कोल्हीं ओरडत होतीं व सर्वत्र घुबडेंहि दिसत होतीं. त्यावरून मोठें भय आल्याचें दिसून येत होतें. विशेषेंकरून हे भयंकर प्रकार कौरवांच्याच सैन्यांत होऊं लागले. तेव्हां त्या सैन्यामध्यें मोठा कलकलाट सुरू झाला. भेरींचा नाद, मृदंगांचा ध्वनि, हत्तींचा चीत्कार, घोड्यांचें खिंकाळणें आणि त्यांच्या टापांचा आवाज यांच्या योगानें जिकडे तिकडे एकच कोलाहल सुरू झाला.

हे महाराजा, मग संध्याकाळीं द्रोणाशीं सर्व सृंजयांचें युद्ध झालें. सर्व विश्व अंधकारानें व्याप्त झाल्यामुळें व चहूंकडून सैन्याच्या हालचालीनें उठलेल्या धुळीमुळें कांहींच समजेना ! आम्ही भयभीत झालों असल्यामुळें जमिनीवरील धूळहि आम्हांला दिसेनाशी झाली. रात्रीच्या वेळीं पर्वतावरील वेळूंचें रान पेटलें असतां जसा शब्द होतो, त्याप्रमाणें एकमेकांवर आपटणाऱ्या शस्त्रांचा नाद होऊं लागला. राजन्, सर्वत्र अंधकार झाल्यामुळें आपला कोण आणि परकीय कोण हेंहि समजेनासें झालें ! रात्रीच्या प्रारंभीं तें रणांगण अगदीं उन्मत्त होऊन गेल्यासारखें दिसत होतें. जमिनीवरील धूळ रक्ताचे योगानें बसून गेली होती आणि अंधकारहि सुवर्णाच्या कवचांनीं व भूषणांनीं नाहींसा होऊं लागला होता !

( २ ) हे भरतर्षभा, रात्रीं ती सुवर्णमणिविभूषित भारती सेना नक्षत्रयुक्त आकाशाप्रमाणें शोभत होती. त्या रात्रीं कोल्हे ओरडत होते, शक्ति फुरफुरत होत्या, ध्वज फडकत होते, हत्ती चीत्कार करीत होते आणि वीरांच्या गर्जना होत होत्या. अशा वेळीं अंगावर कांटा उभारणारा प्रचंड आवाज होऊं लागला.

त्यानें सर्व दिशा दणाणून गेल्या. मध्यरात्रीं ती भारती सेना आपल्या बाहु-भूषणांनीं, कुंडलांनीं, सुवर्णाच्या माळांनीं व शस्त्रांनीं प्रकाशमान दिसूं लागली. तेथें सोन्याचे अलंकार घालून विभूषित केलेले गज व रथ हे विद्युद्युक्त मेघांसारखे दिसत होते. गदादि आयुधें पडत असतां तीं अग्नीसारखीं शोभायमान दिसत होतीं. दुर्योधन त्या सेनेंतील पूर्वेकडील वारा होता. त्याचे योगानें हालचाल करणारे रथ आणि गज जणुंकाय मेघ होते. वाद्यांचा घोष तेथील मेघ-गर्जना असून धनुष्यें ह्या विजा चमकत होत्या. द्रोण व पांडव हे तेथील पर्जन्यमेघ असून खड्ग, शक्ति आणि गदा ह्या अशनि होत्या. शरांची वृष्टि ह्या पर्जन्यधारा पडत होत्या. अस्त्रें हे तेथील सुटलेले वायु होते. अशा त्या अत्यंत भयंकर सैन्यामध्यें वीरांनीं युद्धाच्या इच्छेनें प्रवेश केला. त्या भयंकर रात्रीच्या प्रारंभीं मोठी गर्जना झाली आणि भीरूंना भिवविणारें व शूरांना हर्ष-विणारें असें अतिदारुण युद्ध सुरू झालें. त्या वेळीं क्रुद्ध झालेले पांडव आणि सृंजय द्रोणावर धांवून आले. परंतु हे राजा, त्यांतील प्रमुख महार-थ्यांना द्रोणानें पराङ्मुख केलें व कित्येकांस यमपुरींहि पाठविलें. एकट्या द्रोणानें तें सर्व चतुरंग सैन्य त्या रात्रीं त्रस्त केलें. ७. ६. १५४.

---

## अध्याय १५५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर, शिबीचा वध. ३ भीमाचा पराक्रम. ]

(१) धृतराष्ट्र—तो अमितपराक्रमी द्रोण क्षुब्ध होऊन सृंजयांमध्यें शिरला, तेव्हां तुम्हांला काय वाटलें बरें ? दुर्योधनाशीं संभाषण करून द्रोण जेव्हां सैन्यांत प्रविष्ट झाला, तेव्हां युधिष्ठिराच्या मनांत काय आलें असावें ? जयद्रथ आणि भूरिश्रवा हे वीर ठार झाले असतां, युद्धांत कधींहि पराजित न झालेला तो महातेजस्वी द्रोण पांचालांवर चालून गेला, तेव्हां आतां आप-णास कोणतें कृत्य अवश्य केलें पाहिजे, असें दुर्योधनास वाटलें ? त्या वरद व द्विज-श्रेष्ठ वीराच्या बरोबर कोण होते व पाठीमागें कोण होते ? शत्रूकडील योद्ध्यांचा संहार करणाऱ्या त्या द्रोणापुढें तरी कोण होते ? हे प्रभो, द्रोणाच्या बाणांनीं व्याकुळ झालेल्या सर्व पांडवांची स्थिति शिशिरऋतूंत थंडीनें कांपणाऱ्या कृश धेनूंप्रमाणें झाली असावी, असें मला वाटतें ! तो शत्रूंचा नाश करणारा महाधनुर्धर पुरुषश्रेष्ठ पांचालांत शिरून मृत्यु तरी कसा पावला ? हे संजया,

माझे रथी शत्रूशीं संग्राम करीत असतां मारले गेले, कित्येकांचा पराजय झाला, कित्येक विरथ केले गेले, असें तूं सांगत आहेस! पांडवांच्या प्रहारांमुळें घाबरून गेलेले ते वीर घनदाट काळोखांत सांपडले असतां, त्यांचे मनांत कोणते विचार आले असावे? तूं पांडव हृष्ट व प्रक्षुब्ध झालेले असून माझे लोक दुःखी व भ्रान्त झाल्याचें सांगत आहेत! हे संजया, रात्रीच्यावेळीं पलायन न करणारे कौरव व पांडव एकमेकांस कसे ओळखतां येत होते हें सांग पाहूं!

( २ ) संजय—हे राजन्, तें अतिदारुण रात्रियुद्ध सुरू होऊन सोमकांसह सर्व पांडव द्रोणावर धांवून आले. तेव्हां द्रोणानें केकयांना आणि धृष्टद्युम्नाच्या सर्व पुत्रांना शीघ्रगामी बाणांच्या योगानें यमलोकीं पाठविलें. महारथी द्रोण आपल्या वीरांचा वध करीत आहे, हें पाहून खवळलेला प्रतापवान् शिबिराजा त्यावर चालून गेला. आपल्यावर वेगानें चालून येणाऱ्या त्या महारथ्यास द्रोणानें तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. शिबिराजानें हंसत-हंसतच भल्ल बाण मारून द्रोणाच्या सारथ्याला खालीं पाडिलें. तेव्हां द्रोणानें त्याचे अश्व आणि सारथि यांचा वध केला व त्याचें मस्तकहि शिरस्त्राणासह धडापासून वेगळें केलें. इतक्यांत दुर्योधनानें द्रोणाकरितां दुसरा सारथि पाठविला. त्यानें अश्वांचे रज्जु आपल्या हातीं घेतले आणि द्रोण पुनः शत्रूवर धांवून गेला!

( ३ ) नंतर पितृवधामुळें क्रुद्ध झालेला कलिंगराजाचा पुत्र सेनेसह रणांत भीमसेनावर चालून आला. त्यानें भीमावर बारा बाण, विशोकावर तीन बाण व त्याच्या ध्वजावरहि एक बाण टाकिला. तेव्हां क्रुद्ध झालेला भीम त्याच्या रथावर चढला व त्यानें मुष्टिप्रहार करून त्या शूर कलिंगवीराचा वध केला! हे परंतपा, हें भीमाचें कृत्य कर्ण व त्याचे बंधु यांना सहन झालें नाहीं. त्यांनीं भीमावर सर्पसदृश नाराच बाण टाकले. तेव्हां भीमसेन ध्रुवाच्या रथाकडे वळला आणि बाणवृष्टि करणाऱ्या त्या ध्रुवाचाहि त्यानें मुष्टिप्रहारानें वध करून त्याला जमिनीवर लोळविलें. हे महाराजा, नंतर तो बलवान् भीमसेन जयराताच्या रथावर चढला आणि सिंहनाद करीतच उजव्या हातानें जयराताला एक चपेटिका मारून त्यानें त्याचा वध केला!

रणांत असें महत् कर्म करून तो अद्भुतपराक्रमी भीमसेन पुनः आपल्या रथावर चढला आणि तुझ्या सेनेवर चालून आला. संहार करण्यासाठीं धांवून येणाऱ्या त्या महाबाहु भीमसेनाचें तुझ्या पुत्रांनीं निवारण केलें. त्यांनीं त्यावर मोठी शरवृष्टि करून त्याला आच्छादून टाकिलें. भीमानें

रणांत दुर्मदाच्या रथाचे अश्व व सारथि यांना सहज हंसत बाण मारून यमलोकीं पाठविले. तेव्हां दुर्मद दुष्कर्णाच्या रथावर चढला. नंतर ते तुझे दोघे पुत्र एका रथांत बसून भीमावर बाण सोडूं लागले. तेव्हां कर्ण, अश्वत्थामा, दुर्योधन, कृपाचार्य, सोमदत्त व बाल्हीक हे पहात असतां त्या शत्रुमर्दन भीमानें दुर्मद व दुष्कर्ण यांचा रथ लत्ताप्रहार करून भग्न केला व तुझ्या त्या बलवान् व शूर पुत्रांचा मुष्टिप्रहारानें वध करून मोठी गर्जना केली ! तेव्हां त्या सैन्यांत अत्यंत हाहाकार झाला ! हे राजा, तेव्हां भीमाला पाहून 'हा साक्षात् रुद्रच भीमाच्या रूपानें धृतराष्ट्रपुत्रांशीं युद्ध करीत आहे' असें म्हणून ते सर्व राजे रणांतून पळूं लागले !

याप्रमाणें निशारंभीं सैन्याची अत्यंत त्रेधा झालेली पाहून मोठमोठ्या राजांनीं त्या भीमाची स्तुति केली. नंतर तो महाबलवान् भीमसेन युधिष्ठि-राजवळ गेला व त्यानें त्याला वंदन केलें. त्यावेळीं भीमसेनाचे डोळे प्रफुल्लित कमलाप्रमाणें शोभत होते. भीमास पाहून नकुल, सहदेव, द्रुपद, विराट व केकय यांस आणि धर्मराजासहि परम आनंद झाला. अंधकासुराचा वध झाला असतां देवांनीं जशी शंकराची प्रशंसा केली, त्याप्रमाणें त्यांनीं वृकोदराची अत्यंत स्तुति केली. नंतर क्रुद्ध झालेले तुझे पुत्र आणि महात्मा द्रोणाचार्य यानें युद्धाच्या इच्छेनें रथ, पदाति आणि गज यांसह भीमाला वेढिलें ! हे नृपवरा, नंतर कृष्णघनांनीं व्याप्त होऊन अतिभयंकर दिसूं लागलेल्या प्रदोषसमयीं कौरव आणि पांडव यांचें महाभयंकर आणि परम आश्चर्यकारक युद्ध झालें. ७. ६. १५५.

---

## अध्याय १५६ वा.

[ १ सोमदत्ताची प्रतिज्ञा. २ सात्यकीचें त्यास उत्तर. ३ सोमदत्तमूर्च्छा. ४ द्रोण-पांडवयुद्ध व घटोत्कचवर्णन. ५ अंजनपर्व्याचा वध. ६ घटोत्कच व अश्वत्थामा यांचें युद्ध. ७ घटोत्कचाचा पराभव. ]

( १ ) संजय—सात्यकीनें प्रायोपवेशन करून बसलेल्या आपल्या पुत्राचा वध केला असल्यामुळें अत्यंत क्रुद्ध झालेला सोमदत्त सात्यकीला म्हणाला—" हे सात्वता, पूर्वीं देवांनीं आणि क्षत्रिय महात्म्यांनीं जो धर्म आचरला, तो सोडून तूं आज अधम धर्मांचे ठिकाणीं कसा प्रवृत्त झालास ? सात्यके,

कोणता क्षत्रियधर्मरत सुज्ञ पराङ्मुखावर, दीनावर आणि शस्त्रत्याग करणाऱ्यावर शस्त्र टाकील बरें? हे सात्वता, वृष्णींमध्यें महाबाहु प्रद्युम्न आणि तूं असे दोघे महारथि म्हणून प्रसिद्ध आहां. पार्थानें ज्याचा बाहु छेदिला आहे आणि जो प्रायोपवेशन करून बसला आहे, त्याच्या वधासारखें नीच व पापमूलक कृत्य तूं कसें केलेंस बरें? हे दुराचारा, तूं त्या कर्मांचें फळ आज युद्धांत भोग! हे मूर्खा, तुझा पराभव करून तुझें मस्तक मी आज छेदीन! अरे सात्वता, मी माझे दोन पुत्र, यजन आणि सारें पुण्य यांची शपथ घेऊन सांगतों कीं, ज्या तुला आपल्या वीरत्वाचा मोठा अभिमान वाटत आहे, त्या तुझें संरक्षण विजयी पार्थ करण्यास तयार नसेल, तर पुत्र-बांधवांसह तुझा वध आजची रात्र संपण्यापूर्वी मी करीन! माझे हातून असें न झाल्यास मी घोर नरकांत पडेन!" याप्रमाणें भाषण करून सोमदत्तानें उच्च स्वरांत आपला शंख वाजविला आणि सिंहनाद केला!

(२) तेव्हां सात्यकि क्रोधाविष्ट होऊन त्या सोमदत्ताला म्हणाला "हे कौरवेया, तुझ्या बरोबर अगर दुसऱ्या अनेकांबरोबर युद्ध करितांना माझ्या हृदयांत अल्पहि भीति कधीं उत्पन्न झाली नाहीं! जरी तूं या सर्व सैन्यासह मजशीं युद्धाला सिद्ध झालास, तरी तुजपासून मला किंचितहि व्यथा होणार नाहीं! नीचांना मान्य असलेल्या युद्धविषयक गोष्टी तूं मला कितीहि सांगितल्यास, तरी क्षत्रियधर्मांत तत्पर असलेल्या मला तूं मुळींच भिववूं शकणार नाहींस! तुझी माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा असेल, तर तूं निर्दयतेनें तीक्ष्ण बाण मजवर टाक आणि मग मीहि तसेंच करीन! मीं तुझा महारथी व शूर पुत्र याचा वध केला आहे! आणि आपल्या बंधूच्या संकटसमयीं धांवून आलेल्या शलाचाहि घात मींच केला आहे! आज तुझा पुत्र आणि बांधव यांसह मी वध करीन! तूं महारथी कौरव आहेस, त्याअर्थी रणांत सावधपणें उभा रहा. ज्याच्या ठिकाणीं नित्य दान, दम, पावित्र्य, अहिंसा, विनय, धृति, क्षमा इत्यादि गुण वसतात, त्या युधिष्ठिराच्या तेजानें तूं आधींच हत झालेला आहेस! आणि आतां तूं कर्ण आणि शकुनि यांसह रणांत नाश पावणार आहेस! मी कृष्णाच्या पायांची आणि माझ्या हातून जीं यज्ञादि पुण्यकर्में झालीं असतील, त्यांची शपथ घेऊन सांगतों कीं, मी तुज पाप्याचा युद्धांत पुत्रांसहवर्तमान वध करीन! युद्ध सोडून पळून जाशील, तरच तुझें रक्षण होईल!"

क्रोधानें ज्यांचे नेत्र आरक्त झाले आहेत, असे ते पुरुषश्रेष्ठ याप्रमाणें बोलून एकमेकांवर शरवृष्टि करूं लागले. नंतर हजारों रथ आणि गज यांसह चारी बाजूंनीं सोमदत्तास वेष्टून दुर्योधन उभा राहिला. शकुनीहि आपले पुत्र-पौत्र आणिं इंद्रासमान पराक्रमी बंधु यांस घेऊन त्याच्या रक्षणास आला. तुझा तो वज्रदेही श्यालहि लक्षाधिक अश्वसादी घेऊन त्या महाधनुर्धर सोमदत्ताचें चारी बाजूंनीं रक्षण करूं लागला!

(३) याप्रमाणें बलवान् वीरांनीं रक्षण केलेल्या सोमदत्तानें सात्यकीस बाणांनीं आच्छादिलें. तें पाहून क्रोधसंतप्त धृष्टद्युम्न मोठ्या सैन्यानिशीं त्यावर धांवून आला. हे राजन्, तीं दोन्ही सैन्यें परस्परांशीं युद्ध करूं लागलीं असतां प्रचंड वायूनें क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें गर्जना होऊं लागली. नंतर सोमदत्तानें नऊ बाण मारून सात्यकीला विद्ध केलें व सात्यकीनेंहि त्या कुरुश्रेष्ठावर तितकेच बाण टाकिले. सात्यकीच्या बाणांनीं विद्ध झाल्यामुळें सोमदत्त रथांत मूर्च्छा येऊन पडला! तेव्हां सारथ्यानें त्या महारथी सोमदत्ताचा रथ त्वरित रणांतून दूर नेला! हतसंज्ञ झालेल्या सोमदत्तास पाहून सात्यकीला मारण्याच्या इच्छेनें द्रोण त्यावर धांवला! तेव्हां युधिष्ठिरादिक सात्यकीचें रक्षण करण्यासाठीं त्याच्या सभोंवतीं उभे राहिले. नंतर पूर्वी त्रैलोक्य जिंकण्याच्या इच्छेनें देवांशीं बलीचें युद्ध झालें, त्याप्रमाणें द्रोण आणि पांडव यांमध्यें युद्ध जुंपलें. पांडवांच्या सैन्यावर बाणांची वृष्टि करून महातेजस्वी द्रोणानें युधिष्ठिराला विद्ध केलें. नंतर सात्यकि, धृष्टद्युम्न, भीम, नकुल, सहदेव, शिखंडी, द्रौपदेय, विराट, द्रुपद, युधामन्यु व उत्तमौजा इत्यादि सैनिकांचा वेध करून तो द्रोण पुनः युधिष्ठिरावर चालून आला. पांडवांचे सैनिक याप्रमाणें हत होऊं लागले, तेव्हां ते भयभीत होऊन आर्तस्वरानें दशदिशांस पळून गेले! आपल्या सैन्याचा द्रोणानें केलेला संहार पाहून अर्जुन त्यावर धांवून आला व युधिष्ठिराचें सैन्यहि पुनः मागें फिरलें!

( ४ ) नंतर द्रोण आणि पांडव यांमध्यें पुनः युद्ध प्रवृत्त झालें. हे राजन्, द्रोणानें त्या पांडवसेनेला उधळून लाविलें! अशाप्रकारें द्रोणाकडून सारखा वध होऊं लागल्यामुळें सव्यसाची अर्जुन पहात असतांहि भीतीनें तें पांडवांचें सैन्य पळून गेलें!

हे भारता, द्रोणानें रात्रीं आपल्या सैन्याचा भंग केलेला पाहून अर्जुन कृष्णाला 'द्रोणाच्या रथाकडे चल' असें म्हणाला. तेव्हां कृष्णानें आपले कुंद-

पुष्पाप्रमाणें शुभ्र अश्व द्रोणरथाकडे शीघ्र चालविले. अर्जुन द्रोणाकडे निघाला असतां भीमानेंहि आपला रथ द्रोणाकडेच वळविला. हे महाराजा, नंतर पांचालादि वीरहि त्यालाच अनुसरले. तेव्हां हे राजा, अंगावर रोमांच उभा राहील, असा भयंकर संग्राम झाला! दक्षिणेच्या बाजूनें अर्जुनानें व उत्तरेच्या बाजूनें वृकोदरानें मोठ्या रथसमुदायानिशीं तुझ्या सैन्यास अडवून धरिलें. त्या पुरुषश्रेष्ठ भीमार्जुनांस पाहून धृष्टद्युम्न आणि महाबलिष्ठ सात्यकि हे तेथें आले. तेव्हां प्रचंड वाऱ्यानें खवळलेल्या सागरांप्रमाणें एकमेकांवर प्रहार करणाऱ्या त्या सैन्यसमूहांमध्यें प्रचंड ध्वनि उत्पन्न झाला. हे राजन्, सौमदत्तीच्या वधानें संतप्त झालेला अश्वत्थामा सात्यकीला रणांत पाहून त्याचा वध करण्याच्या निश्चयानें त्यावर धांवला. परंतु अतिशय खवळलेल्या भीमसेनपुत्र घटोत्कचानें त्याचें निवारण केलें!

ज्या रथांत तो घटोत्कच बसला होता, तो महाभयंकर रथ लोखंडी असून त्याला अस्वलाच्या कातड्याचें आवरण होतें! तो औरसचौरस बारा हजार हात होता! सर्वप्रकारची युद्धसामुग्री आंत ठेविली असून त्याचा आवाज महामेघांच्या शब्दाप्रमाणें होता. त्या रथाला अश्व किंवा गज नसून हत्तींसारखे पिशाच्च जोडलेले होते! रथाचा ध्वज उंच असून त्यावर एक गृध्रपक्षी होता. त्याचे योगानें त्या रथास अद्भुत शोभा आली होती. त्या पक्ष्याचे पंख व चरण पसरलेले असून डोळे उघडलेले होते व तो जसा कांहीं बोलतच आहे, असें वाटत असे. रथाच्या पताका रक्तानें आर्द्र झाल्या होत्या व आंतड्यांच्या माळांनीं तो सुशोभित केला होता. त्याला आठ चक्रें होतीं. अशा त्या भव्य रथांत घटोत्कच बसला असून त्याबरोबर एक अक्षौहिणी राक्षस होते. त्यांच्या हातांत शूल, मुद्गर, पाषाण व वृक्ष होते. हे राजा, त्यानें आपलें तें प्रचंड चाप हातांत घेतल्याचें ऐकतांच राजे भयभीत होत असत! तो घटोत्कच म्हणजे प्रळयकाळचा दंडधारी अंतकच होय, असें त्यांना वाटत असे. तो पर्वतशिखरासारखा भयंकर स्वरूपाचा दिसत असे. अशा त्या राक्षसेंद्र घटोत्कचाला पहातांच तुझ्या पुत्रांची सेना भयविह्वल व त्रस्त होऊन गेली. सोसाट्याच्या वाऱ्याच्या वेगानें जिचे भोंवरे क्षुब्ध झाले आहेत व जिच्या लाटा वर उसळत आहेत, अशा गंगेसमान ती सेना दिसूं लागली! घटोत्कचाच्या सिंहनादानें गज भयभीत होऊन मूत्रोत्सर्ग करूं लागले आणि लोकहि अतिव्यथित झाले. नंतर सायंकाळ होतांच त्या राक्षसांची संख्या वाढत जाऊन त्यांनीं केलेल्या

पाषाणवृष्टीमुळें सर्व भूमि आच्छादून गेली आणि लोखंडी चक्रें, भृशुंडी इत्यादिकांचीहि सारखी वृष्टि होऊं लागली.

तें अतिभयंकर युद्ध पाहून राजे, तुझे पुत्र आणि कर्णहि व्यथित होऊन दशदिशांना पळून गेले. एकटा मानी अश्वत्थामा मात्र डगमगला नाहीं. त्यानें घटोत्कचानें निर्माण केलेली माया आपल्या बाणांनीं नष्ट केली. आपल्या मायेचा नाश अश्वत्थाम्यानें केलेला पाहून संतप्त झालेल्या घटोत्कचानें अश्वत्थाम्यावर घोर बाणांची वृष्टि केली. तेव्हां क्रोधमूर्च्छित भुजंग ज्याप्रमाणें वेगानें वारुळांत शिरतात, त्याप्रमाणें ते बाण अश्वत्थाम्याच्या शरीरांत घुसले. तेव्हां त्या चपल व प्रतापी अश्वत्थाम्यानें संतापून त्या घटोत्कचावर दहा बाण टाकले व त्याला विद्ध केलें. मर्मांचे ठिकाणीं विद्ध होऊन घटोत्कच फार व्यथित झाला. नंतर त्यानें लक्ष आरांचें अत्यंत तीक्ष्ण व मणिरत्नविभूषित चक्र अश्वत्थाम्याचा वध करण्याच्या इच्छेनें सोडलें. तें वेगानें आपल्यावर येत आहे, असें पाहून अश्वत्थाम्यानें त्यावर तीक्ष्ण शरांचा वर्षाव केला. त्यायोगानें अभाग्याच्या संकल्पाप्रमाणें तें चक्र व्यर्थ होऊन जमिनीवर पडलें ! चक्र फुकट गेलेलें पाहून मग सूर्यास राहू जसा आच्छादून टाकतो, त्याप्रमाणें घटोत्कचानें अश्वत्थाम्यास आपल्या बाणांनीं आच्छादून टाकिलें !

( ५ ) इतक्यांत 'अंजनपर्वा'नामक घटोत्कचपुत्रानें अश्वत्थामा आपल्यावर चालून येत आहे, असें पाहून मोठा पर्वत जसा वायूला अडवितो, त्याप्रमाणें त्याचा अटकाव केला. त्यावेळीं मेघानें जलधारांनीं व्याप्त केलेल्या मेरुपर्वतासारखा अश्वत्थामा शोभूं लागला. त्या रुद्र, उपेंद्र व इंद्र यांसारख्या पराक्रमी अश्वत्थाम्याला या गोष्टीची कांहींच भीति वाटली नाहीं ! त्यानें एक बाण टाकून अंजनपर्व्याचा ध्वज छेदिला, दोन बाणांनीं त्याचे दोन सारथि मारिले, तीन बाणांनीं त्याचें त्रिवेणुक मोडलें, एका बाणानें धनुष्य तोडलें व चार बाणांनीं त्या रथाश्वांचा वध केला. हे राजन्, त्या हिडिंबासुताच्या पुत्रानें–अंजनपर्व्यानें–सुवर्णमय गदा फेंकली असतां तीहि अश्वत्थाम्यानें बाणांचा मार केल्यामुळें खालीं पडली ! नंतर आकाशांत उड्डाण करून कालमेघाप्रमाणें अंजनपर्व्यानें गर्जना केली आणि अंतराळांतून त्या अश्वत्थाम्यावर तो वृक्षांची वृष्टि करूं लागला; परंतु त्या मायावी घटोत्कचपुत्राला अश्वत्थाम्यानें, सूर्य जसा किरणांनीं मेघाला भेदितो, त्याप्रमाणें बाणांनीं विद्ध केलें.

नंतर तो अंजनपर्वा खालीं उतरून एका सुवर्णविभूषित रथावर चढला. तेव्हां तो जमिनीवर कोसळून पडलेला काळाकुट्ट काजळाचा पर्वतच कीं काय, असा भासला ! परंतु अंधकासुराचा ज्याप्रमाणें महेश्वरानें अंत केला, त्याप्रमाणें पोलादी चिलखत घातलेल्या भीमसेनपौत्राचा अश्वत्थाम्यानें वध केला !

आपल्या महाबलिष्ठ पुत्राचा अश्वत्थाम्यानें वध केलेला पाहून वन जाळणाऱ्या प्रदीप्त अग्नीप्रमाणें पांडवांच्या सेनेचा विध्वंस करणाऱ्या शारद्वतीसुत अश्वत्थाम्याजवळ घटोत्कच आला आणि न डगमगतां त्याला मोठ्या रागानें बोलला.

घटोत्कच—द्रोणपुत्रा, थांब, थांब ! माझ्या हातून तूं कधींहि जीवंत सुटणार नाहींस ! षडाननानें जसा क्रौंचाचा वध केला, त्याप्रमाणें आज मी तुझा वध करीन !

अश्वत्थामा—वत्सा, अमरांसारखा तूं पराक्रमी आहेस ! जा, दुसऱ्या कोणाबरोबर तरी युद्ध कर ! भीमसेन माझा गुरुबंधु आहे, तरी पित्यासमान मला पीडा देणें तुला कधींहि न्याय्य होणार नाहीं. तुझ्यावर माझा बिलकूल रोष नाहीं. कोणालाहि राग आला असतां तो आपलाच घात करून घेत असतो, हें लक्षांत ठेव आणि त्याप्रमाणें वाग !

संजय—पुत्रशोकानें आधींच दुःखी झालेल्या घटोत्कचाचे डोळे हें भाषण ऐकून क्रोधानें लाल झाले आणि तो अश्वत्थाम्यास म्हणाला "हे द्रौणे, तूं मला असल्या बोलण्यानें भिववूं पाहतोस ! तूं मला प्राकृत जनाप्रमाणें युद्धभीरु समजतोस काय ? हें तुझें बोलणें मिथ्या आहे. कौरवांच्या विख्यात कुलांत मी भीमसेनापासून जन्म पावलों असून समरांत कधींहि परावृत्त न होणाऱ्या पांडवांचा पुत्र आहें. मी राक्षसांचा राजा असून पराक्रमामध्यें रावणासमान आहें ! द्रोणपुत्रा, उभा रहा, उभा रहा ! माझ्यापासून तूं जीवंत सुटणार नाहींस ! आज समरांगणांत तुझा युद्धाभिमान मी नाहींसा करतों पहा !"

( ६ ) असें बोलून क्रोधानें लाल झालेला तो अतिबलाढ्य राक्षस गजावर सिंह चालून जातो, त्याप्रमाणें अश्वत्थाम्यावर धांवून गेला. जलधारांची वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें त्या घटोत्कचानें रथाच्या आंसासारख्या बाणांनीं त्या रथिश्रेष्ठ अश्वत्थाम्यावर वृष्टि केली. ती शरवृष्टि आपल्या अंगावर येण्यापूर्वींच द्रौणीनें आपल्या बाणांनीं तिचा नाश केला. तें पाहून घटोत्कचानें एका अति-

उंच पर्वताचें रूप धारण केलें. त्या पर्वताच्या शिखरांवर दाट वृक्षांची झाडी वाढली असून त्यांतून शस्त्रसंघ पडत होते ! असा अंजनगिरीसारखा पर्वत पाहूनहि अश्वत्थामा भ्रांत झाला नाहीं. त्यानें हास्यपूर्वक आपलें वज्रास्त्र सोडून त्या योगानें त्या प्रचंड पर्वताचा नाश केला. नंतर त्या घटोत्कचानें नीलवर्ण मेघाचें रूप धारण केलें व आकाशांतून रणांत त्या द्रोणपुत्रावर भयंकर पाषाणवृष्टि केली ! तेव्हां अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या द्रोणपुत्रानें वायव्यास्त्राची योजना करून त्या उठलेल्या नील मेघाचा नाश केला ! नंतर आपल्या बाणांनीं सर्व दिशा रोधून त्या नरश्रेष्ठ अश्वत्थाम्यानें लाखों रथ चूर्ण करून टाकिले. तरीहि न डगमगतां घटोत्कच आपलें धनुष्य आकर्ण ओढून पुष्कळ राक्षसांसह रथांत बसून पुनः चालून येत आहे, असें द्रौणीनें पाहिलें. ते राक्षस सिंह-शार्दूलांप्रमाणें उग्र व मदोन्मत्त गजांसारखे पराक्रमी दिसत होते. कांहीं गजांवर, कांहीं रथांवर, तर कांहीं अश्वांवर आरूढ झाले होते. त्यांनीं नानाप्रकारचीं शस्त्रें, कवचें व भूषणें धारण केलीं होतीं. ते मोठे सामर्थ्यवान् दिसत असून क्रोधावेशामुळें त्यांनीं डोळे वटारलेले होते. प्रचंड आरोळ्या मारीत ते युद्धास प्रवृत्त झाले होते.

याप्रमाणें तो घटोत्कच युद्धाकरितां येत आहे, असें पाहून तुझा मुलगा दुर्योधन खिन्न होऊन गेला. तेव्हां त्याला अश्वत्थामा म्हणाला “ दुर्योधना, उभा रहा ! तूं, तुझे बंधु, वीर आणि इंद्रासमान पराक्रमी राजे यांनीं गडबडून जाण्यासारखें कांहीं नाहीं. तुझ्या शत्रूंचा आज मी संहार करीन ! तुझा पराजय होणार नाहीं, हें मी प्रतिज्ञापूर्वक सांगत आहें. तूं सैन्याचें समाधान कर !”

दुर्योधन—हे गौतमिनंदना, तुझें मन थोर असून तुझी आम्हांवर अत्यंत भक्ति आहे. म्हणून या तुझ्या बोलण्यांत अद्भुत असें कांहीं मला वाटत नाहीं.

संजय—अश्वत्थाम्याशीं असें भाषण करून तो शकुनीला म्हणाला, “ अर्जुनाचे एक हजार रथ आहेत, तेव्हां तूं साठ हजार रथ घेऊन त्यावर जा. कर्ण, वृषसेन, कृप, नील, उत्तर दिशेकडील वीर व दुसरेहि अनेक योद्धे व साठ हजार पदाति तुझ्या मागून येतील. मामा, देवेंद्र जसा असुरांस जिंकितो, तसा तूं भीमाला, नकुल-सहदेवांना, आणि धर्मराजाला जिंकून टाक ! माझी जयाशा केवळ तुझ्यावर अवलंबून आहे. हे मातुला, अश्वत्थाम्यानें बाणांनीं

पांडवांचीं शरीरें विद्ध केलीं आहेत. तरी कार्तिकेयानें जसा असुरांवर जय मिळविला, त्याप्रमाणें तूं या कुंतीपुत्रांना जिंकून टाक!”

हे राजन्, याप्रमाणें तुझ्या पुत्रानें सांगतांच, पांडवांचा नाश करण्याचा हेतु मनांत धरून तो शकुनि जाऊं लागला. तें पाहून तुझ्या पुत्रांस अत्यंत आनंद झाला. नंतर अश्वत्थामा व घटोत्कच यांचें रणांगणावर शक्र-प्रल्हादांच्या युद्धाप्रमाणें रात्रीच्या समयीं मोठें तुमुल युद्ध झालें. तेव्हां घटोत्कचानें अग्नि किंवा विष यांप्रमाणें अतिप्रखर दहा बाण गौतमीसुताच्या छातीवर मारिले. भीमसुताच्या बाणांनीं विद्ध झालेला अश्वत्थामा वाऱ्यानें हालविलेल्या वृक्षाप्रमाणें कांपूं लागला! पुनः घटोत्कचानें अंजलिक शरानें अश्वत्थाम्याच्या हातांतील महातेजस्वी धनुष्य तोडून टाकिलें. नंतर द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें दुसरें मोठें भार सहन करणारें धनुष्य घेतलें आणि पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघा-प्रमाणें घटोत्कचावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. हे भारता, त्या शारद्वती-सुतानें शत्रूंचा घात करणारे सुवर्णपुंख बाण त्या राक्षसांवर टाकिले! त्या बाणांनीं पीडित झालेला राक्षसांचा समुदाय सिंहांनीं व्याकुळ केलेल्या गज-समूहाप्रमाणें दिसला! अश्व, सारथि, गज आणि रथ यांसह त्या राक्षसांचा संहार अश्वत्थाम्यानें केला आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें त्यानें त्यांना जाळून टाकिलें! हे नृपा, पूर्वीं महेश्वर शंकर त्रिपुरासुराला जाळून स्वर्गांत शोभला, त्याप्रमाणें किंवा युगांतीं सर्व भूतांचा दाह करून प्रदीप्त झालेल्या प्रलयाग्नी-प्रमाणें तुझ्या शत्रूंचा विध्वंस करून तो विजयिश्रेष्ठ द्रोणपुत्र अधिकच प्रकाशूं लागला!

नंतर त्या घटोत्कचानें ‘द्रोणपुत्राला मारून टाका’ असें त्या भीम-कर्मी राक्षसांना सांगून त्यांची मोठी सेना अश्वत्थाम्यावर पाठविली. घटो-त्कचाची आज्ञा मान्य करून ते राक्षस, प्रचंड सिंहनाद करून व पृथ्वी दणदणावून नानाप्रकारच्या आयुधांसह द्रोणपुत्रावर त्याला मारण्याला धांवून आले. त्यांचें स्वरूप भयंकर असून जिह्वा भयानक दिसत होत्या! त्यांचे नेत्र लालभडक झालेले होते. अशा त्या भीमपराक्रमी राक्षसांनीं हजारों शक्ति, शतघ्नी इत्यादि आयुधें त्या अश्वत्थाम्याच्या मस्तकावर फेंकलीं! द्रोण-पुत्राच्या मस्तकावर होणारी ती मोठी शरवृष्टि पाहून ते सर्व वीर व्यथित झाले. परंतु त्या पराक्रमी द्रौणीनें ती वरून होणारी शरवृष्टि आपल्या उज्ज्वल व वज्रतुल्य बाणांनीं नाहींशी केली! नंतर दिव्यास्त्रांनीं मंत्रित दुसऱ्या

सुवर्णपुंख बाणांनीं उदार मनाच्या द्रोणपुत्रानें त्या राक्षसांवर त्वरित प्रहार केला. त्या बाणांनीं त्या विशालवक्ष राक्षसांचे समुदाय व्यथित झाले! सिंहाकडून मत्त गजसमूह जसा व्याकुल व्हावा, त्याप्रमाणें त्यांची स्थिति झाली! तेव्हां द्रोणपुत्रानें बाणांनीं पीडित केलेले राक्षस अतिसंतप्त होऊन त्याला मारण्याकरितां त्यावर धांवून गेले! त्यावेळीं हे भारता, दुसऱ्या कोणींहि न केलेला असा अतिअद्भुत पराक्रम द्रोणपुत्रानें तेथें करून दाखविला! त्या एकट्या अस्त्रवेत्त्या द्रौणीनें एका क्षणांत राक्षसाधिपति घटोत्कचाच्या समक्ष ती राक्षससेना प्रज्वलित बाणांच्या योगानें जाळून खाक केली! त्या राक्षसांचें सगळें सैन्य नष्ट करून तो अश्वत्थामा युगांतीं सर्व भूतांना व्यापून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें शोभूं लागला! हे भारता, सर्पसदृश बाणांनीं तो सैन्यें दग्ध करीत असतांना त्या समरांत पांडवांकडील हजारों राजांमध्यें घटोत्कचाखेरीज दुसरा कोणीहि त्या द्रोणपुत्राकडे दृष्टि टाकूं शकला नाहीं! हे भरतश्रेष्ठा, त्या घटोत्कचानें क्रोधानें डोळे गरगर फिरवून, हातावर हात मारून व दांतओंठ खाऊन आपल्या सारथ्याला म्हटलें ‘ मला अश्वत्थाम्याकडे घेऊन चल! ’

मग तो अरिसूदन घटोत्कच घोररूपी व तेजस्वी पताकांनीं सुशोभित रथांत बसून पुनः द्रौणीशीं द्वंद्वयुद्ध करण्यास निघाला. त्या भीमविक्रमी घटोत्कचानें सिंहासारखी गर्जना केली आणि जिला आठ घंटा लाविल्या आहेत, अशी देवांनीं निर्माण केलेली अशनि त्यानें द्रोणपुत्रावर सोडली! परंतु द्रौणीनें आपलें धनुष्य रथांतच ठेवलें आणि उडी मारून ती अशनि घेतली आणि उलट घटोत्कचावरच सोडली! तेव्हां घटोत्कचानें रथांतून खालीं उडी घेतली. त्या महातेजस्वी व अतिदारुण अशनीनें घटोत्कचाचे अश्व, सारथी, ध्वज आणि रथ यांचें भस्म केलें आणि मग भूमि विदीर्ण करून ती आंत शिरली! ती शंकरनिर्मित अशनि द्रोणपुत्रानें उडी मारून घेतल्याचें पाहून सर्व लोक त्याची स्तुति करूं लागले!

हे नृपा, मग तो भीमपुत्र धृष्टद्युम्नाच्या रथावर गेला आणि इंद्रधनुष्यासमान मोठें घोर धनुष्य घेऊन द्रोणपुत्राच्या विशाल छातीवर प्रखर बाण टाकूं लागला. धृष्टद्युम्नानें देखील भ्रांत न होतां सर्पतुल्य सुवर्णपिसाऱ्याच्या बाणांनीं त्या द्रौणीच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. तेव्हां द्रोणपुत्रानें हजारों नाराच बाण त्यावर सोडले आणि त्यांनींहि अग्निशिखांसारख्या शरांनीं ते अश्वत्थाम्याचे बाण छेदून टाकिले. हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें त्या अश्वत्थाम्याचें

आणि त्या दोघां पुरुषश्रेष्ठांचें वीरांस हर्षविणारें अतितीव्र व महाघोर युद्ध झालें. नंतर भीम आपल्या सैन्यासह तेथें आला, तरी धर्मात्मा व अमितविक्रमी द्रोणपुत्र अश्वत्थामा घटोत्कच, धृष्टद्युम्न व त्यांचे अनुचर यांशीं युद्ध करीतच होता! हे भारता, त्या युद्धांत दुसऱ्या कोणींहि करून दाखविला नाहीं, असा अतिअद्भुत पराक्रम द्रोणपुत्रानें करून दाखविला. त्यानें क्षणमात्रांत भीमसेन, घटोत्कच, धृष्टद्युम्न, नकुल-सहदेव, धर्मराज व श्रीकृष्ण यांच्या देखत घोडे, सारथी, रथ आणि गज यांसुद्धां त्या अक्षौहिणी राक्षससेनेचा विध्वंस करून टाकला! वेगानें आलेल्या बाणांनीं विद्ध झालेले हत्ती सशृंग पर्वताप्रमाणें जमिनीवर पडले! नुकत्याच कापून काढलेल्या गजशुंडा इकडून तिकडे हालचाल करीत असतां ती जमीन जणुंकाय सरपटणाऱ्या सर्पांनींच व्याप्त झाली आहे, असा भास होत होता. सोन्याच्या दांड्यांनीं विभूषित असलेलीं राजछत्रें मोडून जमिनीवर पडलीं होतीं, त्यामुळें ज्यावर चंद्रसूर्य उगवले आहेत व जें ग्रहांनीं व्याप्त झालें आहे, अशा प्रलयकालच्या आकाशाप्रमाणें ती भूमि शोभत होती.

हे राजा, त्या द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें तेथें एक महाघोर नदीचें निर्माण केली होती. मोठमोठे ध्वज हे तिच्यामधील बेडूक, भेरी हीं तीमधील विस्तीर्ण कांसवें, छत्रें ह्या तिचें सेवन करणाऱ्या हंसपंक्ती, आणि चामरें हा तिजवर आलेला फेंस होता![1]

( ७ ) राक्षसांना बाणांनीं मारून अश्वत्थाम्यानें घटोत्कचाचा पाडाव केला व पुनः अतिसंतापानें भीमसेन, धृष्टद्युम्न यांसह पांडवांना त्यानें आपल्या नाराच बाणांनीं विद्ध केलें आणि सुरथनामक द्रुपदपुत्राचा त्या महाबलिष्ठानें वध केला! नंतर त्यानें पुनः शत्रुंजय नांवाच्या दुसऱ्या द्रुपदाच्या मुलाला आणि बलानीक, जयानीक, जयाश्व यांनाहि परलोक दाखविला. त्याप्रमाणें सुवर्णालंकारमंडित श्रुताह्वय राजाला तीन तीक्ष्ण बाण मारून यमलोकीं पाठविलें! हे मारिषा, पृषध्र व चंद्रसेन यांचा वध करून दहा बाणांनीं कुंतिभोजाचे दहा पुत्र त्यानें वधिले! नंतर एक यमदंडासमान घोर बाण घटोत्कचावर सोडला. तो महाबाण घटोत्कचाचें हृदय विदारून त्वरित जमिनींत शिरला. हे पृथ्वीपते, मग घटोत्कच मरून पडला, असें वाटून महारथी धृष्ट-

---

1 येथील नदीचें वर्णन पूर्वी पुष्कळ वेळां आलें असल्यामुळें सोडलें आहे.

धृष्टद्युम्नानें आपला उत्तम रथ अश्वत्थाम्यापासून दूर पळविला! नंतर हे नृपा, युधिष्ठिरसैन्यांतील राजांनींहि पलायन केलें! याप्रमाणें रणांगणांत द्रोणपुत्रानें धर्मराजाच्या सैन्याचा पराभव करून गर्जना केली, तेव्हां भारता, सर्व लोक व तुझे पुत्र यांनीं त्याची स्तुति केली.

नंतर शेंकडो शरांनीं छिन्नदेह होऊन गतप्राण होऊन पडलेल्या राक्षसांच्या योगानें ती रणभूमि जणुंकाय पर्वतशिखरांनींच अतिदुर्गम व अतिभयंकर होऊन गेली. सिद्ध, गंधर्व, पिशाच्च, यांचे संघ आणि नाग, सुपर्ण, पितर, पक्षी, राक्षससमुदाय, भूतगण, अप्सरा आणि देव त्या पराक्रमी अश्वत्थाम्याची प्रशंसा करूं लागले. ७. ६. १५६.

---

## अध्याय १५७ वा.

[ १ बाह्लीकवध. २ भीमाचा पराक्रम. ३ द्रोण-युधिष्ठिरयुद्ध. ]

( १ ) संजय—द्रुपदाचे पुत्र, कुंतिभोजाचे पुत्र आणि हजारों राक्षस यांचा द्रोणपुत्राकडून वध झालेला पाहून युधिष्ठिर, भीमसेन, पार्षत, धृष्टद्युम्न आणि सात्यकि यांनीं पुनः जोरानें संग्राम करण्याचा विचार केला. तेव्हां सात्यकीला रणांत पाहून सोमदत्त अतिशय खवळला आणि हे भारता, त्यानें बाणांची मोठी वृष्टि करून त्याला आच्छादून टाकिलें. नंतर तेथें तुझे विजयेच्छु लोक आणि शत्रु यांमध्यें अत्यंत भीतिप्रद व घोर युद्ध झालें! सोमदत्त धांवून येत आहे, असें पाहून सात्यकीच्या रक्षणासाठीं शिलाधौत सुवर्णपुंख व उज्ज्वल बाणांनीं भीमानें त्याला जर्जर केलें आणि एक नवीन, बळकट व भयंकर परीघ घेऊन तो सोमदत्ताच्या मस्तकावर फेंकला! इतक्यांत पुत्रशोकानें विह्वल, वृद्धावस्थेंत शोभणाऱ्या गुणांनीं संपन्न व नाहुष ययातीसमान योग्यतेच्या त्या वृद्ध सोमदत्ताच्या मस्तकावर अत्यंत क्रुद्ध होऊन सात्यकीनें वज्रासमान तीक्ष्ण बाण सोडून त्याला विद्ध केलें आणि एक अतितीक्ष्ण बाण त्यानें त्याच्या वक्षःस्थलावर मारला. हे वीरा, तो घोर परीघ व बाण एकाच वेळीं सोमदत्ताच्या देहावर पडल्यामुळें तो महारथी मूर्च्छित होऊन भूमीवर पडला!

आपला पुत्र मूर्च्छित झालेला पाहून प्रलयकालच्या मेघाप्रमाणें वृष्टि करीत बाल्हीक त्या सात्यकीवर चालून गेला. नंतर भीमानें सात्यकीचा पक्ष

घेऊन युद्धारंभींच बाल्हीकाला बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां त्या क्षुब्ध प्रातिपेयानें इंद्राच्या वज्राप्रमाणें आपल्या शक्तीचा प्रहार भीमाच्या छातीवर केला. त्या शक्तीनें विद्ध झालेला भीम कांपूं लागला व लगेच त्याला मूर्च्छाहि आली. शुद्धीवर येतांच त्या बलवान् भीमानें आपली गदा बाल्हीकावर फेंकली. त्या योगानें वज्रप्रहारानें जसा मोठा पर्वत कोसळून पडतो, तसा तो बाल्हीक मस्तक तुटून भूमीवर पडला !

( २ ) हे पुरुषश्रेष्ठा, तो बाल्हीक वीर मृत होऊन जमिनीवर पडल्यावर नागदत्त, दृढरथ, महाबाहु, अयोभुज, दृढ, सुहस्त, विरजा, उग्र, प्रमाथी व अनुयायी हे दाशरथी रामाप्रमाणें तुझे दहा पुत्र भीमावर चालून गेले. त्यांस पाहून भीमानें प्रत्येकाच्या मर्मस्थलीं एकेक बाण मारिला ! त्यामुळें ते हतप्रभ व गतप्राण होऊन सोसाट्याच्या वाऱ्यानें पर्वताग्रावरून पडणाऱ्या वृक्षां-प्रमाणें रथांतून खालीं पडले. त्या तुझ्या दहा पुत्रांचा दहा नाराच बाणांनीं वध करून कर्णाच्या आवडत्या वृषसेन पुत्रावरहि त्यानें बाणवृष्टि केली. तेव्हां कर्णाचा प्रख्यात बंधु जो वृकरथ, त्यानें भीमावर शरांचा वर्षाव केला. तेव्हां तो बलिष्ठ भीमसेन त्यावरहि धांवून गेला. नंतर हे भारता, त्या वीरानें तुझ्या श्यालकांचे सात रथ्यांना गतप्राण केलें आणि बाणांनीं शतचंद्राचाहि वध केला. महारथी शतचंद्राचा वध झाल्याचें सहन न होऊन गवाक्ष, शरभ, विभु, सुभग आणि भानुदत्त ह्या शकुनीच्या पांच शूर बंधूंनीं भीमावर चालून जाऊन त्यावर मेघवृष्टीप्रमाणें तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. तथापि त्या भीमानें पांच बाणांनीं त्या पांच अतिरथ्यांस यमसदनीं पाठविलें. त्या वीरांना मारलेले पाहून मोठमोठे राजे भयानें कांपूं लागले !

( ३ ) हे अनघा, मग युधिष्ठिर क्रुद्ध होऊन द्रोण व तुझे पुत्र पहात असतां तुझ्या सैन्याचा नाश करूं लागला. त्या क्षुब्ध झालेल्या युधिष्ठिरानें अंबष्ठांस, मालवांस, शूर त्रिगर्तांस आणि शिबींसहि रणांत यमलोकीं पाठ-विलें ! त्याप्रमाणें अभीषाह, शूरसेन व वसातिकांसह बाल्हीकांचाहि वध करून त्या युधिष्ठिरानें पृथ्वीवर रक्ताचा चिखलच करून ठेवला ! हे राजन्, यौधेय, मालव व मद्रक यांचे शूर गणांसहि त्यानें परलोकीं धाडलें. युधि-ष्ठिराच्या रथाजवळ त्यावेळीं 'मारा, ओढून काढा, पकडा, विद्ध करा, तोडा' असा एकच तुमुल ध्वनि होत होता !

युधिष्ठिर आपल्या सैन्याचा संहार करीत असल्याचें पाहून तुझ्या पुत्राच्या प्रेरणेनें द्रोणानें त्यावर बाणवृष्टि करण्यास आरंभ केला. अत्यंत क्रुद्ध होऊन त्यानें धर्मावर वायव्यास्त्र सोडलें. धर्मानेंहि प्रत्यस्त्र सोडून त्या दिव्यास्त्राचा नाश केला. नंतर द्रोणानें त्या पांडुनंदनाचा वध करण्याच्या हेतूनें त्यावर वारुण, याम्य, आग्नेय, त्वाष्ट्र व सावित्र हीं अस्त्रें फेंकलीं; परंतु त्या सर्वांचें महाबाहु धर्मपुत्रानें न भितां आपल्या अस्त्रांनीं निवारण केलें. हे भारता, नंतर तुझ्या पुत्रांचें हित करण्यांत तत्पर असलेल्या द्रोणानें आपली प्रतिज्ञा खरी करण्याच्या इच्छेनें धर्मपुत्रास मारण्यासाठीं ऐंद्र व प्राजापत्य हीं अस्त्रें त्याच्यावर सोडलीं. तेव्हां महातेजस्वी धर्मानें माहेंद्र अस्त्र सोडून त्या अस्त्रांचा नायनाट केला. तें पाहून द्रोण क्रोधसंतप्त झाला आणि धर्माचा वध करण्याच्या हेतूनें त्यानें त्यावर ब्रह्मास्त्र सोडलें. हे महीपते, त्यायोगानें जिकडे-तिकडे घोर अंधार पडून कांहीं दिसेनासें झालें आणि सर्व प्राणी त्रासून गेले. ब्रह्मास्त्राचा उदय झाल्याचें पाहून कुंतीपुत्र युधिष्ठिरानें ब्रह्मास्त्राचीच योजना करून त्याचा प्रतिकार केला. नंतर दोन्ही सैन्यांतील मुख्य अधिकारी त्या नरश्रेष्ठ द्रोण-युधिष्ठिरांची प्रशंसा करूं लागले. कारण, ते दोघे महाधनुर्धर असून सर्व प्रकारच्या युद्धांत मोठे निष्णात होते.

हे भारता, हें पाहून द्रोणानें धर्माला सोडलें आणि क्रोधानें लाल नेत्र करून त्यानें द्रुपदाच्या सैन्यावर वायव्यास्त्र सोडलें आणि त्याची फांकाफांक केली. द्रोणाच्या प्रहारामुळें भीम व महात्मा अर्जुन यांच्या देखत ते पांचाल भिऊन पळून जाऊं लागले. तें पाहून अर्जुन आणि भीम ह्या दोघांनीं त्या सैन्यास अडवून धरिलें व दोघे रथसंघानिशीं द्रोणसैन्याकडे गेले. दक्षिणेच्या बाजूनें अर्जुनानें व उत्तरेच्या बाजूनें भीमानें त्या भारद्वाजावर मोठी शरवृष्टि केली. केकय, सृंजय व महापराक्रमी पांचाल आणि सात्वतांसह मत्स्य हे त्यांच्या मागून जाऊं लागले. नंतर त्या भारती सेनेचा अर्जुनाकडून वध होत असतां अंधकार व झोंप यांमुळें व्याकुळ होऊन ती सेना पुनः फांकली. तेव्हां द्रोण व तुझा मुलगा दुर्योधन यानें स्वतः तिला मागें फिरविण्याचा यत्न केला; परंतु त्यांच्यानें तिचें निवारण झालें नाहीं. ७. ६. १५७.

---

## अध्याय १५८ वा.

[ १ कर्ण व दुर्योधन यांचा संवाद. २ कृपाचार्यकृत कर्णाधिक्षेप. ]

( १ ) संजय—तें पांडवांचें मोठें सैन्य खवळलें आहे, यास्तव त्याचा प्रतिकार करणें आपणाला कठीण आहे, असें वाटून दुर्योधन कर्णाला म्हणाला "हे मित्रवत्सला, मित्राला साहाय्य करण्याची हीच वेळ आहे. म्हणून हे कर्णा, समरांत सर्व महारथी योद्ध्यांचें तूंच रक्षण कर. कारण पांचाल, मत्स्य, केकय व महारथ पांडव हे सर्व निश्वास टाकणाऱ्या सर्पांप्रमाणें चिडून जाऊन त्यांनीं चारी बाजूंनीं आमच्या योद्ध्यांस वेढलें आहे. जयाची इच्छा करणारे पांडव आणि तें इंद्रासारखें पांचालांचें पराक्रमी रथसैन्य हर्षभरित होऊन गर्जना करीत येत आहे पहा!"

कर्ण—आज प्रत्यक्ष इंद्र अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां येथें आला, तरी त्याचाहि क्षणांत पराभव करून मी अर्जुनाचा वध करीन. हे भारता, मी ही सत्य गोष्ट तुला प्रतिज्ञापूर्वक सांगत आहें. यासाठीं धीर धर. मी पांडवांना आणि पांचालांना मारीन आणि कार्तिकेयानें इंद्रास जसा जय मिळवून दिला, तसा तुला मिळवून देईन. हे पार्थिवा, माझ्या हातून तुझें हित व्हावें एवढ्याचकरितां मी जगलों आहें. सर्व पांडवांमध्यें अर्जुन हाच काय तो बलवान् आहे. त्यावर इंद्रानें निर्माण केलेली अमोघ शक्ति मी सोडीन. तिनें तो महाधनुर्धर निधन पावला असतां त्याचे बंधु तुझ्या आधीन होतील किंवा पुनः वनवासाला तरी जातील! हे कौरवा, मी जीवंत असतां तूं दुःखी होऊं नकोस. मी समरांत सर्व पांडवांना, पांचालांना, केकयांना व वृष्णींना जिंकीन आणि बाणसमूहांनीं त्यांचे तुकडे तुकडे करून तुला पृथ्वी मिळवून देईन."

( २ ) संजय—कर्ण याप्रमाणें बोलत असतां कृप हंसला व त्या सूतपुत्राला बोलला "हे कर्णा, ठीक, ठीक! आज तुझ्यासारखा नाथ मिळाल्यानें कुरुश्रेष्ठ दुर्योधन सनाथच झाला आहे! पण राधेया, नुसत्या बोलण्यानें कार्यसिद्धि कधीं होत नसते! कर्णा, तूं दुर्योधनाजवळ मोठी प्रौढी मिरवितोस, परंतु तुझा विक्रम किंवा त्या प्रकारची फलप्राप्ति कोठेंच दिसून येत नाहीं. आजपर्यंत रणांत तूं अनेक वेळां पांडवांबरोबर युद्धार्थ उभा राहिल्याचें आम्हीं पाहिलें आहे; परंतु हे सूतपुत्रा, सर्वत्र तुलाच पांडवांनीं जिंकलें आहे. कर्णा,

दुर्योधनाला गंधर्व पकडून नेत असतां सैन्यें लढत राहिलीं, तूं मात्र एकटा सर्वांच्या आधीं पळालास ! त्याचप्रमाणें विराटनगरांत सर्व कौरवांना पांडवांनीं जिंकलें असतां त्यांत तूंहि बांधवांसह जिंकला गेला होतास ! जो तूं एकट्या अर्जुनाला रणांगणांत जिंकण्यास असमर्थ आहेस, तो तूं सर्व पांडव व कृष्ण यांस जिंकण्याचा उत्साह धरितोस हें कसें ? हे सूतपुत्रा, तोंडानें कांहीं न बोलतां युद्ध करून दाखीव ! तूं आत्मश्लाघा करीत आहेस ! कांहीं न बोलतां करून दाखविणें हेंच सत्पुरुषांचें व्रत होय. शारदीय मेघाप्रमाणें तूं व्यर्थ गर्जना केलीस, परंतु कर्णा, तूं निष्फल आहेस, हें दुर्योधन राजाला मात्र कळत नाहीं. हे राधेया, अर्जुनाची जोंवर गांठ पडली नाहीं, तोंवर खुशाल गर्जना कर. पार्थाच्या बाणांनीं विद्ध झालास, म्हणजे तुझी ही बडबड आपोआपच बंद पडेल. बाहुवीर्यांत क्षत्रिय शूर आहेत, वाग्बलांत ब्राह्मण शूर आहेत, धनुष्यकलेंत अर्जुन शूर आहे आणि कर्ण हा मनोरथ करण्यांत शूर आहे ! ज्यानें प्रत्यक्ष शंकरालाहि आपल्या पराक्रमानें संतोषविलें, त्या अर्जुनाचा प्रतिकार कोण करूं शकेल बरें ?"

याप्रमाणें कृपानें त्यावेळीं कर्णाला संतापविलें असतां तो वीरश्रेष्ठ कर्ण कृपाला बोलला "वर्षाकालांतील मेघांप्रमाणें शूर सर्वदा गर्जना करीत असतात, आणि ऋतुकालीं पेरलेल्या बीजासमान फलप्राप्तीहि शीघ्र करून देत असतात. रणामध्यें मोठा भार सहन करणारे शूर प्रौढी मिरवीत असले, तरी त्यांत त्यांचा मला कांहीं दोष दिसत नाहीं. कांहीं भार धारण करण्याचा मनुष्य निश्चय करितो, तेव्हां दैवच त्याला साहाय्य होत असतें. उद्योगाचा आश्रय करून मोठा भार धारण करण्याचें मीं योजिलें आहे आणि पांडव, कृष्ण व सात्यकि यांचा रणांत वध केल्याचें समजूनच मी ही गर्जना करीत आहें ! तर हे विप्रा, यांत तुझें काय जातें, सांग पाहूं ! शूर शरत्कालांतील मेघांप्रमाणें कधींहि वृथा गर्जना करीत नसतात व पंडितहि आपली शक्ति ओळखूनच गर्जना करीत असतात. हे गौतमा, आज रणांत एकत्र सज्ज झालेल्या कृष्णार्जुनांस जिंकण्याची माझ्या मनांत मोठी हौस आहे; म्हणून मी गर्जना करीत आहें आणि या माझ्या गर्जनेचें फळ काय आहे, तेंहि पहा ! युद्धांत पांडव, कृष्ण व सात्यकि यांचा वध करून ही निष्कंटक पृथ्वी मी दुर्योधनास देणार आहें !"

कृप—तुझे हे मनोरथ मला आनंद देत नाहींत. तूं कृष्णार्जुनांची आणि पांडुपुत्र धर्मराजाची सर्वदा निंदा करीत असतोस ! परंतु कर्णा, जिकडे तें

युद्धविशारद असतील, तिकडेच सर्वदा जय निश्चयानें असतो. कारण, देव, गंधर्व, यक्ष, मनुष्य, सर्प, राक्षस हे सर्व जरी सज्ज होऊन आले, तरी युद्धांत कृष्णार्जुन हे अजिंक्यच आहेत! हा धर्मपुत्र युधिष्ठिर ब्राह्मणांचे ठिकाणीं आदरबुद्धि ठेवणारा, सत्यवक्ता, मनोनिग्रही, गुरु आणि दैवत यांचें पूजन करणारा, सदोदित धर्मरत, विशेषेंकरून अस्त्रनिपुण, धैर्यवान् आणि कृतज्ञ आहे. याचे बंधुहि बलिष्ठ आणि त्याच्याचसारखे सर्व गुणांनीं संपन्न आहेत. त्यांचे संबंधीहि इंद्राप्रमाणें पराक्रमी, पांडवांवर अनुरक्त आणि मोठे रणशूर आहेत. धृष्टद्युम्न, शिखंडी, दौर्मुखी, जनमेजय, चंद्रसेन इत्यादि वीर, द्रुपदाचे पुत्र आणि मोठा अस्त्रवेत्ता स्वतः द्रुपदराजा आणि विराटराजा, तसेच नकुल-सहदेव आणि घटोत्कचादि योद्धे हे ज्यांच्याकरितां लढत आहेत, त्या पांडवांचा नाश कधींहि होणार नाहीं! हे आणि दुसरेहि अनेक वीरांचे संघ त्या पांडुपुत्र युधिष्ठिराकडे आहेत. यांपैकीं दोघे भीमार्जुनच देव, दानव, मानव, यक्ष, राक्षस, भूतें, सर्प व भुजंग यांसह सर्व जगताचा निःपात आपल्या अस्त्रवीर्यानें करण्यास समर्थ आहेत! एकटा युधिष्ठिर आपल्या घोर दृष्टीनें सर्व पृथ्वी जाळून टाकील! कर्णा, अमितसामर्थ्यवान् श्रीकृष्ण ज्यांच्याकरितां सज्ज होऊन राहिला आहे, त्यांना युद्धांत जिंकण्याकरितां तूं धजतोस तरी कसा? हे सूतपुत्रा, तूं कृष्णाशीं रणसंग्राम करण्याची मोठी हौस धरून राहिला आहेस, हें तुझें नित्याचेंच मोठें अनीतिकारक वर्तन होय!

संजय—हे भरतर्षभा, हें कृपाचें भाषण ऐकून कर्ण हंसतहंसत त्यास म्हणाला "हे ब्रह्मन्, तूं पांडवांविषयीं जें बोललास, तें सत्य आहे. पांडवांमध्यें आणखीहि पुष्कळ गुण आहेत. पांडव हे रणांत इंद्रासह देवांना, आणि दैत्य-यक्ष-गंधर्वांसह पिशाच्च, उरग आणि राक्षस यांनाहि अजय्य आहेत; परंतु इंद्रानें दिलेल्या शक्तीनें मी पांडवांना जिंकीन. विप्रा, इंद्रानें मला अमोघ शक्ति दिली आहे; तिच्या योगानें मी सव्यसाची अर्जुनाचा रणांत वध करीन आणि तो पांडुपुत्र अर्जुन रणांत हत झाला असतां त्याचे ते सख्खे बंधु अर्जुनावांचून पृथ्वीचा उपभोग घेण्यास मुळींच समर्थ होणार नाहींत! गौतमा, याप्रमाणें सर्व पांडव नाश पावले असतां ही समुद्रवलयांकित पृथ्वी आपोआप कौरवेंद्र दुर्योधनाला वश होईल. या जगांत सर्व कामें मोठ्या दूरदर्शीपणानें केलीं असतां साधतात, यांत संशय नाहीं. हें जाणूनच मी गर्जना करीत आहें. तूं ब्राह्मण असून वृद्ध आहेस; त्यामुळें युद्ध करण्यास

केवळ असमर्थ आहेस. पांडवांशीं तुझा स्नेह असल्यामुळें मोहानें तूं माझा असा अपमान करीत आहेस ! हे ब्राह्मणा, येथें पुनः जर अशा प्रकारचें अप्रिय भाषण केलेंस, तर हे दुर्मते, माझें खड्ग उगारून मी तुझी जिह्वाच छाटून टाकीन ! कौरवांच्या सर्व सैन्यास भिवविण्याकरितां तूं रणांत पांडवांची स्तुति करण्याची इच्छा करतोस काय ? हे द्विजा, त्यासंबंधींहि माझें यथार्थ भाषण ऐक. दुर्योधन, द्रोण, शकुनि, दुर्मुख, जय, दुःशासन, वृषसेन, मद्रपति शल्य, तूं, सोमदत्त, भूरि, तसाच अश्वत्थामा आणि विविंशति हे सर्व युद्धविशारद वीर सज्ज होऊन ज्याच्या बाजूनें लढण्यास उभे आहेत, त्यास इंद्रासमान बलाढ्यहि कोणता शत्रु जिंकणार ? हे सर्व शूर, अस्त्रनिपुण, बलिष्ठ, स्वर्गाची इच्छा करणारे, धर्मज्ञ आणि युद्धकुशल आहेत. हे लढाईंत देवांनाहि मारतील. पांडवांचा वध व दुर्योधनाचा जय इच्छिणारे हे सर्व सज्ज होऊन युद्धांत उभे राहतील. अत्यंत बलवानांनाहि जय मिळणें, ही गोष्ट दैवाधीन आहे, असें मी समजतों. कारण महाबाहु भीष्म हा शेंकडो शरांनीं विह्वल होऊन पडला आहे ! विकर्ण, चित्रसेन, बाह्लीक, जयद्रथ, भूरिश्रवा, जय, जलसंध, सुदक्षिण, रथिश्रेष्ठ शल आणि वीर्यवान् भगदत्त हे व देवांनाहि अजिंक्य असलेले दुसरे शूर व बलवत्तर राजे समरांत पांडवांकडून मारले गेले ! हे नराधमा, ही गोष्ट दैवाशिवाय दुसऱ्या कशानें झाली आहे, असें समजतोस ? हे द्विजा, तूं ज्या दुर्योधनाच्या शत्रूंची वारंवार स्तुति करतोस, त्यांचेहि शेंकडो हजारों वीर पडले आहेत. कौरवांचीं सर्व सैन्यें पांडवांबरोबरच क्षय पावत आहेत, यांत पांडवांचा कांहीं प्रभाव आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं. हे द्विजाधमा, तूं त्यांना सर्वदा बलवान् समजतोस, म्हणूनच मी यथाशक्ति त्यांच्याबरोबर दुर्योधनाच्या हितास्तव लढण्याची इच्छा करीत आहें. जय होणें, न होणें हें दैवाधीन आहे !" ७. ६. १५८.

---

## अध्याय १५९ वा.

[ १ अश्वत्थाम्याकडून कर्णाचा अधिक्षेप. २ कर्णपराक्रम. ३ कर्णपराजय. ४ दुर्योधनाचा संताप. ५ युद्धांत पांडवांचा निग्रह करण्याविषयीं दुर्योधनाची अश्वत्थाम्यास विनवणी. ]

( १ ) **संजय**—याप्रमाणें तो सूतपुत्र आपल्या मातुलास दुर्भाषण करून बोलला, असें पाहून अश्वत्थामा तत्काल आपलें खड्ग उगारून मदोन्मत्त

गजावर उडी घालणाऱ्या सिंहाप्रमाणें क्रोधाविष्ट होऊन कुरुराजाच्या समक्ष त्यावर चालून गेला.

अश्वत्थामा—नराधमा, माझा मामा अर्जुनाच्या सत्य गुणांची स्तुति करीत असतां तूं द्वेषामुळें त्याची निर्भर्त्सना करतोस काय ? तुला मोठा गर्व झाला आहे आणि त्यामुळें तूं कोणाहि धनुर्धराची पर्वा ठेवीत नाहींस आणि आपल्याच शौर्याचा मोठेपणा मिरवीत असतोस ! तुला समरांत जिंकून तुझ्या देखत जयद्रथाचा गांडीवधारी अर्जुनानें वध केला, तेव्हां तुझें तें वीर्य आणि तीं अस्त्रें कोठें गेलीं होतीं ? ज्यानें पूर्वीं साक्षात् शंकराशीं युद्ध केलें, त्याच्या-बरोबर हे सूताधमा, केवळ मनोरथ करून युद्ध करण्याची व्यर्थ इच्छा करीत आहेस ! सर्व शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ कृष्ण अर्जुनाचा पाठीराखा असतां, इंद्रासहित एकत्र झालेले सर्व सुर व असुर ज्याला जिंकण्यास समर्थ नाहींत, त्या कधींहि पराभव न पावलेल्या लोकैकवीराला या राजांच्या साहाय्यानें हे दुर्बुद्धे, तूं कसा जिंकूं शकणार ? नराधमा, अरे जरा थांब ! दुर्मते, तुझें मस्तक धडापासून वेगळें करतों पहा !

संजय—वेगानें कर्णावर क्रुद्ध झालेल्या त्या अश्वत्थाम्यास स्वतः दुर्योधन राजानें आणि नरश्रेष्ठ कृपाचार्यांनें आंवरून धरिलें.

कर्ण—हा दुर्मति ब्राह्मणाधम मोठा शूर दिसत आहे खरा ! याला युद्धाची मोठी प्रौढी वाटत आहे. हे कुरुसत्तमा, माझा पराक्रम याला एकदां पाहूं दे ! सोड आतां याला !

अश्वत्थामा—दुर्मते सूतपुत्रा, तुझ्या या अपराधाची आम्ही क्षमा करितों. तुझा हा शिखरास गेलेला गर्व एकटा अर्जुनच नाहींसा करील !

दुर्योधन—अश्वत्थामन्, शांत हो. हे मानदा, क्षमा कर. कांहीं झालें तरी या कर्णावर क्रोध करणें तुला योग्य नाहीं. तूं, कर्ण, कृप, द्रोण, मद्रराज व शकुनि यांवर मोठा कार्यभार येऊन पडला आहे. तर हे द्विजसत्तमा, शांत हो ! हे सर्व पांडव कर्णाबरोबर युद्ध करण्याची इच्छा धरून चारी बाजूंनीं इकडेच येत आहेत !

संजय—दुर्योधनानें समाधान केलें असतां तो महाशय अश्वत्थामा अत्यंत क्षुब्ध झाला होता, तरी शांत झाला; तसाच तो उदार अंतःकरणाचा कृपा-चार्यहि आपल्या सौम्य स्वभावामुळें लवकरच शांत झाला.

कृप—दुर्मते सूतपुत्रा, तुझ्या अपराधाची आम्ही क्षमा करितों. तुझा हा मर्यादेच्या पलीकडे गेलेला दर्प एक अर्जुनच नाहींसा करील !

( २ ) संजय—मग ते पांडव आणि यशस्वी पांचाल एकत्र होऊन चोहों बाजूंनीं सिंहनाद करीत कर्णावर धांवून आले आणि देवगणांनीं वेष्टित इंद्राप्रमाणें कौरववीरांनीं वेष्टिलेला महारथी, वीर्यवान् व तेजस्वी कर्णहि आपल्या बाहुबलाचा आश्रय करून व धनुष्य घेऊन समरास उभा राहिला. नंतर कर्ण व पांडव यांचें युद्ध सुरू झालें. हे महाराजा, त्या भयंकर युद्धास सिंहनादानें अद्भुत शोभा आली होती. नंतर हे राजा, ते पांडव आणि यशस्वी पांचाल यांनीं महाबाहु कर्णाला पाहून मोठी आरोळी ठोकली आणि म्हणाले "हा कर्ण, कोठें कर्ण ! कर्णा, या महारणांत उभा रहा ! हे दुरात्मन् पुरुषाधमा, कर आतां आमच्याबरोबर युद्ध !' दुसऱ्या कित्येकांनीं कर्णास पाहतांच क्रोधानें नेत्र लाल करून म्हटलें "ह्या अल्पबुद्धि, गर्विष्ठ सूतपुत्राचा सर्व राजश्रेष्ठांनीं वधच केला पाहिजे. याला जीवंत ठेवणें योग्य नाहीं. हा पापपुरुष पांडवांचा नित्याचा मोठा वैरी असून दुर्योधनाच्या मतानें वागणारा आहे. सर्व अनर्थांचें कारण हाच आहे. मारा याला !" असें ओरडत धर्मराजानें सूतपुत्राच्या वधाकरितां नेमलेले ते क्षत्रिय महारथी शरांची वृष्टि करीत त्यावर धांवले. ते आपल्यावर धांवून येत असलेले सर्व महारथी पाहून तो कर्ण यत्किंचितहि भ्याला नाहीं, किंवा त्रासलाहि नाहीं. हे भरतर्षभा, तो सैन्यसागर संहारकालच्या सागराप्रमाणें उसळलेला पाहून तुझ्या पुत्रांस संतोषविणाऱ्या, रणांत अपराजित, बलवान् व कुशाग्रबुद्धि कर्णानें शरांचा वर्षाव करून त्या सैन्यास चारी बाजूंनीं प्रतिबंध केला. मग ते राजेहि शरवृष्टि करून त्याचें निवारण करूं लागले. इंद्राशीं ज्याप्रमाणें दैत्यगण युद्ध करितात, त्याप्रमाणें ते अनेक राजे कर्णाबरोबर लढले. हे प्रभो, त्या राजांच्या बाणांचें निवारण कर्णानें मोठी शरवृष्टि करून केलें. देवदानवांच्या युद्धांत ज्याप्रमाणें इंद्राचें दानवांशीं युद्ध झालें, त्याप्रमाणें पांडव व कौरव वीरांचें तें युद्ध झालें. त्या युद्धांत कर्णाचें अद्भुत कौशल्य आम्हांला दिसून आलें. सर्व बाजूंनीं दक्ष शत्रु त्याला धरण्यास सज्ज असतांहि तो रणांत कोणालाहि सांपडला नाहीं. त्या महारथी कर्णानें राजांचे ते बाणसमूह निवारण केले आणि त्यानें जोकडें, दांडे, छत्रें, ध्वज आणि अश्व यांवर आपल्या नांवानें अंकित असलेले बाण टाकले. नंतर ते राजे त्याच्या बाणांनीं पीडित होऊन थंडीनें कुडकुडणाऱ्या गाईप्रमाणें

इकडेतिकडे भटकूं लागले. कर्णानें मारलेले अश्व, गज व रथी जागजागीं मरून पडल्याचें आम्हीं पाहिलें. राजा, युद्धांतून परत न फिरणाऱ्या वीरांचीं पडलेलीं मस्तकें व बाहु यांनीं सर्व रणभूमि व्यापिली होती! मृत झालेले, मरणारे व सर्वत्र हळहळणारे वीर यांनीं सर्व समरांगण यमनगरीप्रमाणें अति-भयंकर झालें होतें!

कर्णाचा तो पराक्रम पाहून दुर्योधन राजानें अश्वत्थाम्यासमीप जाऊन म्हटलें, "हा कर्ण रणांत सर्व सज्ज असलेल्या राजांशीं युद्ध करीत आहे! कार्तिकेयानें विध्वस्त केलेल्या राक्षससेनेप्रमाणें कर्णाच्या बाणांनीं व्याकुल झालेली ही सेना पळत आहे पहा! बुद्धिमान् कर्णानें या सेनेला समरांत जिंकल्याचें पाहून तो अर्जुन कर्णाचा वध करण्याच्या इच्छेनें त्यावर धांवून येत आहे! तर ज्या योगानें तुमच्या देखत अर्जुन या महारथी कर्णाला समरां-गणांत मारणार नाहीं, अशी कांहींतरी युक्ति योजिली पाहिजे!"

तेव्हां दैत्यसेनेवर येणाऱ्या इंद्राप्रमाणें अर्जुन कर्णावर धांवून येत आहे, असें पाहून त्याचें रक्षण करण्याच्या इच्छेनें अश्वत्थामा, कृप, शल्य आणि महारथी कृतवर्मा हे पार्थावर चालून गेले. तेव्हां पांचालांनीं परिवेष्टित अर्जुनहि वृत्रासुरावर चालून येणाऱ्या इंद्राप्रमाणें कर्णावर धांवून आला!

**धृतराष्ट्र**—प्रलयकालच्या यमासारखा क्षुब्ध झालेला अर्जुन येत आहे, असें पाहून वैकर्तन कर्णानें पुढें काय केलें? जो अर्जुनाशीं नित्य स्पर्धा करीत असे आणि त्या दारुण योद्ध्याला युद्धांत जिंकण्याची ज्याला इच्छा होती, त्या कर्णानें आपला वैरी युद्धांत सहज प्राप्त झाला असतां पुढें काय केलें?

(३) **संजय**—एका गजावर जसा दुसरा गज चालून येतो, त्याप्रमाणें तो पांडुपुत्र आपल्यावर येत आहे, असें पाहून कर्ण मुळींच न डगमगतां रणांत त्यावर धांवून गेला. कर्ण वेगानें येत असतां पार्थानें बाणांची वृष्टि करून त्यास आच्छादून टाकलें. कर्णानेंहि तशीच शरवृष्टि करून त्यास झांकिलें. तेव्हां त्या शत्रुतापन अर्जुनानें कर्णावर देदीप्यमान अग्रांच्या तीनशें बाणांची वृष्टि केली आणि एक नाराच बाण टाकून त्याच्या डाव्या हाताच्या मनगटावर मोठा प्रहार केला. त्यामुळें त्याच्या हस्तांतून धनुष्य गळून पडलें; परंतु निमि-षार्धांत त्यानें तें धनुष्य उचलून रणांत कसलेल्या वीराप्रमाणें अर्जुनास आपल्या शरसमूहानें झांकून टाकिलें. अर्जुनानें ती कर्णाची शरवृष्टि आपल्या

बाणांनीं हंसतच उधळून लाविली. त्यावेळीं करिणीसाठीं क्रुद्ध झालेल्या वन्य गजांचे युद्धाप्रमाणें कर्ण व अर्जुन यांमध्यें अत्यद्भुत व भयंकर युद्ध झालें! मग महाधनुर्धर अर्जुनानें कर्णाचा पराक्रम पाहून त्याचें धनुष्य त्वरेनें मुष्टि-प्रदेशींच तोडून टाकलें आणि अर्धचंद्राकृति बाणांनीं त्याचे चार अश्व मारले व कर्णाच्या सारथ्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें. नंतर ज्याचा सारथि व अश्व मारले आहेत आणि ज्याचें धनुष्य छिन्न केलें आहे, अशा त्या कर्णावर पांडुनंदन अर्जुनानें चार बाण टाकून त्याला विद्ध केलें. तेव्हां तो अर्जुनाच्या बाणांनीं पीडित कर्ण त्या रथांतून खालीं उडी टाकून कृपाचार्यांच्या रथावर चढून बसला. अशाप्रकारें साळू पक्ष्यासारखा अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध झालेला कर्ण जीविताच्या रक्षणाकरितां कृपाच्या रथांत जाऊन बसला!

( ४ ) हे भरतर्षभा, कर्णाचा पराजय झालेला पाहून, अर्जुनाच्या बाणांनीं व्याकुळ झालेले तुझे योद्धे दाही दिशांना पळूं लागले. हे नृपा, ते पळतांना पाहून दुर्योधन राजानें त्यांना मागें परतवून म्हटलें "शूरहो, तुमचें पळणें आतां पुरे! श्रेष्ठ क्षत्रियहो, उभे रहा! हा मी अर्जुनाच्या वधाकरितां स्वतः रणांत जात आहें! पांचाल व सोमक यांसुद्धां सर्व पांडवांचा मी वध करीन! मी आज युद्ध करीत असतां युगांतींच्या कालाप्रमाणें माझा पराक्रम पांडवांच्या दृष्टीस पडेल! मी धनुष्य हातांत घेऊन बाणांची वृष्टि करीत असतां ग्रीष्म-र्तूच्या अखेरीला होणाऱ्या मेघवृष्टीप्रमाणें माझी शरवृष्टि समरांत सैनिक पाह-तील! नतपर्व बाणांनीं मी आज रणांत अर्जुनाला जिंकीन. शूरहो, उभे रहा! अर्जुनाची भीति सोडा! ज्याप्रमाणें मकरालय समुद्र नियत मर्यादेला पोंचला असतां तिचें उल्लंघन करीत नाहीं, त्याप्रमाणें आज माझा पराक्रम पाहून अर्जुनहि त्याचें आक्रमण करूं शकणार नाहीं!"

असें म्हणून दुर्योधन मोठ्या सैन्यानिशीं अर्जुनाकडे निघून गेला. त्यावेळीं त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. तो महाबाहु दुर्योधन निघालेला पाहून शूर शारद्वत कृपाचार्य अश्वत्थाम्याला म्हणाला "हा महाबाहु व असहिष्णु राजा क्रुद्ध झाला आहे. हा पतंगवृत्ति धारण करून अर्जुनाशीं लढण्याची इच्छा करीत आहे. म्हणून जोंपर्यंत अर्जुनाला गांठून आमच्या देखत हा प्राण सोडणार नाहीं, तोंपर्यंत या कुरुनाथाचें रक्षण कर! हा कौरवराज अर्जुनाच्या बाणांच्या तडाक्यांत सांपडला नाहीं, तोंपर्यंत याला आंवर! सर्पांसमान भयंकर पार्थाच्या बाणांच्या तावडींत सांपडून ह्याचें भस्म झालें नाहीं, तोंवर

याला युद्धापासून पराङ्मुख कर! हे मानदा, आम्ही सर्व युद्धास तयार असतां कोणाचेंहि साहाय्य न घेतां हा राजा एकटाच अर्जुनाबरोबर युद्धार्थ जात आहे, हें मला अनुचित दिसतें. शार्दूलाच्या हातून गजाची मुक्तता ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याप्रमाणें अर्जुनाशीं लढत असतां त्याच्या हातून कुरुपतीची जीवंत सुटका दुर्लभ आहे, असें मला वाटतें!''

मातुलानें याप्रमाणें सांगितलें असतां शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ अश्वत्थाम्यानें दुर्योधनाला म्हटलें "गांधारे, मी जीवंत असतां युद्धाला जाणें तुला योग्य नाहीं. हे कौरवा, सदोदित तुझ्या हिताकरितां प्रयत्न करणाऱ्या माझा अनादर करून युद्धाला जाणें बरें नव्हे. पार्थाच्या विजयाविषयीं तूं कांहीं चिंता करूं नकोस! हे सुयोधना, उभा रहा! मी अर्जुनाचें निवारण करितों!''

(५) दुर्योधन—आचार्य पांडुपुत्रांचें पुत्रांप्रमाणें रक्षण करित असतो आणि द्विजोत्तमा, तूंहि त्यांची नित्य उपेक्षाच करीत असतोस! आतां हें माझ्या दुर्भाग्यामुळें होत आहे किंवा तुझा पराक्रम मंद आहे अथवा धर्मराजाचें किंवा द्रौपदीचें प्रिय करण्यासाठीं आहे, हें मला समजत नाहीं. ज्याच्याकरितां सुखार्ह व अपराजित असलेले सर्व माझे बांधव परम दुःखांत पडले आहेत, त्या मज लोभ्याला धिक्कार असो! शस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आणि महेश्वरासारखा पराक्रमी पुरुष गौतमीपुत्राखेरीज दुसरा कोण आहे कीं जो अंगांत सामर्थ्य असतांहि शत्रूंचा वध करणार नाहीं! हे गौतमीसुता, प्रसन्न हो आणि या माझ्या शत्रूंचा संहार कर! तुझ्या अस्त्रांपुढें उभें राहण्यास देव किंवा दानवहि समर्थ होणार नाहींत! द्रौणे, या पांचालांना व सोमकांना त्यांच्या सेवकांसह मारून टाक! आम्ही तुझ्या आश्रयानें बाकीच्यांचा वध करतों! हे सोमक व यशस्वी पांचाल दावानलाप्रमाणें माझ्या सैन्यांत फिरत आहेत. हे नरोत्तमा, अर्जुन ज्यांचें रक्षण करीत आहे, अशा पांचालांनीं माझ्या सैन्याचा भंग करण्यापूर्वींच त्यांचें व केकयांचें निवारण कर. हे अरिंदमा, त्वरा करून जा! हे मारिषा, आरंभीं किंवा नंतर तुला हें केलेंच पाहिजे. हे महाबाहो, तूं या पांचालांच्या नाशासाठींच उत्पन्न झाला आहेस! आणि तूं मनांत आणशील, तर हें सर्व जग पांचालरहित करून टाकशील! अरे ही सिद्धांची वाणी आहे आणि ते बोलले, तसेंच होणार आहे. यासाठीं हे पुरुषश्रेष्ठा, तूं पांचालांचा आणि त्यांच्या सेवकांचा वध कर! तुझ्या अस्त्रांसमोर उभें राहण्यास इंद्रासह देवहि समर्थ होणार नाहींत, मग पांचालांसह पांडवांची

योग्यता ती काय ? हें मी सत्य सांगत आहें. सोमकांसह पांडव तुझ्या समोर संग्रामांत टिकणार नाहींत, हें माझें बोलणें सत्य समज. हे महाबाहो, जा ! आजची वेळ निघून जातां उपयोगी नाहीं. कारण पार्थाच्या बाणांनीं पीडित झालेली ही माझी सेना पळून जात आहे पहा ! हे महाबाहो, तूं आपल्या दिव्य तेजाच्या योगानें पांडव व पांचाल यांचा निग्रह करण्यास समर्थ आहेस !" ७. ६. १५९.

---

## अध्याय १६० वा.

[ १ अश्वत्थाम्याचा पराक्रम. ]

( १ ) संजय—याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण ऐकतांच दैत्यवधाविषयीं प्रयत्न करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या युद्धदुर्मद अश्वत्थाम्यानें शत्रूचा वध करण्याचा यत्न केला आणि तो महाबाहु तुझ्या पुत्राला म्हणाला " हे महाबाहो, तूं बोलतोस, तें सत्य आहे. मला आणि माझ्या पित्याला पांडव हे प्रिय आहेत, त्याप्रमाणें आम्हीहि त्यांना प्रिय आहों. परंतु हे कुरूद्वहा, तो संबंध युद्धांत मात्र नाहीं ! बाबारे, आम्ही प्राणांचीहि क्षिति न बाळगतां निर्भयपणें आमच्या सामर्थ्यानुसार युद्ध करीत आहों. हे नृपोत्तमा, मी, कर्ण, शल्य, कृप आणि कृतवर्मा हे मिळून पांडवांच्या सेनेचा निमेषांत नाश करून टाकूं ! आणि हे कुरुश्रेष्ठा, आम्ही रणांत नसल्यास ते पांडवहि कुरुसेना निमेषार्धांत नष्ट करून टाकतील. हे भारता, आम्ही पांडवांशीं किंवा पांडव आमच्यांशीं युद्ध करूं लागले असतां एकमेकांचें तेज एकत्र मिळून शांत होत असतें. तेव्हां पांडव जीवंत असतां त्यांची सेना जिंकणें म्हणजे अशक्यच गोष्ट होय, हें मी तुला सत्य सांगतों. हे भारता, पांडव स्वतःकरितां लढणारे आहेत. ते समर्थ असतांनाहि तुझ्या सेनेचा नाश कां करीत नाहींत बरें ? हे कौरवा, तूं अत्यंत लुब्ध व कपटपटु आहेस. तूं सर्वांविषयीं शंका घेणारा आहेस, तसा मानीहि आहेस. म्हणून आम्हांविषयीं व इतरांविषयींहि तुझें मन साशंक आहे, असें मला वाटतें. हे कुरुनंदना, तुझ्याकरितां मी प्राणांवरहि उदार होऊन व यत्नाचा आश्रय करून हा युद्धाला चाललों पहा ! मी शत्रूंबरोबर लढून मोठमोठ्यांनाहि जिंकीन ! हे अरिंदमा, मी पांचाल, सोमक, केकय आणि पांडवेय यांबरोबर युद्ध करीन. माझ्या बाणांनीं दग्ध झालेले पांचाल आणि सोमक सिंहपीडित बैलांप्रमाणें चारी

बाजूंना आज पळून जातील! माझा पराक्रम पाहून आज धर्मसुत युधिष्ठिराला आणि सोमकांना सर्व जग अश्वत्थाममयच दिसेल! पांचाल व सोमक यांना रणांत हतप्राण केलेले पाहून धर्मराजाला परम दुःख होईल. हे भारता, जे जे मजबरोबर युद्ध करण्यास येतील, त्यांचा मी वध करीन. हे वीरा, माझ्या बाहूंच्या तडाक्यांत जे कोणी येतील, ते कधींहि जिवंत सुटणार नाहींत."

हे धृतराष्ट्रा, तुझ्या पुत्रास असें बोलून कौरवांच्या कल्याणाची इच्छा करणारा व सर्व धनुर्धरांना त्रस्त करणारा तो पुरुषश्रेष्ठ अश्वत्थामा युद्धाला निघाला. तो कैकयांना व पांचालांना म्हणाला "हे महारथहो, आतां तुम्ही सर्व माझ्या शरीरावर प्रहार करा! स्थिर राहून युद्ध करा आणि आपलें अस्त्रकौशल्य दाखवा!"

हे महाराजा, असें अश्वत्थाम्यानें सांगतांच जलधर मेघाप्रमाणें त्या सर्वांनीं अश्वत्थाम्यावर शरवृष्टि केली. परंतु हे प्रभो, द्रोणपुत्रानें त्या बाणांचा नाश करून पांडुपुत्र व धृष्टद्युम्न यांच्या देखत दहा वीरांचा वध केला! तेव्हां त्या द्रौणीच्या मारानें भयभीत झालेले पांचाल व सोमक हे त्यास रणांत सोडून दाही दिशांस पळूं लागले! हे महाराजा, सोमकांसह पांचालांना पळून जातांना पाहून रणांत धृष्टद्युम्न अश्वत्थाम्यावर धांवून गेला. त्याबरोबर रणांत कधींहि परावृत्त न होणाऱ्या शूरांचे शंभर रथ होते. त्यांचा नाद सजल मेघांप्रमाणें होत होता व ते सुवर्णभूषणांनीं चित्रविचित्र दिसत होते. मग तो पांचाल राजपुत्र महारथी धृष्टद्युम्न आपले योद्धे मारलेले पाहून द्रौणीला म्हणाला "हे दुर्बुद्धे आचार्यपुत्रा, इतर वीरांचा वध केलास, यांत काय महत्त्व आहे? जर तूं खरा शूर असशील, तर माझ्याबरोबर युद्ध कर. आतां माझ्या समोर उभा रहा, म्हणजे मी तुझा वध करतों!" असें बोलून त्या प्रतापी धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्यावर मर्मभेदक तीक्ष्ण बाण टाकून त्याला विद्ध केलें. तेव्हां सर्पाच्या शेपटीवर पाय पडला असतां जसा तो क्रुद्ध होतो, तसा तो मानी अश्वत्थामा किमपिहि न गडबडतां हातांत धनुष्य घेऊन म्हणाला 'हे धृष्टद्युम्ना, स्थिर होऊन उभा रहा! म्हणजे तेवढ्या वेळांत मी तुला यमलोकीं पाठवितों!'

याप्रमाणें शत्रुवीरांचा नाश करणाऱ्या त्या द्रौणीनें पार्षतास सांगून आपल्या हस्तलाघवानें त्यावर शरसंधान करून चारी बाजूंनीं त्याला आच्छादिलें.

अशाप्रकारें रणांत पीडा होत असतां तो युद्धदुर्मद पांचालपुत्र धृष्टद्युम्न द्रौणीला टोंचून बोलला "माझी प्रतिज्ञा काय व माझी उत्पत्ति कशाकरितां आहे, हें तूं जाणत नाहींस! हे सुदुर्बुद्धे, द्रोणाचा वध केल्यावर तुझाहि मी वध करणार आहें. म्हणून आज द्रोण जीवंत असतां मी तुला रणांत मारीत नाहीं. आज रात्र होण्यापूर्वीच तुझ्या पित्याला मारून, नंतर तुझाहि वध करावा, असें माझ्या मनांत आहे. पांडवांविषयीं जो द्वेष व कौरवांविषयीं जी भक्ति तुझ्या मनांत आहे, ती आज माझ्या समोर स्थिर राहून मला दाखीव! तूं माझ्या हातून आज जीवंत सुटणार नाहींस! कारण, जो ब्राह्मण ब्राह्मण्य टाकून क्षात्रधर्माच्या ठिकाणीं रत झाला, तो हे पुरुषाधमा, तुझ्यासारखा जगांतील सर्व लोकांना सर्वदा वध्यच होय!"

पार्षत धृष्टद्युम्नाचें असें कठोर भाषण ऐकून तो द्विजश्रेष्ठ अश्वत्थामा अत्यंत क्रुद्ध झाला आणि 'अरे उभा रहा, उभा रहा' असें त्याला बोलला. त्यानें धृष्टद्युम्नाकडे पाहिलें, तेव्हां तो आपल्या नेत्रांनीं त्यास जाळीतच आहे कीं काय, असा भास झाला. सर्पाप्रमाणें निश्वास टाकीत आपल्या बाणांनीं त्यानें धृष्टद्युम्नास आच्छादून टाकिलें. हे राजश्रेष्ठा, पांचाल सेनांनीं परिवेष्टिलेला तो अतिबलवान् महारथी आपल्याच वीर्याचा आश्रय करून यत्किंचितहि भ्याला नाहीं. त्यानें अश्वत्थाम्यावर अनेक बाण टाकले. नंतर बाणांचा पण लावून जणुंकाय द्यूतच खेळत आहेत, असें युद्ध त्यांनीं आरंभिलें. अतिसंतापानें ते महाधनुर्धर परस्परांवर बाण टाकून एकमेकांस पीडा करूं लागले. त्यांची शरवृष्टि चोहों बाजूंनीं होऊं लागली. अश्वत्थामा आणि धृष्टद्युम्न यांचें तें अत्यंत घोर व भयानक युद्ध पाहून सिद्ध, चारण आणि वादिक यांनीं त्यांची प्रशंसा केली! त्यांनीं आपल्या बाणसमूहांनीं आकाश व दशदिशाहि व्यापून टाकिल्या. आपल्या शरांनीं त्यांनीं घनदाट अंधार उत्पन्न केला आणि अदृश्य होऊन ते युद्ध करूं लागले. परस्परांच्या वधाकरितां सज्ज झालेले आणि प्राणिमात्रास भयप्रद वाटणारे ते आपलीं धनुष्यें आकाशांत मंडलाकार फिरवीत रणांत जणुंकाय नाचतच होते. त्या महाबाहूंची ती चमत्कारिक व लाघवपूर्वक युद्धाची पद्धत पाहून हजारों मोठमोठ्या योद्धयांनीं त्यांची स्तुति केली. वनांत जागृत झालेल्या वन्य गजांप्रमाणें रणक्षुब्ध झालेल्या त्या दोघांस पाहून दोन्ही सैन्यांत आनंदीआनंद होऊन सिंहनाद होऊं लागले आणि सैनिकांनीं शंख वाजविले. जिकडे-तिकडे हजारों वाद्यें वाजूं लागलीं. अशा-

प्रकारें भीरूंची भीति वाढविणारें तें युद्ध दोन घटकांपर्यंत बरोबरीनें चाललें. मग हे महाराजा, त्या द्रोणपुत्रानें महात्म्या धृष्टद्युम्नाचा ध्वज, धनुष्य, छत्र, हीं तोडलीं आणि दोन पार्ष्णिसारथि, सारथि आणि चार घोडे यांना मारून तो रणांत धांवून गेला. तेथें आपल्या सन्नतपर्व बाणांनीं त्या महानुभाव द्रौणीनें हजारों पांचालांना पळवून लावलें. नंतर हे भरतर्षभा, रणांत इंद्राप्रमाणें त्या अश्वत्थाम्याचा पराक्रम पाहून ती पांडवी सेना अगदीं व्याकुळ होऊन गेली. महारथी अश्वत्थाम्यानें शंभर बाणांनीं शंभर पांचाल वीरांना मारून मग धृष्टद्युम्न व अर्जुन यांचे देखत तीन तीक्ष्ण बाणांनीं तीन महारथ्यांचा वध केला! अत्यंत व्यवस्थित रीतीनें राहिलेल्या पांचालांचा त्यानें नाश केला. नंतर ते रणग्रस्त झालेले पांचाल व सृंजय आपले रथ व अश्व यांचा नाश झालेला पाहून अश्वत्थाम्यासमोरून पळून गेले!

याप्रमाणें त्या महारथी द्रोणपुत्रानें समरांत शत्रूंना जिंकिलें आणि ग्रीष्मकालाच्या अखेरीला होणाऱ्या मेघगर्जनेप्रमाणें महानाद त्यानें केला! युगांतीं सर्वभूतांचें भस्म करून अग्नि जसा शोभतो, त्याप्रमाणें अनेक शूरांचा रणांत घात करून तो अश्वत्थामा अधिकच तेजस्वी दिसूं लागला! कौरव ज्याची स्तुति करीत आहेत व ज्यानें समरांत हजारों शत्रूंचा वध केला आहे, असा तो प्रतापी अश्वत्थामा, शत्रुगणांचा संहार करून शोभायमान झालेल्या देवेंद्राप्रमाणें शोभूं लागला! ७. ६. १६०.

---

## अध्याय १६१ वा.

### [ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराजा, मग युधिष्ठिर व भीमसेन यांनीं अश्वत्थाम्याला चारी बाजूंनीं घेरलें आणि दुर्योधनहि भारद्वाजासह रणांत पांडवांवर चालून गेला. तेव्हां त्या दोन सैन्यांमध्यें भीरूंचें भय वाढविणारें घनघोर युद्ध झालें. हे महाराजा, अंबष्ट, मालव, वंग, शिबि आणि त्रैगर्त यांच्या तुकड्या वृकोदरानें यमलोकीं पाठविल्या आणि अभीषाह व शूरसेन या देशांतील रणोन्मत्त क्षत्रियांना कापून काढून पृथ्वीवर रक्ताचा चिखलच करून टाकला! राजा, किरीटी अर्जुनानें यौधेय, अद्रिज, मद्रक आणि मालव यांना आपल्या तीक्ष्ण बाणांनीं मृत्युलोकीं पाठविलें. सरळ गतीच्या नाराच बाणांनीं विद्ध

गज दोन शिखरांच्या पर्वतांप्रमाणें जमिनीवर पडले ! जिकडे-तिकडे विव- ळत पडलेल्या गजांच्या कापलेल्या शुंडांनीं व्याप्त झालेली पृथ्वी जणुंकाय सरपटणाऱ्या सर्पांनींच व्यापून गेल्यासारखी दिसत होती ! सुवर्णविभूषित राजछत्रें जमिनीवर पडलेलीं असल्यामुळें ती युगांतीं सूर्यचंद्रादि ग्रहांनीं भरून गेलेल्या आकाशाप्रमाणें दिसत होती ! 'मारा, प्रहार करा, कापून काढा' इत्यादि प्रकारचा एकसारखा तुमुल ध्वनि द्रोणाच्या रथाजवळ होत होता. द्रोणानें परम क्रुद्ध होऊन रणांत वायव्यास्त्र योजून प्रचंड वाऱ्यानें मेघांप्रमाणें शत्रूंना उधळलें. द्रोणाकडून मारले जाणारे पांचाल भीमसेन व अर्जुन यांसमक्ष भीतीनें पळूं लागले. नंतर अर्जुन आणि भीमसेन प्रचंड रथसमूह व मोठी सेना घेऊन एकाएकीं द्रोणावर चालून गेले ! अर्जुन दक्षिणेकडून व भीमसेन उत्तरेकडून त्यावर बाणसमूहांची वृष्टि करूं लागले. हे महाराजा, ते द्रोणावर धांवून येतांच सृंजय, महापराक्रमी पांचाल, मत्स्य आणि सोमक हेहि त्यांच्या मागून गेले. हे राजन्, त्याप्रमाणें तुझ्या पुत्राचे शूर महारथी मोठ्या सैन्यानिशीं द्रोणाच्या रथाकडे जाऊं लागले. तेव्हां ती भारती सेना अर्जुनाच्या शराघातामुळें, अंधारामुळें आणि झोंप येऊं लागल्यामुळें पुनः विस्कळित झाली. तेव्हां द्रोण व तुझा पुत्र दुर्योधन हे तिचें निवारण करूं लागले. परंतु त्यांच्या हातून त्या सैन्याचें निवारण झालें नाहीं. पांडुपुत्र अर्जुनाच्या बाणांनीं विस्कळित झालेली ती सेना दाट अंधकार पडल्यामुळें चारी बाजूंनीं पळत सुटली आणि हे महाराजा, कित्येक राजेहि भीतीनें आपले शेंकडो रथ तेथेंच टाकून पळून गेले ! ७. ६. १६१.

---

## अध्याय १६२ वा.

[ १ सोमदत्तवध. २ द्रोण-युधिष्ठिरयुद्ध. ३ युधिष्ठिराचें दुर्योधनाकडे गमन. ]

( १ ) **संजय**—सोमदत्त आपलें धनुष्य गरगर फिरवीत आहे, हें पाहून सात्यकि आपल्या सारथ्यास म्हणाला 'सूता, सोमदत्ताकडे मला घेऊन जा. महाबलिष्ठ सोमदत्ताला रणांत मारल्याशिवाय मी मागें फिरणार नाहीं. हें माझें वचन सत्य समज !' मग त्या सारथ्यानें मनोजव, शंखवर्ण व कधींहि न थुजणारे सिंधुदेशाचे अश्व रणांत हांकले. हे राजा, पूर्वीं दैत्यवधाविषयीं उद्युक्त इंद्रास जसे त्याचे हरिदश्व घेऊन गेले, त्याप्रमाणें मन किंवा वायु

यांप्रमाणें ते वेगवान् अश्व सात्यकीस सोमदत्ताकडे घेऊन गेले. क्षुब्ध होऊन सात्यकि आपल्यावर वेगानें येत आहे, असें पाहून महाबलिष्ठ सोमदत्तहि निर्भयपणें मार्गे फिरला आणि वृष्टिमान् पर्जन्याप्रमाणें शरवृष्टि करून, सूर्यास आच्छादणाऱ्या मेघासमान त्यानें सात्यकीला आच्छादून टाकलें. सात्यकीनेंहि न भितां शरसमुदायांनीं त्या कुरुपुंगव सोमदत्ताला झांकून टाकिलें.

याप्रमाणें त्या नरश्रेष्ठांनीं परस्परांस बाणांनीं विद्ध केल्यामुळें वसंतऋतूंतील फुललेल्या पळसांप्रमाणें ते दिसूं लागले. त्यांचें सर्व अंग रक्तानें भिजून गेल्यामुळें कुरु आणि वृष्णिकुलाची कीर्ति पसरविणारे ते दोघे वीर एकमेकांस पाहूं लागले, तेव्हां ते आपल्या नेत्रांनीं परस्परांस जाळीतच आहेत कीं काय, असा भास झाला. बाणांनीं त्यांचीं शरीरें भिन्न होऊन सर्वत्र त्यांचीं शकलें झालेलीं दिसत होतीं, आणि अंगांत बाण रुतल्यामुळे ते वीर साळू पक्ष्यांप्रमाणें शोभत होते. सुवर्णपुंख बाणांनीं ते विद्ध झाल्यामुळें पावसाळयांत काजव्यांनीं व्याप्त झालेल्या वृक्षांप्रमाणें प्रकाशत होते! त्यांचें शरीर बाणांच्या योगानें तेजस्वी झाल्यामुळें ते दोघे महारथी ज्यांच्या पाठीवर टेंभे पाजळले आहेत अशा क्रुद्ध हत्तींप्रमाणें रणांत शोभूं लागले.

नंतर हे महाराजा, महारथी सोमदत्तानें अर्धचंद्र बाणानें सात्यकीचें मोठें धनुष्य तोडून टाकलें. सात्यकीनेंहि तत्काल दुसरें वेगवत्तर धनुष्य घेतलें आणि एक क्षुरप्र बाण टाकून सोमदत्ताचें धनुष्य तोडलें आणि मग भग्नदंष्ट्र हत्तीप्रमाणें त्या सोमदत्ताला शंभर नतपर्व बाणांनीं आच्छादून टाकलें. हे राजा, तेव्हां त्या सोमदत्तानें दुसरें धनुष्य घेतलें आणि सात्यकीवर मोठी शरवृष्टि केली. अशा रीतीनें त्या दोघां वीरांनीं परस्परांवर बाण टाकून परस्परांस विद्ध केलें!

नंतर सात्यकीच्या बाजूनें भीमसेन येऊन त्यानें त्या बाह्लीकपुत्र सोमदत्तावर दहा बाण टाकिले. परंतु सोमदत्त यत्किंचित्‌हि न गडबडतां त्या भीमसेनावर तीक्ष्ण बाण सोडूं लागला! मग पुनः भीमानें सात्यकीसाठीं एक बळकट व भयंकर परीघ घेऊन तो सोमदत्ताच्या छातीवर टाकला! तो घोर परीघ आपल्यावर येत आहे, असें पाहून सोमदत्तानें रणांत त्याचे हंसतच तुकडे केले. तेव्हां तो पोलादी महान् परीघ दुखंड होऊन वज्रानें तोडलेल्या मोठ्या पर्वतशिखराप्रमाणें भूमीवर पडला. राजा, सात्यकीनें एका

भल्लानें सोमदत्ताचें धनुष्य तोडलें आणि पांच भल्लांनीं त्याच्या हस्तत्राणाचा भंग केला. त्याचे उत्तम चार अश्वांचाहि त्यानें चार बाणांनीं वध केला आणि त्यानंतर हे भारता, त्या नरश्रेष्ठानें एक नतपर्व भल्ल टाकून त्याच्या सारथ्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें ! नंतर हे राजा, अग्नीप्रमाणें प्रज्वलित, तीक्ष्ण धारेचा एक सुवर्णपुंख भयंकर बाण सात्यकीनें त्या सोमदत्तावर सोडला. बलवान् सात्यकीनें टाकलेला तो बाण, हे भारता, त्याच्या छातींत घुसला ! याप्रमाणें तो महारथी व महाबलिष्ठ सोमदत्त मृत होऊन खालीं पडला !

( २ ) सोमदत्त मरून पडलेला पाहून ते महारथी मोठी शरवृष्टि करीत सात्यकीवर धांवले. हे महाराजा, सात्यकि शरांनीं आच्छादित होत असलेला पाहून युधिष्ठिर व इतर पांडव प्रभद्रकांसह मोठी सेना घेऊन द्रोणसैन्यावर धांवले. मग युधिष्ठिरानें बाणांची वृष्टि करून तुझ्या प्रचंड सैन्याचा द्रोणादेखत अगदीं संहार करून टाकला. आपलीं सैन्यें पळून जात असल्याचें पाहून द्रोण क्रोधानें नेत्र लाल करून त्या धर्मराजावर धांवून गेला. नंतर अतितीक्ष्ण सात बाणांनीं द्रोणानें त्या युधिष्ठिरास विद्ध केलें. युधिष्ठिरानेंहि क्रोधसंतप्त होऊन पांच बाणांनीं द्रोणाचा वेध केला. त्यामुळें महाबाहु द्रोण अतिपीडित झाला. तरी ओंठ चावीत त्यानें युधिष्ठिराचा ध्वज आणि धनुष्य तोडून टाकलीं. तेव्हां त्या नृपोत्तमानें त्वरेनें दुसरें बळकट धनुष्य घेतलें आणि त्यानें द्रोणावर हजारों बाण टाकून त्याला अश्व, सारथि, ध्वज आणि रथ यांसुद्धां विद्ध केलें. त्या वेळचा तो धर्मराजाचा पराक्रम अत्यद्भुतच होता !

हे भरतसत्तमा, त्या शरवर्षावानें व्याकुल झालेला द्रोण मुहूर्तभर त्या रथोपस्थावर स्वस्थ बसून राहिला. शुद्धीवर येतांच क्रोधाविष्ट होऊन त्यानें वायव्यास्त्र सोडलें. परंतु हे भारता, त्या वीर्यवान् युधिष्ठिरानें न गडबडतां त्या अस्त्राचें प्रत्यस्त्रानें निवारण केलें आणि त्या ब्राह्मणाचें प्रचंड धनुष्य मोडून टाकलें. मग त्या क्षत्रियमर्दक द्रोणानें दुसरें धनुष्य घेतलें; परंतु त्या कुरुपुंगवानें तीक्ष्ण भल्लांनीं त्याचेहि तुकडे करून टाकिले !

( ३ ) इतक्यांत वासुदेव त्या कुंतीपुत्र युधिष्ठिराला बोलला " महाबाहो युधिष्ठिरा, मी तुला सांगतों तें ऐक. हे भरतसत्तमा, तूं आतां द्रोणाशीं युद्ध करण्याचें पुरें कर. द्रोण हा रणांत तुला धरण्याविषयीं सारखा प्रयत्न करीत आहे. तेव्हां त्याचें तुझ्याशीं युद्ध होणें, हें मला योग्य दिसत नाहीं. त्याच्या

नाशासाठीं जो निर्माण झाला आहे, तो त्याचा वध करील. म्हणून आचार्यांला सोडून जेथें राजा दुर्योधन आहे, तेथें जा ! राजानें राजाशींच युद्ध करावें, इतरांशीं त्यानें युद्ध करणें योग्य नव्हे. म्हणून हे कौंतेया, माझ्या साहाय्यानें धनंजय आणि रथशार्दूल भीम हे कौरवांबरोबर संग्राम करीत आहेत, तोंपर्यंत गज, अश्व व रथ यांसुद्धां तेथें जा !" वासुदेवाचें भाषण ऐकून युधिष्ठिरानें एक मुहूर्तभर विचार केला आणि मग शत्रूंचा संहार करणारा भीम जेथें उभा होता, तिकडे अंतकाप्रमाणें तुझ्या योद्ध्यांचा वध करीत आणि मोठ्या रथघोषानें सर्व पृथ्वी निनादित करीत त्या भयंकर युद्धासाठीं त्वरित निघून गेला. तेव्हां तो उन्हाळ्याच्या अंतीं दाही दिशा नादित करणाऱ्या मेघाप्रमाणें दिसला. त्यानें शत्रूंचा वध करणाऱ्या भीमाची बाजू घेतली. इकडे द्रोणानेंहि पांडव आणि पांचाल यांची अगदीं दाणादाण करून सोडली ! ७. ६. १६२.

---

## अध्याय १६३ वा.

[ १ युद्धवर्णन. २ धृतराष्ट्राचा प्रश्न. ३ दीपोद्योतन. ४ रथदुर्दिनवर्णन. ]

( १ ) संजय—हे पृथ्वीपते, याप्रमाणें भयंकर व घोर युद्ध सुरू झाल्यामुळें सर्व पृथ्वी अंधार व धूळ यांनीं व्याप्त झाली. त्यामुळें रणांत उभे असलेले लोक परस्परांना दिसेनासे झाले. केवळ अनुमान व संज्ञा यांच्या योगानें तें युद्ध चाललें होतें. हे नृपसत्तमा, त्या युद्धांत मनुष्यें, गज, अश्व यांचा सारखा संहार होत होता. तो पाहून अंगावर रोमांच उभे राहात. द्रोण, कृप, कर्ण, भीमसेन, धृष्टद्युम्न आणि सात्यकि हे वीर परस्परांच्या सैन्यास क्षोभवूं लागले. त्या महारथ्यांनीं चारी बाजूंनीं सैन्याचा नाश चालविला असतां व दाट काळोख पडला असतां जिकडे वाट फुटेल, तिकडे तीं सैन्यें पळत सुटलीं. हे महाराजा, देहभान सुटून ते योद्धे सर्वत्र पळूं लागले आणि पळत असतांना मारले गेले. तुझ्या पुत्राच्या मसलतीवरून हजारों महारथ्यांनीं त्या लढाईंत परस्परांचा वध केला. हे भारता, नंतर सर्व सैन्यें आणि सेनापतिहि रणांत सर्वत्र अंधार झाल्यामुळें अगदीं उद्विग्न होऊन गेले !

( २ ) धृतराष्ट्र—पांडवांनीं तुम्हांला त्रास दिल्यामुळें तुमच्या मनाचा तेजोभंग आधींच झाला होता; तशांत तुम्ही त्या गाढ अंधकारांत सांपडलां असतां, तुमच्या मनाची स्थिति काय बरें झाली असेल ? तसेंच संजया, सर्व

जग अंधकारमय झालें असतां पांडवांच्या सैन्यास किंवा आपल्या सैन्यासहि प्रकाश कोठून मिळाला बरें ?

( ३ ) संजय—नंतर द्रोणानें सेनापतींस आज्ञा केली आणि युद्धांत वध पावून शेष राहिलेल्या सैन्याचा पुनः व्यूह रचला. त्याच्या पुढील बाजूस आपण स्वतः उभे राहून शल्य, अश्वत्थामा, कृतवर्मा व शकुनि ह्यांना मागच्या बाजूस ठेविलें. राजा दुर्योधन स्वतः त्या रात्रीं सर्व सैन्याचें रक्षण करीत फिरत होता. हे पार्थिवा, तो सर्व पदातिसमूहांस सांत्वनपूर्वक म्हणाला, 'तुम्ही सर्व दिव्यास्त्रें टाकून हातांत मोठमोठे पेटलेले दीप घ्या पाहूं !' राजश्रेष्ठाची आज्ञा होतांच त्यांनीं मोठ्या आनंदानें हातांत मोठमोठे पेटलेले दिवे घेतले. मग देव, ऋषि, गंधर्व, सुरर्षि, विद्याधर व अप्सरा यांचे समूहांनीं आणि अंतरिक्षांतील नाग, यक्ष, उरग, किन्नर यांनींहि तें युद्ध पाहण्याच्या कौतुकानें हातांत सुगंधतैलयुक्त दीप धारण केले !

( ४ ) अशाप्रकारें ती विस्कळित झालेली सेना अग्निप्रभेनें पुनः रात्रीच्या वेळीं शोभूं लागली. तसेंच मोठ्या मोलाचीं आणि तेजस्वी विभूषणें आणि पडणारीं चकचकीत शस्त्रें यांच्या योगानें ती विशेष शोभायमान दिसूं लागली. अशा रीतीनें कौरववीरांनीं क्षणांत दीप प्रदीप्त करून तुझ्या सेनेस प्रकाशित केलें. पदातींनीं दिवे व तेल हातांत घेऊन सर्व सैन्यांत अत्यंत प्रकाश पाडला. हे राजेंद्रा, तेव्हां रात्रीच्या वेळीं ती सेना आकाशांत विजांनीं शोभणाऱ्या मेघांप्रमाणें दिसूं लागली. याप्रमाणें ती प्रकाशित झाली असतां अग्नीप्रमाणें सर्वांस ताप देणारा व सोन्याचें कवच अंगांत घातलेला द्रोण, मध्याह्नकालीं आकाशांत आलेल्या अंशुमाली सूर्याप्रमाणें चकाकूं लागला ! त्यावेळीं तेथें सुवर्णाचीं विभूषणें, शुद्ध निष्क आणि चकचकीत धनुष्यें व शस्त्रें यांवर त्या दीपांच्या ज्योतींचें प्रतिबिंब पडून तीं विशेष शोभायमान दिसूं लागलीं ! हे अजमीढकुलोत्पन्ना, शिंक्यांत ठेवलेल्या गदा, शुभ्र परिघ आणि रथासभोंवतीं फिरणाऱ्या शक्ति यांपासून किरण परावृत्त होऊन त्यांपासून पुनः दुसरे दिवे निर्माण होत असल्याचें दिसत होतें !

हे राजन्, शस्त्रांच्या प्रभा व दीपांचा प्रकाश यांनीं प्रकाशित झालेल्या त्या सैन्यांत आणखी अलंकारांच्या प्रभांची भर पडतांच तें सैन्य अधिकच देदीप्यमान दिसूं लागलें. रक्ताचें सिंचन झालेलीं पाणीदार शस्त्रें व वीरांचीं

कवचें ह्यांची उन्हाळयाच्या अंतीं आकाशांत दिसणाऱ्या विजांप्रमाणें तेथें उज्ज्वल शोभा दिसूं लागली. त्या ठिकाणीं प्रहारांच्या वेगानें कंपित होणाऱ्या, प्रहार करणाऱ्या आणि वेगानें अंगावर धांवून येणाऱ्या लोकांचीं तोंडें वाऱ्यानें कंपित झालेल्या कमलांप्रमाणें शोभूं लागलीं. वृक्षांनीं भरून राहिलेल्या मोठ्या वनाला दावाग्नि लागून त्यानें पेट घेतला असतां जसें सूर्याचेंहि तेज नष्ट होऊन जातें, त्याप्रमाणें ती सेना हे भारता, प्रदीप्त होऊन महा-भयंकर व घोरस्वरूपाची दिसूं लागली !

आमचें सैन्य प्रकाशित झालेलें पाहून पांडवांनीं देखील आपल्या सेनेंतील पदातींस आज्ञा दिली व त्यांनींहि आमच्याप्रमाणें त्वरेनें दिवे तयार केले आणि चारी बाजूंना, मागेंपुढें, मध्यें लोकांनीं पेटलेले दीप घेऊन ती पांड-वांची सेना प्रदीप्त केली. हातांत दिवट्या घेऊन लोक दोन्ही सैन्यांत फिरूं लागले. त्यामुळें तुझी सेना प्रकाशित झाली, तसेंच तें पांडवांनीं रक्षण केलेलें सैन्यहि प्रकाशमान झालें. प्रकाशोत्पादक सूर्यानें आपलें तेज अग्नींत ठेवलें असतां अग्नि जसा अधिक देदीप्यमान दिसतो, तशी तुझी ती सेना पांडवांचें सैन्य उद्दीपित झाल्यामुळें अधिकच शोभूं लागली ! त्या दोन्ही सेनांचा प्रकाश पृथ्वी व आकाश यांना व्यापून त्यानें सर्व दिशाहि व्यापिल्या. त्या प्रकाशामुळें तीं दोन्ही सैन्यें स्पष्टपणें ओळखतां येऊं लागलीं. हे राजा, त्या प्रकाशामुळें अंतरिक्षांतील देवगण जागे झाले ! मग गंधर्व, यक्ष, असुर आणि सिद्ध यांचे समुदाय आणि सर्व अप्सरांचे गण त्या ठिकाणीं प्राप्त झाले. तें देव आणि गंधर्व यांच्या समुदायांनीं व्याप्त झालेलें समरांगण यक्ष, असुरेंद्र व अप्सरा यांच्या गणांनीं, त्याचप्रमाणें मृत झालेल्या वीरांचे स्वर्गा-रोहणानें आकाशासारखें दिसूं लागलें. रथ, अश्व आणि गज, यांनीं जें फुलून गेलें आहे, दिव्यांनीं जें प्रकाशित झालें आहे, ज्यांतील योद्धे अगदीं क्षुब्ध होऊन गेले आहेत, अश्व मृत होऊन पडले आहेत व कांहीं सैनिक पळून गेले आहेत, जेथें रथ, अश्व आणि गज ह्यांची रचना उत्तम प्रकारें केली आहे, असें तें मोठें सैन्य देवदानवांच्या व्यूहासारखें दिसूं लागलें. शक्ति-संघाची व्यग्रता हाच ज्याचा भयंकर वारा, महारथ हींच ज्याचीं अभ्रें, गज आणि अश्व यांच्या किंकाळ्या हाच ज्याचा घोष, शस्त्रांचे ओघ हीच ज्याची वृष्टि, रक्ताचा स्राव ह्याच ज्याच्या जलधारा असें तें रथदुर्दिन रात्रीच्या वेळीं सुरू झालें. वर्षाऋतूच्या शेवटीं ज्याप्रमाणें आकाशाच्या मध्यभागीं असणारा

सूर्य आपल्या किरणांनीं लोकांस त्रास देतो, त्याप्रमाणें त्या सैन्यामध्यें महाग्नीप्रमाणें उदारधी द्विजश्रेष्ठ द्रोण पांडवांच्या सैन्यास त्रस्त करूं लागला. ७. ६. १६३.

---

## अध्याय १६४ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ धृतराष्ट्राचा प्रश्न. ३ संजयाचें उत्तर. ]

(१) **संजय**—अंधार व धूळ यांनीं व्याप्त झालेलें जग पुनः प्रकाशित झालें असतां परस्परांच्या वधाची इच्छा करणारे वीर एकमेकांवर धांवून गेले. हे राजन्, एकमेकांचे अन्याय करणाऱ्या त्या वीरांनीं प्रास आणि खड्ग हीं आयुधें घेतलीं आणि एकमेकांस रणांत गांठून ते त्यांजकडे क्रुद्ध दृष्टीनें पाहूं लागले. चोहोंकडे पेटलेल्या हजारों प्रदीपांनीं व सुवर्णदंडाच्या, सुगंधी तैलाच्या, उज्ज्वल प्रभेच्या, देवगंधर्वादिकांनीं धारण केलेल्या, रत्नखचित दिव्यांच्या योगानें ती भूमि नक्षत्रांनीं शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें देदीप्यमान दिसूं लागली. हे भारता, प्रलयकालीं पृथ्वी दग्ध होत असतां जशी दिसते, त्याप्रमाणें ती रणभूमि शेंकडों उल्कांनीं प्रकाशित होऊन दिसूं लागली. त्या प्रदीपांनीं चोहोंकडे सर्व दिशा प्रकाशित झाल्या आणि वर्षाकालांतील प्रदोषसमयीं काजव्यांनीं फुललेल्या वृक्षांप्रमाणें शोभायमान झाल्या. नंतर वीरांनीं वीरांना गांठून पृथक् पृथक् युद्ध केलें. गज गजाशीं, अश्वारूढ अश्वारूढांशीं व रथ रथांशीं परमहर्षानें भिडले. राजा, तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें त्या भयप्रद प्रदोषकालीं चतुरंग सैन्यामध्यें भयंकर युद्ध सुरू झालें. परंतु हे महाराजा, अर्जुनानें सर्व पार्थिवांचें निवारण करून त्वरेनें कौरवसैन्याची दाणादाण करून सोडली !

( २ ) **धृतराष्ट्र**—तो अजय्य आणि दुर्धर्ष अर्जुन क्षुब्ध होऊन माझ्या पुत्राच्या सैन्यांत शिरला, तेव्हां तुमच्या मनाची स्थिति काय झाली असेल बरें ? तो शत्रुविमर्दक आंत शिरला, तेव्हां सैन्यानें काय केलें ? आणि दुर्योधनानें यावेळीं कोणतें कृत्य योग्य ठरवून तें करण्याचें मनांत आणलें ! कोणते वीर त्याबरोबर युद्धाला तयार झाले ? तो श्वेतवाहन अर्जुन सैन्यांत शिरला असतां द्रोणाचें रक्षण कोणीं बरें केलें ? द्रोणाच्या उजव्या बाजूच्या सेनेचें रक्षण कोणीं केलें, तसेंच डाव्या बाजूचें रक्षण करण्यास कोण

होते ? शत्रूंच्या वीरांचा वध करणाऱ्या त्या द्रोणाच्या मागच्या बाजूस कोण होते ? आणि रणांत शत्रूंना मारीत पुढें कोण गेले तें मला सांग ! रणांत पराजय म्हणून ज्याला कधींच ठाऊक नाहीं, जो महाधनुर्धर, जो मोठा वीर्यशाली, जो नरव्याघ्र रथमार्गांवरून जणुंकाय नाचतच पांचालांमध्यें शिरला आणि बाणांच्या योगानें ज्यानें शत्रूंच्या रथसमुदायांचें भस्म करून टाकलें, तो धूमकेतूप्रमाणें क्रुद्ध द्रोण मृत्यु कसा पावला बरें ? हे सूता, शत्रू-कडील लोक अव्यग्र होते, त्यांचा पराजय झाला नाहीं, ते आनंदित होते, त्यांना त्वेष आला होता, असें मला सांगतोस, परंतु माझ्या वीरांविषयीं मात्र तसें कांहींच सांगत नाहींस ! उलट ते मारले गेले, त्यांची ताटातूट झाली, ते चोहोंकडे फांकले, रथी विरथ केले गेले, असेंच सांगत आहेस !

( २ ) संजय—हे महाराजा, युद्धाला अतिउत्सुक झालेल्या द्रोणाचें मत घेऊन त्या रात्रीं आपल्या वश्य बंधूंना आणि कर्ण, वृषसेन, मद्रराज शल्य, दुर्धर्ष, दीर्घबाहु, तसेंच त्यांच्या अनुयायी वीरांना उद्देशून दुर्योधन म्हणाला, 'पराक्रमी वीरांनो, तुम्ही द्रोणाच्या मागील बाजूचें अत्यंत दक्षतेनें रक्षण करा. हार्दिक्यानें दक्षिणेकडील व शल्यानें उत्तरेकडील बाजूचें रक्षण करावें.'

हे राजन्, त्रिगर्तांपैकीं जे शूर महारथी जीवंत राहिले होते, त्यांना तुझ्या पुत्रानें युद्धांत पुढें पाठविलें. तो म्हणाला, "द्रोण युद्धास तयार झाला आहे, आणि तिकडे ते पांडवहि तसेच अत्यंत उत्सुक दिसत आहेत, तरी तुम्ही अत्यंत दक्षतेनें रणांत शत्रूंचा वध करणाऱ्या त्या द्रोणाचार्यांचें रक्षण करा. द्रोण हा अत्यंत बलवान् असून त्याचें रणांतील हस्तलाघव अपूर्व आहे, तसाच त्याचा प्रतापहि अद्भुत आहे. तो समरांत देवांनाहि जिंकून टाकील, तेथें सोमकांसह पांडवांचा पराजय करील, यांत नवल तें काय ? म्हणून तुम्ही सर्व महारथांनीं मोठ्या सावधगिरीनें द्रोणाचें पंचालपुत्र महारथी धृष्टद्युम्नापासून रक्षण केलें पाहिजे. पांडवसैन्यामध्यें द्रोणापुढें टिकेल, असा धृष्टद्युम्नाशिवाय दुसरा कोणी पुरुष मला दिसत नाहीं. मला वाटतें कीं तुम्हीं अंतःकरणपूर्वक भारद्वाजाचें रक्षण करावें, म्हणजे तो पांडवांचा, सृंजयांचा आणि सोमकांचाहि वध करील. याप्रमाणें सेनेच्या तोंडींच सर्व सृंजयांना मारलें असतां तो अश्व-त्थामा धृष्टद्युम्नाचा वध करील, यांत संशय नाहीं. मग महारथी कर्ण अर्जु-नाला मारील आणि रणदीक्षित मी भीमसेनाला मारीन आणि बाकी

राहिलेल्या तेजोहीन पांडवांचा माझे योद्धे पराभव करतील. असा चिरकाल संस्मरणीय जय खात्रीनें मी मिळवीन. म्हणून हे वीरहो, या संग्रामांत तुम्ही द्रोणाचेंच रक्षण करा!"

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें तुझा पुत्र दुर्योधन बोलला आणि त्यानें त्या घनदाट अंधकारांत सैन्याला युद्धाची आज्ञा केली. त्या रात्रीं एकमेकांना मारण्याच्या इच्छेनें उभय सैन्यांमध्यें भयंकर युद्ध सुरू झालें. अर्जुनानें कौरवसैन्याला व कौरवांनीं अर्जुनाला, याप्रमाणें परस्परांनीं परस्परांस नानाशस्त्रसमुदायांनीं व्याकुळ केलें. अश्वत्थाम्यानें पांचालराजाला व द्रोणानें सृंजयांना संनतपर्व बाणांनीं आच्छादून टाकिलें. हे भारता, याप्रमाणें पांडवांची सेना व पांचालसेना यांचा कौरवसेनेशीं संग्राम झाला. त्यांत एकमेक एकमेकांना मारीत असतां विद्ध झालेल्यांचें विवळणें सुरू झालें. अशा प्रकारचें रौद्र व भयंकर युद्ध आम्हींच नव्हे, तर पूर्वींच्याहि लोकांनीं कधीं पाहिलें नाहीं, किंवा झाल्याचेंहि कधीं ऐकिलें नाहीं! ७. ६. १६४.

---

## अध्याय १६५ वा.

[ १ युधिष्ठिराचें पलायन. ]

(१) **संजय**—हे राजा, सर्व प्राण्यांचा क्षय करणारें तें अतिदारुण रात्रियुद्ध सुरू झालें असतां धर्मपुत्र युधिष्ठिर पांडव, पांचाल व सोमक यांना बोलला, "द्रोणाला मारण्याच्या ईर्ष्येनें त्याकडे धांवत जा, व त्यावर मारा करा. युधिष्ठिराच्या सांगण्यावरून पांचाल आणि सृंजय भयंकर गर्जना करीत द्रोणावर चालून गेले. क्रोधाविष्ट होऊन आपली शक्ति, आपला उत्साह आणि आपलें वीर्य दाखवीत ते वीर मोठ्यानें ओरडत रणांत येऊन ठेपले. तेव्हां मत्त गजावर दुसरा मत्त गज चालून यावा, त्याप्रमाणें युधिष्ठिर द्रोणावर चालून येत असतां हार्दिक्य कृतवर्मा त्यावर धांवून आला. हे राजा, सात्यकि समरांत शरवृष्टि करीत असतां समरांगणाच्या तोंडींच कौरवपक्षाकडील भूरीनें त्याला गांठलें. राजा, महारथी द्रोणाला गांठण्याच्या इच्छेनें येणाऱ्या सहदेवाचें वैकर्तन कर्णानें निवारण केलें. तोंड पसरून येणाऱ्या भीमसेनाला—प्रत्यक्ष आपल्या मृत्यूला—येतां पाहून दुर्योधन त्यावर चाल करून गेला. वीरश्रेष्ठ व सर्वयुद्धविशारद नकुलाचें सौबल शकुनीनें सत्वर

निवारण केलें. हे राजा, रथिश्रेष्ठ शिखंडी रथांत बसून येत असतां शारद्वत कृपाचार्यानें त्याला अडवून धरिलें. हे महाराजा, मयूरांसारख्या अश्वांनीं प्रतिविंध्य पुढें चाल करून येत असतां दुःशासनानें मोठ्या सावधगिरीनें त्याचें निवारण केलें. हे राजन्, मायेचे शेंकडो प्रकार जाणणारा भीमसेनपुत्र घटोत्कच चाल करून येत आहे, असें पाहून अश्वत्थाम्यानें त्या राक्षसाचा निरोध केला. महारथी द्रुपद ससैन्य व आपल्या अनुयायांसह द्रोणावर येत असतां वृषसेनानें त्याचें निवारण केलें. हे भारता, द्रोणाला मारण्याचा हेतु धरून सत्वर येणाऱ्या विराटास क्रोधाविष्ट झालेल्या मद्रराज शल्यानें मागें हटविलें. नकुलपुत्र शतानीक धांवून येत असतां द्रोणाचें रक्षण करण्यासाठीं चित्रसेनानें बाणवृष्टि करून त्याला अडवून धरिलें. वीरश्रेष्ठ व महारथी अर्जुन चाल करीत असतां राक्षसाधिपति अलंबुषानें त्याचा निग्रह केला. रणांगणांत शत्रूंचा संहार करणारा जो महाधनुर्धर द्रोण, त्याचें पंचालपुत्र धृष्टद्युम्नानें मोठ्या कौतुकानें निरोधन केलें. त्याचप्रमाणें पांडवांकडील दुसरे महारथी चाल करून आले असतां हे राजा, तुझ्या रथ्यांनीं आपल्या बळानें त्यांना मागें फिरविलें. त्या महारणांत गजारूढ अनेक वीर शत्रुपक्षाच्या गजांशीं भिडून परस्परांचें मर्दन करूं लागले. हे राजा, संध्यासमयीं अश्व परस्परांवर उलटून पडले असतां आपल्या वेगानें ते सपक्ष पर्वतच आहेत कीं काय, असें भासूं लागलें. प्रास, शक्ति, ऋष्टि हीं आयुधें हातांत घेऊन अश्वसादी शत्रूच्या अश्वसादींबरोबर पृथक् पृथक् गर्जना करीत युद्ध करूं लागले. इतर लोकहि गदा, मुसळें इत्यादि नानाप्रकारचीं आयुधें घेऊन परस्परांशीं झगडूं लागले!

इकडे खवळलेल्या समुद्राला ज्याप्रमाणें मर्यादा थांबवून धरिते, त्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या हार्दिक्य कृतवर्म्यानें युधिष्ठिराचें निवारण केलें. तथापि युधिष्ठिरानें त्या हार्दिक्याला पांच बाणांनीं विद्ध केलें आणि पुनः वीस बाण त्यावर टाकून ‘अरे उभा रहा, उभा रहा,’ असें म्हटलें. परंतु हे मारिषा, क्रोधसंतप्त होऊन कृतवर्म्यानें एक भल्ल बाण धर्मपुत्रावर टाकून त्याचें धनुष्य तोडून टाकलें आणि सात बाणांनीं त्याला विद्ध केलें. नंतर त्या महारथी युधिष्ठिरानें दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या कृतवर्म्याच्या छातीवर व बाहूंवर दहा बाण टाकले. त्यांनीं विद्ध झालेला कृतवर्मा इतका संतप्त झाला कीं, तो रोषानें थरथर कांपूं लागला. तशा स्थितींतहि त्यानें युधिष्ठिरावर सात बाण फेंकले,

त्यावर युधिष्ठिरानें त्याचें धनुष्य तोडलें व त्याच्या हस्तत्राणाचेहि तुकडे केले आणि नंतर पांच तीक्ष्ण बाण त्यावर टाकले. ते त्याच्या सुवर्णविभूषित व मूल्यवान् कवचाचा भेद करून वारुळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें जमीन फोडून आंत शिरले! परंतु त्या हार्दिक्यानें दुसरें धनुष्य घेऊन निमेषमात्रांत धर्मराजावर साठ व त्याचे सारथ्यावर नऊ बाण टाकून त्या दोघांनाहि विद्ध केलें. हे भरतश्रेष्ठा, तेव्हां उदार अंतःकरणाच्या त्या युधिष्ठिरानें आपलें मोठें धनुष्य रथांत ठेवलें आणि सर्पिणीपेक्षांहि भयंकर अशी शक्ति त्या कृतवर्म्यावर सोडली. धर्मराजानें टाकलेली ती मोठी सुवर्णचित्रित शक्ति हार्दिक्याच्या उजव्या बाहूचा छेद करून पृथ्वीतलांत शिरली. इतक्या अवकाशांत त्या युधिष्ठिरानें दुसरें धनुष्य घेतलें आणि सन्नतपर्व बाणांनीं त्या हार्दिक्याला झांकून टाकिलें! नंतर रणशूर आणि वृष्णिकुलांतील प्रख्यात रथी कृतवर्म्यानें निमिषार्धांत युधिष्ठिराचे अश्व व सारथि यांस मारलें आणि धर्मराजाला विरथ केलें! नंतर त्या ज्येष्ठ पांडवानें ढाल व खड्ग घेतलीं, परंतु तींहि कृतवर्म्यानें रणांत बाणांनीं उडवून दिलीं. नंतर एक सुवर्णदंडाचा दुरासद तोमर त्या धर्मपुत्र युधिष्ठिरानें घेतला आणि त्वरेनें हार्दिक्यावर सोडला. त्या तोमराचे हार्दिक्यानें हंसतहंसतच मोठ्या हुशारीनें दोन तुकडे करून टाकले! नंतर त्यानें शेंकडो बाण युधिष्ठिरावर फेंकले आणि क्रोधावेशांत तीक्ष्ण शरांनीं त्याचें कवचहि फोडून टाकलें. राजा, हार्दिक्याच्या बाणांनीं तें बहुमूल्य कवच फुटून त्याचे आकाशांतून पडणाऱ्या नक्षत्रांच्या समूहांप्रमाणें तुकडे उडाले!

याप्रमाणें विरथ झालेला युधिष्ठिर कवच भग्न झाल्यामुळें कृतवर्म्याच्या बाणांच्या प्रहारांनीं त्रस्त झाला आणि त्यानें त्वरेनें रणांतून पलायन केलें. याप्रमाणें धर्मात्म्या युधिष्ठिराला जिंकून तो कृतवर्मा द्रोणाच्या चक्राचें रक्षण करूं लागला. ७. ६. १६५.

---

## अध्याय १६६ वा.

[ १ भूरिवध. २ घटोत्कचपराभव. ३ दुर्योधनपराजय. ]

(१) **संजय**—हे राजन्, रथिश्रेष्ठ सात्यकि प्रयाणस्थानापासून गजाप्रमाणें चाल करून येत असतां, भूरीनें त्यास रणांत गांठलें. तेव्हां सात्यकि क्रोधाविष्ट होऊन त्यानें पांच तीक्ष्ण बाण भूरीच्या हृदयावर मारून त्याला विद्ध

केलें. त्यामुळें त्याच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला ! भूरीनेंहि त्या रण-दुर्मद सात्यकीवर दहा बाण मारून त्याला दोहों भुजांच्या मध्यभागीं विद्ध केलें. अशा रीतीनें हे महाराजा, त्या दोघांनीं एकमेकांस बाणांनीं व्याकुळ केलें. क्रोधानें त्यांचे नेत्र लाल झाले होते, आणि त्यांनीं आपलीं धनुष्यें आकर्षून धरिलीं होतीं. अशा स्थितींत त्यांनीं परस्परांवर भयंकर शरवृष्टि केली. क्षुब्ध झालेले ते दोघे वीर त्या वेळीं प्रत्यक्ष यम किंवा अंतक यांसारखे दिसत होते. त्यांनीं परस्परांस बाणांनीं आच्छादिलें होतें. असें तें युद्ध एक मुहूर्तभर अगदीं बरोबरीनें झालें. मग क्रुद्ध सात्यकीनें हंसतहंसतच रणांत त्या कौरवपक्षाकडील महात्म्या भूरीचें धनुष्य तोडून टाकिलें. नंतर नऊ तीक्ष्ण बाणांनीं सात्यकीनें त्याच्या हृदयावर मारा केला आणि त्याला 'उभा रहा, उभा रहा' असें ओरडून सांगितलें. जरी तो शत्रुतापन भूरि बलवान् शत्रूकडून असा विद्ध झाला होता, तरी त्यानें दुसरें धनुष्य घेऊन सात्य-कीवर बाणांचा मार सुरू केला. हे राजन्, त्यानें तीन बाणांनीं सात्यकीला विद्ध केलें आणि भल्ल बाणानें त्याचें धनुष्य तोडून टाकलें. धनुष्य छिन्न होतांच सात्यकि अत्यंत क्षुब्ध झाला. त्यानें एक वेगवती शक्ति भूरीच्या वक्षः-स्थलावर फेंकली. त्याबरोबर तो भूरि दिव्य किरणांचा मंगळ तारा आका-शांतून पडावा, त्याप्रमाणें आपल्या उत्तम रथांतून दैवयोगानें एकाएकीं खालीं कोसळून पडला !

( २ ) हे नराधिपा, भूरीला मारलेला पाहतांच महारथी अश्वत्थामा सात्य-कीच्या रथाकडे वेगानें धांवला आणि "हे शैनेया, थांब, थांब" अशी त्यानें गर्जना केली. तेव्हां मेघ मेरुपर्वताला ज्याप्रमाणें वृष्टीनें आच्छादून टाकतो, त्याप्रमाणें आपल्या शरौघानें त्यानें त्यास झांकून टाकलें ! हे राजा, तो सव-कून सात्यकीच्या रथावर येत आहे, असें पाहून घटोत्कचानें मोठी गर्जना केली आणि त्याला म्हटलें " हे द्रोणपुत्रा, थांब, उभा रहा, तूं माझ्या हातून जीवंत सुटणार नाहींस. ज्याप्रमाणें षडाननानें महिषासुराचा वध केला, त्याप्रमाणें हा मी तुला मारितों ! मी आज तुझा सारा रणावेश नाहींसा करितों पहा ! "

क्रोधानें डोळे आरक्त करून तो शत्रुतापन घटोत्कच असें बोलला आणि गजश्रेष्ठावर जाणाऱ्या सिंहाप्रमाणें तो अश्वत्थाम्यावर धांवून गेला ! नंतर

रथाच्या आंसाएवढ्या बाणांनीं मेघधारांप्रमाणें त्यानें अश्वत्थाम्यावर वृष्टि केली. शरवृष्टि होऊं लागतांच सर्पसदृश बाणांनीं हंसतहंसतच द्रौणीनें ती तत्काळ नाहींशी केली. आणि शेंकडो तीक्ष्ण, मर्मभेदक व शीघ्रगामी बाणांनीं त्या अरिविमर्दक राक्षसाधिपति घटोत्कचाला त्यानें आच्छादून टाकलें. बाणांनीं व्याप्त होऊन पिसांनीं शोभणाऱ्या साळू पक्ष्याप्रमाणें तो युद्धांत शोभूं लागला. नंतर क्रुद्ध होऊन त्या प्रतापवान् भीमपुत्रानें वज्राप्रमाणें उग्र शरांनीं द्रौणीला छिन्न-भिन्न केलें आणि क्षुरप्रादि बाणांनीं त्यावर सारखी वृष्टि केली. वज्राप्रमाणें व मेघगर्जनेप्रमाणें गर्जना करीत ती अतुल शरवृष्टि अंगावर पडत असतां तो क्रोधसंतप्त अश्वत्थामा किमपिहि भ्याला नाहीं. त्या महातेजस्वी अश्वत्थाम्यानें दिव्यास्त्रमंत्रित घोर शरांच्या योगानें, वायु जसा मोठमोठ्या मेघांस नाहींसे करून टाकतो, त्याप्रमाणें ती दिव्य शक्ति उडविली ! हे महाराजा, इतक्यांत अंतरिक्षांत जणुंकाय बाणांची दुसरी लढाईच जुंपली. ती लढाई अतिभयंकर असून योद्ध्यांचा हर्ष वाढवणारी होती. त्यावेळीं अस्त्रांच्या संघर्षानें सर्वत्र ठिणग्या पडूं लागल्या. त्यामुळें रात्रीच्या प्रारंभीं आकाश जणुंकाय काजव्यांनींच भरून गेल्यासारखें दिसूं लागलें. नंतर द्रौणीनें आपल्या बाणसमूहांनीं सर्व दिशा व्यापून टाकिल्या आणि तुझ्या पुत्रांच्या कल्याणाकरितां त्या घटोत्कच राक्षसास बाणांनीं झांकून टाकिलें. त्या घोर रात्रीच्या वेळीं रणांगणांत अश्वत्थाम्याचें घटोत्कचाशीं युद्ध इंद्र व प्रह्लाद यांच्या युद्धासारखें झालें. तेव्हां घटोत्कचानें अतिसंतप्त होऊन द्रौणीच्या वक्षःस्थलावर प्रलयाग्नीसमान दहा तेजस्वी बाण मारले. त्या प्रचंड बाणांचा मारा होतांच तो महाबलवान् अश्वत्थामा समरांगणावर वाऱ्यानें हालणाऱ्या वृक्षाप्रमाणें कांपूं लागला आणि मूर्च्छा येऊन ध्वजयष्टीला धरून राहिला ! हे राजा, तेव्हां तुझ्या सैन्यांत सर्वत्र हाहाकार झाला आणि हे पृथ्वीपते, तुझ्या सर्व लोकांना द्रौणि मेला असें वाटलें. त्या युद्धांत द्रोणपुत्र अश्वत्थाम्याची तशी स्थिति झालेली पाहून पांचाल आणि सृंजय यांनींहि मोठा सिंहनाद केला.

तो महाबलिष्ठ अश्वत्थामा नंतर लवकरच शुद्धीवर आला. नंतर त्या शत्रुनाशनानें आपलें धनुष्य डाव्या हातानें घट्ट धरलें व आकर्ण ओढून एक यमदंडासारखा भयंकर उत्कृष्ट बाण त्या घटोत्कचावर सोडला. तो बाण घटोत्कचाच्या हृदयाचा भेद करून पिसाऱ्यासुद्धां जमिनींत शिरला ! त्यामुळें घटोत्कच मूर्च्छित होऊन रथपीठावर बसून राहिला. एवढा मोठा बलवान्

घटोत्कच त्या रणांत द्रोणपुत्राकडून विद्ध होऊन मूर्च्छित झाल्याचें पाहतांच त्याचा सारथि भिऊन गेला आणि त्यानें त्याला द्रोणपुत्रापासून दूर पळविलें ! हे भारता, नंतर तुझ्या पुत्रांनीं आणि सर्व योद्धयांनीं त्या द्रोणपुत्राचा गौरव केला. तेव्हां त्याचें शरीर मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी दिसूं लागलें.

( ३ ) इकडे भारद्वाजाच्या रथाजवळ भीमसेन युद्ध करीत असतां त्याच्यावर दुर्योधन राजानें स्वतः तीक्ष्ण शरांचा भडिमार केला. तेव्हां हे मारिषा, भीमानें त्यावर दहा बाण मारिले. मग आकाशांत मेघजालांचे योगानें जसे सूर्यचंद्र आच्छादून जातात, त्याप्रमाणें ते दोघे वीर समरांगणांत शरांनीं झांकून गेलेले दिसले. हे भरतश्रेष्ठा, मग दुर्योधन राजानें पांच बाणांनीं भीमसेनावर प्रहार करून ‘ अरे थांब, थांब ’ अशी मोठ्यानें गर्जना केली. भीमसेनानें दहा बाणांनीं दुर्योधनाचें धनुष्य आणि त्याचा ध्वज यांचा छेद करून नव्वद नतपर्व बाणांनीं त्या कौरवश्रेष्ठाला विद्ध केलें. तेव्हां दुर्योधनानें दुसरें मोठें धनुष्य घेतलें आणि तीक्ष्ण बाणांनीं सर्व योद्धयांच्या समक्ष त्या भीमसेनावर बाणांचा प्रहार सुरू केला. त्या बाणांचा भीमसेनानें भंग केला आणि मग त्यानें पंचवीस क्षुद्र बाण दुर्योधनावर टाकले. हे मारिषा, मग दुर्योधन भीमावर अतिशय संतापला आणि त्यानें एक क्षुरप्र बाण घेऊन भीमाचें धनुष्य छेदून टाकिलें. भीमसेनानें त्वरित दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या कौरवराजाला सात तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. परंतु दुर्योधनानें हां हां म्हणतां तेंहि धनुष्य छेदून टाकिलें ! हे महाराजा, ह्याप्रमाणें भीमानें जें जें धनुष्य घेतलें त्या त्या प्रत्येक धनुष्याचा त्या मदोत्कट व विजयेच्छु दुर्योधनानें भंग करून टाकावा, असें चाललें ! याप्रमाणें दुर्योधन आपलें धनुष्य पुनः पुनः छेदून टाकीत आहे, हें पाहून भीमसेनानें सर्वपारसवी नांवाची उत्कृष्ट शक्ति दुर्योधनावर टाकली. मृत्यूची प्रत्यक्ष बहीणच असलेली ती वह्निशिखेप्रमाणें प्रदीप्त शक्ति आकाशाचा भांग पाडीत दुर्योधनावर येऊं लागली ! परंतु ती शक्ति येण्यापूर्वीच दुर्योधनानें सर्व लोकांच्या व भीमसेनाच्या देखत तिचे तीन तुकडे करून टाकले. नंतर भीमानें आपली महाप्रभ व प्रचंड गदा घेतली आणि ती दुर्योधनाचे रथावर मोठ्या वेगानें फेंकली. तेव्हां त्या गदेनें रणांगणीं तुझ्या पुत्राचे अश्व, सारथि आणि रथ, यांचा चुराडा केला ! आणि हे राजेंद्रा, मग तुझा पुत्र भीमाच्या भीतीनें तेथून पळाला व महात्म्या नंदकाच्या रथावर चढून बसला ! नंतर तुझा महारथी पुत्र मेला, असें वाटून भीमानें त्या

रात्रीच्या वेळीं सर्व कौरवांना भिववीत सिंहनाद केला. हे राजा, तुझ्या सैनिकांनाहि तुझा पुत्र मेला, असें वाटून त्यांनीं सर्वत्र ' हायहाय ' असा आक्रोश केला! सर्व त्रस्त योद्धयांचा आर्तनाद आणि महात्म्या भीमसेनाची गर्जना ऐकून युधिष्ठिरालाहि दुर्योधन मेला, असेंच वाटलें आणि मग तो जेथें भीमसेन होता, तेथें वेगानें गेला. हे पृथ्वीपते, नंतर पांचाल, केकय, मत्स्य, हे द्रोणाबरोबर युद्ध करण्याच्या इच्छेनें त्यावर चालून गेले. त्या ठिकाणीं द्रोणाबरोबर शत्रूंचें फार मोठें भयंकर युद्ध जुंपलें आणि त्यांत दोन्ही पक्षांचे लोक घोर अंधकारांत निमग्न होऊन परस्परांवर प्रहार करूं लागले! ७. ६. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[१ सहदेवाचा पराभव. २ विराटाचा पराभव. ३ अलंबुषाचा पराभव.]

(१) संजय—पृथ्वीपते, द्रोणाला गांठण्याच्या इच्छेनें सहदेव धांवून येत असतां वैकर्तन कर्णानें त्याला अडवून धरिलें. तेव्हां सहदेवानें त्यावर नऊ बाण टाकले आणि नंतर दहा नतपर्व बाणांनीं त्याला विद्ध केलें. कर्णानेंहि सहदेवावर शंभर नतपर्व बाणांचा मारा केला आणि मोठ्या त्वरेनें त्याचें सज्ज धनुष्य शीघ्र तोडून टाकलें. नंतर त्या प्रतापवान् सहदेवानें दुसरें धनुष्य घेतलें आणि कर्णाला वीस बाण मारिले. तो त्याचा पराक्रम अत्यद्भुत झाला. मग सन्नतपर्व बाणांनीं कर्णानें त्याचे घोडे मारले आणि त्याच्या सारथ्याला त्वरित एका भल्लानें यमलोकीं पाठविलें! याप्रमाणें सहदेव विरथ झाल्यावर त्यानें ढाल व खड्ग घेतलीं. तीं देखील कर्णानें हंसतहंसतच बाण मारून तोडून टाकलीं. नंतर सहदेवानें प्रचंड, अतिघोर, सुवर्णविभूषित गदा घेऊन मोठ्या संतापानें वैकर्तन कर्णाच्या रथावर फेंकली. परंतु सहदेवानें फेंकलेली ती गदा कर्णानें बाणांनीं कुंठित करून जमिनीवर पाडली. आपली गदा फुकट गेल्याचें पाहून सहदेवानें त्वरेनें कर्णावर आपली शक्ति फेंकली. तिचाहि कर्णानें बाणांनीं नाश केला. हे महाराजा, मग सहदेवानें आपल्या सुंदर रथांतून खालीं उडी मारली आणि कर्ण नीट उभा आहे, असें पाहून सहदेवानें रथचक्र घेतलें आणि तें रणांत कर्णाच्या रथावर फेंकलें. तेव्हां उद्यत कालचक्राप्रमाणें आपल्यावर सहसा येणारें तें चक्र हजारों बाण मारून त्या सूतपुत्रानें छेदून टाकिलें. नंतर सहदेवानें दंड, दोऱ्या, जोकडें,

गजांचीं कलेवरें, मृत घोडे व मनुष्यें कर्णावर फेंकलीं, परंतु त्यानें बाणांनीं त्यांचाहि विध्वंस करून टाकला! मग निरायुध झालेल्या माद्रीसुतानें कर्णाच्या बाणांनीं व्यथित होऊन युद्ध करण्याचें सोडून दिलें. नंतर राधेय तत्काल त्याजवळ गेला आणि त्याला हंसून म्हणाला 'अरे भिऱ्या, आपल्यापेक्षां बलवानाशीं कधींहि युद्ध करूं नकोस! हे माद्रेया, आपल्या बरोबरीचे जे असतील, त्यांच्याशींच युद्धाला जा! माझ्या भाषणाविषयीं संशय घेऊं नकोस!' नंतर आपल्या उग्र धनुष्याच्या टोंकानें त्याला टोंचून म्हणाला, 'अरे हा अर्जुन रणांगणावर कौरवांशीं लढत आहे. हे माद्रीसुता, पाहिजे तर त्याच्याकडे जा, किंवा पसंत असल्यास घरीं निघून जा!''

याप्रमाणें बोलून त्या रथिश्रेष्ठ कर्णानें आपला रथ हांकिला आणि पांचाल व पांडव यांचीं सैन्यें दग्ध करीत तेथून निघाला. वध करण्याला सहदेव सांपडला असतांहि त्या महाकीर्तिमान्, शत्रुनाशन व सत्यसंध कर्णानें कुंतीचें भाषण स्मरून त्याचा वध केला नाहीं! हे राजन्, सहदेव अगदीं खिन्न होऊन गेला. आधींच तो शरपीडित झाला होता, तशांत कर्णाच्या वाग्बाणांनीं तप्त झाल्यामुळें त्याला आपला जीवहि नकोसा झाला होता. नंतर तो महारथी पंचालपुत्र जनमेजयाच्या रथावर मोठ्या त्वरेनें जाऊन बसला.

( २ ) इकडे विराट आपल्या सेनेसह वेगानें द्रोणावर चाल करून गेला असतां, मद्रराज शल्यानें त्या धनुर्धराला बाणांनीं आच्छादून टाकलें. हे राजा, ज्याप्रमाणें पूर्वीं जंभासुर व इंद्र यांचें युद्ध झालें, त्याप्रमाणें त्या दोघां महाधनुर्धरांचें समरांगणावर मोठें युद्ध जुंपलें. मद्रराजानें विराट सेनापतीवर शंभर नतपर्व बाणांचा मारा केला आणि हे राजन्, विराटानेंहि उलट नऊ तीक्ष्ण बाणांनीं त्याला विद्ध केलें. मग मद्रराजानें त्याचे चार अश्वांचा वध केला आणि दोन बाणांनीं त्याचा सारथि व ध्वज यांनाहि पाडिलें. तेव्हां त्या महारथानें रथांतून सत्वर खालीं उडी मारली आणि आपलें धनुष्य विस्फारीत व तीक्ष्ण शर सोडीत तो उभा राहिला!

आपल्या बंधूचे घोडे मारले गेले, असें पाहतांच शतानीक सर्व सैन्याच्या समक्ष आपला रथ तेथें घेऊन येऊं लागला. त्याला येतांना पाहून मद्रराज शल्यानें त्या महारणामध्यें त्याजवर पुष्कळ बाण मारून त्याला यमसदनीं पाठविलें! तो वीर हत झाला असतां रथिश्रेष्ठ विराट त्याच्या ध्वजचिह्नित रथावर जाऊन

बसला. त्यानें नेत्र वटारलेले होते व क्रोधातिरेकानें त्याचा उत्साहहि द्विगुणित झाला होता. त्यानें शल्याच्या रथावर बाणांचा वर्षाव केला. नंतर क्षुब्ध होऊन त्या शल्यानें एक नतपर्व बाण त्या सेनापति विराटाच्या उरःप्रदेशावर मारला. हे महाराजा, तो विराट राजा बाणाच्या योगानें अत्यंत विद्ध होऊन रथांतच पडून राहिला. हे भरतर्षभा, त्या विराटाला मोठी मूर्च्छा आली. हे भारता, त्या विद्ध झालेल्या विराट राजास त्याच्या सारथ्यानें रणांतून दूर नेलें. नंतर हे भारता, रणभूवर शल्यानें शेंकडो बाणांचा वर्षाव केल्यामुळें विराटाची ती मोठी सेना रात्रीं पळत सुटली !

( ३ ) हे राजश्रेष्ठा, पळत सुटलेली ती सेना पाहून जेथें तो शल्य व्यवस्थित उभा होता, तेथें कृष्ण व अर्जुन जाऊं लागले. इतक्यांत राक्षसाधिपति अलंबुष त्यांवर चालून आला. त्याचा रथ उत्कृष्ट असून त्याला आठ चक्रें होतीं, व अश्वांच्या तोंडांचे पिशाच्च त्याला जोडलेले होते. त्याच्या पताका रक्तानें भिजलेल्या असून रक्तपुष्पांच्या माळांनीं तो सुशोभित केला होता. त्याचा ध्वज उंच उभारलेल्या काठीवर असून, त्यावर भयंकर स्वरूपाचा, चित्रविचित्र पंखांचा, विशाल डोळयांचा, शब्द करणारा गृध्रपक्षी विराजमान झाला होता ! हे राजा, भिन्न अंजनपर्वताप्रमाणें तो काळाकुट्ट राक्षस त्या ध्वजाच्या योगानें शोभत होता ! ज्याप्रमाणें मोठा पर्वत वायूला अडवून धरितो, त्याप्रमाणें त्या अलंबुषानें अर्जुन येतांना त्याच्या मस्तकावर बाणांची वृष्टि करून त्याचें निवारण केलें. त्यावेळीं अर्जुन व तो अलंबुष राक्षस यांमध्यें भयंकर व घोर युद्ध झालें. तें युद्ध पाहून सर्व प्रेक्षक अति आश्चर्यचकित होऊन गेले ! त्याचप्रमाणें गृध्र, काक, बक, घुबड, कंक, कोल्हे हेहि परम हर्षित झाले ! हे भारता, त्या युद्धांत अर्जुनानें शंभर बाणांचा मारा त्या अलंबुषावर केला आणि नऊ तीक्ष्ण बाणांनीं त्याचा ध्वज छेदून टाकला, तीन बाणांनीं त्याच्या सारथ्याला मारलें, दुसऱ्या तीन बाणांनीं त्याचें त्रिवेणुक मोडलें, एका बाणानें त्याचें धनुष्य आणि चार शरांनीं हे भरतसत्तमा, त्याचे चार अश्व मारले ! पुनः अलंबुषानें धनुष्य सज्ज केलें, परंतु त्याचेहि अर्जुनानें दोन तुकडे करून टाकले ! तेव्हां विरथ झालेल्या त्या अलंबुषानें खड्ग उगारिलें, त्याचेहि अर्जुनानें एक बाण मारून दोन तुकडे केले ! हे भरतर्षभा, नंतर अर्जुनानें चार तीक्ष्ण बाण त्या राक्षसावर टाकले आणि त्यामुळें तो विद्ध होऊन भीतीनें रणांगणांतून पळत सुटला !

राजा, याप्रमाणें त्या अलंबुष राक्षसाला जिंकून तो अर्जुन नर, अश्व आणि गज यांवर आपल्या बाणांचा प्रहार करीत द्रोणाजवळ त्वरेनें गेला आणि हे महाराजा, त्या यशस्वी अर्जुनाकडून मारले जाणारे तुझे सैनिक वाऱ्यानें कोसळून पडणाऱ्या वृक्षांप्रमाणें भूमीवर पडूं लागले ! हे नृपते, महावीर अर्जुन याप्रमाणें तुझ्या पुत्राचे सैन्यास मारूं लागला असतां, तें सर्व सैन्य पळून गेलें ! ७. ५. १६७.

---

## अध्याय १६८ वा.

[ १ शतानीक-चित्रसेनयुद्ध. २ द्रुपद-वृषसेनयुद्ध. ३ प्रतिविन्ध-दुःशासनयुद्ध. ]

( १ ) संजय—हे भारता, तुझ्या सेनेला शतानीक आपल्या बाणांनीं दग्ध करीत असतां, तुझ्या चित्रसेन पुत्रानें त्याचें निवारण केलें. तेव्हां त्या नकुलपुत्र शतानीकानें चित्रसेनावर पांच बाण टाकिले व चित्रसेनानेंहि त्यावर दहा बाण मारले, आणि पुनः हे महाराजा, नऊ तीक्ष्ण बाणांनीं युद्धांत त्याच्या वक्षःस्थलावर चित्रसेनानें प्रहार करून त्यास विद्ध केलें ! मग नकुलपुत्रानें नतपर्व बाणांनीं त्याचें कवच त्याच्या शरीरापासून दूर उडवून दिलें ! तें त्याचें कृत्य अत्यद्भुत झालें ! हे नृपा, तुझ्या पुत्राचें कवच नाहींसें झाल्यामुळें, योग्य वेळीं कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें तो विशेष तेजस्वी दिसूं लागला. नंतर नकुलपुत्रानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें त्याच्या ध्वजाचा छेद केला आणि हे महाराजा, मोठ्या उत्साहानें युद्ध करीत असतां त्याचें धनुष्यहि तोडलें ! मग धनुष्यहीन व कवचहीन झालेल्या त्या नरश्रेष्ठ चित्ररथानें दुसरें शत्रुनिवारक धनुष्य घेतलें आणि हे मारिषा, त्या भरतकुलोत्पन्न महारथानें त्वरेनें क्रोधानें नऊ बाण टाकून शतानीकाला विद्ध केलें. त्यामुळें हे महाराजा, चित्ररथावर अत्यंत संतप्त होऊन त्या नरोत्तमानें त्याचे चार अश्व आणि सारथि यांना मारलें ! मग महारथि चित्ररथानें आपल्या रथांतून खालीं उडी टाकली आणि त्या महाबलिष्ठानें पंचवीस बाणांनीं नकुलपुत्राला विद्ध केलें. याप्रमाणें युद्ध करितांना त्याचें रत्नविभूषित धनुष्य शतानीकानें रणांत अर्धचंद्र बाणानें तोडून टाकिलें ! तेव्हां तो विरथ चित्ररथ महात्म्या कृतवर्म्याच्या रथावर चढला.

( २ ) इकडे महारथी द्रुपद आपल्या सेनेसह द्रोणास गांठण्याच्या इच्छेनें चाल करून येत असतां त्यावर वृषसेन शेंकडो बाणांची वृष्टि करीत धांवून

आला, तेव्हां द्रुपदानें महारथी कर्णपुत्राचे बाहू व उरःप्रदेश यांवर साठ बाणांनीं प्रहार केला. हे अनघा, वृषसेनानेंहि अतिसंतप्त होऊन त्या रथांत बसलेल्या द्रुपदाचे हृदयावर पुष्कळ तीक्ष्ण बाण मारले. ते बाण त्या दोघांच्या शरीरांत कांट्यांप्रमाणें रुतून बसले ! हे महाराजा, त्यामुळें पिसाऱ्यानें शोभणाऱ्या साळू पक्ष्यांप्रमाणें ते दिसूं लागले ! त्या महायुद्धामध्यें देदीप्यमान अग्रांच्या, सुवर्णपुंखांच्या बाणांनीं त्यांचीं कवचें विदीर्ण होऊन ते रक्तानें माखून गेले होते, व त्यामुळें ते रणांत विशेष प्रकाशत होते ! सुवर्णासमान कांतीनें शोभणारे ते दोघे वीर अद्भुत कल्पवृक्षांप्रमाणें किंवा प्रफुल्लित किंशुकवृक्षांप्रमाणें शोभूं लागले. नंतर हे राजा, वृषसेनानें नऊ बाणांनीं त्या द्रुपदाला विद्ध केलें आणि हजारों बाण त्यावर फेंकले! त्यावेळीं हे महाराजा, तो कर्णपुत्र जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें दिसत होता. द्रुपद त्या योगानें अत्यंत क्रुद्ध झाला. त्यानें एक तीक्ष्ण भल्ल बाण टाकून त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले. नंतर कर्णपुत्रानें दुसरें सुवर्णबद्ध नवीन बळकट धनुष्य घेतलें आणि एक लखलखीत व तीक्ष्ण भल्ल बाण द्रुपदावर सोडला. त्या बाणानें सर्व सोमकांस भयभीत करून सोडलें. तो बाण द्रुपदाचें हृदय विद्ध करून जमिनींत शिरला ! वृषसेनाच्या बाणानें विद्ध झालेला द्रुपद राजा संज्ञाहीन झालेला पाहून सारथ्यानें मोठ्या कौशल्यानें त्याला रणांतून दूर पळविलें. राजेंद्रा, पांचालांचा महारथी याप्रमाणें पराभव पावला असतां, ज्याचीं कवचें बाणांनीं भिन्न होऊन गेलीं आहेत, असें तें द्रुपदसैन्य त्या भयंकर रात्रीच्या वेळीं पळून गेलें ! त्यांतील सैनिकांनीं आपले दीप टाकले नसल्यामुळें सभोंवतीं पेटणाऱ्या त्या दीपांनीं ती भूमि निरभ्र आकाश नक्षत्रांमुळें जसें शोभतें त्याप्रमाणें शोभत होती. तसेंच हे महाराजा, भूमीवर पडलेल्या बाहुभूषणांनीं ती पृथ्वी वर्षा-ऋतूंतील विद्युद्युक्त मेघांप्रमाणें दिसत होती. नंतर कर्णसुताला भ्यालेले ते सोमक तारकासुराचे वेळीं इंद्राच्या भीतीनें पळून गेलेल्या दानवांप्रमाणें त्वरेनें पळून गेले ! हे महाराजा, त्या वृषसेनापासून पीडा पावलेले ते सोमक पळूं लागले, तेव्हां त्यांजवळ असलेल्या दीपांच्या प्रकाशानें ते पळत असल्याचें दिसून येत असे ! हे भारता, कर्णपुत्र वृषसेनानें त्यांस रणांत जिंकल्यावर तो मध्याह्नीच्या सूर्याप्रमाणें रणांगणावर शोभूं लागला. त्या तुझ्याकडील व शत्रूकडील हजारों राजांमध्यें तो एकटा प्रतापशाली वृषसेनच त्यावेळीं प्रकाशत होता. रणांत याप्रमाणें

सोमकांच्या शूर व महारथी वीरांस जिंकल्यावर तो वृषसेन जेथें युधिष्ठिर राजा होता, तेथें त्वरित गेला.

( ३ ) क्रोधाविष्ट प्रतिविंध्य रणांत शत्रूंना जाळून टाकीत असतां तुझा पुत्र महारथी दुःशासन त्यावर चालून गेला. हे राजा, त्या दोघां वीरांचा समागम निरभ्र आकाशांतील सूर्य-बुधांच्या संगमाप्रमाणें विस्मयकारक झाला. प्रतिविंध्य रणांगणीं दुष्कर कर्म करीत असतां दुःशासनानें तीन बाणांनीं त्याच्या मस्तकावर प्रहार केला. तुझ्या महाबलिष्ठ व धनुर्धर पुत्रानें अतिविद्ध केलेला तो प्रतिविंध्य तीन शिखरांच्या पर्वताप्रमाणें शोभूं लागला. मग त्या महारथी प्रतिविंध्यानें दुःशासनाला नऊ बाणांनीं विद्ध करून त्यावर पुनः आणखी सात बाण टाकले. तेव्हां हे भारता, तुझ्या पुत्रानें तेथें मोठें दारुण कर्म केलें! उग्र बाण टाकून त्यानें प्रतिविंध्याचे अश्व पाडले, एका भल्ल बाणानें त्याचा सारथि व ध्वज यांना उडवून दिलें आणि त्या धनुर्धराच्या रथाचे तिळाएवढाले तुकडे करून टाकले! तसेंच हे प्रभो, त्या दुःशासनानें त्याच्या पताका, भाते, रश्मि व रज्जु यांचे क्रोधानें नतपर्व बाणांनीं तुकडे तुकडे करून टाकिले. मग तो धर्मात्मा विरथ झाला असतांहि हातांत धनुष्य घेऊन उभा राहिला आणि वारंवार शंभर शंभर बाण मारून तुझ्या पुत्राशीं लढूं लागला. परंतु तुझ्या पुत्रानें एक क्षुरप्र बाण टाकून त्याचें धनुष्य तोडलें आणि त्या धनुष्यहीन वीरावर दहा बाण मारले. मग तो विरथ झालेला पाहून त्याचे महारथी बंधु मोठ्या सेनेसह वेगानें त्याकडे आले. नंतर तो सुतसोमाच्या तेजस्वी रथावर चढून बसला आणि धनुष्य घेऊन तुझ्या पुत्रावर बाण मारूं लागला. नंतर तुझे सर्व योद्धे मोठ्या सैन्यासह तुझ्या पुत्रास वेढून युद्ध करूं लागले. हे भारता, त्या रात्रीच्या भयंकर वेळीं तुझ्या पुत्रांचें व त्यांचें यमराष्ट्राची वृद्धि करणारें मोठें युद्ध प्रवृत्त झालें. ७. ६. १६८.

---

## अध्याय १६९ वा.

[ १ शकुनीचा नकुलाकडून पराजय. २ शिखंडीचा कृपाचार्याकडून पराजय. ३ युद्धवर्णन. ]

( १ ) संजय—नकुल तुझ्या सेनेचा क्रोधावेशानें घात करीत असतां त्यावर सौबल शकुनि रागानें धांवून आला आणि त्यानें ‘थांब, थांब,’ असें त्याला सांगितलें. त्या दोघां वीरांचें परस्परांशीं वैर असल्यामुळें ते अन्योन्यांच्या

वधाच्या इच्छेनें एकमेकांवर बाण टाकूं लागले. राजा, नकुल जसा सारखा शरवर्षाव करीत होता, तसाच सौबलहि युद्धामध्यें आपलें कौशल्य दाखवीत होता. हे महाराजा, त्यावेळीं ते दोघे वीर, बाणरूपी कंटकांनीं विद्ध होऊन, पिसांनीं शोभणाऱ्या साळू पक्ष्यांप्रमाणें समरांत शोभूं लागले! सरळ अग्रांच्या सुवर्णपुंख बाणांनीं त्यांचीं कवचें फुटून गेलीं; रक्तस्रावानें भिजलेले ते वीर महायुद्धामध्यें प्रकाशूं लागले! हे महाराजा, सुवर्णतुल्य कांतिमान् व विचित्र आकाराचे ते दोघे वीर रणांगणावर कल्पवृक्षांप्रमाणें किंवा प्रफुल्लित किंशुक-वृक्षांप्रमाणें दिसूं लागले. अंगांत शर रुतल्यामुळें ते दोघे शूर रणांत कंटकांनीं फुलून गेलेल्या सांवरीच्या वृक्षांप्रमाणें भासूं लागले! डोळे वटारून एकमेकां-कडे सारखी नजर लावून पहाणारे ते वीर, क्रोधानें आरक्त झालेल्या डोळ्यांनीं जणुंकाय परस्परांस जाळीतच आहेत कीं काय, असा भास होत होता. तुझ्या श्यालकानें क्रोधाविष्ट होऊन माद्रीसुताला हंसतच एका कर्णाकार तीक्ष्ण बाणानें हृदयाच्या ठिकाणीं विद्ध केलें. तेव्हां तो नकुल रथोपस्थावरच पडून राहिला व त्याला प्रबळ मूर्च्छा आली. हे राजा, आपल्या अत्यंत वैरी व गर्विष्ठ शत्रूची मूर्च्छित झालेली अवस्था पाहून ग्रीष्मऋतूच्या शेवटीं गर्जना कर-णाऱ्या मेघाप्रमाणें शकुनीनें गर्जना केली. इतक्यांत पांडुपुत्र नकुल देहभाना-वर आला आणि मुख पसरून राहिलेल्या अंतकाप्रमाणें शकुनीवर पुनः धांवून गेला. हे भरतर्षभा, त्यानें क्षुब्ध होऊन शकुनीवर साठ बाण टाकिले आणि पुनः शंभर नाराच बाण त्याच्या वक्षःस्थलावर मारिले. नंतर त्यानें त्याचें सशर धनुष्य मुष्टिप्रदेशींच तोडून टाकिलें आणि त्वरेनें ध्वज छेदून टाकून रथाखालीं पाडविला! नंतर एका तीक्ष्ण, पाणीदार व अणकुचीदार बाणानें त्या पांडुपुत्र नकुलानें सपक्ष श्येनपक्ष्याचा बाणानें जसा भेद करावा, त्या-प्रमाणें त्याच्या दोन्ही मांड्या फोडून त्याला पाडविलें! हे महाराजा, तेव्हां तो अतिविद्ध होऊन कामुक कामिनीला जसा आलिंगन देतो, त्याप्रमाणें ध्वजयष्टीला दृढ धरून रथांतच पडून राहिला. हे अनघा, तुझा तो श्यालक मूर्च्छित झालेला पाहून सारथ्यानें त्वरित रथ हांकून सेनेच्या अग्रभागापासून त्याला दूर पळवून नेलें! नंतर पांडव आणि त्यांचे अनुचर यांनीं मोठ्यानें गर्जना केली. तो शत्रुतापन नकुल शत्रूला रणांत जिंकिल्यावर क्रोधानें सारथ्याला बोलला, 'अरे, मला द्रोणसैन्याकडे घेऊन चल!' तें त्या माद्रीसुताचें भाषण ऐकून तो सारथि जेथें द्रोण होता, तेथें त्याला घेऊन गेला.

( २ ) हे राजा, रणांत द्रोणाचार्याला गांठण्याची शिखंडी इच्छा करीत असतां कृपाचार्य मोठ्या वेगानें त्यावर चालून आला. द्रोणाच्या सैन्याकडे तो शत्रुदमन गौतम त्वरेनें येत असतां शिखंडीनें हंसतच त्याजवर नऊ भल्ल-बाणांचा प्रहार केला. मग हे महाराजा, तुझ्या पुत्रांचें कल्याण करणाऱ्या कृपाचार्यानें त्यावर पांच बाण मारून पुनः आणखी वीस बाण टाकले. त्यांचें तें अत्यंत घोर व भयानक युद्ध, देवासुरांच्या युद्धकालीं शंबर व इंद्र यांमध्यें झालेल्या समराप्रमाणें झालें. त्या युद्धदुर्मद दोघां महारथी वीरांनीं ग्रीष्म-ऋतूच्या अंतकालीन घनांप्रमाणें शरजालांनीं आकाश व्यापून टाकिलें. त्यामुळें आधींच तें घोर आकाश पुनः अधिकच भयंकर दिसूं लागलें. हे भरतश्रेष्ठा, ती रात्र त्या युद्धशाली योद्ध्यांना कालरात्रीप्रमाणें घोर व महाभयंकर झाली. हे महाराजा, गौतमानें बाण लावून सज्ज केलेलें प्रचंड धनुष्य शिखंडीनें अर्धचंद्र बाणानें तोडून टाकिलें. तेव्हां हे राजा, क्रुद्ध होऊन कृपाचार्यानें सोन्याच्या दांड्याची, तीक्ष्ण अग्राची दारुण शक्ति त्यावर फेंकली! ती आपल्यावर येणारी शक्ति शिखंडीनें पुष्कळ बाण मारून छेदून टाकली. तेव्हां ती छिन्न होऊन जमिनीवर पडली. नंतर त्या रथिश्रेष्ठ गौतमानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तीक्ष्ण बाणांनीं शिखंडीला आच्छादून टाकिलें. अशा रीतीनें त्या यशस्वी गौतमानें रणांत बाणाच्छादित केलें असतां तो रथिश्रेष्ठ शिखंडी रथोपस्थावरच बसून राहिला. मग हे भारता, युद्धांत कष्टी झालेल्या त्या शिखंडीला पाहून शारद्वत कृपाचार्य त्याचा वध करण्याच्या इच्छेनें त्यावर पुष्कळ बाण मारूं लागला. नंतर तो महारथी याज्ञसेनि रणांत विमुख झालेला पाहून त्याला चारी बाजूंनीं सोमक व पांचाल यांनीं वेढिलें. त्याप्रमाणें तुझे पुत्रहि त्या द्विजश्रेष्ठासभोंवतीं आपल्या मोठ्या सैन्यासह जमा झाले. नंतर फिरून युद्धास आरंभ झाला.

( ३ ) हे राजन्, एकमेकांवर धांवून जाणाऱ्या रथांचा आवाज मेघग-र्जनेप्रमाणें तुमुल होऊं लागला आणि हे राजेंद्रा, एकमेकांवर चालून जाणारे अश्व व गज यांच्या योगानें तें रणांगण अत्यंत भयानक दिसूं लागलें. तसेंच परस्परांवर तुटून पडणाऱ्या पदातींच्या पादशब्दानें पृथ्वी भयत्रस्त झालेल्या स्त्रीप्रमाणें कांपूं लागली. हे राजा, रथी अतिशय वेगवान् रथांत बसून मोठ्या वेगानें जात असतां त्यांनीं कावळे ज्याप्रमाणें टोळांस पकडतात, त्याप्रमाणें पुष्कळ रथस्वामींस धरिलें. हे भारता, तसेंच मदस्रावी महागजांनीं

दुसऱ्या मदस्रावी गजांना त्या ठिकाणीं अडवून ठेवलें. सादींनीं सादींना व पदातींनीं पदातींना गांठलें. अगदीं खवळून जाऊन ते परस्परांशीं लढले, परंतु कोणी कोणाचा पराजय करूं शकले नाहींत. तेथें एकमेकांवर धांवून जात असतां, पळून जात असतां, व पुनः मागें फिरून जात असतां, त्या सैन्याचा रात्रीच्या वेळीं मोठा घोर आवाज होत होता. हे महाराजा, रथ, गज आणि अश्व यांवर पेटत असलेले प्रदीप, आकाशांतून पडलेल्या मोठ्या उल्कांप्रमाणें दिसूं लागले. हे भरतश्रेष्ठा, दीपांनीं प्रकाशमान झालेली ती रात्र त्या रणाग्रभागीं दिवसाप्रमाणेंच भासत होती. ज्याप्रमाणें पृथ्वीवरील अंधकार सूर्याच्या योगानें नाहींसा होतो, त्याप्रमाणें जिकडे तिकडे जळत असलेल्या प्रदीपांनीं त्या ठिकाणचा अंधकार नाहींसा झाला. आकाश, पृथ्वी, दिशा व उपदिशा, अंधकार व धूळ यांनीं भरून गेल्या होत्या, त्या पुनः या दीपप्रकाशानें प्रकाशित झाल्या. त्याचप्रमाणें महात्म्यांचीं अस्त्रें, कवचें व अंगांवरील रत्नें यांचीं तेजें त्या प्रदीपांच्या प्रभेमध्यें लोपून गेलीं. हे भारता, संध्यासमयीं तें युद्ध सुरू होऊन एकच कोलाहल झाला असतां, मी कोण हेंहि कोणास समजेना ! हे भरतसत्तमा, त्या रणांत पित्यानें पुत्रास मारिलें, पुत्रानें मोहवशात् पित्याला मारिलें, मित्रानें मित्राचा वध केला, मामानें भाच्याचा प्राण घेतला आणि भाच्यानें मामाला ठार केलें. आपले आपल्यांचा वध करूं लागले आणि शत्रुहि आपल्यांतच एकमेकांना मारूं लागले! अशा प्रकारें त्या रात्रीं भीरूंना भयानक वाटणारें असें अमर्याद युद्ध झालें ! ७. ६. १६९.

---

## अध्याय १७० वा.

[ १ द्रोण-धृष्टद्युम्नादिकांचें संकुल युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराजा, तें अत्यंत तुमुल आणि भीतिजनक युद्ध प्रवृत्त झालें असतां धृष्टद्युम्न द्रोणाकडे निघाला. आपलें उत्तम धनुष्य सज्ज करून त्याची दोरी वरचेवर खेंचीत तो सुवर्णविभूषित द्रोणाच्या रथावर चालून आला. हे महाराजा, द्रोणाच्या वधेच्छेनें तो येत असतां पांचालांनीं आणि पांडवांनीं द्रोणाला वेढा दिला. आचार्यश्रेष्ठ द्रोण वेष्टित झालेला पाहून तुझ्या पुत्रांनीं रणांगणांत मोठ्या दक्षतेनें त्याचें सर्व बाजूंनीं रक्षण केलें. नंतर

वाऱ्यानें उसळून जाऊन ज्यांतील जीव क्षुब्ध होऊन गेले आहेत, अशा दोन भयंकर समुद्रांप्रमाणें ते सेनासागर परस्परांवर चालून आले. हे महाराजा, नंतर धृष्टद्युम्नानें पांच बाण द्रोणाच्या हृदयावर शीघ्र मारिले आणि सिंहनाद केला. हे भारता, द्रोणानेंहि पंचवीस बाण मारून त्याला रणांत विद्ध केलें. त्यानें एका भल्ल बाणानें त्याचें मोठा नाद करणारें धनुष्य तोडून टाकिलें. हे भरतर्षभा, अशा रीतीनें द्रोणानें विद्ध केलें असतां धृष्टद्युम्नानें ओंठ चावीत चावीत आपलें धनुष्य तत्काल टाकून दिलें व नंतर त्या प्रतापवान् क्रुद्ध धृष्टद्युम्नानें द्रोणाचा वध करण्याच्या इच्छेनें दुसरें एक उत्कृष्ट धनुष्य घेतलें आणि तें आकर्ण ओढून प्राणांतकारक एक घोर बाण द्रोणावर सोडला! त्या बलवान् वीरानें महारणांत टाकलेल्या त्या भयंकर बाणानें, उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें, तें सर्व सैन्य प्रकाशित करून सोडलें. हे राजा, तो भयंकर बाण पाहून देव, गंधर्व आणि मानव 'युद्धांत द्रोणाचें कल्याण असो!' असें म्हणूं लागले. तो बाण आचार्यांच्या रथाकडे येत आहे, असें पाहून कर्णानें मोठ्या त्वरेनें त्याचे बारा तुकडे केले! हे राजा, त्या धनुर्धर सूतपुत्रानें छिन्न केलेला तो बाण निर्विष सर्पाप्रमाणें सत्वर खालीं पडला! नंतर कर्णानें दहा बाणांनीं धृष्टद्युम्नाला विद्ध केलें. द्रोणपुत्रानें पांच, द्रोणानें स्वतः सात, शल्यानें दहा, दुःशासनानें तीन, दुर्योधनानें वीस आणि शकुनीनें पांच बाण, याप्रमाणें त्या सर्व महारथींनीं धृष्टद्युम्नावर बाणांचा वर्षाव केला. त्या भयंकर सात वीरांनीं द्रोणाकरितां महारणांत त्या धृष्टद्युम्नाला विद्ध केलें. तरीहि हे राजा, यत्किंचितहि न भितां त्यानें त्या सर्वांवर तीन तीन बाण टाकले. त्यानें द्रोण, द्रोणपुत्र, कर्ण आणि तुझा पुत्र दुर्योधन यांचा वेध केला. त्या धनुर्धराकडून ते विद्ध झाले असतां त्यांतील प्रत्येक महारथी वीरानें रणांत धृष्टद्युम्नाला पुनः पांच पांच बाण मारिले आणि हे राजा, द्रुमसेनानें संक्रुद्ध होऊन एक बाण त्यावर मारून त्याला विद्ध केलें आणि तत्काल दुसरे तीन बाण मारून त्याला 'उभा रहा, उभा रहा' असें सांगितलें! त्या युद्धांत सात्यकीनें शीघ्रगामी तीन बाण त्यावर टाकून त्याला विद्ध केलें आणि त्या वीर्यवानानें पुनः एका भल्लानें द्रुमसेनाचें सोन्याच्या उज्वल कुंडलांनीं सुशोभित मस्तक त्याच्या देहापासून कापून काढलें! ज्यानें दंतांनीं ओष्ठपुटांचा चावा घेतला आहे, असें तें मस्तक सोसाट्याच्या वाऱ्यानें पडलेल्या पक्क ताडफळाप्रमाणें रणभूमीवर कोसळून पडलें!

पुनः त्या वीर धृष्टद्युम्नानें आपल्या अत्यंत तीक्ष्ण बाणांनीं त्या योद्ध्यांस विद्ध करून नानाप्रकारांनीं युद्ध करणाऱ्या कर्णाचें धनुष्य भल्लांनीं तोडून टाकलें. मोठ्या सिंहाचें शेंपूट पूर्ण तोडलें असतां तें जसें त्याला सहन होत नाहीं, त्याप्रमाणें आपलें धनुष्य तोडलेलें कर्णाला सहन झालें नाहीं. त्यानें दुसरें धनुष्य घेतलें आणि क्रोधानें नेत्र वटारून निश्वास टाकीत व शरवृष्टि करीत तो महाबलिष्ठ धृष्टद्युम्नावर धांवून आला. कर्ण क्षुब्ध झालेला पाहून ते सहा महारथी वीर पांचालपुत्र धृष्टद्युम्नास मारण्याच्या इच्छेनें त्वरेनें त्यास वेढा देऊन राहिले. तुझ्या सहा प्रमुख योद्ध्यांच्या हातांत धृष्टद्युम्न सांपडल्यामुळें तो मृत्युमुखींच पडला, असें आम्हांला वाटलें !

इकडे ह्याच वेळीं दाशार्ह सात्यकि बाण टाकीत पराक्रमी धृष्टद्युम्नाजवळ येऊन पोंचला. तो महाधनुर्धर व युद्धदुर्मद सात्यकि येत असतां राधेय कर्णानें दहा सरलगामी बाणांनीं त्यावर प्रहार केला. हे महाराजा, सात्यकीनें कर्णास दहा बाण मारून सर्व वीर पहात असतां विद्ध केलें आणि 'अरे, जाऊं नकोस, उभा रहा,' अशी गर्जना केली. हे राजा, त्या बलवंत सात्यकीचा आणि महात्म्या कर्णाचा बलि आणि वासव यांसारखा समागम झाला. आपल्या रथघोषानें क्षत्रियांस त्रासविणाऱ्या त्या क्षत्रियश्रेष्ठ सात्यकीनें महारथी कर्णावर बाणांचा वर्षाव केला. हे महाराजा, आपल्या धनुष्याच्या घोषानें पृथ्वी कांपवून सोडणारा बलिष्ठ सूतपुत्र कर्णहि सात्यकीशीं युद्धाला प्रवृत्त झाला. त्यानें सात्यकीवर अनेक बाणांचा वर्षाव केला. तसेंच त्या वृष्णिश्रेष्ठ सात्यकीनें देखील समरांत कर्णावर शरवृष्टि केली. अशा प्रकारें त्यांचें तें युद्ध बरोबरीचें झालें.

हे महाराजा, मग तुझे मुलगे आणि कर्णाचा कवच घालून सज्ज झालेला पुत्र यांनीं सात्यकीवर चोहों बाजूंनीं तीक्ष्ण बाणांचा सारखा भडिमार केला. परंतु हे प्रभो, प्रत्यस्त्रांनीं त्यांच्या व कर्णाच्या अस्त्रांचें निवारण करून क्रोधानें सात्यकीनें वृषसेनाच्या छातीवर प्रहार केला ! राजेंद्रा, त्या बाणानें तो वीर्यवान् वृषसेन विद्ध झाला व हातांतील धनुष्य टाकून रथांत मूर्च्छित पडला ! तेव्हां महारथ वृषसेन मृत्यु पावला, असें समजून पुत्रशोकानें व्यथित झालेला कर्ण सात्यकीस पीडा देऊं लागला. कर्णाकडून पीडित झालेल्या त्या महारथी युयुधानानें कर्णावर पुनःपुनः त्वरेनें बाणांचा वर्षाव केला. कर्णाला दहा बाणांनीं व वृषसेनाला सात बाणांनीं विद्ध करून सात्यकीनें त्यांचीं हस्तकवचें

व धनुष्यें तोडून टाकलीं. तेव्हां त्यांनीं शत्रूंना भयदायक अशीं दुसरीं धनुष्यें सज्ज केलीं आणि युयुधानावर समंततः तीक्ष्ण बाण मारून त्याला विद्ध केलें !

हे राजन्, वीराग्रणींचा क्षय करणारें तें युद्ध प्रवृत्त झालें असतां गांडीव-धनुष्याचा मोठा ध्वनि ऐकूं येऊं लागला. तेव्हां रथाचा घोष आणि गांडीवाचा ध्वनि ऐकून सूतपुत्र कर्ण दुर्योधनाला बोलला, "हा महाधनुर्धर पार्थ सर्व सेनांचा पराभव करून व मुख्य-मुख्य नरश्रेष्ठांचा व पुरुकुलोत्पन्नांचा वध करून आपलें उत्तम धनुष्य गरगर फिरवीत राहिला आहे. त्याच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार आणि मेघांच्या गडगडाटासारखा रथघोष ऐकूं येत आहे. अर्जुन आपणाला योग्य असा पराक्रम करून दाखवीत आहे. हे राजा, यानें भारती सेना अनेक प्रकारांनीं कशी विदीर्ण करून सोडली आहे, पहा ! सर्वत्र उधळून टाकलेलीं सैन्यें कांहीं केल्यानें स्थिर राहूं शकत नाहींत ! वायूनें विदीर्ण झालेल्या अभ्रजालाप्रमाणें त्यांची तुटातूट झाली आहे. सव्यसाची अर्जुन दृष्टीस पडतांच समुद्रांतील फुटलेल्या नौकेप्रमाणें यांची स्थिति झाली आहे. हे राजा, पळून जाणाऱ्या व गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं विद्ध झालेल्या वीराग्रणींच्या गर्जना ऐकूं येत आहेत ! हे राजशार्दूला, रात्रीं आकाशांत होणाऱ्या मेघगर्जनेसमान अर्जुनाच्या रथाजवळ होणारा दुंदुभिघोष ऐक ! तसेंच हाहाकार व अनेक प्रकारचे सिंहनाद त्याच्या रथाजवळ होत आहेत, ते श्रवण कर ! सात्वतांमधील श्रेष्ठ हा सात्यकि आमच्या मध्यभागीं आहे पहा ! येथें हें सात्यकिरूप लक्ष्य आपल्या हातीं लागल्यास आम्ही सर्व शत्रूंना जिंकूं. तसा मोठमोठ्या रथिश्रेष्ठ शूरांनीं सर्व बाजूंनीं वेढिलेला हा पांचाल राजपुत्र धृष्टद्युम्न द्रोणाशीं भिडला आहे. त्या सात्यकीला व पार्षत धृष्टद्युम्नाला आम्ही मारूं शकूं, तर हे महाराजा, आमचा निःसंशय जय होईल. म्हणून हे महाराजा, या महारथी वीर वृष्णि-पार्षतांना वेढून सौभद्राप्रमाणें मारण्याचा प्रयत्न आम्ही करितों. हे भारता, अनेक कुरुश्रेष्ठ वीरांशीं सात्यकि भिडला आहे, हें जाणून हा सव्यसाची अर्जुन समोर द्रोणसैन्याकडे येत आहे पहा. म्हणून सात्यकीला पुष्कळांनीं वेढून टाकिल्याचें अर्जुनाला समजण्याआधींच अनेक मुख्य-मुख्य रथिश्रेष्ठांनीं तिकडे जाऊन त्वरित बाण सोडावे. हे महाराजा, जेणेंकरून हा मधुकुलोत्पन्न सात्यकि येथेंच परलोकाला जाईल, अशी कांहींतरी योग्य युक्ति शोधून काढ !"

हे राजा, कर्णाचे मताचा स्वीकार करून तुझा पुत्र दुर्योधन पूर्वी रणांत यशस्वी विष्णूशीं भाषण करणाऱ्या इंद्राप्रमाणें शकुनीला असें म्हणाला— "कधींहि परत न फिरणारे दहा हजार गज आणि हजारों रथी घेऊन तूं अर्जुनावर चालून जा. दुःशासन, दुर्विषह, सुबाहु आणि दुःप्रधर्षण हे पुष्कळ पदातींसह तुझ्या मागून येतील. हे महाबाहो मातुला, तूं कृष्णार्जुनांना आणि त्या धर्मराजाला जिंक. त्याचप्रमाणें नकुल-सहदेवांना आणि भीमसेनालाहि जिंकून टाक. देवांची जयाशा जशी देवेंद्रावर होती, त्याचप्रमाणें माझी सर्व आशा तुझ्यावर आहे. ज्याप्रमाणें इंद्रानें असुरांस जिंकिलें, त्याप्रमाणें तूं सर्व कौंतेयांना जिंक!"

हे प्रभो, याप्रमाणें दुर्योधनानें सांगितलें असतां, तुझ्या पुत्रांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें तो शकुनि तुझ्या पुत्रांसह मोठें सैन्य घेऊन पांडुनंदनांना दग्ध करण्याकरितां निघाला. हे राजा, मग तो सौबल पांडवांच्या सैन्यावर चाल करून गेला असतां तुझ्या लोकांचें शत्रुसैन्याशीं युद्ध जुंपलें. इतक्यांत सूतपुत्र कर्णहि मोठ्या सैन्यासह शेंकडो बाण टाकीत सात्यकीवर शीघ्र धांवून आला. त्यानंतर सर्व राजांनींहि सात्यकीला वेढून टाकलें. नंतर भारद्वाज द्रोण धृष्टद्युम्नाच्या रथाकडे गेला. रात्रीच्या वेळीं द्रोणाचें धृष्टद्युम्नाशीं व पांचालांशीं अत्यंत अद्भुत व घनघोर युद्ध झालें. ७. ६. १७०.

---

## अध्याय १७१ वा.

[ १ सात्यकीचा पराक्रम. २ अर्जुन-शकुनियुद्ध. ३ द्रोण-धृष्टद्युम्नयुद्ध. ]

( १ ) संजय—नंतर ते सर्व क्षुब्ध झालेले युद्धदुर्मद व असहिष्णु वीर त्वरित युयुधानाच्या रथावर धांवून गेले. हे राजा, सुवर्णरौप्यभूषणांनीं शृंगारित रथ, अश्व आणि गज यांसह चारी बाजूंनीं त्यास त्यांनीं वेढा दिला. त्याला सर्व बाजूंनीं वेष्टून त्या महारथ्यांनीं त्याची निर्भर्त्सना करीत सिंहनाद केला. माधव सात्यकीचा वध करण्याची इच्छा करून त्या महारथ्यांनीं त्वरेनें त्या सत्यविक्रमी वीरावर तीक्ष्ण शरांचा वर्षाव केला. शत्रूंच्या वीरांचा संहार करणाऱ्या त्या महाबाहु सात्यकीनें आपल्यावर ते येऊन पडत आहेत, असें पाहून पुष्कळ बाण सोडून त्यांचा प्रतिकार केला. त्या ठिकाणीं युद्धदुर्मद वीर सात्यकीनें सन्नतपर्व उग्र बाणांनीं शत्रूंचीं मस्तकें तोडलीं, गजांच्या

सोंडा व अश्वांच्या माना कापल्या आणि तुझ्या वीरांचे बाहुहि हत्यारांसह क्षुरप्र बाणांनीं छेदून टाकिले ! हे भारता, इतस्ततः पडलेल्या चामरांनीं व शुभ्र छत्रांनीं पृथ्वी नक्षत्रपूर्ण आकाशासारखी दिसूं लागली. हे प्रभो, त्या युद्धांत युयुधानाशीं युद्ध करणाऱ्या वीरांचा तुमुल आक्रोश क्रंदन करणाऱ्या पिशाच्चांप्रमाणें होऊं लागला ! त्या प्रचंड आक्रोशानें पृथ्वी दुमदुमून गेली आणि रात्र तीव्र स्वरूपाची व अत्यंत भयावह भासूं लागली. युयुधानाच्या बाणांनीं भग्न झालेलें सैन्य पाहून अंगावर रोमांच उठविणाऱ्या प्रचंड आरोळया ऐकून हे राजा, तुझा रथिश्रेष्ठ पुत्र दुर्योधन आपल्या सारथ्याला 'जेथें हा शब्द होत आहे, तेथें घोडे हांक' असें वारंवार बोलला ! दुर्योधनाची आज्ञा होतांच सारथ्यानें ते उत्तम अश्व युयुधानाच्या रथाकडे हांकले. नंतर तो क्रुद्ध दुर्योधन युयुधानावर चालून गेला. तो उत्तम प्रकारचा धनुर्धर, युद्धांत श्रमसहिष्णु व चपलहस्ताचा असून त्याची युद्धपद्धतीहि आश्चर्यकारक होती. नंतर सात्यकीनें शत्रूच्या रक्ताचें प्राशन करणारे बारा बाण टाकून दुर्योधनाला विद्ध केलें. आपणाला प्रथमतःच बाणांनीं विद्ध केलेलें पाहून दुर्योधनानेंहि संतप्त होऊन त्या सात्यकीचा दहा बाणांनीं वेध केला. नंतर हे भरतर्षभा, त्या सर्व पांचालांचें व भरताचें दारुण व तुमुल युद्ध प्रवृत्त झालें.

हे भारता, मग त्या सात्यकीनें रणांत क्रुद्ध होऊन तुझ्या महारथी दुर्योधन पुत्राच्या उरःप्रदेशीं ऐशीं बाण मारले व त्याच्या अश्वांचा वध केला. एका बाणानें त्याच्या सारथ्यालाहि त्वरित रथांतून खालीं पाडलें ! राजेंद्रा, त्या हताश्व रथांतूनच सात्यकीच्या रथावर तुझा पुत्र तीक्ष्ण बाण मारूं लागला; परंतु हे राजा, त्या शैनेयानें तुझ्या पुत्रानें टाकिलेले पन्नास बाण त्वरेनें तोडून टाकले. नंतर दुसऱ्या एका भल्ल बाणानें त्यानें तुझ्या पुत्राचें मोठें धनुष्य मुष्टिप्रदेशींच तोडून टाकलें. तेव्हां विरथ व धनुष्यहीन झालेला तो सर्वलोकेश्वर राजा दुर्योधन कृतवर्म्याच्या दीप्तिमान् रथावर त्वरेनें चढला. राजश्रेष्ठा, दुर्योधन तेथून परावृत्त होतांच त्या सात्यकीनें तुझ्या सेनेला त्या रात्रीं बाण मारून पळवून लाविलें !

( २ ) राजा, शकुनीनें अर्जुनाला हजारों रथांनीं, सहस्रावधि गजांनीं व कित्येक अश्वसहस्रांनीं चारी बाजूंनीं वेढा दिला आणि नानाप्रकारच्या शस्त्रांनीं त्यांवर मारा केला. कालप्रेरित झालेले ते क्षत्रिय अर्जुनावर सर्व

प्रकारचीं महास्त्रें टाकीत त्याच्याशीं युद्ध करूं लागले. नंतर अर्जुनानेंहि संतप्त होऊन त्या सैन्याचा विपुल संहार करीत त्यांतील हजारों रथ, गज आणि अश्व यांचें निवारण केलें. तेव्हां त्या समरशूर सौबल शकुनीनें हंसतच तीक्ष्ण शरांनीं अर्जुनाला विद्ध केलें आणि शंभर बाण मारून त्याचा मोठा रथ अडवून ठेवला. हे भारता, तेव्हां अर्जुनानें वीस बाणांनीं त्याला युद्धांत विद्ध केलें आणि दुसऱ्याहि महाधनुर्धरांवर तीन तीन बाण टाकले. राजा, धनंजयानें युद्धांत आपल्या बाणांनीं त्यांचें निवारण केलें आणि असुरांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें तुझ्या योद्धयांचा संहार केला. हे महीपाला, युद्धांत तुटून पडलेल्या गजशुंडोपम भुजांनीं व्यापलेली पृथ्वी जणुंकाय पंचमुखी सर्पांनींच व्यापल्या-सारखी दिसत होती. ज्यांवर मुकुट धारण केलेले होते, ज्यांच्या कर्णांत सुंदर कुंडलें शोभत होतीं, ज्यांचीं नाकें शोभायमान दिसत होतीं, क्रोधानें ज्यांचे ओष्ठ चावले गेले होते, ज्यांनीं डोळे वटारिले होते व ज्यांचीं भाषणें अत्यंत मधुर होतीं, अशीं निष्क व चूणामणि धारण केलेलीं अनेक क्षत्रियांचीं मस्तकें कमलांप्रमाणें पसरिलीं जाऊन जणुंकाय जमिनीवर पडलेल्या शिलोच्चयां-प्रमाणें भासत होतीं. याप्रमाणें त्या उग्र व पराक्रमी अर्जुनानें तें दारुण कर्म करून पांच नतपर्व बाणांनीं शकुनीला पुनः विद्ध केलें. अर्जुनानें उलूकावर तीन बाण टाकले. उलूक विद्ध होतांच त्यानेंहि द्विगुणित अवसानानें हजारों बाण सोडून अर्जुनाचा वेध केला व नंतर त्यानें वासुदेवावरहि मारा केला आणि मोठी गर्जना करून पृथ्वी दणदणावून सोडली. नंतर अर्जुनानें रणांत शकु-नीचें धनुष्य बाणांनीं तोडलें आणि त्याचे चार अश्वांचा वेध केला. तेव्हां हे भरतर्षभा, तो सौबल शकुनि रथांतून उडी टाकून सत्वर उलूकाच्या रथावर चढला! हे राजेंद्रा, मग ते महारथी पितापुत्र एका रथावर आरूढ होऊन मेघ जसे पर्वतावर जलवृष्टि करितात, त्याप्रमाणें पार्थावर बाणवृष्टि करूं लागले. परंतु हे महाराजा, अर्जुनानें त्या दोघांना तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें आणि मग तुझ्या सेनेची त्यानें बाण मारून चोहों बाजूंनीं तुटातूट करून सोडली. हे प्रजापालका राजा, वाऱ्यानें ज्याप्रमाणें अभ्रें सर्वत्र विच्छिन्न होऊन जातात, त्याप्रमाणें तुझ्या सेनेची त्यावेळीं फांकाफांक झाली. हे भरत-श्रेष्ठा, तेव्हां तें रात्रीच्या वेळीं वध पावणारें सैन्य व्याकुळ होऊन सर्वत्र भयानें पहात चारी दिशांस पळून गेलें! लढाईत कित्येक आपलीं वाहनें टाकून देऊन, कित्येक त्यांस हांकून, भ्रमिष्टांप्रमाणें त्या भयंकर अंधकारांतून

पळूं लागले! हे भरतर्षभा, तुझ्या योद्धयांना समरांत जिंकून आनंदित झालेले कृष्णार्जुन शंख वाजवूं लागले.

( ३ ) हे महाराजा, धृष्टद्युम्नानें तीन बाणांनीं द्रोणाला विद्ध करून त्याच्या धनुष्याची दोरी एका तीक्ष्ण बाणानें तत्काल तोडून टाकली. मग क्षत्रिय-मर्दन शूर द्रोणानें तें धनुष्य जमिनीवर टाकून दुसरें अधिक वेगाचें व विशेष बळकट धनुष्य हातीं घेतलें. नंतर सात बाणांनीं द्रोणानें धृष्टद्युम्नाला विद्ध करून त्याच्या सारथ्याचा रणांत पांच बाणांनीं वेध केला. महारथी धृष्टद्युम्नानें त्यांचें बाणांनीं त्वरित निवारण करून आसुरी सेनेची दाणादाण करणाऱ्या इंद्राप्रमाणें कौरवांच्या सेनेची तुटातूट करून सोडली. हे मारिषा, याप्रमाणें तुझ्या पुत्राचें सैन्य मारलें जात असतां दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नर, अश्व व गज यांना वाहून नेणारी यमराजनगरीजवळील वैतरणीसारखी नदी उत्पन्न झाली. रक्तप्रवाह ह्या त्या नदीच्या लाटा होत्या. तो प्रतापी तेजस्वी धृष्टद्युम्न याप्रमाणें त्या सैन्याला उधळून लावून देवगणांमध्यें इंद्राप्रमाणें शोभूं लागला. नंतर धृष्टद्युम्न व शिखंडी यांनीं मोठे शंख फुंकले. तसेंच नकुल, सहदेव, सात्यकि आणि भीमसेन यांनींहि शंख वाजविले. हे राजेंद्रा, तुझ्या हजारों रथ्यांना जिंकून ते जयाभिमानी व रणोत्कट महारथी पांडव तुझा पुत्र, कर्ण, शूर द्रोण आणि द्रोणपुत्र यांच्या देखत सिंहनाद करूं लागले. ७. ६. १७१.

---

## अध्याय १७२ वा.

[ १ दुर्योधनाची द्रोण-कर्णांस प्रेरणा. २ द्रोणकृत पांचालसैन्याचा पराभव. ३ कृष्णार्जुनांचें द्रोणसैन्याकडे गमन. ४ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—हे राजेंद्रा, पराक्रमी वीरांनीं आपलें सैन्य मारल्यामुळें त्याची फाटाफूट झाली. त्यामुळें तुझा पुत्र दुर्योधन अत्यंत क्रोधाविष्ट झाला. तेव्हां कर्ण व जयिश्रेष्ठ द्रोण यांजवळ येऊन क्रोधसंतप्त झालेला तो वाक्पटु दुर्योधन त्यांस बोलला—"सव्यसाची अर्जुनानें युद्धांत सिंधुपतीचा वध केल्याचें पाहून तुम्ही दोघे संतापानें ह्या युद्धाला प्रवृत्त झालां आणि आतां पांडवांची सेना माझ्या सैन्याचा संहार करीत असतां, त्यांना जिंकण्यास समर्थ असूनहि तुम्ही दुर्बलांसारखे पहात राहिलां आहां! मानी वीर-

हो, मी त्याज्य आहें, असें जर तुम्हांला वाटत होतें, तर ‘ आम्ही दोघे पांडवांना रणांत जिंकूं, ’ असें त्यावेळीं तुम्हीं सांगावयाचें नव्हतें! तुमचें तें भाषण ऐकूनच त्यावेळीं मीं युद्धाला अनुमति दिली. नाहींतर वीरांचा नाश करणाऱ्या त्या पांडवांबरोबरच्या युद्धास मी प्रवृत्त झालों नसतों. पुरुषश्रेष्ठहो, माझा त्याग करणें तुम्हांस योग्य वाटत नसल्यास तुमच्या पराक्रमानुरूप अजून तरी युद्ध करा. कारण तुम्ही दोघेहि मोठे पराक्रमी आहां!”

(२) याप्रमाणें तुझ्या पुत्राकडून वाक्शरांनीं पीडित होऊन त्या दोघां वीरांनीं दुखविलेल्या सर्पाप्रमाणें युद्ध करण्यास आरंभ केला. नंतर ते दोघे सर्वलोकधनुर्धर व रथिश्रेष्ठ रणांत सात्यकिप्रमुख पांडवांवर चालून गेले. तसेंच ते पांडवहि एकत्र होऊन सर्व सैन्यासह सारखा आक्रोश करणाऱ्या त्या वीरांवर धांवून आले. सर्व शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ व महाधनुर्धर द्रोणानें क्रुद्ध होऊन शिनिपुंगवावर त्वरित दहा बाण मारले. नंतर कर्णानें दहा, तुझ्या पुत्रानें सात, वृषसेनानें दहा आणि शकुनीनें सात बाण त्यावर सोडले. हे कौरवा, इतक्या वीरांनीं युद्धांत त्या सात्यकी वीरावर बाणवृष्टि केली. द्रोण पांडवसेनेचा वध करीत आहे, असें पाहून सोमक चोहों बाजूंनीं त्वरेनें त्यावर शरवृष्टि करूं लागले. हे राजेंद्रा, ज्याप्रमाणें सूर्य किरणांच्या योगानें अंधकार हरण करितो, त्याप्रमाणें त्या ठिकाणीं द्रोण क्षत्रियांचे प्राण हरण करूं लागला. राजेंद्रा, द्रोण पांचालांचा वध करूं लागला, तेव्हां ते एकमेकांच्या नांवानें आक्रोश करूं लागले आणि त्यांचा मोठा तुमुल शब्द ऐकूं येऊं लागला. पिता पुत्रांना, पुत्र पित्यांना, बंधु बंधूंना, भाचे मामांना, मामा भाच्यांना, मित्र मित्रांना व संबंधी लोक आपल्या बांधवांना, जीविताच्या आशेनें तेथेंच सोडून त्वरित पळूं लागले! दुसरे कित्येक मोहित होऊन द्रोणाच्याच संमुख धांवून गेले! आणि पांडवांचे इतर वीर रणांत मारले गेले! याप्रमाणें त्या महात्म्याकडून पीडा पावत असतां रात्रीं हातांतील उल्का टाकून देऊन भीमसेन, अर्जुन, नकुल-सहदेव, युधिष्ठिर व धृष्टद्युम्न हे पहात असतां पांडवांची सेना शीघ्र पळून गेली! अंधकारानें सर्व जग व्याप्त झाल्यामुळें कांहींच ओळखतां येत नव्हतें; तथापि पळून जाणारे हे पांडवाकडील होत, हें कौरवांकडील प्रकाशावरून समजत होतें. हे राजा, तें सैन्य पळून जात असतां महारथी द्रोण व कर्ण हे त्याजवर मागून पुष्कळ बाण मारूं लागले! याप्रमाणें पांचालांचा भंग होऊन ते क्षीण होत आहेत, असें पाहून जनार्दन खिन्न वदनानें अर्जु-

नाला म्हणाला, " महाधनुर्धर द्रोण आणि कर्ण हे एकत्र होऊन धृष्टद्युम्न, सात्यकि आणि पांचाल यांवर वरचेवर बाणांचा सारखा प्रहार करीत आहेत आणि यांच्या शरवर्षावानें आमचे महारथी वीर त्रस्त झाले आहेत. कितीहि निवारण केलें तरी पळून जाणारी आमची सेना थांबत नाहीं."

( ३ ) तेव्हां ती आपली सेना पळून जात आहे, असें पाहून श्रीकृष्ण व अर्जुन म्हणाले, " पांडववीरहो, त्रस्त होऊन पळूं नका, भीति सोडून द्या! आम्ही शस्त्रांनीं सज्ज असलेल्या सर्व सैन्यांचे व्यूह रचून द्रोण व सूतपुत्र कर्ण यांचा प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करितों.' नंतर कृष्ण अर्जुनाला म्हणाला, " हे दोघेहि बलिष्ठ, शूर, अस्त्रसंपन्न व जयाभिलाषी आहेत; यांची तुझ्या सेनेनें उपेक्षा केली असतां, हे आजच्या रात्रींतच तुझ्या सर्व सैन्याचा नाश करून टाकतील!"

याप्रमाणें त्यांचें भाषण चाललें असतां भीमकर्मा महाबलवान् वृकोदर आपलें सैन्य मागें फिरवून त्वरेनें येऊं लागला. तें पाहून हे राजा, श्रीकृष्ण अर्जुनाला आनंदवीत पुनः म्हणाला, 'हा रणश्लाघी भीम, सोमक आणि पांडव यांना घेऊन महारथी द्रोण व कर्ण यांवर वेगानें चालून येत आहे; तर हे पांडुनंदना, सर्व सैन्यांच्या आश्वासनाकरितां हा व महारथी पांचाल यांच्यासह शत्रूशीं युद्ध कर.' नंतर ते दोघे पुरुषश्रेष्ठ कृष्णार्जुन, द्रोण व कर्ण यांना गांठून रणाच्या अग्रभागीं जाऊन उभे राहिले.

( ४ ) संजय—नंतर तें युधिष्ठिराचें मोठें सैन्य पुनः मागें फिरलें. तेव्हां द्रोण व कर्ण हे युद्धामध्यें शत्रूंचें मर्दन करूं लागले. मग राजा, चंद्रोदय होऊन उचंबळलेले दोन समुद्र जसे मोठ्या आवेशानें परस्परांशीं भिडतात, त्याप्रमाणें रात्रीच्या वेळीं त्या दोन सैन्यांमध्यें रणसंग्राम प्रवृत्त झाला! नंतर तुझी सेना हातांतील दीप टाकून उन्मत्तासारखी पांडवांबरोबर लढूं लागली. सर्व पृथ्वी धूळ व अंधकार यांनीं व्यापून गेल्यामुळें ती अतिभयंकर दिसत होती आणि जयाभिमानी वीर एकमेकांनीं उच्चारलेलें नाम व गोत्र यांवरूनच एकमेकांशीं युद्ध करीत होते! हे राजा, स्वयंवरसमयाप्रमाणें त्या युद्धांत एकमेकांवर प्रहार करणारे राजे आपलीं नांवें ऐकवीत असल्याचें ऐकूं येत होतें. नंतर एकाएकीं सर्व शांत झालें आणि मग पुनः क्रुद्ध होऊन लढणाऱ्यांमध्यें जय पावणाऱ्या, त्याचप्रमाणें जिंकलेल्यांचाहि एकच मोठा रणकल्लोळ माजून

राहिला. हे कुरुसत्तमा राजा, जेथें जेथें दीप दिसत, तेथें तेथें ते शूर पतंगांप्रमाणें धांवून येत असत. राजेंद्रा, याप्रमाणें पांडव व कौरव यांमध्यें युद्ध चाललें असतां घनघोर व अतिगाढ रात्र पडली. ७. ६. १७२.

---

## अध्याय १७३ वा.

[ १ कर्ण-धृष्टद्युम्न युद्ध. २ पांचाल सेनेचें पलायन व कर्णाचें निवारण करण्यास युधिष्ठिराची अर्जुनाला प्रेरणा. ३ कृष्णार्जुनांचा संकेत. ४ कृष्णार्जुनांच्या प्रेरणेनें घटोत्कचाचा युद्धारंभ. ]

( १ ) संजय—नंतर शत्रुविनाशक कर्णानें रणांत धृष्टद्युम्नाला पाहून मर्मभेदक दहा बाणांनीं त्याच्या उरःप्रदेशावर प्रहार केला आणि हे मारिषा, धृष्टद्युम्नानें देखील मोठ्या त्वरेनें त्या कर्णाला दहा बाणांनीं विद्ध करून 'थांब, थांब,' म्हणून गर्जना केली. कर्णानें पांचालाग्रणी धृष्टद्युम्नाच्या सारथ्यास व चार अश्वांस बाणांनीं विद्ध केलें. तसेंच त्याचें उत्तम धनुष्यहि छेदून टाकिलें. एका भल्ल बाणानें त्याच्या सारथ्यालाहि रथाखालीं पाडलें. नंतर विरथ, हताश्व व सारथिहीन झालेल्या धृष्टद्युम्नानें भयंकर परिघ घेऊन कर्णाच्या अश्वांचें चूर्ण केलें! सर्पतुल्य बाणांनीं कर्णाकडून विद्ध झाल्यामुळें तो पायांनींच युधिष्ठिराच्या सैन्यांत गेला आणि हे मारिषा, सहदेवाच्या रथावर चढून बसला. पुनः कर्णावर चालून जावें, अशी त्याची इच्छा होती; परंतु धर्मपुत्र युधिष्ठिरानें त्याचें निवारण केलें.

( २ ) महातेजस्वी कर्णानेंहि धनुष्याच्या प्रचंड नादाबरोबर सिंहनाद केला आणि तारस्वरानें आपला शंखहि वाजविला. धृष्टद्युम्नाला त्या कर्णानें जिंकिलें, असें पाहून ते महारथी पांचाल व सोमक फारच संतप्त झाले. त्यांनीं मरणालाहि न भितां सूतपुत्र कर्णाच्या वधाकरितां सर्व बाजूंनीं शस्त्रें घेतलीं व ते कर्णावर धांवून गेले. इकडे कर्णाच्या सारथ्यानेंहि दुसरे शंखवर्णाचे, सिंधुदेशचे व महावेगवान् उत्तम अश्व रथास जोडले. नंतर तो कर्ण पर्वतावर वृष्टि करणाऱ्या घनाप्रमाणें पांचालांच्या महारथी वीरांवर मोठ्या दक्षतेनें बाण टाकूं लागला. ती पांचालांची महासेना कर्णाकडून पीडित होत असतां सिंहानें भिवविलेल्या हरिणीप्रमाणें पळत सुटली. अश्वांवरून,

गजांवरून व रथांतून भूमीवर पडलेले लोक जिकडेतिकडे दिसूं लागले! कर्णानें पळून जाणाऱ्या वीरांचे त्या महायुद्धांत क्षुरप्र बाणांनीं बाहू तोडिले, कित्येकांचा शिरच्छेद केला आणि हे राजेंद्रा, गजांवर व अश्वांवर बसलेल्या व भूमीवर असलेल्यांच्या मांड्या त्यानें कापून काढल्या. पुष्कळ महारथी धांवत असतां त्यांना आपलीं गात्रें किंवा वाहनें छिन्न झालीं आहेत, हेंहि समजलें नाहीं! ते सृंजय आणि पांचाल युद्धांत मारले जात असतां इतके भिऊन गेले होते कीं, नुसती तृणाची काडी हालली असतां देखील तो कर्णच आला आहे, असें त्यांस वाटत असे! आपल्याच पक्षांतील एखादा योद्धा भांबावून पळत असतां तो कर्णच आहे, असें वाटून त्यालाच भिऊन ते पळून जात असत! हे भारता, त्या भग्न होऊन पळत सुटलेल्या सैन्यांवर कर्ण मागून बाण टाकीत त्यांचा पाठलाग करीत होता. विमनस्क झालेले ते लोक एकमेकांकडे मूढांसारखे पाहूं लागले; परंतु महारथी कर्णानें त्यांची दाणादाण केल्यामुळें ते उभेहि राहूं शकले नाहींत! हे राजा, कर्णानें व द्रोणानें याप्रमाणें तीक्ष्ण बाणांनीं प्रहार केल्यामुळें ते पांचाल सर्व दिशांकडे पहात पळत सुटले!

नंतर राजा युधिष्ठिरानें आपलें सैन्य पळून जात असल्याचें पाहून, तें पळून कां जात आहे हें जाणलें आणि तो अर्जुनाला म्हणाला, "हा महाधनुर्धर कर्ण भयंकर रात्रीं धनुष्य हातांत घेऊन संतप्त झालेल्या सूर्याप्रमाणें उभा आहे, पहा! कर्णाच्या बाणांनीं विद्ध झालेल्या तुझ्या बांधवांचा हा अनाथांसारखा होणारा शब्द ऐकूं येत आहे! अरे, हा कर्ण बाण ओढतो केव्हां आणि सोडतो केव्हां, यांतील अंतर मला मुळींच समजत नाहीं. हा खरोखर आमचा नाश करणार आहे. यासाठीं हे धनंजया, आतां यापुढें कालानुसार काय करावयाचें तें ठरवून कर्णाचा वध जेणेंकरून होईल, ती गोष्ट कर!"

(३) हे महाराजा, याप्रमाणें धर्मानें सांगितलें असतां अर्जुन कृष्णाला म्हणाला, "हा कुंतीपुत्र धर्म राधेयाचा पराक्रम पाहून अगदीं भिऊन गेला आहे. कर्णाचें सैन्य आमच्यावर याप्रमाणें वारंवार धांवून येत आहे, तरी कालानुसार तुला जें योग्य वाटेल तें तूं लवकर कर. आमचें सैन्य पळत सुटलें आहे. हे मधुसूदना, हें सैन्य द्रोणाच्या बाणांनीं अगदीं त्रस्त होऊन

गेलें आहे. शिवाय कर्णाच्या त्रासानें त्याला स्थिरहि राहतां येत नाहीं! त्याचप्रमाणें हा कर्ण पळून जाणाऱ्या महारथ्यांवर निःशंकपणें तीक्ष्ण बाण टाकीत त्यांच्या मागें लागल्याचें मला दिसून येत आहे! हे वृष्णिशार्दूला, ज्याप्रमाणें सर्पाला प्रत्यक्ष पादस्पर्श सहन होत नाहीं, त्याप्रमाणें याला रणाच्या अग्रभागीं माझ्यानें पहावत नाहीं. म्हणून हे मधुसूदना, हा महारथी कर्ण जिकडे आहे, तिकडे मला घेऊन त्वरित चल! मग मी तरी त्याचा वध करीन, किंवा तो तरी मला ठार करील!"

वासुदेव—हे कौंतेया, हा कर्ण इंद्रासारखा अमानुषविक्रमी नरव्याघ्र रणभूमीवर संचार करीत असलेला मला दिसत आहे. हे पुरुषव्याघ्र धनंजया, तुझ्याशिवाय किंवा घटोत्कच राक्षसाशिवाय याच्या विरुद्ध युद्धांत उभा राहण्यास दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. हे अनघा, तूं या सूतपुत्राशीं लढावें, अशी वेळ अजून आली नाहीं, असें मला वाटतें. हे महाबाहो, त्याच्या जवळ मोठ्या उल्केसमान प्रज्वलित वासवी शक्ति आहे, आणि ती रणांत तुजवर सोडावी, अशा विचारानें त्यानें तिचें रक्षण केलें आहे. कारण, ती तशीच घोर स्वरूपाची आहे. म्हणून महाबलवान् घटोत्कचानें या राधेयाच्या बरोबर युद्धास जावें. घटोत्कच बलवान् भीमाचा पुत्र असून देवांसारखा पराक्रमी आहे. दिव्य, राक्षसी आणि आसुरी या तिन्ही प्रकारच्या अस्त्रांत त्याची गति आहे. शिवाय हा घटोत्कच तुमच्यावर सर्वदा अनुरक्त असून तुमचा हितैषीहि आहे. हा कर्णाला युद्धांत जिंकील, यांत मला संशय वाटत नाहीं.

(४) याप्रमाणें कृष्णानें सांगितलें असतां त्या महाबाहु कमलनयन पार्थानें त्या घटोत्कच राक्षसाला हांक मारली. तेव्हां तो तत्काल त्यांच्यापुढें प्रकट झाला. हे राजेंद्रा, त्यानें कवच, धनुष्यबाण, खड्ग हीं धारण केलीं होतीं. राजा, मग कृष्ण व पंडुनंदन अर्जुन यांना प्रणाम करून तो कृष्णाला म्हणाला, 'हा मी सिद्ध आहें, मला आज्ञा असावी.' नंतर प्रज्वलित कुंडलें धारण करणाऱ्या, मेघसदृश वर्णाच्या व प्रदीप्त मुखाच्या हिडिंबासुत घटोत्कचाला दाशार्ह कृष्ण हंसत बोलला—

वासुदेव—बाबा घटोत्कचा, मी तुला जें कांहीं सांगणार आहें, तें लक्ष्यांत ठेव. सांप्रत तुझ्या पराक्रमाचा काळ येऊन ठेपला आहे. असा पराक्रम करून दाखविणें दुसऱ्या कोणालाहि शक्य नाहीं. म्हणून तूं या दुःखसमुद्रांत

बुडणाऱ्या बांधवांना नौकारूप हो ! विविध अस्त्रें आणि राक्षसी माया हीं तुला अवगत आहेत. हे घटोत्कचा, पहा ह्या कर्णानें गोवारी जसा गाईंना पिटाळून लावतो, त्याप्रमाणें रणाग्रभागीं पांडवांच्या सेनेची कशी त्रेधा उडविली आहे ! हा कर्ण महाधनुर्धर बुद्धिमान् व दृढपराक्रमी आहे. तो पांडवांच्या सैन्यांतील मोठमोठ्या क्षत्रिय वीरांस मारीत सुटला आहे. मोठी शरवृष्टि करणारे दृढधन्वी वीरहि त्याच्या बाणरूपी ज्वालांनीं पीडित होऊन त्याच्या पुढें उभें राहूं शकत नाहींत ! या रात्रीच्या समयीं सूतपुत्रानें शरवर्षावानें विह्वल केलेले पांचाल, सिंहानें गांजलेल्या हरणांप्रमाणें पळून जात आहेत ! अशा प्रकारें रणांत माजलेल्या सूतपुत्राचा प्रतिबंध करणारा हे भीमविक्रमा, तुझ्यावांचून दुसरा कोणी नाहीं ! म्हणून हे महाबाहो, यावेळीं तुला शोभण्यासारखा, तसाच तुझा मातुल व पितर यांच्या तेजाला व अस्त्रबलाला साजेसा पराक्रम करून दाखीव ! हे हिडिंबापुत्रा, लोक यासाठींच पुत्राची इच्छा करीत असतात. हा आम्हांला दुःखांतून कसा तारील, हीच त्यांना सर्वदा काळजी लागलेली असते. म्हणून तूं आपल्या बांधवांना दुःखमुक्त कर. हे घटोत्कचा, पिते पुत्रांची इच्छा करतात, ती स्वार्थामुळेंच करीत असतात ! जे इहलोकीं व परलोकीं पितरांस तारतात, तेच त्यांचे खरे हितकर्ते होत ! हे भीमनंदना, रणांत लढत असतां तुझें बळ भयंकर असतें. तुझ्या मायाहि दुस्तर आहेत. हे परंतपा, रात्रीच्या वेळीं कर्णानें बाणांचे योगानें पांडवांच्या सेनेला उधळून लावलें आहे. ती कौरवसैन्यसमुद्रांत बुडत आहे, तरी तूं तिला तीर हो ! राक्षस हे जात्याच बलवान्, अत्यंत दुर्धर्ष, शूर व पराक्रमी असतात आणि त्यांतहि रात्रीच्या वेळीं त्यांच्या पराक्रमाला मर्यादाच नसते. म्हणून तूं महाधनुर्धर कर्णाला रणांत आपल्या मायेनें जिंक ! धृष्टद्युम्नप्रमुख पांडव द्रोणाचा वध करितील !

संजय—हे कुरुकुलोत्पन्ना, केशवाचें भाषण ऐकून अर्जुनहि त्या अरिंदम घटोत्कच राक्षसाला बोलला, " हे घटोत्कचा, तूं, दीर्घबाहु सात्यकि आणि पंडुपुत्र भीमसेन एवढेच वीर सर्व सैन्यांत मला दिसत आहेत ! म्हणून तूं जा, आणि रात्रीं कर्णाशीं द्वंद्वयुद्ध कर ! या युद्धांत महारथी सात्यकि तुझा पाठीराखा होईल. स्कंदाच्या साहाय्यानें ज्याप्रमाणें पूर्वी इंद्रानें तारकासुराचा वध केला, त्याप्रमाणें सात्वताच्या साहाय्यानें तूं रणांत त्या शूर कर्णाचा वध कर ! "

**घटोत्कच**—हे भारता, मी कर्णाला, द्रोणाला व दुसऱ्याहि अस्त्रसंपन्न महाबलवान् क्षत्रियांना पुरून उरणारा आहें. आजच्या रात्रीं मी त्या सूत-पुत्राशीं अशा रीतीनें लढेन कीं, ही भूमि आहे, तोंपर्यंत लोक आमच्या संग्रामाचें वर्णन करीत राहतील ! आज मी कोणालाहि—शूरांना, भ्यालेल्यांना किंवा हात जोडून शरण आलेल्यांनाहि—सोडणार नाहीं ! राक्षसी धर्माला अनुसरूनच मी सर्वांचा वध करून टाकीन !

**संजय**—असें बोलून तो महाबाहु, परवीरांतक, हिडिंबासुत तुझ्या सैन्याला भिववीत रणांत कर्णावर धांवून गेला. दीप्तिमान् केंस धारण करणारा व प्रदीप्त मुखाचा तो राक्षस आपल्यावर क्रोधानें चालून येत आहे, असें पाहून पुरुषश्रेष्ठ सूतपुत्र कर्ण हंसतच त्याला सामोरा गेला. हे राजशार्दूला, इंद्र व प्ऱ्हाद यांमध्यें ज्याप्रमाणें भयंकर रणकंदन झालें, तसेंच कर्ण आणि घटोत्कच राक्षस यांमध्यें रात्रीच्या वेळीं तुमुल युद्ध झालें ! ७. ६. १७३.

---

## अध्याय १७४ वा.

[ १ दुर्योधनाची दुःशासनास कर्णाच्या रक्षणार्थ प्रेरणा. २ घटोत्कचाशीं युद्ध करण्यासाठीं आज्ञा देण्याविषयीं अलंबुषानें केलेली दुर्योधनाची प्रार्थना. ३ दुर्योधनाची त्यास संमति. ४ घटोत्कचाकडून अलंबुषाचा वध. ]

( १ ) **संजय**—हे राजा, युद्धांत कर्णाला मारण्याच्या उद्देशानें त्याच्या रथावर चालून गेलेल्या घटोत्कचाला पाहून तुझा पुत्र दुर्योधन दुःशासनाला म्हणाला, "कर्णाचा पराक्रम पाहून हा राक्षस त्यावर त्वरेनें धांवून येत आहे, तर त्या महारथाचें निवारण कर. तूं मोठें सैन्य घेऊन जेथें तो महाबलवान् राक्षस आहे, तेथें जा. कारण वैकर्तन कर्ण त्या राक्षसाशीं युद्ध करूं इच्छीत आहे. हे मानदा, तुझ्या प्रमादामुळें त्या भयंकर राक्षसाकडून कर्णाचा नाश होऊं नये, म्हणून मोठ्या दक्षपणानें तूं युद्धांत कर्णाचें रक्षण कर !"

( २ ) राजन्, इतक्यांत जटासुराचा रणधुरंधर व बलिष्ठ मुलगा दुर्योधनाजवळ येऊन त्याला म्हणाला, "हे दुर्योधना, तुझी आज्ञा असेल तर, तुझे प्रख्यात व युद्धदुर्मद शत्रु जे पांडव त्यांना त्यांच्या अनुयायांसह मारावें, अशी माझी इच्छा आहे. माझा पिता जटासुर हा पूर्वीं राक्षसांचा ग्रामाधिपति

होता. या क्षुद्र पांडवांनीं राक्षसांचा नाश करण्याचा कांहीं उपाय योजून त्याचा वध केला आहे. म्हणून हे राजेंद्रा, शत्रूंच्या मांसानें आणि त्यांच्या रक्ताच्या पूजनानें त्याची निष्कृति करण्याची माझी इच्छा आहे. तर राजा, मला आज्ञा दे."

( ३ ) तेव्हां दुर्योधन राजा संतुष्ट होऊन त्याला म्हणाला, "द्रोण, कर्ण वगैरे वीरांच्या साहाय्यानें शत्रूंचा वध करण्यास मी समर्थ आहें. तरी तूं माझ्या आज्ञेनें जा आणि घटोत्कचाला युद्धांत जिंक ! तो क्रूरकर्मा घटोत्कच राक्षस व मनुष्य यांपासून निर्माण झाला आहे. तो पांडवांचें सर्वदा कल्याण करणारा असून आमचे गज, अश्व व रथ यांचा नाश करितो; त्याचें राहणेंहि अंतरिक्षांत असतें ! तर तूं त्याच्याशीं युद्ध कर व त्याला यमसदनीं पाठवून दे !"

( ४ ) त्यावर 'ठीक आहे,' असें म्हणून त्या महाकाय जटासुरपुत्रानें त्या घटोत्कचाला आह्वान करून त्यावर नानाप्रकारच्या शस्त्रांचा मारा केला. मग सोसाट्याच्या वाऱ्यानें ज्याप्रमाणें मेघ उडविले जातात, त्याप्रमाणें त्या घटोत्कचानें त्या अलंबुषाला, कर्णाला आणि दुस्तर कुरुसैन्यालाहि व्याकुल करून सोडलें ! नंतर अलंबुषानें त्याचें तें मायाबल पाहून त्वरेनें नानाविध बाणसमूहांनीं त्याला जर्जर केलें ! आणि त्या महाबलिष्ठ राक्षसानें घटोत्कचास पुष्कळ बाणांनीं विद्ध करून, पांडवांच्या सेनेला पळवून लाविलें ! हे भारता, त्यानें पळविलेली पांडवांची सेना सायंकाळीं वाऱ्यानें फांकल्या जाणाऱ्या मेघांप्रमाणें उधळून गेली. मग घटोत्कचानें आपल्या बाणांनीं तुझ्या सेनेला इतकें त्रस्त करून टाकलें कीं, हे राजा, हातांतील हजारों दीप टाकून ती सारखी पळत सुटली ! नंतर क्रुद्ध अलंबुषानें त्या महायुद्धांत, अंकुशांनीं जसा महागजावर मारा करावा, त्याप्रमाणें दहा बाण त्या घटोत्कचावर मारले ! त्यावर घटोत्कचानें त्याचा रथ, सारथि आणि सर्व आयुधें यांचे तिळांएवढे तुकडे केले आणि मोठी गर्जना केली ! मेघ मेरुपर्वतावर जलवृष्टि करितात, त्याप्रमाणें त्यानें बाणवृष्टि करून कर्ण, दुसरे हजारों कौरव आणि अलंबुष यांना विह्वल करून सोडलें. त्यामुळें त्या राक्षसाकडून पीडिलेलें तें कौरवसैन्य फारच खवळून गेलें. हे महाराजा, सारथि हत झाल्यावर विरथ झालेल्या जटासुरपुत्रानें क्रोधसंतप्त होऊन घटोत्कचावर मुष्टिप्रहार केला. भूकंपानें

ज्याप्रमाणें वृक्ष, गुल्म, तृण इत्यादिकांसह पर्वत कांपतो, त्याप्रमाणें त्या मुष्टिप्रहारानें घटोत्कच कांपूं लागला ! नंतर त्या भीमपुत्र घटोत्कचानें शत्रुसंघाचा नाश करणाऱ्या आपल्या परिघसदृश बाहूनें अलंबुषावर जोरानें मुष्टिप्रहार केला आणि क्रोधानें इंद्रध्वजांसारख्या आपल्या हातांनीं त्याला भूतलावर आदळलें ! जटासुरपुत्रानेंहि घटोत्कचापासून आपली मुक्तता करून घेतली आणि तो पुनः वेगानें घटोत्कचावर धांवून गेला. त्यानें घटोत्कचाला वर उचलिलें आणि संतापानें भूमीवर आपटलें ! याप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या दोघां राक्षसांचें मोठें तुमुल व अंगावर रोमांच उभे करणारें युद्ध झालें ! ते अतिमायावी व महापराक्रमी वीर मायेच्या योगानें एकमेकांवर सरशी करीत इंद्रवैरोचनांप्रमाणें लढले ! थोडा वेळ अग्नि व समुद्र होऊन, तर कांहीं काळ गरुड व तक्षक होऊन ते लढत ! केव्हां मेघ व महावायु तर केव्हां पर्वत व वज्रें होऊन, पुनः गज व शार्दूल या रूपांनीं ते प्रकट होत, आणि लगेच सूर्य व राहु यांचीं रूपें धारण करून ते युद्धाला प्रवृत्त होत असत ! याप्रमाणें शेंकडों माया निर्माण करून परस्परांचा वध करूं पाहणाऱ्या त्या अलंबुष-घटोत्कचांचें युद्ध अत्यंत आश्चर्यकारक झालें ! परिघ, गदा, प्रास, मुद्गर, पट्टिश, मुसलें आणि पर्वताग्रें यांचा परस्परांनीं परस्परांवर मारा केला. ते महामायावी राक्षस गजांवरून, अश्वांवरून, रथांवरून व पायांनींहि रणांत अन्योन्यांशीं लढले !

हे राजा, घटोत्कचानें अलंबुषाचा वध करण्याच्या इच्छेनें अत्यंत क्रोधानें आकाशांत उडी घेतली आणि वेगानें ससाण्याप्रमाणें त्यावर झडप घातली. नंतर त्या प्रचंडदेहाच्या राक्षसाधिपति अलंबुषाला उचलून मयासुराला विष्णूप्रमाणें भूमीवर आपटून मारलें ! मग घटोत्कचानें आपला खड्ग बाहेर काढला आणि हे महाराजा, त्या पराक्रमी वीरानें अलंबुष राक्षसाचें रणांत स्फुरण पावणारें व भयंकर आक्रोश करणारें तें विक्राळ स्वरूपाचें मस्तक धडापासून वेगळें केलें ! रक्तानें माखलेलें तें मस्तक केंसांच्या ठिकाणीं धरून घटोत्कच दुर्योधनाचे रथाकडे गेला आणि तें रथांत ठेवून हंसतहंसत त्याला म्हणाला, "ह्या तुझ्या बांधवाला मारलें आहे; ह्याचा पराक्रम तूं पाहिला आहेसच ! ह्यापुढें कर्णाचाहि नाश असाच झालेला तूं पाहशील आणि नंतर तुझीहि तीच अवस्था होईल ! ज्याला स्वधर्म, अर्थ आणि काम ह्या तीन गोष्टींची इच्छा आहे, त्यानें रिक्त हस्तानें राजा, ब्राह्मण व स्त्री यांचें

दर्शन घेऊं नये. तरी माझे हातून कर्णाचा वध होईपर्यंत तूं स्वस्थ आनंदानें रहा !”

हे नरेश्वरा, असें बोलून तो घटोत्कच कर्णाकडे निघून गेला. नंतर त्या नर-राक्षसांचें समरांगणावर अतिथोर, भयानक व आश्चर्यकारक युद्ध झालें. ७. ६. १७४.

---

## अध्याय १७५ वा.

[ १ कर्ण व घटोत्कच यांचें युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—वैकर्तन कर्ण व राक्षस घटोत्कच यांचें रात्रीचे वेळीं युद्ध झालें, तें कसें झालें ? त्या घोर राक्षसाचें रूप कशा प्रकारचें होतें ? त्याचा रथ, त्याचे अश्व आणि त्याचीं सर्व आयुधें कशीं होतीं ? त्याच्या अश्वांचे उंचीचें प्रमाण काय होतें, त्याचा रथध्वज व धनुष्य केवढीं मोठीं होतीं, त्याचें कवच व शिरस्त्राण कशा प्रकारचीं होतीं ? हें सर्व मी तुला विचारीत आहें, तर संजया, तूं तें सर्व मला सांग; कारण तूं मोठा कुशल आहेस.

संजय—राजा, त्याचें शरीर प्रचंड होतें, नेत्र व तोंड तांबडें होतें, पोट खपाटीं गेलें होतें, त्याचे केंस उभारलेले होते, दाढी हिरवी होती, शंकाकार कान आणि हनुवटी मोठी होती ! त्याचें तोंड कानांपर्यंत तासलेलें होतें ! दाढा तीक्ष्ण होत्या, व त्याला पुढें चार लांब सुळे होते ! त्याची लांब जीभ आणि ओष्ठ हीं तांबडीं लाल होतीं ! त्याच्या शरीराचा वर्ण नील होता, त्याचा देह पर्वतासारखा होता. त्यामुळें त्याजकडे पाहून भीति वाटत असे ! तो महाबलवान् असून दिसण्यांत अगदीं विद्रूप होता ! त्याचा स्पर्श फार कठोर असे. त्या महामायावी राक्षसाचे हातांत कडीं वगैरे अलंकार असून बाहूंवर अंगद होते. पर्वतावरील वणव्याच्या रांगांप्रमाणें त्यानें हृदयावर निष्क धारण केले होते ! सोन्याचा, चित्रविचित्र, सुंदर दिसणारा, तोरणा-सारख्या आकाराचा, शुभ्र किरीट त्याच्या मस्तकावर शोभत होता. बालसू-र्योपम कांतीचीं कुंडलें त्याच्या कानांत असून गळयांत शुभ्र माला होती. अंगांत मोठें तेजस्वी व जड कांशाचें कवच घातलें होतें. त्याचा १रथ चारशें हात लांबीचा असून त्यावर शेंकडो बारीक घंटा असून त्यांचा आवाज होत

---

१ येथें रथवर्णनाचा संक्षेप केला आहे.

होता. ध्वजाच्या योगानें त्या रथाला फारच शोभा आली होती. मदोन्मत्त गजांसारखे, रक्तवर्ण नेत्रांचे, भयंकर, इच्छेप्रमाणें वर्ण धारण करणारे, अत्यंत वेगवान्, श्रमांविषयीं निष्काळजी, बलवान् शंभर अश्व त्या रथाला जोडलेले असून ते त्या राक्षसाला नेत होते. त्यांची आयाळ विपुल असून ते वरचेवर खिंकाळत होते. दीप्त कुंडलें धारण करणारा, प्रदीप्त मुखाचा, विरूप डोळ्यांचा एक घोर राक्षस त्याचा सारथि होता. सूर्यकिरणांसारख्या दोऱ्यांनीं त्यानें आपले घोडे खेंचून धरले होते. त्या सारथ्याच्या सांनिध्यांत तो राक्षस अरुणानें युक्त सूर्यासारखा किंवा ज्यावर मोठा मेघ आला आहे, अशा महापर्वतासमान दिसत होता! मेघगर्जनेसारख्या आवाजाचें, बळकट दोरीचें धनुष्य तो एकसारखें उडवीत होता! त्याची लांबी बारा मुंढे हात असून त्याचा विस्तार एक हातभर होता!

रथाच्या आंसाएवढ्या बाणांनीं सर्व दिशा आच्छादून त्या वीरांचा क्षय करणाऱ्या रात्रींत तो घटोत्कच कर्णावर धांवून गेला. रथामध्यें बसून तो धनुष्य गरगर फिरवीत असल्यामुळें त्याचा आवाज मेघगर्जनेप्रमाणें ऐकूं येत होता. हे भारता, त्या नादानें तुझी सेना भयभीत झाली आणि समुद्राच्या लाटांप्रमाणें कांपूं लागली! तो विरूपाक्ष व भयंकर राक्षस आपल्यावर चालून येत आहे, असें पाहून कर्णानें हंसतहंसतच त्वरेनें त्याचें निवारण केलें. घटोत्कच शर सोडीत अगदीं जवळ आला असतां यूथपति गजानें दुसऱ्या यूथपति गजावर हल्ला करावा, त्याप्रमाणें शर फेंकीत कर्ण त्यावर धांवून गेला. हे राजेंद्रा, तेव्हां तें कर्ण-घटोत्कचांचें युद्ध इंद्र-शंबरासुरांसारखें तुमुल झालें. भयंकर नादाचीं, मोठ्या वेगाचीं धनुष्यें घेऊन बाणवृष्टि करीत त्यांनीं परस्परांना झांकून टाकिलें! शार्दूल नखांनीं किंवा महागज दांतांनीं जसे एकमेकांस विद्ध करितात, त्याप्रमाणें त्यांनीं रथशक्ति व बाण यांच्या योगानें परस्परांस विह्वल केलें. शरसंधानानें एकमेकांचीं गात्रें छिन्नभिन्न झाल्यामुळें आणि शरोल्कांनीं ते तप्त होत असल्यामुळें त्यांच्याकडे पाहाणें देखील अत्यंत भयंकर झालें होतें! त्यांच्या सर्वांगाला क्षतें पडलीं असून रक्ताचे ओघानें ते भिजून अगदीं चिंब झाले होते! त्यामुळें ते जलस्राव करणाऱ्या गैरिकाचलां-प्रमाणें शोभत होते! बाणाग्रांनीं शरीरें विद्ध झालीं असतांहि ते महा-तेजस्वी योद्धे परस्परांचा भेद करण्याचा सारखा प्रयत्न करीत होते; तथापि कोणी कोणास कांपवूं शकला नाहीं! प्राणांचा पण लावून रणांगणांत द्यूत

खेळणाऱ्या त्या कर्ण-घटोत्कचांचें तें रात्रियुद्ध बराच वेळपर्यंत अगदीं बरोबरीचें झालें! तो घटोत्कच धनुष्याला तीक्ष्ण बाण जोडून जेव्हां ते सोडूं लागला, तेव्हां शत्रूकडीलच नव्हेत, तर आपल्याकडील लोकहि अगदीं भिऊन जाऊं लागले! हे राजा, जेव्हां कर्णाला घटोत्कचावर आपली सरशी करतां येईना, तेव्हां त्या अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ वीरानें एका दिव्यास्त्राची योजना केली. आपल्यावर कर्णानें योजलेलें दिव्यास्त्र पाहून त्या पांडुनंदन घटोत्कचानें मोठी राक्षसी माया उत्पन्न केली. तेव्हां शूल, मुद्गर धारण करणाऱ्या व पर्वत आणि वृक्ष हातांत घेणाऱ्या राक्षसांची मोठी सेना त्याच्या सभोंवतीं गोळा झाली! मोठें धनुष्य सज्ज करून व उग्र कालदंड धारण करून अंतकाप्रमाणें येणाऱ्या त्या घटोत्कचाला पाहून ते सर्व राजे भयभीत होऊन गेले! घटोत्कचाच्या सिंहनादानें भिऊन गेलेले गज मूत्रोत्सर्ग करूं लागले! लोकहि अत्यंत भिऊन गेले! हे राजा, नंतर मध्यरात्र झाल्यावर अधिक बल चढलेल्या राक्षससैन्यानें चारी बाजूंनीं अति उग्र व मोठी पाषाणवृष्टि केली! तशींच लोखंडी चक्रें, भुशुंडी इत्यादिकांचीहि सारखी वृष्टि होऊं लागली!

हे नराधिपा, तें उग्र आणि घोर युद्ध पाहून तुझे पुत्र आणि योद्धे व्यथित होऊन तेथून पळाले! आपल्या अस्त्रबळाची श्लाघा करणारा मानी कर्ण मात्र एकटा डगमगला नाहीं. घटोत्कचानें निर्माण केलेली माया त्यानें आपल्या बाणांनीं नष्ट केली. तें पाहून घटोत्कच क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें सूतपुत्रावर घोर बाण सोडले. नंतर कर्णहि क्रोधाविष्ट झाला आणि त्या प्रतापी वीरानें मोठ्या चपलतेनें घटोत्कचाला दहा बाणांनीं विद्ध केलें! तेव्हां घटोत्कचानें हजार आरांचें एक मणिरत्नभूषित बालरवीप्रमाणें तेजस्वी दिव्यचक्र घेतलें आणि तें कर्णाचा वध करण्याच्या हेतूनें त्याच्या रथावर फेंकलें! परंतु कर्णाच्या बाणांच्या योगानें तें अभाग्याच्या संकल्पाप्रमाणें व्यर्थ होऊन भूमीवर पडलें! त्यामुळें घटोत्कच अतिशय संतप्त झाला आणि राहु जसा सूर्याला आच्छादितो, त्याप्रमाणें त्यानें आपल्या बाणांनीं कर्णाला झांकून टाकिलें. परंतु रुद्र, उपेंद्र किंवा इंद्र यांसारख्या पराक्रमी कर्णानें यत्किंचितहि न भितां आपल्या बाणांनीं त्या घटोत्कचाचा रथ आच्छादून टाकिला. नंतर घटोत्कचानें सुवर्णवलयविभूषित गदा कर्णावर फेंकली, परंतु कर्णानें बाणांच्या प्रहारानें तीहि खालीं पाडली! नंतर तो प्रचंड देहाचा घटोत्कच आकाशांत उडी मारून कालमेघाप्रमाणें गर्जना

करीत नभस्तलांतून वृक्षांची वृष्टि करूं लागला. तेव्हां सूर्यकिरणांनीं मेघाला जसा भेदून टाकतो, त्याप्रमाणें कर्णानें आकाशांतहि त्या भीमसेन-पुत्राला बाणांनीं विद्ध केलें. शिवाय त्याचे सर्व अश्व मारून शेंकडों बाणसमूहांनीं त्याचा रथहि आच्छादून टाकला. नंतर वृष्टिमान् पर्ज-न्याप्रमाणें त्यानें त्यावर बाणवृष्टि केली. तेव्हां त्या घटोत्कचाच्या शरीरावर क्षतांवांचून दोन बोटेंहि रिकामी जागा नव्हती. असा तो एका मुहूर्ताच्या अवधींत साळू पक्ष्यासारखा दिसूं लागला! कर्णाच्या बाणांनीं आच्छादिल्या-मुळें त्याचे अश्व, रथ, ध्वज किंवा स्वतः तो घटोत्कच देखील आम्हांला रणभूमीवर मुळींच दिसेनासा झाला. परंतु त्या मायावी वीरानें दिव्यास्त्राचा अस्त्रानें नाश करून कर्णाशीं मायावी युद्ध करण्यास आरंभ केला. अशा रीतीनें तो मायेनें आणि लाघवानें कर्णाशीं युद्ध करूं लागला. तेव्हां आकाशांतून अदृश्य शरजालें पडूं लागलीं. हे कुरुसत्तमा, तो महामायावी भैमसेनी आपल्या मायेच्या योगानें सर्वांना मोह पाडीत संचार करूं लागला. हे भारता, वेडींवांकडीं व अशुभ तोंडें करून मायेनें त्यानें सूतपुत्राचीं दिव्यास्त्रें गिळून टाकलीं! आणि पुनः तो महादेही गतप्राण व निरुत्साह होऊन आकाशांतून खालीं पडलेला दिसूं लागला! तो मेला असें समजून कौरवा-ग्रणींनीं मोठी गर्जना केली! इतक्यांत दुसरे नवे देह धारण करून तो सर्वत्र दिसूं लागला! तो महाबाहु शंभर मस्तकें व शंभर उदरें धारण करून मैनाक पर्वतासारखा दिसूं लागला! पुनः तो राक्षस अंगुष्ठमात्र होऊन समुद्रतरंगां-प्रमाणें इकडून तिकडे व वरखालीं उसळूं लागला! नंतर त्यानें पाण्यांत उडी घेतली व दुसरीकडून वर आलेला दिसला! पुनः आकाशांतून खालीं उतरून व अंगांत कवच घालून आपल्या सुवर्णपरिष्कृत रथावर चढून बसला. नंतर मायेच्या योगानें पृथ्वी, आकाश आणि सर्व दिशा यांमध्यें फिरून कर्णाच्या रथाजवळ गेला आणि निर्भयपणें त्याला बोलला, ‘ अरे सूतपुत्रा, आतां उभा रहा; मी जीवंत असतां तूं कोठें जाणार आहेस? तुझी युद्धाची हौस आज रणांत जिरवितों पहा!’

असें बोलून त्या क्रूर पराक्रमी राक्षसानें क्रोधानें डोळे लाल केले, तो आका-शांत उडाला आणि फार मोठ्यानें हंसला. मग गजेंद्रावर प्रहार करणाऱ्या सिंहाप्रमाणें त्यानें कर्णावर बाणांचा मारा केला. परंतु कर्णानें ती बाणवृष्टि दुरूनच नाहींशी केली. हे भरतर्षभा, तेव्हां घटोत्कचानें गुप्त होऊन माया

उत्पन्न केली आणि आपण उंच पर्वतप्राय होऊन राहिला. त्या पर्वताच्या शिखरांवर दाट झाडी असून त्यांतून शूलप्रासादिजल पाझरत होतें ! आपल्या प्रपातांतून उग्र आयुधें वाहून नेणारा तो काजळाच्या ढिगासारखा पर्वत पाहूनहि कर्ण डगमगला नाहीं ! त्यानें मग हास्यपूर्वक दिव्यास्त्राची योजना केली. त्याचे योगानें तो महापर्वत नाश पावला. नंतर तो अत्युग्र राक्षस आकाशांत इंद्रधनुष्यासह एक नीलवर्ण मेघ होऊन त्या सूतपुत्रावर पाषाणवृष्टि करूं लागला. अस्त्रज्ञांमध्यें श्रेष्ठ वैकर्तन कर्णानें वायव्यास्त्राची योजना करून त्या कालमेघाला उडवून दिलें आणि बाणसमूहानें दिशा आच्छादून घटोत्कचानें टाकलेल्या अस्त्राचा नाश केला ! तेव्हां महाबलिष्ठ भैमसैनीनें रणांत त्या कर्णावर महामायेची योजना केली. नंतर जे गजांवर, अश्वांवर व रथांत बसले आहेत, ज्यांनीं विविध शस्त्रें धारण केलीं आहेत, नानाप्रकारचीं कवचें व भूषणें ज्यांनीं परिधान केलीं आहेत, जे सिंहशार्दूलां-सारखे व मत्तमातंगांप्रमाणें पराक्रमी आहेत, अशा घोर व क्रूर राक्षसांनीं वेष्टित घटोत्कच देवांनीं परिवृत इंद्राप्रमाणें रथांतून येत आहे, असें पाहून महाधनुर्धर कर्ण त्याशीं युद्ध करूं लागला ! तेव्हां घटोत्कचानें पांच बाणांनीं कर्णाला विद्ध करून सर्व राजांना भयभीत करून सोडणारी भयंकर गर्जना केली, व शरगणांसह एका अंजलिकानें त्या कर्णाच्या हातांतील धनुष्य तोडून टाकिलें ! नंतर कर्णानें दुसरें बळकट व भारसह धनुष्य घेतलें आणि तें जोरानें आकर्ण ओढलें. हे महाराजा, तेव्हां कर्णानें सुवर्णपुंखांचे, शत्रूंस मारणारे व अंतरिक्षगामी बाण त्या राक्षसावर टाकले ! त्यामुळें वन्य गजांना सिंह जसा व्याकुळ करून सोडतो, त्याप्रमाणें त्या विशाल छातीच्या राक्षससमूहांना कर्णानें आपल्या बाणांनीं पीडित केलें. त्या समर्थानें बाणांनीं अश्व, सारथि, गज यांसुद्धां सर्व राक्षसांना व्याकुळ करून प्रलयकालीं प्राणिमात्रास जाळून टाकणाऱ्या अग्निनारायणाप्रमाणें त्यांना दग्ध करून टाकिलें ! पूर्वीं त्रिपुरासुराला दग्ध करणाऱ्या महेश्वराप्रमाणें त्या राक्षससेनेला जाळून तो सूतपुत्र कर्ण शोभूं लागला ! हे मारिषा, त्या पांडवपक्षीय हजारों राजांमध्यें त्या यमतुल्य महाबलिष्ठ राक्षसाधिपति घटोत्कचाशिवाय दुसऱ्या कोणाच्यानेंहि त्याजकडे पाहवेना ! हे राजा, त्यावेळीं मोठ्या उल्कांमधून तैलाचे बिंदु पडतात, त्याप्रमाणें त्या क्रुद्ध घटोत्कचाच्या नेत्रांतून अग्नि उत्पन्न झाला ! नंतर हातावर हात मारून व दांतओंठ चावून गजांएवढीं मोठीं व पिशाचांसारख्या

तोंडाचीं गाढवें लावलेल्या मायानिर्मित रथांत तो बसला आणि संतप्त होऊन आपल्या सारथ्यास बोलला, 'मला सूतपुत्राकडे घेऊन चल!'

हे राजा, नंतर तो रथिश्रेष्ठ आपल्या घोर रथांत बसून पुनः कर्णाशीं द्वंद्व-युद्ध करण्याकरितां गेला आणि शंकरानें निर्माण केलेली महाघोर व आठ चाकांची एक अशनि त्या राक्षसानें कर्णावर फेंकली! तिची उंची दोन योजनें असून लांबी एक योजन होती. ती पोलादी असून कदंबाच्या फुलांवरील केसरांप्रमाणें तीवर सारखे शूल होते! तेव्हां कर्णानें आपलें धनुष्य बाजूला ठेवून व उडी मारून ती अशनि घेतली आणि उलट घटोत्कचावरच फेंकली! इतक्यांत घटोत्कचानेंहि रथांतून खालीं उडी टाकली तरी ती महातेजस्वी अशनि अश्व, सारथि व ध्वज यांचें भस्म करून जमिनींत शिरली! हें पाहून देवांसहि आश्चर्य वाटलें! कर्णानें ती देवनिर्मित अशनि घेतल्याचें पाहून सर्व लोक त्याची स्तुति करूं लागले! नंतर तो परंतप कर्ण पुनः रथावर चढला आणि तेथून तो नाराच बाण टाकूं लागला. हे मानदा, त्या युद्धांत कर्णानें जें अद्भुत कर्म केलें, तशाप्रकारचें सर्व लोकांमध्यें दुसऱ्या कोणाच्याहि हातून होणें अशक्य होतें! पर्वतावर पडणाऱ्या जलधारांप्रमाणें नाराचांचा वर्षाव होत असतां तो गंधर्वनगराच्या आकाराचा राक्षस पुनः अंतर्धान पावला. त्या शत्रुविनाशक राक्षसानें मायेच्या योगानें व लाघवानें तीं सर्व दिव्यास्त्रें नाहींशीं केलीं, असें असतांहि कर्ण त्यावेळीं अगदीं शांतपणें त्याच्याशीं युद्ध करीत होता! हे महाराजा, नंतर त्या महाबलिष्ठ घटोत्कचानें क्रुद्ध होऊन महारथीहि भिऊन जातील, अशीं अनेक रूपें प्रकट केलीं! तेव्हां सिंह, व्याघ्र, तरस, अग्नीसारख्या जिभांचे साप व अयोमुख पक्षी चारी दिशांकडून तेथें आले! तो घटोत्कच कर्णचापांपासून सुटलेल्या बाणांनीं पीडित झाला असतांहि दुष्प्रेक्ष्य नागराजाप्रमाणें गुप्त होत असे! राक्षस, पिशाच्च, यातुधान, कुत्रे व लांडगे वेडींवांकडीं तोंडें करून कर्णावर चारी बाजूंनीं धांवून आलीं! त्यांनीं आपल्या उग्र शब्दानें कर्णाला त्रासवून सोडलें! तेव्हां कर्णानें आपल्या दिव्य अस्त्रांनीं त्या राक्षसी मायेचा नाश करून आपल्या सन्नतपर्व बाणांनीं त्याच्या अश्वांना ठार केलें! त्या बाणांनीं ते विद्रीर्ण झाले, व कित्येकांच्या पाठी फुटून गेल्या! अशारीतीनें ते त्या राक्षसाच्या देखत भूमीवर पडले! याप्रमाणें त्या हैडिंबीची माया कर्णानें नष्ट केली. तेव्हां 'हा मी तुझा आतां वध करितों,' असें म्हणून तो अंतर्धान पावला. ७. ६. १७५.

## अध्याय १७६ वा.

[ १ अलायुधाचें युद्धार्थ आगमन. ]

( १ ) **संजय**—अशाप्रकारें कर्ण व घटोत्कच यांचें युद्ध चाललें असतां वीर्यवान् अलायुध राक्षसाधिपति रणांगणांत आला आणि तो मोठ्या सैन्या-निशीं दुर्योधनाजवळ गेला. तो हजारों विद्रूप व नानाप्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या राक्षसांनीं वेष्टित असून पूर्वीचें वैर लक्ष्यांत ठेवून आला होता. कारण त्याच्या जातीचा, पराक्रमी व ब्राह्मणभक्षक बकासुर, महातेजस्वी किर्मीर व त्याचा मित्र हिडिंब यांस पूर्वीं भीमानें मारलें होतें. रात्रियुद्ध सुरू झाल्याचें त्यास समजतांच तो भीमास मारण्याच्या उद्देशानें मत्त मातंगासारखा किंवा क्रुद्ध सर्पासारखा दुर्योधनाला म्हणाला, " भीमसेनानें माझे बांधव बकासुर, किर्मीर आणि हिडिंब मारल्याचें तुला ठाऊक आहेच ! तसेंच आमचा व दुसऱ्या राक्षसांचाहि अपमान करून त्यानें हिडिंबेचें पाणिग्रहण केलें आहे, याहून आणखी तें काय पाहिजे ? हे राजा, अश्व, रथ, गज आणि इतर परिवार यांसह त्यास मारावें आणि अमात्यांसह घटोत्कचाचाहि वध करावा, ह्या इच्छेनें मी आलों आहे ! वासुदेव ज्यांचा अग्रणी आहे, अशा सर्व कुंतीपुत्रांना आणि त्यांच्या अनुचरांना मारून मी आज त्यांचें भक्षण करीन ! राजा, तूं आपल्या सेनेला मागें फिरीव, आम्हीं पांडवांशीं युद्ध करूं ! "

तें त्याचें भाषण ऐकून दुर्योधनाला आनंद झाला आणि तो त्याला आदरपूर्वक बोलला, ' तुझ्या लोकांसह तुला पुढें करून आम्ही शत्रूंशीं लढूं ! या वैराचा एकदां शेवट लावून घेण्याचें माझ्या सैनिकांच्या मनांत असल्यामुळें ते युद्ध थांबवून कधींहि स्वस्थ बसणार नाहींत !'

यावर ' ठीक आहे,' असें राजा दुर्योधनास सांगून तो राक्षसाधिपति आपल्या मनुष्यभक्षक अनुचरांसह त्वरेनें भीमावर धांवला. तेव्हां दीप्ति-मान् शरीराचा अलायुध सूर्यसदृश तेजस्वी रथांत बसला होता. तो रथ घटोत्कचाच्या रथासारखाच होता. त्याचा निर्घोष अतुल असून तो अनेक तोरणांनीं चित्रविचित्र केला होता[१]. त्याचें धनुष्यहि फार मोठें, दृढ प्रत्यंचेचें,

---

१. ह्या रथाचें वर्णन मागें घटोत्कचाच्या रथाचें वर्णन दिलें आहे, त्या-प्रमाणेंच असल्यामुळें येथें गाळलें आहे.

व सुवर्णासारखें उज्ज्वल होतें ! त्याचे तीक्ष्ण व सुवर्णपुंख बाण आंसाएवढे मोठे होते ! तो घटोत्कचासारखाच महाबलिष्ठ होता ! त्याचा ध्वज अग्नि किंवा सूर्य यांप्रमाणें तेजस्वी असून कोल्हे त्याचें रक्षण करीत होते ! त्याचें स्वरूप घटोत्कचापेक्षां शोभिवंत असून त्याचें तोंड व्याकुळ व प्रदीप्त दिसत असे ! त्याचीं बाहुभूषणें प्रज्वलित असून मस्तकावर देदीप्यमान मुकुट होता ! त्यानें गळयांत माळा घातली होती, व खड्ग धारण केलें होतें ! त्यानें हातांत गदा-मुसलादि आयुधें घेतलीं असून त्याचा देह गजासारखा प्रचंड होता ! अग्नीसारख्या तेजस्वी रथांत बसून पांडवांच्या सेनेचा संहार करीत असतां तो रणांगणावर आकाशांतील विद्युद्युक्त मेघांसमान शोभत होता ! हे राजा, कवचें व ढाली धारण करून, सर्व श्रेष्ठ व महाबलवान् पांडवपक्षीय राजे मोठ्या हर्षानें त्याशीं लढूं लागले ! ७. ६. १७६.

---

## अध्याय १७७ वा.

[ १ अलायुधाशीं युद्ध. ]

( १ ) संजय—तो भीमकर्मा राक्षस समरांगणावर येत असल्याचें पाहून सर्व कौरवांना मोठा हर्ष झाला. तसेंच समुद्र तरून जाणाऱ्या नौकाविहीन लोकांना ती सांपडली असतां जसा हर्ष होतो, तसा तुझ्या दुर्योधनप्रमुख पुत्रांस त्यावेळीं झाला. त्या पुरुषर्षभ वीरांना आपला पुनर्जन्म झाल्यासारखें वाटून त्यांनीं त्या अलायुध राक्षसाधिपतीचें स्वागतपूर्वक गौरव केलें.

इकडे कर्ण आणि घटोत्कच यांमध्यें अमानुष, महाभयंकर व अतिदारुण युद्ध प्रवृत्त झालें असतां सर्व राजांसह पांचाल कुतूहलपूर्वक तें पाहूं लागले ! तुझे वीरहि तें युद्ध पहात इतस्ततः फिरूं लागले ! समरांगणांत घटोत्कचाचा तो पराक्रम पाहून द्रोण, अश्वत्थामा, कृपाचार्य वगैरे संभ्रांत होऊन गेले आणि 'आतां आपलें सैन्य जीवंत रहात नाहीं,' म्हणून आक्रोश करूं लागले ! हे महाराजा, त्यावेळीं तुझें सैन्य उद्विग्न झालें, त्यामध्यें हाहाकार माजला आणि तें विमनस्क होऊन गेलें ! कर्णाच्या जीविताविषयीं त्याची अगदीं निराशा झाली ! कर्णाची ती संकटावस्था पाहून दुर्योधनानें अलायुधाला बोलाविलें आणि तो त्या राक्षसाधिपतीला म्हणाला, " वैकर्तन कर्ण हा हैडिंबाशीं भिडून रणांत आपणाला साजेल, असा मोठा पराक्रम करीत आहे ! गजानें वृक्षांचा नाश करावा, त्याप्रमाणें त्यानें नानाप्रकारच्या शस्त्रांनीं रणांत हे शूर राजे मारून

टाकिले आहेत, पहा ! घटोत्कच हा तुझा भाग आहे, असें मीं राजसभेंत तुझ्याच संमतीनें ठरविलें आहे. तर हे वीरा, तूं पराक्रम करून त्याचा वध कर ! हे अरिकर्शना, हा पापी घटोत्कच मायाबलाचा आश्रय करून आपल्या समोरच वैकर्तन कर्णाला आकर्षीत आहे पहा ! "

दुर्योधन राजानें असें सांगतांच तो भीमपराक्रमी व महाबलवान् राक्षस 'ठीक आहे,' असें म्हणाला आणि घटोत्कचावर धांवून गेला. हे प्रभो, तेव्हां घटोत्कचानें कर्णाला सोडून आपल्यावर चालून येणाऱ्या शत्रूला बाणांनीं उध्वस्त करून सोडलें ! त्यावेळीं अरण्यांत करिणीसाठीं ज्याप्रमाणें दोन मत्तगजांचें युद्ध व्हावें, त्याप्रमाणें त्या दोन राक्षसाधिपतींचें युद्ध झालें. घटोत्कचानें मुक्त केलेला रथिश्रेष्ठ कर्ण सूर्यसदृश रथांत बसून भीमसेनावर चालून गेला. परंतु सिंह जसा वृषभास त्रासवितो, त्याप्रमाणें अलायुधानें रणांत घटोत्कचाला ग्रस्त केल्याचें पाहून भीमसेनानें कर्णाकडे दुर्लक्ष केलें आणि आपल्या रविसमान तेजस्वी रथांतून बाण सोडीत अलायुधाच्या रथाकडे तो वीराग्रणी निघून गेला. हे प्रभो, आपल्यावर भीम येत आहेसें पाहून अलायुधानें घटोत्कचाला सोडून भीमाला युद्धार्थ आह्वान केलें ! हे प्रभो, तेव्हां राक्षसांतक भीमसेन त्यावर सहसा चालून गेला आणि त्यानें त्या राक्षसेंद्राला त्याच्या अनुचरांसह शरवर्षावानें आच्छादून टाकलें ! तसेंच अलायुधानेंहि शिलाशुद्ध सरलगामी बाणांनीं त्या भीमसेनावर पुनःपुनः बाणवृष्टि केली ! तेव्हां तुझ्या पुत्रांना जय मिळावा, या इच्छेनें अलायुधाचे अनुचर राक्षसहि भीमावर धांवून गेले ! त्या महाबलिष्ठ भीमसेनानें याप्रमाणें पुष्कळांकडून बाणांचा प्रहार होत असतांहि पांच-पांच तीक्ष्ण बाणांनीं त्या सर्वांना विद्ध केलें ! तेव्हां ते क्रूरबुद्धि राक्षस भयंकर गर्जना करीत दश-दिशांना पळून गेले ! आपल्या राक्षसांना भीम त्रस्त करीत आहेसें पाहून तो अलायुध भीमसेनावर वेगानें धांवून आला आणि शरवृष्टीनें त्यानें त्याला व्याप्त केलें ! भीमानेंहि त्याला तीक्ष्णाग्र बाणांनीं विद्ध केलें ! भीमानें रणांत सोडलेल्या कित्येक बाणांचा अलायुधानें छेद केला व कित्येक त्वरेनें ग्रहण केले ! नंतर त्या भीमपराक्रमी भीमानें आपली वज्रतुल्य गदा त्यावर फेंकली ! अग्नीसारख्या ज्वाला प्रसविणारी ती गदा येत आहे, असें पाहून अलायुधानें तिच्यावर आपल्या गदेनें जोरानें प्रहार केला. त्यायोगानें उलट ती भीमाकडे आली ! तेव्हां कुंतीपुत्रानें त्या राक्षसश्रेष्ठाला आपल्या बाणांनीं विद्ध केलें !

ते बाण देखील त्या राक्षसानें तीक्ष्ण शरांनीं विफल करून टाकले! नंतर रात्रीच्या वेळीं ते सर्व राक्षस त्या राक्षसेंद्राच्या आज्ञेवरून मोठमोठ्या रथांचा नाश करण्यास प्रवृत्त झाले. तेथें त्या राक्षसांकडून अत्यंत पीडित होऊन पांचाल, सृंजय, तसेंच अश्व आणि मोठमोठे गज यांनाहि शांति मिळाली नाहीं!

तें अतिघोर महायुद्ध चाललेलें पाहून पुंडरीकाक्ष धनंजयाला म्हणाला, " हे पांडवा, हा महाबाहु भीम त्या राक्षसेंद्राच्या अधीन झाला आहे! तर तूं यत्किंचितहि विचार न करितां त्याच्या मागोमाग जा; धृष्टद्युम्न, शिखंडी, युधामन्यु, उत्तमौजा आणि द्रौपदेय या महारथींनीं कर्णावर चालून जावें आणि हे पार्था, नकुल, सहदेव आणि वीर्यवान् युयुधान यांनीं तुझ्या आज्ञेनुसार त्या राक्षसांचा वध करावा! हे महाबाहो, तूं देखील या द्रोणपुरस्कृत सेनेचा संहार कर; कारण हे नरव्याघ्रा, आपल्यावर मोठी भीतीची वेळ आली आहे!"

कृष्णानें ह्याप्रमाणें सांगतांच महारथी, वैकर्तन कर्णावर आणि त्या राक्षसावर रणांत चालून गेले. नंतर त्या प्रतापवान् राक्षसाधिपतीनें आपलें धनुष्य पूर्ण खेंचून सोडलेल्या सर्पतुल्य बाणांनीं भीमाचें धनुष्य तोडलें. तसेंच तीक्ष्ण बाणांनीं त्याचे अश्व आणि सारथि यांना भीमसेनाच्या समक्ष ठार केलें! नंतर तो भीम अश्वहीन व सारथिहीन होऊन रथासनावरून खालीं उतरला आणि त्यानें मोठी गर्जना करून आपली प्रचंड व घोर गदा त्यावर फेंकली! तेव्हां त्या राक्षसानें आपल्याकडे येणाऱ्या गदेवर गदेनें प्रहार केला व गर्जना केली. तें त्या राक्षसाचें घोर व भयावह कर्म पाहून भीमसेन प्रहृष्ट झाला व त्यानें ती गदा तत्काळ धारण केली! तेव्हां त्या नर-राक्षसांचें तुमुल युद्ध झालें आणि त्यांत गदाघातांच्या निनादानें पृथ्वी थरथर कांपूं लागली! नंतर गदा बाजूला ठेवून त्यांनीं एकमेकांना गांठलें व वज्राघातसदृश मुष्टिप्रहारांनीं ते अन्योन्यांना मारूं लागले! रथांचीं चाकें, जोकडें, आंस, आसनें आणि उपकरणें यांतील जें जें म्हणून आढळून येईल, तें तें घेऊन ते एकमेकांवर प्रहार करूं लागले. त्यांच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहात असतांहि परस्परांना भिडून मत्त मातंगांप्रमाणें पुनःपुनः ते एकमेकांना ओढूं लागले! तेव्हां पांडवांचे कल्याणाविषयीं सर्वदा तत्पर असलेल्या हृषीकेशानें त्यांना पाहिलें आणि भीमसेनाच्या रक्षणाकरितां घटोत्कचाला तिकडे पाठवून दिलें! ७. ६. १७७.

---

## अध्याय १७८ वा.

[ १ श्रीकृष्णाची घटोत्कचास अलायुधाकडे जाण्याची प्रेरणा. २ अलायुधाचा घटोत्कचाकडून वध. ]

( १ ) संजय—हे राजन्, त्या राक्षसानें रणांत भीमाला ग्रस्त केल्याचें पाहून वासुदेव घटोत्कचाला म्हणाला, " हे महाबाहो, अलायुधानें समरांत सर्व सैन्याच्या व तुझ्या समक्ष भीमाला कसें ग्रस्त केलें आहे, पहा! म्हणून तूं कर्णाला सोडून दे आणि आधीं या राक्षसाधिपति अलायुधाचा आणि नंतर कर्णाचाहि वध कर."

( २ ) श्रीकृष्णाचें भाषण ऐकून तो वीर्यवान् घटोत्कच बकासुराचा बंधु व राक्षसांचा अधिपति जो अलायुध, त्याच्याशीं युद्ध करूं लागला. हे भारता, त्या दोघां राक्षसांचें रात्रीच्या वेळीं अतितुमुल व अत्युग्र युद्ध झालें. ते उग्र स्वरूपाचे शूर राक्षस धनुष्यें घेऊन वेगानें येत असतां अत्यंत क्रुद्ध व सशस्त्र महारथी युयुधान आणि नकुल-सहदेव यांनीं तीक्ष्ण शरांनीं त्यांना विद्ध केलें! हे राजा, किरीटी अर्जुनानें सर्व मोठ्या क्षत्रिय वीरांवर समंततः बाणांची वृष्टि केली! इकडे कर्णानेंहि पांडवांकडील सर्व पार्थिवांना आणि धृष्टद्युम्न, शिखंडी इत्यादि पांचालांच्या महारथांस पळवून लाविलें! ते पांचाल मारले जात आहेत, असें पाहून तो भीमपराक्रमी भीम रणांत बाण सोडीत वेगानें कर्णावर चालून आला! तसेंच नकुल, सहदेव आणि सात्यकि यांनींहि राक्षसांचा संहार केला आणि कर्ण होता तेथें आले. नंतर ते कर्णाबरोबर व पांचाल द्रोणाबरोबर युद्ध करूं लागले!

इकडे अलायुध संक्रुद्ध होऊन त्यानें अरिंदम घटोत्कचाच्या मस्तकावर एका प्रचंड परिघाचा प्रहार केला! त्यानें त्या बलवान् घटोत्कचाला क्षणमात्र मूर्च्छा आली, परंतु त्या वीर्यवानानें मोठ्या निग्रहानें आपणाला सांवरून धरिलें. नंतर अग्नीसारखी प्रदीप्त सुवर्णविभूषित गदा भीमसेनानें त्यावर टाकली! ती गदा मोठा निनाद करीत आली आणि तिनें त्याचे अश्व, रथ आणि सारथि यांचें चूर्ण केलें! नंतर अलायुधहि राक्षसी मायेचा आश्रय करून अश्व, चक्रें, अक्ष भंगून गेलेल्या व ध्वजकूबर चूर्ण झालेल्या रथांतून त्वरेनें वर उडाला! त्यानें मायेनें रक्ताची सारखी वृष्टि चालविली! त्यावेळीं विजा चमकूं लागल्या आणि आकाशहि दाट अभ्रांनीं व्याप्त होऊन गेलें! नंतर त्या महायुद्धामध्यें

विद्युद्युक्त मेघांचे कडकडाट व त्यांबरोबरच शस्त्रप्रहारांचाहि महानिनाद होऊं लागला ! तेव्हां घटोत्कचानें त्या राक्षसाची मोठी माया अवलोकून आकाशांत उडी मारली व त्या मायेचा मायेनेंच नाश केला ! इतक्यांत तो मायावी अलायुध घटोत्कचावर भयंकर पाषाणवृष्टि करूं लागला ! परंतु या वीर्यवान् घटोत्कचानें शरवृष्टि करून त्या पाषाणवृष्टीचा सर्वत्र संहार केला ! तो त्याचा पराक्रम अत्यद्भुतच झाला ! नंतर ते परस्परांवर नानाप्रकारची शस्त्रवृष्टि करूं लागले. ते लोखंडी परिघ, शूल, गदा इत्यादि आयुधांनीं, तसेंच उपटलेल्या प्रचंड शाखांच्या मोठमोठ्या शमी, ताड, कदंब, चंदन आदिकरून वृक्षांनीं अन्योन्यांवर वृष्टि करूं लागले ! त्याचप्रमाणें अनेकविध धातूंनीं व्याप्त पर्वताग्रेंहि एकमेकांवर मारूं लागले ! तेव्हां स्फोट होणाऱ्या वज्राच्या शब्दाप्रमाणें त्यांचा प्रचंड आवाज होऊं लागला ! हे नृपा, त्या घटोत्कच व अलायुधाचें पूर्वी झालेल्या वालिसुग्रीवांप्रमाणें किंवा दोन बलवान् सिंहांप्रमाणें भयंकर युद्ध झालें. नानाविध घोर आयुधांनीं व बाणांनीं युद्ध केल्यावर ते तीक्ष्ण खड्ग घेऊन परस्परांवर चालून गेले ! ते महादेही व बलाढ्य वीर एकमेकांवर तुटून पडले आणि परस्परांचे केंस धरून खेंचूं लागले ! हे राजा, त्यांचीं शरीरें धर्मानें इतकीं व्याप्त झालीं कीं, अतिवृष्टीच्या वेळीं मेघांतून पडणाऱ्या जलधारांप्रमाणें त्यांच्या शरीरांतून घर्म निघूं लागला आणि रक्तहि वाहूं लागलें ! नंतर घटोत्कच वेगानें अलायुधावर धांऊन आला, त्यानें त्यास वर उचललें आणि जमिनीवर आपटून त्याचें प्रचंड मस्तक कापून काढलें ! याप्रमाणें कुंडलविभूषित त्याचें मस्तक हरण केल्यावर त्या बलाढ्यानें मोठी भयंकर गर्जना केली ! तो शत्रुविनाशक, प्रचंड देहाचा बकासुराचा बंधु हत झाल्याचें पाहून पांचाल आणि पांडव सिंहनाद करूं लागले ! त्या राक्षसाचा वध रणांत होतांच पांडव वीरहि हजारों भेरी व अयुतावधि शंख वाजवूं लागले ! ती रात्र पांडवांना अत्यंत विजयावह झाली आणि समंतात् लावलेल्या दीपमालांनीं ती फारच शोभूं लागली.

त्या महाबलाढ्य घटोत्कचानें तें मृत अलायुधाचें मस्तक नंतर दुर्योधनासमोर फेंकलें ! हे भारता, अलायुधाचा वध झाल्याचें पाहून दुर्योधन आणि त्याचें सर्व सैन्य परम उद्विग्न झालें. कारण अलायुधानें पूर्वीचें वैर लक्ष्यांत आणून व दुर्योधनाकडे स्वतः येऊन 'मीच भीमसेनाला युद्धांत मारणार' अशी प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणें तो खरोखरच त्याला मारणार, अशा

विश्वासानें दुर्योधन आपलें व आपल्या बंधूंचें जीवित शाश्वत झाल्याचें मानीत होता. परंतु भीमसेनाच्या पुत्रानें त्याचा वध केल्याचें पाहून भीमसेनाची प्रतिज्ञा पूर्ण झाली असें त्यास वाटूं लागलें. ७. ६. १७८.

---

## अध्याय १७९ वा.

[ १ कर्ण-घटोत्कचयुद्ध; कौरवसैन्याचा संहार. २ वासवी शक्ति सोडण्याविषयीं कर्णाची प्रार्थना. ३ घटोत्कचवध. ४ कर्णाचा सत्कार. ]

( १ ) **संजय**—अलायुधाचा वध केल्यामुळें घटोत्कचाला परमानंद झाला आणि तो तुझ्या सैन्यासमोर विविध प्रकारें गर्जना करूं लागला. गजांसहि कंपित करणारा त्याचा तुमुल शब्द ऐकून तुझ्या वीरांस सुद्धां मोठें भय उत्पन्न झालें. बलाढ्य घटोत्कच अलायुधाशीं युद्ध करण्यांत गुंतला आहे, असें पाहून महाबाहु कर्ण पांचालांवर धांवून गेला. त्यानें धृष्टद्युम्न व शिखंडी यांवर दहा-दहा नतपर्व बाण सोडले व त्यांच्या शरीरांचा भेद केला! त्यानें नाराच बाणांनीं युयुधान आणि उत्तमौजा यांना विद्ध केलें आणि सात्यकीसारख्या महारथ्यालाहि कंपित केलें! हे जनाधिपा, रणांगणावर ते सर्व योद्धे सव्यदक्षिण बाण सोडीत होते, तेव्हां त्यांचीं धनुष्यें मंडलाकार फिरतांना दिसत असत. त्यांच्या प्रत्यंचांचे नाद व रथनेमींचा निर्घोष हा उन्हाळ्याच्या शेवटीं होणाऱ्या मेघांच्या गडगडाटाप्रमाणें गंभीर होत असे. प्रत्यंचांचे टणत्कार व धांवांचा घोष ही ज्याची गर्जना, धनुष्यें हीं ज्याचीं विद्युन्मंडलाकार ध्वजशिखरें, शरौघ ही ज्याची मोठी जलवृष्टि असा तो संग्राममेघच तेथें निर्माण झाला होता! हे नरेंद्रा, शत्रुगणांस त्रस्त करणारा, धैर्याचा महानग, तो वैकर्तन कर्ण महापर्वताप्रमाणें तेथें निश्चल स्थित राहिला आणि त्यानें त्या वृष्टीचा विध्वंस केला! तुझ्या पुत्रांचें कल्याण करण्यांत तत्पर असलेल्या महात्म्या वैकर्तनानें सुवर्णपुंख वज्रपातासमान तीक्ष्ण शरांनीं शत्रूंना पळवून लाविलें! त्या कर्णानें वेगानें कित्येकांचे ध्वज छिन्न करून टाकले, कित्येकांचे देह शरविद्ध करून भिन्न केले, कित्येकांचे सारथि मारले, तर कित्येकांच्या अश्वांचा वध केला! युद्धांत कोठेंहि आश्रय न मिळाल्यामुळें ते परत युधिष्ठिराच्या सैन्याकडे फिरले! भंग होऊन त्यांना पराङ्मुख झालेले पाहून घटोत्कच अत्यंत संतापला आणि आपल्या सुवर्णरत्नविभूषित रथांत बसून त्यानें

सिंहासारखी गर्जना केली आणि कर्णाच्या रथाजवळ जाऊन आपल्या वज्र-तुल्य शरांनीं त्याला विद्ध केलें ! त्या दोघांनीं कर्णि, नाराच, शिलीमुख आदि-करून बाणांनीं आकाश निनादित केलें ! त्यावेळीं अंतरिक्ष तिर्यग् गतीनें संचार करणाऱ्या सुवर्णपुंख व प्रज्वलित बाणांच्या धारांनीं व्याप्त असल्यामुळें जणुंकाय विचित्र पुष्पांच्या मालांनींच सुशोभित झाल्यासारखें दिसत होतें ! त्या दोघां अप्रतिम प्रभाववान् वीरांनीं उत्तम शस्त्रांनीं मोठ्या दक्षतेनें परस्परांवर प्रहार केले ! त्यावेळीं त्या दोघांमध्यें युद्धांत कोणाला यत्किंचित्हि अंतर दिसून आलें नाहीं. रविपुत्र व भीमपुत्र या दोघांमधील तें युद्ध अतिविस्मय-कारक, अद्वितीय, क्षोभजनक, शस्त्रनिपातांनीं घोर आणि राहु-सूर्याच्या युद्धा-प्रमाणें अत्यंत उन्मत्तपणें होऊं लागलें !

**संजय**—हे नृपा, युद्धांत कर्णाला घटोत्कचावर आपलें प्राबल्य दाखवितां येईना, तेव्हां त्या अस्त्रज्ञांतील श्रेष्ठ कर्णानें एक उग्र अस्त्र प्रकट केलें, आणि त्या अस्त्रानें घटोत्कचाचे अश्व व सारथि यांसह त्याच्या रथाचें चूर्ण केलें ! तेव्हां घटोत्कच विरथ होऊन तत्काळ अंतर्धान पावला !

**धृतराष्ट्र**—संजया, तो मायावी राक्षस शीघ्र अंतर्धान पावला असतां माझ्या वीरांनीं पुढें काय केलें, तें सर्व मला सांग.

**संजय**—तो राक्षस अंतर्धान पावला असतां सर्व कौरवांनीं मोठ्यानें आक्रोश केला. मायावी राक्षस अदृश्यपणें कर्णास मारणार नाहींना, अशी त्यांस मोठी काळजी वाटूं लागली ! तेव्हां त्या अस्त्रकुशल कर्णानें बाणांनीं सर्व दिशा व्यापून टाकल्या ! त्याच्या बाणांनीं सर्व आकाश अंधकारमय झाल्यामुळें कोणीहि प्राणी तेथें जाऊं शकेना ! हा कर्ण बाण घेतो केव्हां, सोडतो केव्हां आणि कराग्रांनीं भात्यास स्पर्श करितो केव्हां, हें त्याच्या चापल्यानें कोणालाच दिसत नव्हतें ! त्यानें सर्व अंतरिक्ष बाणांनीं व्याप्त केलें होतें. इतक्यांत आकाशांत राक्षसानें निर्माण केलेली, लोहिताभ्राप्रमाणें दिसणारी, देदीप्यमान, अग्निज्वालेप्रमाणें उग्र, दारुण, घोर आणि भयंकर माया आम्हांला दिसूं लागली ! हे कौरवेंद्रा, त्या मायेवर विजा चमकत होत्या व प्रज्वलित उल्काहि प्रकट झाल्या होत्या ! तिचा घोषहि हजारों दुंदुभींच्या आवाजाप्रमाणें अतिघोर होत होता ! सुवर्णपुंख बाण, शक्ति, ऋष्टि, इत्यादि आयुधें समंतात् प्रादुर्भूत झालीं ! तेथें ठिकठिकाणीं मोठमोठ्या

शिला पडूं लागल्या आणि हजारों अशनि, वज्रें व अग्निसमान शेंकडो क्षुरयुक्त चक्रें उत्पन्न झालीं! शक्ति, पाषाण, पशु इत्यादिकांची ती विशाल व प्रदीप्त वृष्टि कर्ण आपल्या शरौघानें थांबवूं शकला नाहीं! बाणांनीं हत झालेले अश्व, वज्रप्रहारांनीं पीडित झालेले गज आणि शिलाघातांनीं व्यथित झालेले महारथी पडत असतां मोठा ध्वनि होऊं लागला! घटोत्कचाच्या भयंकर शस्त्रवृष्टीनें दुर्योधनाचें सैन्य फारच भयभीत होऊन सर्व दिशांना भ्रमण करूं लागलें! हाहाकार करीत तें भ्रमण करीत होतें व दुःखी व विषण्ण होऊन लपतहि होतें! त्यावेळीं त्यांतील श्रेष्ठ पुरुष मात्र आर्यभावामुळें तेथून पराङ्मुख झाले नाहींत. ती राक्षसी, भयंकर स्वरूपाची, अतिघोर पडणारी शरवृष्टि व मरून पडत असलेलें आपलें सैन्य पाहून तुझ्या पुत्रांना मोठी भीति उत्पन्न झाली! हे नरेंद्रा, अग्नीप्रमाणें ज्यांच्या जिव्हा प्रदीप्त आहेत आणि ज्यांचा आवाज अतिभयंकर आहे, अशा शिवा शेंकडों प्रकारचे चीत्कार करितांना आणि राक्षसांचे समुदायहि गर्जत असतांना पाहून तुझे योद्धे फारच व्यथित होऊन गेले! प्रदीप्त जिव्हांचे, तीक्ष्ण दंष्ट्रांचे व पर्वतप्राय देहाचे ते राक्षस शक्ति हातांत घेऊन आकाशांत गेले आणि मेघांप्रमाणें उग्र वृष्टि करूं लागले! त्यांनीं मारलेले बाण, शक्ति, शूल इत्यादि आयुधांनीं जर्जर होऊन तुझे योद्धे पडले! ते राक्षस शूल, भुशुंडी, पाषाण, शतघ्नी आणि लोखंडी पट्टयांनीं वेष्टित स्थूल तुझ्या पुत्राच्या सैन्यावर टाकूं लागले! तेव्हां त्यांना फारच संकटावस्था प्राप्त झाली! शूरांचीं आंतडीं निघालीं, मस्तकें विदीर्ण झालीं आणि देह छिन्नभिन्न होऊन त्यांनीं तेथें शयन केलें! घोडे छिन्न झाले, हत्ती भंग पावले आणि पाषाणांच्या योगानें रथांचें चूर्ण होऊन गेलें! याप्रमाणें त्या घोररूपी राक्षसांनीं पृथ्वीवर मोठी शरवृष्टि केली. अशी त्या घटोत्कचानें तेथें माया निर्माण केली. भ्यालेल्याला किंवा प्राणदानाची याचना करणारालाहि तो सोडीत नव्हता! तेथें कौरवांचा भयंकर संहार प्रवृत्त झाला असतां आणि क्षत्रियांचा अभाव होण्याची वेळ आली असतां कौरवांचे सैनिक भग्न होऊन ‘ कौरवहो, पळा पळा, आतां येथें राहूं नका! आम्हांला पांडवांकरितां हे इंद्रादि देवच मारीत आहेत!’ अशा आरोळ्या देत ते सारखे पळत सुटले! याप्रमाणें सर्व भारतवीर दुःखसागरांत मग्न झाले असतां सूतपुत्र कर्णच एकटा तेथें द्वीपासारखा निश्चल स्थित होता. तुमुल आक्रोश चालू असतां आणि भग्न झालेल्या सैन्याची वाताहत झाली असतां अंधकारांत

कौरव कोण व इतर कोण हेंहि ओळखतां येईनासें झालें. कौरव संभ्रांत होऊन अमर्याद पळूं लागले आणि सर्व दिशा शून्य होऊन जणुंकाय त्यांजकडे निरखून पाहूं लागल्या. ती वृष्टि सहन करणारा काय तो एक कर्णच दिसून आला. राक्षसाच्या दिव्य मायेशीं झगडून त्यानें बाणांनीं अंतरिक्ष व्यापून टाकलें. दुष्कर आर्यकर्म करणारा तो विनयशील कर्ण त्या युद्धांत यत्किंचितहि भ्रांत झाला नाहीं. राजा, भयभीत झालेले सर्व सैंधव आणि बाल्हीक कर्णाकडे पाहूं लागले. राक्षसाच्या विजयांतहि कर्णाच्या स्थैर्यावरून ते त्याची प्रशंसा करूं लागले !

( २ ) इतक्यांत घटोत्कचानें चक्रयुक्त शतघ्नी कर्णावर फेंकली. तिनें कर्णाचे चारहि अश्व हत झाले. तेव्हां तो अश्वहीन कर्ण उद्विग्न होऊन यानांतून खालीं उतरला. कौरव रणांतून पळून जात आहेत आणि त्यांचीं अस्त्रें मायेनें विफळ होत आहेत, हें पाहूनहि तो संभ्रांत झाला नाहीं. पुढील कर्तव्याचाच विचार तो करूं लागला. तेव्हां सर्व कौरव ती घोर स्वरूपाची माया पाहून कर्णाकडे बघून म्हणाले " कर्णा, आपल्या शक्तीनें आज ह्या राक्षसाचा वध कर ! कारण धृतराष्ट्रपुत्र कौरव येथें नाश पावत आहेत ! भीम आणि अर्जुन आमचें काय करणार आहेत ? आज मध्यरात्रीं ताप देणाऱ्या या पापी राक्षसाला मार ! आमच्यांपैकीं जो कोणी या घोर संग्रामांतून वांचेल, तो पांडवांशीं व त्यांच्या सैन्याशीं युद्ध करील व त्यांना जिंकील. यासाठीं इंद्रानें दिलेल्या शक्तीनें या घोर राक्षसाला मार ! कर्णा, हे सर्व इंद्रतुल्य कौरव रात्रियुद्धांत वीरांसह नाश पावूं नयेत !

( ३ ) राजा, मध्यरात्रीं राक्षसानें आपल्यावर केलेला संप्रहार व त्याजकडून त्रस्त झालेलें सैन्य पाहून आणि कौरववीरांनीं केलेली प्रार्थना लक्ष्यांत घेऊन ती शक्ति सोडण्याचें कर्णानें मनांत आणलें. तो सिंहासारखा असहिष्णु असल्यामुळें त्याला रणांतील प्रतिघात सहन झाला नाहीं. त्यानें त्या राक्षसाचा नाश करण्यासाठीं ती कोणालाहि असह्य व श्रेष्ठ वैजयंती शक्ति हातांत घेतली. अर्जुनाच्या वधाकरितां त्यानें ती शक्ति वर्षानुवर्ष आदरपूर्वक रक्षण करून ठेवली होती व ती कुंडलांचा मोबदला म्हणून इंद्रानें त्याला दिली होती. ती पाशयुक्त, रक्तलोलुप, अंतकाची जणुंकाय जिह्वाच, यमाची भगिनी किंवा प्रज्वलित उल्काच, कर्णानें राक्षसावर फेंकली ! हे राजा, ती

श्रेष्ठ व प्रदीप्त परकायाविनाशक शक्ति कर्णाच्या हातांत झळकतांना पाहून घटोत्कच भयभीत झाला आणि विंध्यपर्वतासमान होऊन पळूं लागला! ती शक्ति पाहतांच अंतरिक्षांतील प्राणिवर्ग आर्तस्वरानें आक्रोश करूं लागले. हे राजा, त्यावेळीं वारे सोसाट्यानें वाहूं लागले आणि मेघगर्जनेबरोबर विद्युत्पा-तहि होऊं लागला! त्या प्रदीप्त शक्तीनें ती माया भस्म करून राक्षसाचें हृदय अति भग्न केलें! ती माया रात्रीच्यावेळीं पेटत वर उडून नक्षत्रांत शिरली. अशाप्रकारें दिव्य, नाग, मानुष आणि राक्षस या विविध अस्त्रांनीं युद्ध करून शेवटीं तो घटोत्कच वासवी शक्तीनें भिन्न झाला आणि भयंकर किंकाळ्या फोडीत त्यानें प्राण सोडला!

हे राजन्, शत्रूचा क्षय करण्याकरितां त्या राक्षसानें हेंचसें काय, परंतु आण-खीहि दुसरें आश्चर्यकारक कर्म केलें. त्या शक्तीनें त्याचीं मर्मस्थलें विदीर्ण झालीं असतांहि पर्वत किंवा मेघ यांसमान तो दिसूं लागला आणि अशा-प्रकारें प्रचंडदेही घटोत्कच खालीं डोकें करून आकाशांतून पृथ्वीवर गतप्राण होऊन पडला! त्याचीं गात्रें स्तब्ध व जिह्वा छिन्न झाली होती. तो भीमसे-नाचा भीमकर्मा पुत्र याप्रमाणें भयंकर रूप धारण करून खालीं पडला आणि हे राजा, गतप्राण होऊनहि त्यानें आपल्या देहानें तुझ्या सैन्याचा एक भाग चूर्ण करून टाकला! त्या राक्षसानें पडत असतां आपलें शरीर अत्यंत विस्तीर्ण केलें. त्या योगानें तुझें एक अक्षौहिणी सैन्य नाश पावलें. अशाप्रकारें मेल्या-वरहि त्यानें पांडवांचें प्रिय केलें!

(४) याप्रमाणें माया दग्ध होऊन राक्षसाचा वध झाला, हें पाहून कौरव हृष्ट झाले आणि त्यांनीं मोठ्यानें सिंहनाद केले. त्यांबरोबरच भेरी, शंख, मुरज आणि आनक हेहि वाजूं लागले. वृत्राच्या वधसमयीं देवांनीं जसा इंद्राचा गौरव केला, त्याप्रमाणें कौरवांनीं कर्णाचा आदरसत्कार केला आणि तो कर्ण तुझ्या पुत्राच्या रथांत बसून मोठ्या हर्षानें आपल्या सैन्यांत गेला. ७. ६. १७९.

---

## अध्याय १८० वा.

[ १ श्रीकृष्णहर्ष. २ अर्जुनाचा त्यासंबंधीं कृष्णाला प्रश्न. ३ कृष्णाकडून उत्तर. ]

( १ ) **संजय**—विशीर्ण पर्वताप्रमाणें त्या हिडिंबासुताचा वध झालेला पाहून सर्व पांडवांना मोठा शोक झाला आणि त्यांचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले. एकट्या श्रीकृष्णाला मात्र परम हर्ष होऊन त्यानें सिंहनाद केला आणि अर्जुनाला आलिंगन दिलें. मोठी गर्जना करून त्यानें हातांतील रश्मींचें संयमन केलें आणि वायूनें प्रकंपित वृक्षाप्रमाणें तो नाचूं लागला. त्यानें पुनः एकदा अर्जुनाला आलिंगन दिलें. त्यानें वारंवार टाळया पिटल्या आणि रथनीडावर बसूनच आणखी एकदां मोठ्यानें गर्जना केली.

( २ ) राजा, श्रीकृष्णाला अत्यंत हर्ष झालेला पाहून महाबलिष्ठ अर्जुन खिन्न मनानें त्याला म्हणाला, "हे मधुसूदना, आजचा तुझा हा अतिहर्ष अस्थानीं दिसत आहे. घटोत्कचाच्या वधानें आज शोक करण्याची वेळ आली आहे. त्याच्या वधानें सैन्यें विमुख झालीं आहेत आणि आम्हीहि त्याच्या वधामुळें अत्यंत उद्विग्न झालों आहों. जनार्दना, तुला हर्ष झाला आहे, त्याअर्थीं त्याचें कारणहि अल्प नसलें पाहिजे. हे सत्यवादिन्, तुला मी विचारीत आहें, मला सत्य सांग. हे अरिंदमा, ह्यांत कांहीं विशेष रहस्य नसेल, तर तूं मला तें सांगावें. हे मधुसूदना, आमचें धैर्य नष्ट होत आहे, तर याचें कारण आधीं सांग. जनार्दना, आजची ही तुझी कृति समुद्राच्या शोषणाप्रमाणें किंवा मेरूच्या भ्रमणाप्रमाणें मला वाटत आहे!"

( ३ ) **वासुदेव**—धनंजया, मला परम हर्ष झाला आहे, याचें कारण सांगतों ऐक. तें ऐकल्यानें तुझ्या मनाला तत्काल उत्तम शांति प्राप्त होईल. हे महातेजस्वी धनंजया, घटोत्कचानें ही शक्ति नष्ट केल्यामुळें कर्ण रणांत आजच हत झाला आहे, असें समज. कर्णाच्या हातांत ती शक्ति असल्यावर कार्तिकेयासमान त्याच्या पुढें रणांत उभा राहूं शकेल, असा पृथ्वीवर कोण पुरुष आहे? त्याचें कवच आणि कुंडलें हीं हरण केलीं गेलीं ही फार सुदैवाची गोष्ट झाली. तसेंच यावेळीं ती अमोघशक्ति घटोत्कचावर नाहींशी झाली, हेंहि आमचें सुदैवच होय. कर्णाचें कवच व कुंडलें जर आज अक्षय असतीं, तर एकट्या कर्णानें रणांत अमरांसह त्रैलोक्यहि जिंकलें असतें! इंद्र, कुबेर, जलाधिपति वरुण किंवा प्रत्यक्ष यम यांनाहि रणांत कर्णाशीं युद्ध

करण्याचें धैर्य झालें नसतें. तूं गांडीव धनुष्य व मी सुदर्शन चक्र सज्ज केलें असतें, तरीहि आमच्यानें त्या कवचकुंडलधारी नरश्रेष्ठाला जिंकतां आलें नसतें. तुझ्या हिताकरितां इंद्रानें कपटानें त्याचीं कुंडलें हरण केलीं आणि त्या परपुरंजय वीराला कवचहीनहि केलें ! यानें आपलें कवच व तीं विमल कुंडलें कापून इंद्रास दिलीं, म्हणूनच यास वैकर्तन म्हणत असतात. मंत्रसामर्थ्यानें स्तंभित केलेल्या क्रुद्ध सर्पाप्रमाणें किंवा ज्वाला शांत झालेल्या अग्नीप्रमाणें हा कर्ण आज मला दिसत आहे. हे महाबाहो, जी शक्ति कर्णानें घटोत्कचावर फेंकली आणि जी महात्म्या इंद्रानें कुंडलें व दिव्य कवच यांच्या विनिमयानें त्याला दिली, ती मिळाल्यापासून हा वृष कर्ण तुला रणांत नित्य मेलेलाच समजत आहे. आज कर्ण ह्या स्थितींत आहे, तरी देखील हे नरव्याघ्रा, तो तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाच्याहि हातून मारला जाणें शक्य नाहीं ! हे अनघा, हें मी तुला सत्य सांगत आहें. हा कर्ण ब्रह्मण्य, सत्यवादी, तपस्वी, व्रतस्थ आणि शत्रूंवर देखील उपकार करणारा आहे. म्हणूनच याला वृष—धर्मप्रधान—हें नाम प्राप्त झालें आहे. हा युद्धप्रवीण महाबाहु आपलें धनुष्य सर्वदा सज्ज ठेवीत असतो आणि सिंह जसा गजांच्या यूथपतीवर गर्जना करितो, त्याप्रमाणें हा रणाग्रभागीं मोठमोठ्या रथिश्रेष्ठांचाहि रणमद नाहींसा करितो. हे नरव्याघ्रा, मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें या कर्णाकडे बघण्यास तुझे मोठमोठे प्रख्यात योद्धेहि समर्थ होणार नाहींत ! शरत्कालच्या दिवाकराप्रमाणें हा शरजालांचा सहस्ररश्मि आहे. उन्हाळ्याच्या शेवटीं मेघासमान निरंतर शरवृष्टि करणारा हा कर्ण म्हणजे वृष्टिमान् पर्जन्यासारखा दिव्यास्त्रांचा मेघच होय. समंतात् देव जरी अंगांतून मांसशोणित गळूं लागेपर्यंत सारखी वृष्टि करूं लागले, तरीहि त्यांना यास जिंकणें अशक्य आहे. हे पांडवा, कवच आणि कुंडलें यांनीं हीन आणि वासवी शक्तीनेंहि वियुक्त झाल्यामुळें सांप्रत हा सामान्य मनुष्यासारखा झाला आहे. असें आहे, तरीहि त्याच्या वधाला एकच उपाय आहे आणि तो, कर्ण संकटांत सांपडला असतां मोठ्या दक्षतेनें योजला पाहिजे. त्याचें रथचक्र रुतून तो संकटांत पडेल, तेव्हां पूर्वीं मीं दिलेल्या संज्ञेनुसार त्याला मार. हा शस्त्रसज्ज असतां बलदैत्याचा वध करणारा प्रत्यक्ष वज्रपाणि इंद्र देखील या अजिंक्य वीराला रणांत मारूं शकणार नाहीं. तुझ्या हिताकरितां निरनिराळे उपाय योजून जरासंध, प्रख्यात चेदिराज आणि महाबलिष्ठ निषाद, एकलव्य,

त्याचप्रमाणें हिडिंब, किर्मीर, बकासुर वगैरे मोठमोठे राक्षस, शत्रुचक्राचें चूर्ण करणारा अलायुध आणि उग्रकर्मा व चपल घटोत्कच यांचाहि वध मींच करविला आहे. ७. ६. १८०.

---

## अध्याय १८१ वा.

[ १ जरासंधादिकांच्या वधासंबंधी अर्जुनाचा प्रश्न. २ श्रीकृष्णाचें उत्तर. ]

**अर्जुन**—हे जनार्दना, आमच्या हितासाठीं तूं जरासंधादि राजे कसे आणि कोणत्या उपायांनीं मारविलेस बरें ?

( २ ) **वासुदेव**—जरासंध, चेदिराज आणि महाबलाढ्य निषादपुत्र यांचा वध पूर्वी केला नसता, तर आज ते फार भयंकर झाले असते. त्या रथिश्रेष्ठांची निवड दुर्योधनानें अवश्य केली असती आणि त्यांचा आमच्यांशीं नित्य द्वेष असल्यामुळें कौरवांचाच त्यांनीं आश्रय केला असता. ते महाधनुर्धर, अस्त्रज्ञ आणि दृढयोद्धे असल्यामुळें देवांप्रमाणें सर्व कौरवसेनेचें त्यांनीं रक्षण केलें असतें. सूतपुत्र कर्ण, जरासंध, चेदिराज आणि एकलव्य यांनीं दुर्योधनाच्या आश्रयानें या पृथ्वीला त्रस्त करून सोडलें असतें. हे धनंजया, मीं त्यांचा कोणत्या उपायांनीं वध केला, तें सांगतों ऐक. या उपायांवांचून साक्षात् देवांकडूनहि त्यांचा युद्धांत पराजय झाला नसता. पार्था, प्रत्यक्ष लोकपाल रक्षण करीत असतां, यांपैकीं प्रत्येक शत्रुसैन्याशीं युद्ध करीत राहिला असता. पूर्वी बलराम जरासंधावर चालून आला असतां त्या राक्षसानें क्रोधाविष्ट होऊन आपली सर्वघाती गदा आमच्या नाशाकरितां फेंकली ! जणुंकाय आकाशास सीमन्त पाडीतच ती प्रज्वलित गदा अग्नीप्रमाणें इंद्रानें सोडलेल्या अशनीसारखी येतांना दिसली. ती वेगानें येत असतांना पाहून त्या रोहिणीपुत्र बलरामानें तिच्या प्रतिकारार्थ स्थूणाकर्णसंज्ञक अस्त्र सोडलें ! त्या अस्त्रवेगानें कुंठित होऊन ती गदा पृथ्वी देवीला विदीर्ण करीत आणि पर्वतांना कंपित करीत भूमीवर येऊन पडली ! त्यावेळीं जरानामक एक घोर व अतिपराक्रमी राक्षसी होती. तिनें त्या अरिंदम जरासंधाला उत्पत्तिकाळीं सांधिलें. कारण एका मातेपासून अर्धा देह, तर दुसऱ्या मातेपासून अर्धा देह अशी त्याची उत्पत्ति होती. जरेनें तीं दोन अर्धें एकत्र केल्यामुळें त्याला जरासंध हें नाम

प्राप्त झालें! पार्था, ती राक्षसी आपले पुत्र व बांधव यांसह त्या गदेनें व स्थूणाकर्ण अस्त्रानें तेथें नाश पावली. धनंजया, तो जरासंध राक्षस गदारहित झाल्यामुळें भीमसेनाकडून महायुद्धांत मारला गेला हें तूं पाहिलें आहेसच. हे नरोत्तमा, जर त्या प्रतापी जरासंधाच्या हातांत गदा असती, तर इंद्रसहित देवहि त्याला रणांत मारण्याला समर्थ झाले नसते!

तसाच तो निषादपुत्र एकलव्य सत्यपराक्रमी होता; परंतु तुझ्या हितासाठींच द्रोणानें आचार्यदक्षिणेचें मिष करून त्याचा अंगठा नाहींसा केला. तो दृढपराक्रमी व अभिमानी नैषादि हातांत अंगुलित्राण घालून वनांत फिरत असतां दुसरा रामच दिसत असे. एकलव्य अंगुष्ठसहित असता तर त्याला युद्धांत जिंकण्यास देव, दानव, राक्षस किंवा उरग हेहि समर्थ झाले नसते; तेथें त्याजकडे नजर टाकण्यास मनुष्य कसा बरें समर्थ झाला असता? तो मुष्टीचा दृढ, कृती आणि दिवारात्रौ शरसंधान करणारा होता. तुझ्या हितासाठींच मीं त्याला रणाग्रभागीं नष्ट केलें!

पार्था, पराक्रमी चेदिराजाला तुझ्या देखतच मीं मारिलें! सर्व सुरासुरांना देखील त्यास समरांत जिंकणें अशक्य होतें. हे नरव्याघ्रा, लोकांचें हित करण्याच्या इच्छेनें त्याच्या व इतरहि देवद्वेष्ट्यांच्या नाशाकरितांच मी तुझ्यासह अवतरलों आहें. हिडिंब, बक आणि किर्मीर यांचा भीमसेनाकडून मीं वध करविला! ते ब्राह्मणांच्या यज्ञांचा नाश करणारे रावणासारखेच वागणारे होते. मायावी अलायुधाला मींच घटोत्कचाकडून मारविलें! घटोत्कचाचा वधहि मीं कर्णाकडून त्या शक्तीच्या योगानेंच करविला. जर कर्णानें त्याला महायुद्धांत शक्तीनें मारलें नसतें, तर त्या भीमसेनपुत्राचा वध करणें मला प्राप्त होतें. तुमचें कल्याण करण्याच्या इच्छेनेंच मीं त्याला आजवर मारलें नव्हतें. हा घटोत्कच ब्रह्मद्वेष्टा व यज्ञद्वेषी होता. तसाच तो धर्मद्वेष्टा व पापी अंतःकरणाचा राक्षस होता. म्हणून मीं त्याला मारविलें. हे अनघा, ती इंद्रदत्त शक्तीहि मीं मोठ्या युक्तीनें निष्फळ केली. पांडवा, जे कोणी धर्माचा लोप करणारे असतील, ते सर्व मला वध्य होत आणि ही अक्षय प्रतिज्ञा मीं धर्मसंस्थापनेसाठीं केली आहे. ब्रह्म, सत्य, दम, ऱ्ही, धृति आणि क्षमा हीं जेथें जेथें वसतात, तेथेंच मी नित्य रममाण होत असतों, हें शपथपूर्वक मी तुला सांगतों. वैकर्तन कर्णाची भीति आतां तूं बाळगूं नकोस. तूं त्याचा प्रति-

कार करशील, असा उपाय मी तुला शिकवीन. वृकोदर भीम सुयोधनाचाहि युद्धांत वध करील. पांडवा, त्याच्याहि वधाचा उपाय तुला मी सांगेन. शत्रु-सैन्यामध्यें सांप्रत तुमुल जयशब्द वाढत आहे आणि तुझीं सैन्यें दाही दिशांना पळत सुटलीं आहेत. कौरवांचा उद्देश साधला असून ते तुझ्या सैन्याचा संहार करीत आहेत आणि वीरश्रेष्ठ द्रोणहि तुझ्या सैन्याचा नाश करीत आहे. ७. ६. १८१.

---

## अध्याय १८२ वा.

[ १ इंद्रशक्ति अर्जुनावर न सोडण्याचें कारण धृतराष्ट्र विचारतो. २ संजयाचें उत्तर. ]

( १ ) धृतराष्ट्र—एकाच वीराच्या वधाचे कामीं समर्थ शक्ति जर कर्णा-जवळ होती, तर इतर सर्वांस सोडून त्यानें ती अर्जुनावरच कां बरें सोडली नाहीं ? त्याचा वध झाला असतां, पांडव व सृंजय हे सर्व मेल्यासारखेच होते. म्हणून त्यानें त्या एका वीरास मारून युद्धांत जय कसा मिळविला नाहीं ? कोणीहि युद्धास आह्वान केलें असतां मागें फिरावयाचें नाहीं, असें अर्जुनाचें महाव्रत असतां सूतपुत्रानें त्यास स्वतः आह्वान करावयाचें होतें. संजया, द्वैरथ युद्धांत त्या अर्जुनाला आणवून इंद्रदत्त शक्तीनें कर्णानें त्याला कां मारलें नाहीं, तें मला सांग. माझा पुत्र खरोखरच बुद्धिहीन व असहाय आहे आणि त्या पाप्याची शत्रूंनीं वंचना केली असतां त्यास शत्रूंवर जय कसा मिळणार ? जिच्यावर कर्णाची सर्व विजयाशा लागून राहिली होती, ती उत्कृष्ट शक्ति कृष्णानें घटोत्कचावर व्यर्थ चालविली. ज्याप्रमाणें एखाद्या विकलांग मनु-ष्याच्या हस्तांतील फळ कोणी बलिष्ठानें हरण करावें, त्याप्रमाणें ती त्याची अमोघ शक्ति घटोत्कचाच्या ठिकाणीं व्यर्थ गेली. वराह आणि सारमेय यांमध्यें युद्ध प्रवृत्त होऊन ते मारले गेले असतां जसा चांडालाचा लाभ होतो, त्या-प्रमाणें या कर्ण-घटोत्कचांच्या युद्धांत बुद्धिमान् वासुदेवाचाच लाभ आहे, असें मला वाटतें. घटोत्कचानें जर कर्णाला मारलें, तर पांडवांचा मोठाच लाभ होईल आणि वैकर्तनानें घटोत्कचाला मारलें, तरीदेखील शक्तिनाश होऊन आपलें कार्य साध्य होईल, असा त्या प्राज्ञ वासुदेवानें विचार करून मोठ्या चातुर्यानें कर्णाकडून घटोत्कचाला मारविलें आणि पांडवांचें हित व प्रिय केलें.

( २ ) **संजय**—अर्जुनावर शक्ति सोडण्याचा कर्णाचा आशय जाणूनच मधुसूदनानें घटोत्कचाची द्वैरथ युद्धांत योजना केली. हे राजा, महाबुद्धिमान् जनार्दनानें महापराक्रमी घटोत्कचाला त्या अमोघ शक्तीच्या नाशासाठीं पाठविलें, हा सुद्धां तुझ्याच दुर्मंत्राचा परिणाम होय. हे कुरूद्वहा, कृष्णानें जर महारथी कर्णापासून अर्जुनाचें रक्षण केलें नसतें, तर आम्ही तेव्हांच कृतकृत्य झालों असतों. हे धृतराष्ट्रा, योगेश्वर प्रभु जनार्दनावांचून अर्जुन अश्व, ध्वज, रथ यांसह युद्धांत तेव्हांच पडेल. हे पार्थिवा, त्या त्या उपायांनीं कृष्ण त्याचें रक्षण करीत आहे, आणि त्यामुळेंच शत्रूंच्या समोर स्थित होऊन पार्थ त्यांस जिंकितो. पंडुपुत्राचें रक्षण त्या अमोघ शक्तीपासून विशेषेंकरून कृष्णच करीत आहे. नाहींतर वृक्षाला विद्युत् जशी भस्म करून टाकते, त्याप्रमाणें त्या शक्तीनें कौंतेयाचा तत्काळ नाश केला असता !

**धृतराष्ट्र**—माझा पुत्र विरोधी, दुर्मंत्री आणि आपणालाच मोठा बुद्धिमान् समजणारा आहे. परंतु अर्जुनाच्या वधाचा उपाय मात्र त्यास सुचला नाहीं. हे सूता, कर्ण महाबुद्धिमान् व सर्व शस्त्रवेत्त्यांमध्यें अग्रेसर असून त्यानें ती शक्ति अर्जुनावर कशी बरें टाकली नाहीं ? गावल्गणे, तूं मोठा बुद्धिमान् असूनहि तुझ्या लक्षांत ही गोष्ट कशी बरें आली नाहीं ?

**संजय**—दुर्योधन, शकुनि, दुःशासन आणि मी कर्णाला नित्य रात्रीं समर्थन करून सांगत होतों कीं, "कर्णा, उद्यां तूं सर्व सैन्यांना सोडून आधीं धनंजयाचा वध कर ! नंतर पांडव आणि पांचाल हे अर्थातच दासांसारखे आम्हांला उपभोग्य होतील किंवा पार्थाच्या वधानंतर कृष्ण कदाचित् पांडवांपैकीं दुसऱ्या कोणाची त्याच्या स्थानीं योजना करील, तर त्यालाच आधीं मारून टाक ! कृष्ण हें पांडववृक्षाचें मूल होय. अर्जुन हा त्याचा वाढलेला स्कंध असून इतर पांडव हे त्याच्या शाखा आहेत. पांचाल हीं त्याचीं पर्णें आहेत. पांडवांचा आधार, त्यांचें बळ, त्यांचा नाथ एक कृष्णच आहे. चंद्राच्या ठिकाणीं नक्षत्रांप्रमाणें पांडव हे कृष्णावर अनुरक्त होऊन राहिले आहेत. म्हणून सूतपुत्रा, पर्णें, शाखा व स्कंध सोडून सर्वत्र व सर्वकालीं पांडवांचें मूल कृष्ण आहे, हें ध्यानांत ठेव." जर कर्ण यदुकुलानंदन श्रीकृष्णाला मारील, तर ही सर्व पृथ्वी त्याला वश होईल, यांत संशय नाहीं. राजन्, जर तो महात्मा मरून भूमीवर पडेल, तर हे नरेंद्रा, गिरि, समुद्र व वनें यांसह ही सर्व

वसुधा तुझी अंकित होऊन राहील, अशा प्रकारचा आमचा दृढनिश्चय असूनहि तो अप्रमेय देवाधिदेव हृषीकेश सर्वदा जागृत असल्यामुळें युद्धकाल येऊन ठेपला असतां आम्हांला मोह पाडीत असे. केशव सर्वदा कर्णापासून अर्जुनाचें रक्षण करीत असतो. त्यानें रणांत कर्णासमोर त्यास कधींहि येऊं दिलें नाहीं. प्रभो, ती अमोघ शक्ति कशी विफल करतां येईल, या विचारानें दुसऱ्याच महारथी वीरांना अच्युत त्यासमोर उभे करीत असे. राजा, तो उदार मनाचा श्रीकृष्ण अशा रीतीनें कर्णापासून अर्जुनाचें रक्षण करीत असतो आणि तो पुरुषश्रेष्ठ स्वतःचें रक्षण करूं शकणार नाहीं, असें कसें होईल ? त्या शत्रुनाशक चक्रपाणीविषयीं विचार केला असतां, त्याला जिंकील असा त्रैलोक्यांतहि कोणी मिळणार नाहीं !

संजय—त्या महाबाहु कृष्णाला सत्यपराक्रमी महारथी सात्यकीनें कर्णाविषयीं असें विचारिलें 'कर्णाचा जर असा विश्वास होता आणि त्याजवळ ती अपरिमित सामर्थ्याची शक्ति होती, तर ती त्यानें अर्जुनावर कां बरें टाकली नाहीं ?'

श्रीकृष्ण—दुःशासन, कर्ण, शकुनि, जयद्रथ आणि दुर्योधनादि वीर सर्वदा या गोष्टीविषयीं विचार करीत असत. त्यांनीं कर्णाला सांगितलें, "हे महाधनुर्धर कर्णा, तूं अमितपराक्रमी आहेस. कर्णा, तूं विजयी वीरांमध्यें अग्रेसर आहेस. ही शक्ति महारथी कुंतीपुत्र धनंजयावांचून दुसऱ्या कोणावर सोडूं नये. देवांमध्यें जसा इंद्र तसा तो अर्जुन पांडवांमध्यें अतियशस्वी आहे. त्या पार्थाचा वध झाला असतां पांडव आणि सृंजय हे अग्निविरहित देवांप्रमाणें मृतप्राय होतील." हे शिनिपुंगवा, त्यावर कर्णानें 'होय, तसेंच करतों,' असें वचन दिलें होतें आणि गांडीवधनुर्धारी अर्जुनाचा वध करावयाचा हीच एक गोष्ट त्याच्या अंतःकरणांत सर्वदा घोळत असे. परंतु हे योधवरा, मीच त्या राधेयाला मोह पाडीत असल्यामुळें त्यानें ती शक्ति श्वेतवाहन अर्जुनावर सोडली नव्हती. ती शक्ति म्हणजे अर्जुनाचा प्रत्यक्ष मृत्युच होय, ही चिंता रात्रंदिवस माझ्या मनाला लागून राहिल्यामुळें मला निद्रा येत नसे किंवा मनाला हर्षहि वाटत नसे. हे शिनिश्रेष्ठा, ती शक्ति घटोत्कचावर नष्ट झालेली पाहून आज धनंजय मृत्युमुखांतूनच मुक्त झाल्यासारखें मला वाटत आहे. रणांत अर्जुन जितका मला रक्षणीय वाटतो, तितका प्रत्यक्ष पिता, माता,

तुम्ही बंधु, इतकेंच नव्हे, तर स्वतःचे प्राण देखील मला वाटत नाहींत. हे सात्वता, धनंजय पार्थावांचून कोणतीहि वस्तु, त्रैलोक्याच्या राज्यापेक्षांहि दुर्लभ असली तरी मला नको. हे युयुधाना, अर्जुन मृत्युमुखांतून परत जीवंत आला आहे, हें पाहून मला आज परम हर्ष झाला आहे. यासाठींच मी समरांत घटोत्कचाला कर्णाकडे पाठविलें होतें. कारण रात्रीच्या वेळीं समरांगणावर कर्णाला पीडा देईल, असा दुसरा कोणीच समर्थ नव्हता.

संजय—धनंजयाचे हिताविषयीं उद्युक्त आणि त्याचें प्रिय करण्यांत तत्पर अशा देवकीपुत्रानें त्यावेळीं सात्यकीला असें सांगितलें. ७.६.१८२.

---

## अध्याय १८३ वा.

[ १ घटोत्कचाच्या वधानें इंद्रशक्ति विफल झाल्यामुळें धृतराष्ट्राचा शोक. २ युधिष्ठिराचा घटोत्कचाच्या वधामुळें शोक. ३ व्यासाकडून युधिष्ठिराचें सांत्वन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, कर्ण-दुर्योधनादिकांचा, सुबलपुत्र शकुनीचा आणि विशेषेंकरून तुझा स्वतःचा हा मोठाच दोष आहे. जर तुम्हांला माहीत होतें कीं, शक्ति रणांत एकाच वीराला मारणारी आहे, तिचें निवारण कोणीहि करूं शकणार नाहीं आणि इंद्रासह देवांसहि ती असह्य आहे, तर युद्ध प्रवृत्त झालें असतां पूर्वीं ती देवकीपुत्र कृष्णावर अथवा अर्जुनावर कां सोडली नाहीं बरें ?

संजय—हे राजेंद्रा, युद्धांतून आम्ही सर्व परतलों असतां रात्रीं असा विचार करीत असूं कीं, " कर्णा, उद्यां प्रभातकाल होतांच केशवावर किंवा अर्जुनावर ती शक्ति तूं सोड ! परंतु हे राजा, प्रभातकालीं देवता कर्णाचा अथवा इतर योद्धयांचा तो विचार नाहींसा करीत असत. पार्थ अथवा देवकीसुत कृष्ण हातांत आले असतांहि कर्णानें त्यांस मारलें नाहीं, त्याअर्थीं दैवच श्रेष्ठ होय, असें मी समजतों. हे प्रभो, कर्णाच्या हातांत कालरात्रिसदृश ती शक्ति असतां दैवानें बुद्धिभ्रंश होऊन व देवमायेनें मोहित होऊन त्यानें ती वासवी शक्ति देवकीपुत्र कृष्णावर किंवा शक्रतुल्य अर्जुनावर सोडली नाहीं.

**धृतराष्ट्र**—तुम्ही दुर्दैवी असून बुद्धीनेंहि मंद आहां. कारण केशवाच्या बुद्धिसामर्थ्यानें ती वासवी शक्ति तृणतुल्य घटोत्कचाला मारून नाहींशी झाली. कर्ण, माझे पुत्र आणि इतरहि सर्व राजे आपल्या दुर्नयानें यमलोकीं गेल्यासारखे मला वाटत आहेत! हे संजया, आज घटोत्कच निधन पावला असतां पुनः कौरव-पांडव यांचें युद्ध कसें प्रवृत्त झालें, तें मला सांग. सैन्याचा व्यूह रचून ते वीर सृंजय-पांचालांसह द्रोणावर चालून गेले असतां त्यांचें युद्ध कसें झालें? सौमदत्ति व जयद्रथ यांच्या वधामुळें द्रोण संतप्त झाला आणि जीवाची आशा सोडून सैन्यांत शिरला, तेव्हां मुख पसरून येणाऱ्या अंतकासारखा तो दिसत होता. तेव्हां शरवृष्टि करीत चालून येणाऱ्या त्या द्रोणाशीं पांडव व सृंजय कसे भिडले? आचार्यांचें रक्षण करणाऱ्या दुर्योधनादिकांनीं आणि अश्वत्थामा, कर्ण आणि कृपाचार्य यांनीं रणांत काय केलें? संजया, भारद्वाजाचा वध करूं पाहणाऱ्या भीमार्जुनांशीं माझे वीरांनीं कसा संग्राम केला, तें सर्व मला सांग! सिंधुराजाच्या व घटोत्कचाच्या वधानें संतप्त झालेल्या त्या क्रोधाविष्ट वीरांनीं रात्रीच्या वेळीं कसें काय युद्ध केलें?

(२) **संजय**—हे राजा, कर्णानें घटोत्कच राक्षसाला रात्रीच्यावेळीं मारलें असतां तुझे वीर हर्षानें गर्जना करूं लागले आणि युद्धाच्या इच्छेनें वेगानें चालून येऊं लागले. त्यामुळें शत्रूचें सैन्य मरूं लागलें. तेव्हां त्या गाढ काळोख्या रात्रीं युधिष्ठिर राजा फार खिन्न झाला आणि महाबाहु भीमाला म्हणाला, "हे महापराक्रमी भीमा, या कौरवांच्या सेनेचें निवारण कर. घटोत्कचाच्या वधानें मला मोठा मोह उत्पन्न झाला आहे." याप्रमाणें भीमाला सांगून युधिष्ठिर राजा आपल्या रथांत पडून राहिला. त्याचे डोळे अश्रूंनीं भरले होते आणि तो पुनःपुनः निश्वास टाकीत होता. कर्णाचा पराक्रम पाहून त्याला भयंकर चिंता वाटूं लागली. तो व्यथित झाला आहे, असें पाहून कृष्ण त्याला म्हणाला, "कौंतेया, दुःख करूं नकोस. हे भरतर्षभा, प्राकृत जनाप्रमाणें दुःख करणें तुला योग्य दिसत नाहीं. राजा, ऊठ आणि युद्धाला प्रवृत्त हो! हे प्रभो, कर्तव्यकर्म कर, तूं विह्वल झालास, तर विजयप्राप्ति संशयित होईल!

कृष्णाचें भाषण ऐकून धर्मपुत्र युधिष्ठिर डोळे पुसून त्याला म्हणाला, "हे महाबाहो, धर्मांची परम गति कोणती हें मला विदित आहे. जो मनुष्य

दुसऱ्याचे उपकार जाणत नाहीं, त्याला ब्रह्महत्येचें पातक लागतें. हे जनार्दना, आमच्या वनवासांत घटोत्कचानें बालपणांतसुद्धां आम्हांला साहाय्य केलें. कृष्णा, श्वेतवाहन अर्जुन अस्त्रप्राप्त्यर्थ गेला असतां हा महाधनुर्धर काम्यक वनांत माझ्याकडे आला आणि धनंजय नव्हता, तोंपर्यंत आम्हांजवळ राहिला. गंधमादन पर्वतावरील यात्रेमध्यें यानेंच मोठमोठ्या संकटांतून आम्हांला तारलें आणि द्रौपदी श्रांत झाली असतां या महात्म्यानें तिला पाठीवर वाहिलें. हे प्रभो, माझ्याकरितां यानें महायुद्धांत आरंभापासून मोठें दुष्कर कर्म केलें आहे. जनार्दना, सहदेवावर माझी जितकी स्वाभाविक प्रीति आहे, तितकीच या राक्षसेंद्र घटोत्कचावर आहे. तो महाबाहु माझा परम भक्त होता, मी त्याला प्रिय होतों व तोहि मला प्रिय होता. त्यामुळें मला शोक होऊन मी उद्विग्न झालों आहें. कृष्णा, कौरवांनीं आमची सेना कशी भग्न केली आहे आणि महारथी द्रोण व कर्ण रणांत कसे सज्ज होऊन राहिले आहेत, पहा ! दोन मत्त गजांनीं ज्याप्रमाणें वेळूंचें वन उध्वस्त करून सोडावें, त्याप्रमाणें हे माधवा, यानें पांडवसैन्य मध्यरात्रीं कसें भग्न केलें आहे पहा ! माधवा, भीमसेनाचें बाहुबल किंवा अर्जुनाचें शरसंधान यांचीहि उपेक्षा करून हे कौरव पराक्रम करून दाखवीत आहेत. हा द्रोण, कर्ण व सुयोधन राजा युद्धांत त्या राक्षसास मारून आनंदानें रणांगणांत गर्जना करीत आहेत. हे जनार्दना, तूं व आम्ही जीवंत असतांहि सूतपुत्राशीं युद्ध करणाऱ्या घटोत्कचाला कसा मृत्यु यावा बरें ? कृष्णा, आम्हां सर्वांना तृणतुल्य मानून सव्यसाची अर्जुनासमक्ष तो भीमसेनपुत्र महाबलाढ्य राक्षस मारला गेला ! दुष्ट धार्तराष्ट्रांनीं अभिमन्यूचा वध केला, तेव्हां तेथें महारथ अर्जुन नव्हता आणि त्या दुष्ट जयद्रथानें आम्हां सर्वांस निरोधून ठेवलें होतें. त्याच्या वधाला द्रोण व त्याचा पुत्र अश्वत्थामा हेच कारण होते. तो वधोपाय द्रोणानेंच स्वतः कर्णाला सांगितला होता आणि तो युद्धांत गुंतला असतां त्याच्या खड्गाचे दोन तुकडे द्रोणानेंच करून टाकले. तो संकटांत असतां कृतवर्म्यानें दुष्टाप्रमाणें एकाएकीं त्याचे अश्व आणि उभय पार्ष्णिसारथी यांस मारलें आणि दुसऱ्या धनुर्धरांनीं सौभद्राला युद्धांत पाडलें ! हे यादवश्रेष्ठ कृष्णा, अर्जुनानें अगदीं अल्पकारणावरून जयद्रथाला मारलें, तें मला विशेषसें आवडलें नाहीं. जर पांडवांना शत्रुवध करणें न्याय वाटत होतें, तर आधीं कर्ण व द्रोण यांचा वध केला पाहिजे होता, असें मला वाटतें. हे पुरुषश्रेष्ठा, हे दोघे आमच्या

दुःखाचें मूळ आहेत व हेच दोघे युद्धांत दुर्योधनाला मिळाल्यामुळें तो स्वस्थ झाला आहे. द्रोण किंवा अनुयायांसह कर्ण यांचा वध करणें योग्य असतां दूर असणाऱ्या जयद्रथाला महाबाहु अर्जुनानें मारलें! त्या सूतपुत्राचा निग्रह करणें मला अवश्य आहे. म्हणून हे वीरा, कर्णाला मारण्याकरितां मीच स्वतः जातों. कारण, भीमसेन तिकडे द्रोणसैन्याशीं भिडला आहे!"

असें बोलून युधिष्ठिर आपलें प्रचंड धनुष्य ओढून व शंख मोठ्यानें वाजवून वेगानें निघाला. तेव्हां हजार रथ, तीनशें गज, पांच हजार अश्व आणि प्रभद्रकांसह पांचाल यांनीं परिवेष्टित शिखंडी धर्मराजामागून त्वरित निघाला. युधिष्ठिरप्रभृति पांडव आणि पांचाल सज्ज होऊन भेरी व शंख वाजवूं लागले. तेव्हां महाबाहु वासुदेव धनंजयाला म्हणाला, "हा युधिष्ठिर क्रोधाविष्ट होऊन वेगानें कर्णाला मारण्याच्या इच्छेनें निघाला आहे, तर त्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं." असें बोलून कृष्णानें अश्वांस हांकलें आणि दूर गेलेल्या युधिष्ठिर राजामागून तो जाऊं लागला.

( ३ ) शोकानें विचारशक्ति नष्ट झालेला आणि क्रोधाग्नीनें संतप्त झालेला धर्मपुत्र युधिष्ठिर कर्णाला मारण्याच्या इच्छेनें सहसा निघालेला पाहून व्यास त्याजवळ गेला आणि त्याला बोलला—

व्यास—संग्रामांत कर्णाशीं भिडूनहि फाल्गुन जीवंत आहे, ही मोठी सुदैवाची गोष्ट आहे. कारण अर्जुनाच्या वधासाठींच त्यानें ती शक्ति रक्षण करून ठेवली होती. महायुद्धांत अर्जुन त्याच्याशीं द्वंद्वयुद्धाला गेला नाहीं, हेंहि तुमचें सुदैवच होय. परस्परांची स्पर्धा करणाऱ्या त्या वीरांनीं द्वंद्वयुद्धांत एकमेकांवर दिव्यास्त्रें टाकिलीं असतीं आणि त्या अस्त्रांनीं पीडित होऊन कर्णानें ती वासवी शक्ति निःसंशय रणांत सोडली असती! हे भरतसत्तमा, तसें झालें असतें, तर भयंकर संकट प्राप्त झालें असतें. हे मानदा, त्या घटोत्कच राक्षसास सूतपुत्रानें मारलें हें फार उत्तम झालें. वासवी शक्ति ही निमित्तमात्र होती, वस्तुतः त्याचा कालच उपस्थित झाला होता. युधिष्ठिरा, तुझ्यासाठींच तो राक्षस युद्धांत मेला आहे. म्हणून तूं क्रोध करूं नकोस किंवा शोकहि करूं नकोस. युधिष्ठिरा, सर्व प्राण्यांची या लोकीं हीच स्थिति व्हावयाची आहे. हे भारता, तूं आपल्या बंधूंसह मोठमोठ्या राजांस घेऊन कौरवांशीं युद्ध कर! आजपासून पांचव्या दिवशीं सर्व पृथ्वी तुझी होईल! हे पुरुषव्याघ्रा, सर्वदा

धर्माचें चिंतन करीत जा. हे पांडवा, नित्य संतोषानें दया, तप, दान, क्षमा आणि सत्य यांचें सेवन कर. कारण जेथें धर्म तेथें जय असावयाचाच !

पंडुपुत्र युधिष्ठिरास असा उपदेश करून व्यास तेथेंच अंतर्धान पावला. ७. ६. १८३.

येथें सहावें घटोत्कचवधपर्व समाप्त झालें.

# द्रोणवधपर्व ७.



## अध्याय १८४ वा.

[ १ सैन्यनिद्रा. ]

( १ ) संजय—व्यासानें असें सांगितल्यावर धर्मराज युधिष्ठिर कर्णवधापासून निवृत्त झाला. तथापि रात्रीं त्या सूतपुत्रानें घटोत्कचाचा वध केल्यामुळें त्याला दुःख झालें होतें व संतापहि आला होता. भीम तुझ्या सैन्याचें निवारण करीत आहे, हें पाहून धर्मराज धृष्टद्युम्नाला म्हणाला, " तूं या द्रोणाचा प्रतिकार कर ! कारण तुझी उत्पत्ति धनुष्य, बाण, कवच, खड्ग यांसह या द्रोणाच्या वधाकरतांच अग्नीपासून झाली आहे. तरी मोठ्या हर्षानें तूं द्रोणावर चालून जा ! जनमेजय, शिखंडी, दौर्मुखी व यशोधर यांनींहि त्या कुंभयोनीला पीडा द्यावी. तसेंच नकुल, सहदेव, द्रौपदीपुत्र, प्रभद्रक, आपापल्या पुत्रबंधूंसह द्रुपद आणि विराट, सात्यकि, केकय व अर्जुन यांनीं सर्व रथी, गज, अश्व आणि पदाति यांसुद्धां द्रोणाच्या वधाच्या इच्छेनें मोठ्या वेगानें त्याजवर धावून जावें आणि सर्वांनीं मिळून त्या महारथी द्रोणाचा रणांत वध करावा ! "

याप्रमाणें त्या महात्म्या धर्मराजाची आज्ञा होतांच ते सर्व द्रोणवधाच्या ईर्षेनें त्यावर धांवून गेले. परंतु मोठ्या उत्साहानें ते येत असतां द्रोणानें त्यांचें निवारण केलें. द्रोणाच्या जीविताची इच्छा करणारा दुर्योधन राजाहि मोठ्या क्रोधानें पांडवांवर चालून आला. पांडव व कौरव गर्जना करूं लागले व त्यांचें तुमुल युद्ध झालें ! त्यांत सर्व वाहनें व सैनिकहि श्रांत झाले. ते श्रांत वीर समरांत निद्रेनें इतके अंध होऊन गेले कीं, त्यांना कांहींहि करतां येईना. ती घोररूप,

प्राणहारिणी व भयंकर रात्र त्रियामा-तीन प्रहरांची-असूनहि त्यांस सहस्त्र-यामा भासूं लागली. परस्परांचा वध होत असतां व विशेषेंकरून निद्रेनें ते वीर अंध होत असतां मध्यरात्र झाली. सर्व क्षत्रिय निरुत्साह व दीन झाले आणि तुझ्या व शत्रूकडील वीरांच्या अस्त्रांचा व बाणांचा क्षय झाला. कित्येक वीरांनीं आपल्या बाहुबलाच्या विश्वासानें, कांहींनीं लज्जेमुळें, तर कोणी स्वकर्तव्य म्हणून आपल्या पक्षास सोडलें नाहीं. दुसरे कित्येक आपलीं अस्त्रें टाकून निद्रावश झाले. कित्येक रथांत, कांहीं अश्वांवर, तर कोणी गजांवर निद्रांध होऊन निश्चेष्ट पडून राहिले. अशा निद्रालु लोकांस दुसऱ्या लोकांनीं यमलोकीं पाठविलें ! देहभान विसरून जाऊन कितीएकांनीं शत्रूंबरोबर आपल्याहि लोकांस मारलें, तर कांहींनीं आपल्या स्वतःवरहि प्रहार केले ! हे महाराजा, ते निद्रांध लोक महायुद्धांत नानाविध प्रलाप करीत असत. नेत्र निद्रेनें लाल झाले असतांहि युद्ध करावयाचेंच म्हणून कित्येक योद्धे रणांत स्थिर झाले होते ! त्या भयंकर अंधकारांत कित्येक निद्रालु वीर सरपटत जाऊन शत्रूंचा वध करीत होते ! शूर शूरांचा संहार करीत होते ! गाढ निद्रेनें व्याप्त झाल्यामुळें शत्रूंनीं केलेले प्रहारहि बहुतेकांना समजले नाहींत !

त्यांची अशी अवस्था पाहून पुरुषर्षभ अर्जुन मोठी गर्जना करून सर्व दिशा निनादित करीत बोलला, "वीरहो, तुम्ही श्रांत झाला आहां, तुमचीं वाहनेंहि ग्लान झालीं आहेत. गाढ अंधकारानें आणि धूलीनें सर्व सैन्य व्याप्त झालें आहे. तर सैनिकहो, तुमची इच्छा असल्यास युद्ध थांबवा आणि मुहूर्तभर येथेंच रणभूमीवर पडून रहा. निद्रेनें श्रमपरिहार होऊन चंद्रोदय झाल्यावर पुनः अन्योन्यांशीं संग्राम करा !"

हे विशांपते, याप्रमाणें अर्जुनाचें भाषण सर्व धर्मज्ञांस आणि सैन्यासहि रुचलें. ते मोठ्यानें गर्जना करून म्हणाले, 'हे कर्णा, हे दुर्योधना, युद्धापासून निवृत्त व्हा. पांडवांचें सैन्य युद्धपराङ्मुख झालें आहे !'

हे भारता, याप्रमाणें अर्जुनानें सर्वत्र गर्जना केली असतां पांडवांची व तुझीहि सेना युद्धापासून निवृत्त झाली. अर्जुनाच्या त्या प्रौढ भाषणाची देव, महात्मे ऋषि आणि सर्व सैन्यें यांनीं मोठी प्रशंसा केली आणि त्या श्रांत सैन्यांनीं मुहूर्तभर निद्रा घेतली.

हे भारता, याप्रकारें तुझ्या सैन्याला विश्रांति व समाधान मिळून त्यानें अर्जुनाची प्रशंसा करून म्हटलें, "महाबाहो अर्जुना, वेद, अस्त्रें, बुद्धि, पराक्रम, धर्म आणि भूतदया हीं तुझ्या ठिकाणीं आहेत. तूं आम्हांला आश्वासन दिलें आहेस, त्याअर्थीं आम्हीहि तुझें कल्याण इच्छितों. त्याप्रमाणें होवो ! हे वीरा, तुझे मनोरथ लवकरच तुला प्राप्त होवोत !"

राजा, त्या महारथींनीं पार्थाची अशी प्रशंसा केल्यावर ते निद्रेनें व्याप्त होऊन स्तब्ध राहिले. कित्येकांनीं अश्वपृष्ठांवर, तर कित्येकांनीं रथनीडांवर, दुसऱ्या कोणी गजस्कंधावर, तर कांहींनीं भूमीवर निद्रा घेतली. गदा, खड्ग आदिकरून आपापलीं आयुधें घेऊन दुसरे कित्येक पृथक् पृथक् निद्रावश झाले. धूलीनें भरलेल्या सर्पांसारख्या शुंडांनीं निद्राग्रस्त गजांनीं निश्वासानें भूमि शीतल केली. ते गज महीतलावर निश्वास टाकीत निद्रित झाले असतां फूत्कार टाकणाऱ्या महासर्पांनीं व्याप्त पर्वतांप्रमाणें शोभूं लागले. ज्यांचे तंग सुवर्णाचे आहेत व ज्यांचीं युगें केसांच्या सटांमध्यें भिडलीं आहेत, अशा अश्वांनीं आपल्या खुराग्रांनीं समविषम जमीन विकृत केली. राजेंद्रा, याप्रमाणें तेथें सर्व लोक आपापल्या वाहनांवर निद्रित झाले. हे भरतर्षभा, अविश्रांत झालेले गज, अश्व व योद्धे युद्धापासून निवृत्त होऊन तेथेंच सुप्त झाले.

याप्रमाणें निश्चेष्ट होऊन निद्रामग्न झालेलें तें सैन्य कुशल चितारयानें पडद्यावर काढलेल्या चित्राप्रमाणें अद्भुत दिसत होतें. परस्परांच्या बाणांनीं विद्ध झालेले ते तरुण क्षत्रिय गजांच्या स्कंधांवर, जणुंकाय कामिनींच्या कुचांवरच लग्न झाल्याप्रमाणें निद्रित झाले !

इतक्यांत नेत्रांस आनंद देणाऱ्या कुमुदपति चंद्रानें पूर्वदिशा सुशोभित केली. एका मुहूर्तांतच सर्व तमाचा लोप होऊन विश्व ज्योतिर्मय झालें. याप्रमाणें चंद्रोदय होऊन दिवसासारखा प्रकाश पडला आणि निशाचरांचाहि क्वचितच संचार होऊं लागला. राजा, सूर्यकरांनीं जसें कमलवन प्रफुल्लित होतें, त्याप्रमाणें चंद्राच्या किरणांनीं तें सैन्य जागृत झालें. चंद्रोदयामुळें समुद्र जसा क्षुब्ध होतो, त्याप्रमाणें तो सैन्यसागरहि चंद्राच्या उदयानें क्षुब्ध झाला. आणि राजा, परलोकाची इच्छा करणाऱ्या त्या वीरांचें लोकविनाशाकरितां भयंकर युद्ध प्रवृत्त झालें ! ७. ७. १८४.

---

## अध्याय १८५ वा.

[ १ द्रोण-दुर्योधनसंभाषण. ]

( १ ) **संजय**—त्यानंतर शोकाकुल दुर्योधन द्रोणाजवळ गेला आणि त्याच्या अंगांत उत्साह व क्रोध उत्पन्न करण्याच्या हेतूनें त्याला म्हणाला—

**दुर्योधन**—शत्रु श्रांत होऊन समरांत विश्रांति घेऊं लागतील, तर त्यांस कधींहि क्षमा करूं नये. विशेषतः विरोध, ग्लानि अथवा कपट दिसून आल्यास त्यांची उपेक्षा करणें योग्य नाहीं. तुझें प्रिय करण्याच्या इच्छेनें आम्हीं जी पांडवांना सहिष्णुता दाखविली, तीमुळेंच हे बलवत्तर झाले आहेत. वास्तविक बलानें किंवा तेजानें ते आमच्यापेक्षां कितीतरी कमी आहेत. परंतु तूं त्यांचें संरक्षण करीत असल्यामुळें पुनःपुनः त्यांचें बल वाढत आहे. दिव्य-ब्राह्मादि म्हणून जीं जीं अस्त्रें आहेत, तीं सर्व मुख्यत्वें तुझ्याजवळच आहेत. पांडव, आम्ही किंवा पृथ्वीवरील कोणीहि धनुर्धारी युद्धांत तुझ्याशीं बरोबरी करूं शकणार नाहीं. हे द्विजोत्तमा, तुला सर्व अस्त्रें अवगत आहेत. दिव्यास्त्रांच्या योगानें तूं सुरासुर आणि गंधर्व यांसुद्धां त्रैलोक्याचाहि नाश करण्यास समर्थ आहेस, यांत संशय नाहीं ! असें असून आणि तुला ते भीत असतांहि तूं त्यांजवर दया दाखवितोस ! ही गोष्ट ते तुझे शिष्य असल्यामुळें होत असेल किंवा कदाचित् माझ्या मंद भाग्यामुळेंहि होत असेल !

**संजय**—अशारीतीनें तुझ्या पुत्रानें उत्तेजित केल्यावर द्रोण क्रोधसंतप्त झाला आणि म्हणाला, " दुर्योधना, मी वृद्ध असून सामर्थ्यानुरूप युद्ध करीत आहें. यापुढें जयप्राप्तीकरितां मला क्षुद्रहि कार्य केलें पाहिजे ! अरे, हे सर्व अस्त्रानभिज्ञ लोक मी अस्त्रज्ञानें मारावे ना ? तुला जें जें आवडेल, तें तें शुभ असो वा अशुभ असो, मी सर्व तुझ्या आज्ञेनें करीन. युद्धांत पराक्रम करून मी सर्व पांचालांना मारीन, तेव्हांच हें कवच उतरीन, हें मी शस्त्र हातांत घेऊन शपथपूर्वक सांगत आहें ! अर्जुन युद्धांत श्रांत झाला आहे, म्हणून तूं सांगत आहेस. परंतु महाबाहो, त्याचा पराक्रम केवढा मोठा आहे, तें सांगतों ऐक. तो सव्यसाची एकदा क्रुद्ध झाला तर देव, गंधर्व, यक्ष, राक्षस हेहि त्याला रणांत जिंकण्याला समर्थ होणार नाहींत. खांडव वनांत भगवान् सुरेश्वराशीं भिडून तो महात्मा वृष्टि करीत असतांहि त्यानें बाणांनीं त्याचें निवारण केलें. यक्ष, नाग, दैत्य आणि दुसऱ्याहि पुष्कळ बलगर्वितांना त्या पुरुषश्रेष्ठानें

मारलें, हें तूं जाणतच आहेस. घोषयात्रेचे वेळीं चित्रसेनादि गंधर्वांना त्यानें जिंकलें आणि तुम्हांला ते गंधर्व नेत असतां त्यांपासून त्याच दृढधन्वी वीरानें सोडविलें. निवातकवच हे देवांचे शत्रु असून त्यांना अवध्य होते. त्यांनाहि त्याच वीरानें रणांत जिंकलें ! हिरण्यपुरांत राहणाऱ्या हजारों राक्षसांस त्यानें जिंकलें ! तो पुरुषव्याघ्र मनुष्याच्या हातून जिंकला जाणें शक्य तरी आहे काय ? हे विशांपते, आपण सर्व यथाशक्ति संग्राम करीत असतां त्या पांडुपुत्रानें तुझ्या सैन्याचा संहार कसा चालविला आहे, हें तुला दिसतच आहे !''

संजय—राजा, अशाप्रकारें अर्जुनाची द्रोण प्रशंसा करीत असतां तुझा पुत्र क्रोधाविष्ट होऊन त्यास पुनः म्हणाला, ' मी, दुःशासन, कर्ण आणि शकुनि मिळून भारतसेनेचे दोन भाग करून आज अर्जुनाला युद्धांत मारूं ! '

त्याचें भाषण ऐकून द्रोण हंसतच म्हणाला, " तुझें कल्याण असो. तेजानें जणुंकाय प्रदीप्त असलेल्या अजिंक्य पुरुषश्रेष्ठ गांडीवधारी अर्जुनाचा पराजय करील असा कोण क्षत्रिय आहे ? अरे, त्या शस्त्रधारी अर्जुनाचा पराभव करण्यास प्रत्यक्ष कुबेर, इंद्र, वरुण, यम, असुर, उरग आणि राक्षस हेहि समर्थ होणार नाहींत. हे भारता, मूढ लोक असतात, तेच तुझ्यासारखें बोलतात. अर्जुनाला युद्धांत गांठून घरीं कुशल येईल असा कोण मनुष्य आहे ? तुझें मन सर्वांविषयीं साशंक असल्यामुळें तूं निष्ठुर आणि पापी आहेस आणि म्हणूनच तुझ्या कल्याणाकरितां यत्न करणाऱ्यांस तूं वाटेल तसें बोलूं इच्छितोस. जा, तूं कुलीन क्षत्रिय आहेस आणि युद्धाचीहि तुला इच्छा आहे. तेव्हां स्वतःसाठीं तूं अर्जुनावर चालून जा आणि त्याला जिंक ! उगीच वेळ घालवूं नकोस. या सर्व निरपराधी क्षत्रियांचा संहार कशासाठीं चालविला आहेस ? या वैराचें मूळ तूंच आहेस, त्याअर्थीं तूंच स्वतः अर्जुनावर चालून जा ! हा तुझा मातुलहि मोठा प्राज्ञ आणि क्षात्रधर्माला अनुसरून वागणारा आहे ! त्या कपटद्यूत खेळणाऱ्या शकुनीला युद्धांत अर्जुनावर जाऊं दे. हा अक्षकुशल, कपटी, शठ, असत्यवादी आणि दुष्कृत्यांत निपुण शकुनि पांडवांना युद्धांत जिंकणार ! तूं मोठ्या हर्षानें त्या मोहांध धृतराष्ट्राला अनेकदां सांगितलें आहेस कीं, ' मी, कर्ण आणि माझा बंधु दुःशासन तिघे पांडुपुत्रांना मारूं ! ' प्रत्येक सभेमध्यें तुझी प्रतिज्ञा अशीच आहे. ही तुझी प्रतिज्ञा सत्य कर आणि कर्णादिकांसह तूं सत्यवचनी हो ! हा तुझा शत्रु अर्जुन तुझ्यापुढें निःशंक

स्थिर आहे. क्षात्रधर्माचें पालन कर! जयापेक्षां तुला वधच श्लाघ्य आहे! तूं पुष्कळ दान केलें आहेस, भोग भोगले आहेस, अध्ययन केलें आहेस, आणि मनाप्रमाणें ऐश्वर्यहि तुला प्राप्त झालें आहे. तूं कृतकृत्य असून कोणाचाहि ऋणी नाहींस. तरी भीति न बाळगतां अर्जुनाशीं युद्ध कर!"

असें बोलून द्रोण तेथून दुसरीकडे निघून गेला आणि सैन्याचे दोन भाग होऊन युद्ध पुनः प्रवृत्त झालें. ७. ७. १८५.

---

## अध्याय १८६ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ द्रोणाकडून द्रुपद-विराटांचा वध. ३ धृष्टद्युम्नाला उद्देशून भीमसेनाचें कठोर भाषण व द्रोणसैन्याकडे गमन. ]

(१) **संजय**—राजेंद्रा, रात्र तीन मुहूर्त राहिल्यावर त्या हृष्ट कौरव-पांडवांमध्यें पुनः युद्धाला प्रारंभ झाला. आदित्याचा सारथि अरुण यानें चंद्रप्रभा हरण केली आणि आकाश आरक्त करून सोडलें. पूर्वेला अरुणानें आरक्त केलेलें रविमंडल सुवर्णचक्राप्रमाणें शोभूं लागलें. सर्व पांडव-कौरव वीरांनीं त्या संध्यासमयीं रथ, अश्व, पालख्या वगैरे सर्व सोडून व सूर्याकडे तोंड करून हात जोडले व ते जप करूं लागले.

द्रोणानें सैन्याचे दोन भाग केले आणि दुर्योधनाला पुढें करून तो सोमक, पांचाल व पांडव यांवर चालून गेला. कौरवसेनेचे दोन भाग केलेले पाहून माधव अर्जुनाला म्हणाला, 'सव्यसाची अर्जुना, या कौरवांस डावीकडे टाकून तूं यांच्या उजवीकडे हो.' कृष्णाचे बोलण्यास अर्जुनानें 'ठीक आहे' म्हणून अनुज्ञा दिली. नंतर कर्ण व द्रोण या महाधनुर्धरांस तो डावे टाकून गेला. कृष्णाचा अभिप्राय जाणून परपुरंजय भीम रणाग्रभागीं असलेल्या अर्जुनाला म्हणाला—

**भीमसेन**—अर्जुना, हे बीभत्सो, माझें भाषण ऐक. ज्यासाठीं क्षत्रिय स्त्री पुत्राला जन्म देते, तो काळ आज आला आहे. असा काळ प्राप्त झाला असतां तूं जर कल्याण करून घेणार नाहींस, तर तूं अश्लाघ्य कर्म करणारा होशील आणि तुझें वर्तन अत्यंत नीच ठरेल. यासाठीं तूं सत्य, श्री, धर्म आणि यश यांच्या ऋणांतून मुक्त हो. या सैन्यास भेदून जा व उजवीकडे वळ!

(२) संजय—भीमानें आणि कृष्णानें प्रेरणा केल्यावर अर्जुनानें कर्णद्रोणांवर चालून जाऊन त्यांचें निवारण केलें. अशाप्रकारें कुरुसैन्यांतील प्रमुख क्षत्रिय वीरांचा नाश करीत तो रणाग्रभागीं येत असतां मोठमोठ्या क्षत्रियपुंगवांना त्याचें निवारण करतां आलें नाहीं. दुर्योधन, कर्ण व सुबलपुत्र शकुनि यांनीं त्या कुंतीपुत्रावर शरवृष्टि केली, परंतु सर्व शस्त्रवेत्त्यांमध्यें अग्रेसर असलेल्या अर्जुनानें ती शरवृष्टि तृणतुल्य मानून उलट त्यांवरच शरवृष्टि केली आणि आपल्या अस्त्रांनीं त्यांचा अस्त्रांच्या प्रतिकार केला. त्यानें दहा-दहा बाणांनीं प्रत्येकाला विद्ध केलें. बाणवृष्टीबरोबरच धूळीचीहि वृष्टि होऊं लागली. गाढ अंधकार पडला आणि सर्वत्र एकच रणकल्लोळ माजला. त्यावेळीं आकाश, भूमि, दिशा हीं दिसत नाहींशीं झालीं ! हे राजा, धूळीमुळें मूढ होऊन सर्वांना अंधळ्यांसारखें झालें. ते राजे गर्जनांच्या धोरणावरून युद्ध करीत होते. विरथ आणि रथस्थ वीर एकमेकांना भिडल्यामुळें त्यांचे केंस, कवचें व भुज हीं परस्परांवर आदळूं लागलीं. कित्येकांचे अश्व मृत झाले, कोणांचे सारथि हत झाले, पुष्कळ रथी संज्ञाहीन झाले व कित्येक मृत्युमुखीं पडले ! जे कोणी जिवंत होते, ते भयविह्वल झालेले दिसत होते. पुष्कळ अश्व पर्वतप्राय मृत गजांवर आदळून सादींसह गतप्राण झाले !

द्रोण संग्रामभूमीच्या उत्तरदिशेला जाऊन तेथें धूमरहित प्रदीप्त अग्नीप्रमाणें उभा राहिला. राजेंद्रा, रणाग्रभागापासून आचार्य पुढें आल्याचें ऐकून पांडवांचीं सैन्यें भयभीत होऊन थरथरां कांपूं लागलीं. हे भारता, द्रोणाची ती तेजस्वी, वीरश्रीयुक्त आणि तेजानें प्रदीप्त झालेली मूर्ति पाहून शत्रु भयभीत होऊन पळत सुटले. वासवास जिंकण्याविषयीं जशी दानवांची निराशा व्हावी, त्याप्रमाणें शत्रुसैन्यास आह्वान करणाऱ्या व मदोन्मत्त गजासमान भासणाऱ्या त्या वीरास जिंकण्यास कोणालाहि आशा नव्हती. त्याला पाहून कांहीं निरुत्साह झाले, कित्येक क्रोधाविष्ट होऊन गेले, तर कांहींजण विस्मयचकित झाले ! कित्येक वीरांना तें मुळींच सहन न होऊन हातांवर हात चोळूं लागले, तर कांहीं क्रोधसंतप्त होऊन दांत-ओंठ खाऊं लागले ! दुसरे कित्येक आपलीं आयुधें गरगरां फिरवूं लागले, कित्येक दंड थोपटूं लागले, तर कांहीं महापराक्रमी वीर जिवावर उदार होऊन द्रोणावर तुटून पडले ! राजेंद्रा, विशेषतः पांचाल द्रोणाच्या बाणांनीं पीडित होऊन अत्यंत वेदना होत असतांहि समरोत्सुक होऊन राहिले !

हे विशांपते, द्रोणावर द्रुपद व विराट धांवून गेले आणि त्यांमागून द्रुपदाचे तीन नातू आणि महाधनुर्धर चेदि हेहि चालून आले. द्रोणानें तीन तीक्ष्ण बाणांनीं द्रुपदपौत्रांचे प्राण हरण केले, तेव्हां ते मृत होऊन भूमीवर पडले! त्यानंतर चेदि, कैकय, सृंजय आणि मत्स्य या महारथींना त्या भारद्वाजानें जिंकलें. हे महाराजा, त्यावेळीं द्रुपद आणि विराट यांनीं क्रोधानें द्रोणावर शरवृष्टि केली. परंतु त्या क्षत्रियांतक द्रोणानें ती शरवृष्टि नाहींशी केली आणि संतप्त होऊन दोन तीक्ष्ण भल्लांनीं त्यांचीं धनुष्यें छिन्न केलीं. विराटानें द्रोण-वधाच्या इच्छेनें दहा तोमर व दहा बाण त्यावर फेंकले आणि द्रुपदानेंहि एक घोर स्वर्णभूषित पोलादी शक्ति द्रोणरथावर टाकली! तेव्हां द्रोणानें अतितीक्ष्ण शरांनीं तो तोमर व शक्ति छिन्न केलीं आणि दोन भल्लांनीं द्रुपद-विराटांना यमसदनीं पाठविलें!

हे महाराजा, विराट, द्रुपद, केकय, मत्स्य, चेदि आणि द्रुपदाचे तीन नातू मारले गेले, हें द्रोणाचें कृत्य पाहून त्या महामनस्क धृष्टद्युम्नानें कोप आणि दुःख यांनीं व्याप्त होऊन रथींच्या मध्यभागीं अशी प्रतिज्ञा केली कीं, "आज ह्या धृष्टद्युम्नाच्या हातून द्रोण जर जिवंत सुटेल, किंवा द्रोण जर त्याचा पराभव करील, तर धृष्टद्युम्नानें केलेलें इष्टापूर्त[1] तसेंच त्याचें क्षत्रियत्व आणि ब्राह्मण्य सर्व नष्ट होवो!"

(३) अशा प्रकारें सर्व धनुर्धरांमध्यें प्रतिज्ञा करून तो परवीरांतक धृष्ट-द्युम्न ससैन्य द्रोणसैन्यावर धांवून गेला. पांडव आणि पांचाल हे द्रोणावर एका बाजूनें मारा करूं लागले आणि दुर्योधन, कर्ण, शकुनि आणि तुझे प्रमुख पुत्र त्याचें रणांत रक्षण करूं लागले. ते सर्व महारथी द्रोणाचें रक्षण करीत असल्या-मुळें पांचालांचे सर्व यत्न विफल होऊन ते त्याला पाहूंहि शकेनात. हे मारिषा, तेव्हां भीम धृष्टद्युम्नावर संतापला आणि कठोर शब्द बोलला—

**भीमसेन**—द्रुपदाच्या कुलांत तूं जन्मला आहेस, तूं सर्व अस्त्रविद्येंत निष्णात आहेस. आपणास क्षत्रिय म्हणविणारा कोण पुरुष पुढें स्थित अस-लेल्या शत्रूकडे केवळ पहात बसेल? पित्याचा किंवा पुत्राचा वध झाला असतां आणि विशेषतः राजसभेंत तशी प्रतिज्ञा केली असतां कोण स्वस्थ बसून राहील?

---

१ वापीकूपतडागादिदेवतायतनानि च । अन्नप्रदानमारामाः पूर्तमर्थ्याः प्रचक्षते ॥
एकाग्निकर्महवनं त्रेतायां यच्च हूयते । अंतर्वेद्यां च यद्दानमिष्टं तदभिधीयते ॥

हा द्रोण अग्नीसारखा प्रज्वलित होऊन व शस्त्रास्त्ररूपी इंधनानें युक्त होऊन आपल्या तेजानें क्षत्रियांस दग्ध करीत आहे आणि समोर पांडवांच्या सेनेला निःशेष करून सोडीत आहे ! आतां तुम्ही स्वस्थ रहा आणि माझा पराक्रम पहा. हा मी द्रोणावर चालून जातों !

राजा, असें बोलून भीमसेन बाणांच्या योगानें तुझ्या सेनेला पळवीत द्रोण-सैन्यावर धांवून गेला. धृष्टद्युम्नानेंहि त्या प्रचंड सेनेंत प्रवेश करून द्रोणाला गांठलें. तेव्हां मोठें तुमुल युद्ध झालें ! सूर्योदयाचे वेळीं सर्व सैन्य संभ्रांत होऊन मोठें दारुण युद्ध झालें ! हे मारिषा, सर्वत्र रथसमुदाय एकमेकांशीं संसक्त झालेले दिसत होते. देहधारी मृत प्राण्यांचीं शरीरें सर्वत्र पसरलीं होतीं ! अशाप्रकारें तें युद्ध अत्यंत भयंकर झालें व अल्पावकाशानें सूर्य उदय पावला. ७. ७. १८६.

---

## अध्यय १८७ वा.

[ १ पंचदशदिवसयुद्धारंभ. २ संकुलयुद्ध. ३ नकुलाकडून दुर्योधनपराजय. ]

( १ ) संजय—हे महाराजा, प्रातःकालीं सूर्योदय होतो न होतो तोंच त्या सर्व वीरांनीं आपलीं कवचें वगैरे तशींच अंगांत ठेवून रणांगणावर सूर्याची उपासना केली. सूर्य उदय पावून सर्वत्र प्रकाशित झाल्यावर पुनः युद्ध प्रवृत्त झालें. हे भारता, सूर्योदयापूर्वीं तेथें जीं द्वंद्वें जुंपलीं होतीं, तींच उदयानंतरहि पुनः जुंपलीं. रथ हयांशीं भिडले, हय गजांशीं जुंपले आणि पदातींनीं गजांना गांठलें. रात्रौ युद्धामुळें व दिवसा सूर्यतेजानें श्रांत होऊन पुष्कळ वीर क्षुधेनें व तृषेनें व्याकुल होऊन भूमीवर संज्ञाहीन पडले. शंख-भेरी-मृदंगांचा नाद, गजांच्या गर्जना व धनुष्यांचे टणत्कार अंतरिक्षाला जाऊन भिडले होते. पळणारे पदाति, एकमेकांवर आदळणारीं आयुधें, खिंकाळणारे अश्व, मागें फिरणारे रथ आणि आक्रोश करणारे लोक यांच्या ध्वनीनें एकच हलकल्लोळ माजून राहिला. त्यांत नानाविध आयुधांनीं विद्ध झालेल्यांचा आतुर नादहि मिळून गेला होता. पदाति, अश्व, रथ आणि गज यांच्या तुमुल ध्वनीनें अंतरिक्ष व्यापून गेलें होतें.

( २ ) याप्रमाणें तीं सैन्यें इतकीं संभ्रांत झालीं होतीं कीं, वीर शत्रूंबरोयर आपल्याहि लोकांना मारूं लागले. ते हातांतील खड्गें योद्ध्यांवर व गजांवर

टाकित होते, तीं धुण्याच्या वस्त्रांच्या राशींप्रमाणें तेथें पडलेलीं दिसत होतीं. त्या खड्गांचे ध्वनि वस्त्रें धुतांना निघणाऱ्या शब्दाप्रमाणें होत होता. त्या भयंकर युद्धांत खड्ग, तोमर आदिकरून आयुधांनीं वीरांचा संहार होऊं लागला आणि परलोकाकडे वाहत जाणारी एक नदी निर्माण झाली.[1]

रात्रभर झालेल्या श्रमांमुळें अश्व व गज श्रांत होऊन गेले आणि तशांत शर व शक्ति यांनीं पीडित होऊन त्यांचीं सर्व गात्रें आंखडून गेलीं होतीं. भारता, त्यावेळीं द्रोण व अर्जुन यांखेरीज सर्व सैन्य विह्वल, संभ्रांत, सभय व आतुर होऊन गेलें होतें. आपल्या आर्तांचें आश्रयस्थान व शत्रूंना परलोकीं पाठविण्यास समर्थ असे ते दोघेच मात्र तेथें दिसत होते. सर्व लोक धुळीनें व्याप्त झाल्यामुळें कर्ण, द्रोण, अर्जुन, युधिष्ठिर, भीमसेन इत्यादि किंवा दुसरेहि वीर कोठें आहेत, हें आम्हांला कांहींहि दिसत नव्हतें! तेथें रक्तानें माखलेले गज, अश्व आणि पदाति पारिजातकवनाप्रमाणें दिसूं लागले!

त्यानंतर दुर्योधन, कर्ण, द्रोण आणि दुःशासन हे चार रथी चार पांडवांशीं भिडले. दुर्योधन-दुःशासन नकुल-सहदेवांशी, कर्ण भीमाशीं आणि द्रोण अर्जुनाशीं युद्ध करूं लागला. रथ्यांचें तें घोर, आश्चर्यावह आणि अमानुष युद्ध सर्व लोक पाहूं लागले. ते नरश्रेष्ठ सूर्यासारख्या तेजस्वी रथांत बसून विद्युद्युक्त शारदीय मेघांसमान शोभूं लागले. ते मोठे धनुर्धर व युद्धकुशल असल्यामुळें मोठ्या स्पर्धेनें, क्रोधानें आणि आवेशानें मत्त गज किंवा वृषभ यांसारखे अन्योन्यावर तुटून पडत. त्यावेळीं त्या महारथ्यांचें एकाच वेळीं चूर्ण होऊन जावयाचें, परंतु काल आल्यावांचून कोणाचाहि देहभेद होत नसतो असें म्हणतात तेंच खरें! रणांगणांत जागजागीं धनुष्यें, बाण इत्यादि आयुधें आणि नानाविध चामरें, कवचें, ध्वज इत्यादि सर्वत्र पसरल्यामुळें तें समरांगण तारागणांनीं व्याप्त नभोमंडलासारखें दिसत होतें!

( ३ ) इतक्यांत दुर्योधनाचें नकुलाशीं युद्ध प्रवृत्त झालें. दोघेहि सारखेच क्रोधसंतप्त होऊन क्षुब्ध झाले होते. माद्रीसुतानें तुझ्या पुत्राला उजवीकडून प्रदक्षिणा घातली आणि मोठ्या हर्षानें त्याला शेंकडो बाणांनीं व्याप्त केलें. तेव्हां तेथें मोठा हाहाकार झाला. हे महाराजा, रणांगणावर भ्रातव्य आपल्या उजवीकडे

---

१ नदीचें वर्णन अनेकदां आल्यामुळें येथें दिलें नाहीं व रणांगणाचें वर्णनहि येथें संक्षेपानें दिलें आहे.

वळल्याचें पाहून दुर्योधनाला तें सहन झालें नाहीं आणि तोहि नकुलाला अपसव्य प्रदक्षिणा करूं लागला, परंतु त्या तेजस्वी नकुलानें त्याचें निवारण केलें. तेव्हां सैनिकांनीं नकुलाची फार प्रशंसा केली. हे राजा, त्यावेळीं नकुल सर्व दुःखें व तुझी कुटिल नीति लक्ष्यांत आणून तुझ्या पुत्रास 'अरे थांब, उभा रहा,' असें मोठ्यानें बोलला. ७. ७. १८७.

---

## अध्याय १८८ वा.

[ १ सहदेव व दुःशासन यांचें युद्ध. २ भीम-कर्णयुद्ध. ३ द्रोणार्जुनयुद्ध. ]

( १ ) त्यावेळीं दुःशासन अत्यंत क्रुद्ध होऊन सहदेवावर धांवून गेला. तें पाहून माद्रीपुत्रानें एका भल्लानें त्याच्या सारथ्याचें मस्तक हांहां म्हणतां उडविलें ! हें कृत्य सहदेवानें इतक्या चपलतेनें केलें कीं सारथ्याच्या अभावीं जेव्हां अश्व इतस्ततः धांवूं लागले, तेव्हां दुःशासनाला आपला सारथि मारल्याचें समजलें. दुःशासन स्वतःच हयविशारद असल्यामुळें त्यानें रश्मि हातांत घेऊन अश्वांचें नियमन केलें आणि इकडे मोठ्या चपलतेनें उत्तम युद्ध केलें. तें त्याचें कृत्य पाहून आपले व शत्रूकडील लोकांनीं रणांगणावर त्याची प्रशंसा केली. सहदेवानें दुःशासनाच्या अश्वांवर तीक्ष्ण बाण टाकले, तेव्हां ते व्याकुळ होऊन इकडेतिकडे भ्रमण करूं लागले. तेव्हां दुःशासन किंचित्काल शरासन बाजूला ठेवून रश्मि हातांत घेई आणि पुनः ते सोडून व धनुष्य घेऊन युद्ध करी. या मधल्या अवकाशांत माद्रीसुत त्याला बाणांनीं आच्छादित करीत असे. तें पाहून तुझ्या पुत्राच्या रक्षणाकरितां कर्ण धांवून आला. तेव्हां भीमानें त्याच्या बाहूंवर दोन व उरःस्थलावर एक असे बाण मारून मोठ्यानें गर्जना केली. त्या बाणांनीं कर्ण निवृत्त होऊन दुखविलेल्या सर्पाप्रमाणें तीक्ष्ण बाणांनीं भीमाचें निवारण करूं लागला !

( २ ) तेव्हां भीम–राधेयांचें मोठें तुमुल युद्ध झालें. ते दोघे वृषभांप्रमाणें डोळे वटारून गर्जना करीत मोठ्या आवेशानें एकमेकांवर तुटून पडले. युद्ध-प्रवीण भीम-कर्ण परस्परांना इतके जवळ भिडले कीं, त्यांना बाणांचा उपयोग करतां येईना. त्यावेळीं त्यांनीं गदायुद्ध आरंभिलें. हे राजा, भीमानें गदेनें कर्णरथाच्या दांड्याचे शेंकडो तुकडे केले. इकडे कर्णानेंहि आपली गदा भीमाच्या रथावर फेंकली, ती छेदून भीमानें पुनः एक मोठी गदा कर्णावर सोडली.

कर्णानें ती आपल्या बाणांनीं फिरविली. ती मंत्राभिहत नागिणीप्रमाणें उलट भीमाकडेच वळली. तिच्या आघातानें भीमाचा विपुल ध्वज कोसळून पडला आणि त्याचा सारथिहि गदाहत होऊन मूर्च्छित झाला. तेव्हां भीमानें तीक्ष्ण बाणांनीं कर्णाचें धनुष्य, ध्वज आणि तूणीर छेदून टाकलीं. नंतर राधेयानें स्वर्णपृष्ठ दुसरें बळकट धनुष्य घेतलें आणि भीमाचे अश्व व दोघे पार्ष्णिसारथी यांस मारलें! भीम विरथ होतांच त्यानें नकुलाच्या रथावर उडी मारली आणि पर्वतावर चढणाऱ्या सिंहाप्रमाणें तो त्यावर चढून बसला!

( ३ ) इतक्यांत द्रोणार्जुनांचेंहि मोठें आश्चर्यकारक युद्ध चालू झालें. ते गुरुशिष्य मोठे युद्धकुशल, अतिचपल आणि रथचर्यानिपुण असल्यामुळें मनुष्यांचे नेत्र व मन त्यांनीं वेधून टाकलीं. त्यामुळें सर्व लोक युद्ध थांबवून गुरु-शिष्यांचें तें अदृष्टपूर्व युद्ध पाहूं लागले. ते वीर अन्योन्यांच्या उजवीकडे हो-ण्याचा प्रयत्न करीत. तें पाहून सर्व योद्ध्यांना परम आश्चर्य वाटलें. कुंतीपु-त्राला जिंकण्यासाठीं द्रोणानें ज्या ज्या उपायांची योजना करावी, त्याचा अर्जुनानें प्रतिकार करावा! तेव्हां द्रोणानें ऐंद्र, त्वाष्ट्र इत्यादि अस्त्रें प्रकट केलीं, परंतु धनंजयानें तीं सर्व छेदून टाकलीं. द्रोण ज्या ज्या अस्त्राची योजना करी, त्याचा त्याच अस्त्रानें अर्जुन नाश करीत असे. द्रोणानें परमदिव्य अस्त्रेंहि अर्जुनावर सोडिलीं. तींहि अर्जुनानें नष्ट केल्याचें पाहून द्रोणानें मनांतल्या मनांत अर्जुनाची फार प्रशंसा केली आणि भारता, सर्व शस्त्रवेत्त्यांमध्यें आपल्या शिष्याची श्रेष्ठता जाणून द्रोण आपणाला पृथ्वीवरील सर्व धनुर्धरांत श्रेष्ठ मानूं लागला! मोठमोठ्या वीरांसमक्ष अर्जुन द्रोणाचा प्रतिकार करीत होता, तरी द्रोण मोठ्या प्रेमानें व विस्मयानें त्याचें निवारण करीत असे. तें अद्भुत युद्ध पाहण्यासाठीं आकाशांत हजारों देव, अप्सरा आणि यक्ष-गंधर्वा-दिक जमले. त्यामुळें आकाश जणुंकाय मेघांनींच व्याप्त झाल्यासारखें दिसूं लागलें. हे नराधिपा, इतक्यांत द्रोण व अर्जुन यांची स्तुति करणारी आकाश-वाणी ऐकूं येऊं लागली. द्रोण व पार्थ अन्योन्यांवर अस्त्रें टाकून दहाहि दिशा प्रज्वलित करूं लागले! तेव्हां तेथें जमलेले सिद्ध आणि ऋषि म्हणाले, "हें युद्ध मानुष, आसुर किंवा राक्षस ह्या तिन्ही प्रकारचें नाहीं किंवा दैव-गांधर्वहि नाहीं. हें खरोखर ब्राह्मयुद्ध आहे. द्रोण अर्जुनाला अत्यधिक आहे व अर्जुनहि द्रोणाला अधिक आहे. या दोहोंमधील अंतर इतर कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं. रुद्र द्विधा होऊन आपण आपल्याशींच युद्ध करूं लागला, तर

त्या रुद्ररूपांची उपमा यांना देतां येईल! दुसरी कोणतीहि उपमा यांना देण्यासारखी नाहीं. आचार्यांच्या ठिकाणीं सर्व ज्ञान सांठविलें आहे, तर अर्जुनाच्या ठायीं ज्ञान व योग हीं एकवटलीं आहेत. आचार्य शौर्यानें युक्त आहेत तर अर्जुन शौर्य व बल यांनीं संपन्न आहे. दोघांचाहि पराभव इतर कोणीहि करण्यास समर्थ नाहीं. हे दोघे मनांत आणतील, तर अमरांसहित सर्व विश्वाचा संहार करूं शकतील!"

इतक्यांत द्रोणानें ब्रह्मास्त्र प्रकट केलें आणि अर्जुन व अंतर्हित जीवांनाहि संतापवून सोडलें. पर्वत, वनें, वृक्ष यांसह पृथ्वी कंपित झाली, सोसाट्याचा वारा सुटूं लागला व सागरहि क्षुब्ध झाले. महात्म्या द्रोणानें तें अस्त्र सोडलें असतां कुरु-पांडवांच्या सेनेला आणि सर्व भूतांना मोठा त्रास झाला. हे राजेंद्रा, अर्जुनानें ब्रह्मास्त्रानेंच त्या अस्त्राचा नाश केला. त्या दोहोंपैकीं कोणाचाहि पराजय होईना, तेव्हां त्या दोन सैन्यांमध्यें संकुलयुद्ध प्रवृत्त होऊन सर्वत्र व्यग्रता उत्पन्न झाली. हे राजेंद्रा, आकाश मेघसमुदायाप्रमाणें शरजालांनीं व्याप्त झालें आणि त्यामुळें कोणीहि गगनसंचारी प्राणी आकाशांतून भ्रमण करीनातसे झाले. ७. ७. १८८.

---

## अध्याय १८९ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ सात्यकि-दुर्योधनांचें युद्ध. ३ भीम व कर्ण यांचें युद्ध. ४ युधिष्ठिराचें आपल्या वीरांस युद्धार्थ प्रोत्साहन. ]

( १ ) **संजय**—हे महाराजा, गज, अश्व आणि नर यांचा तो तसा क्षय चालला असतां दुःशासन-धृष्टद्युम्नांचें युद्ध जुंपलें. धृष्टद्युम्न द्रोणाशीं युद्ध करीत असतां दुःशासनानें बाण टाकून त्याला त्रस्त केलें. त्यामुळें संतप्त होऊन त्यानें दुःशासनाच्या अश्वांवर बाणवृष्टि केली. क्षणांत त्याचा रथ, ध्वज आणि सारथि यांसह धृष्टद्युम्नाच्या बाणांनीं व्याप्त होऊन दिसेनासा झाला. राजेंद्रा, शरजालांनीं व्याकुल झालेला दुःशासन धृष्टद्युम्नासमोर स्थिर राहूं शकला नाहीं. तेव्हां हजारों बाण टाकीत धृष्टद्युम्न द्रोणावर धांवून गेला. इतक्यांत हृदीकपुत्र कृतवर्मा व त्याचे तीन बंधु चालून येऊन त्यांनीं याला वेढिलें. नकुल-सहदेव द्रोणाभिमुख जाणाऱ्या धृष्टद्युम्नाचें रक्षण

करीत त्याच्या मागून गेले. त्या सर्व महारथींनीं रणक्षेत्रांत देह ठेवावयाचे, अशा निश्चयानें युद्ध केलें ! ते शुद्धाचरणी असून स्वर्गप्राप्ति ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. परस्परांना जिंकूं इच्छिणाऱ्या त्या वीरांनीं आर्ययुद्ध केलें. हे राजा, ते सत्कुलांत जन्म पावले असून कर्मानेंहि पवित्र होते. तसेंच ते मोठे ज्ञानी होते. त्यामुळें सद्गतीकरितां त्यांनीं धर्मयुद्ध केलें. कोणतीहि अधार्मिक किंवा अप्रशस्त गोष्ट त्यांनीं कधींहि केली नाहीं. त्यांकडून कर्णी[1], नालीक, लिप्त, बास्तिक, सूची, कपिश, गवास्थि, गजास्थिज, संश्लिष्ट, पूति किंवा जिह्म यांपैकीं कोणताहि बाण योजण्यांत आला नाहीं. सर्वांनीं सरळ व शुद्ध अशींच शस्त्रें धारण केलीं होतीं. धर्मयुद्ध करून परलोक व कीर्ति संपादन करावी, एवढीच त्यांची इच्छा होती.

त्यावेळीं तुझे चार योद्धे आणि ते तिघे पांडव यांमध्यें निर्दोष परंतु तुमुल युद्ध झालें. हे राजन्, तुझ्या त्या वीरांचें नकुल-सहदेवांनीं निवारण केलें. पर्वत पुढें आडवे आले असतां वाऱ्यांचें निवारण होतें, तरी ते वारे पर्वताशींच भिडून राहतात, त्याप्रमाणें त्या नकुल-सहदेवांनीं त्या चौघांचें निवारण केलें, तरी ते त्यांचा प्रतिकार करीत तसेच राहिले ! नकुल-सहदेवांपैकीं प्रत्येक त्या चौघांशीं युद्ध करूं लागला आणि त्यामुळें धृष्टद्युम्नाला द्रोणावर चालून जातां आलें.

( २ ) द्रोण पांचालपुत्र धृष्टद्युम्नाशीं आणि ते चौघे नकुल-सहदेवांशीं रणांगणावर भिडलेले पाहून दुर्योधन त्यांच्यामधून बाणांची वृष्टि करीत तेथें धांवून आला. तें पाहून सात्यकि त्यावर त्वरेनें चालून आला. दुर्योधन आणि सात्यकि हंसतच परस्परांशीं भिडले. त्यावेळीं बालपणचें सर्व वृत्त आठवून त्यांना आनंद झाला आणि ते प्रेमपूर्वक एकमेकांकडे पाहूं लागले. तेव्हां

---

१ कर्णी—दोन शूलाग्रें असलेला बाण. हा शरीरांतून काढतांना आंतडीं बाहेर निघतात. नालीक—हा अतिसूक्ष्म असल्यामुळें शरीरांतून काढतांना फार कष्ट पडतात. लिप्त—हा विषारी असतो. बस्तिक—हा शरीरांतून काढतांना दंड ( दांडा ) मात्र बाहेर येतो. त्याबरोबरचें शल्य बस्तींत रुतून रहातें. सूची—पुष्कळ कांट्यांनीं युक्त. कपिश—कृष्णवर्णाचा. गवास्थि—बैलाच्या हाडाचा. गजास्थिज—हत्तीच्या हाडाचा. संश्लिष्ट—चिकटून राहणारा. पूति—उग्र गंधाचा. जिह्म—सरळ न जाणारा.

दुर्योधन आपणालाच दोष लावून म्हणाला, " मित्रा, क्रोध, लोभ, मोह आणि अमर्ष यांना धिक्कार असो! शिनिपुंगवा, तूं माझ्याशीं व मीं तुझ्याशीं युद्ध करावें, त्याअर्थी क्षात्राचारालाहि धिक्कार असो! कारण तूं मला प्राणांपेक्षांहि प्रिय आहेस व मीहि तुला तसाच आहें. आमच्या बालपणच्या सर्व गोष्टी आतां मला आठवत आहेत. त्या सर्वांचा या रणांगणावर लय व्हावा ना? हे सात्वता, क्रोध व लोभ यांना बळी पडून आपण युद्ध करीत आहों, याहून दुसरें तें काय राहिलें ?"

दुर्योधनाचें भाषण ऐकून सात्यकि तीक्ष्ण बाण उगारून हंसत म्हणाला, ' राजपुत्रा, ही सभा नव्हे किंवा जेथें आपण जमून क्रीडा केल्या तें आचार्यांचें निवेशनहि नव्हे !'

**दुर्योधन**—शिनिश्रेष्ठा, बालपणच्या त्या आमच्या क्रीडा कोणीकडे आणि हें युद्ध कोणीकडे? काल हा खरोखर दुरतिक्रम होय! धनलोभामुळेंच जर आपण येथें जमून युद्धाला प्रवृत्त झालों आहों, तर धनलिप्सेनें तें मिळविलेलें धन तरी काय कामाचें ?

**संजय**—याप्रमाणें तो दुर्योधन बोलत असतां सात्यकि त्याला म्हणाला, "क्षात्रधर्मच मुळीं असा आहे कीं, त्यामुळें तरुण वडिलांशींहि युद्ध करण्यास सज्ज होतात! जर मी तुला प्रिय असेन, तर तूं मला शीघ्र मारून टाक! उशीर लावूं नकोस! हे भरतर्षभा, तुझ्यामुळें तरी मला पुण्यलोकाची प्राप्ति होईल! तुझी जी शक्ति किंवा बल असेल, तें तूं मला शीघ्र दाखीव. मित्रावर आलेलें असें मोठें संकट पहाणें मला आवडत नाहीं!"

अशाप्रकारें भाषणें होऊन सात्यकि अव्यग्र मनानें प्राणांचीहि चिंता न करितां त्वरेनें चालून गेला. तुझ्या पुत्रानेंहि त्यावर बाणवृष्टि करण्यास प्रारंभ केला आणि त्या कुरु-माधव वीरांचें गजेंद्र आणि सिंह याप्रमाणें घोर युद्ध झालें. दुर्योधनानें सात्यकीवर तीस तीक्ष्ण बाण हंसत-हंसत टाकले आणि एका क्षुरप्रानें त्याचें धनुष्य छेदिलें. तेव्हां सात्यकीनें दुसरें बळकट धनुष्य घेतलें आणि तो तुझ्या पुत्रावर बाणांचा वर्षाव करूं लागला. आपला प्राण घेण्यासाठीं ती शरश्रेणी येतांना पाहून दुर्योधनानें तिचा संहार केला. त्यावेळीं लोकांनीं मोठ्या गर्जना केल्या. दुर्योधनानें आणखीहि त्र्याहत्तर बाण सात्यकीवर टाकले. तेव्हां त्यानें त्याचा प्रत्येक बाण व धनुष्य छेदून टाकलें आणि

त्यालाहि बाणांनीं विद्ध केलें. त्यामुळें दुर्योधन व्याकुळ होऊन दुसऱ्या रथावर चढला आणि पुनः धैर्य धरून सात्यकीवर धांवून आला. दुर्योधनानें युयुधानाच्या रथावर सारखी बाणवृष्टि केली आणि त्यानेंहि दुर्योधनाच्या रथावर बाण टाकले. त्यांचा आणि वीरांवर पडणाऱ्या बाणांचा नाद अग्नि मोठे शुष्क वृक्ष जाळीत असतां होणाऱ्या नादाप्रमाणें मोठा होऊं लागला.

( ३ ) दुर्योधनापेक्षां युद्धांत सात्यकि श्रेष्ठ आहे, हें जाणून तुझ्या पुत्राच्या रक्षणार्थ कर्ण त्वरेनें धांवून आला. तें भीमसेनास सहन न होऊन तो बाण फेंकीत कर्णावर त्वरेनें आला. कर्णानें हंसतच त्याच्या बाणांचा संहार केला, धनुष्य छेदिलें आणि बाणांनीं त्याच्या सारथ्यालाहि मारून टाकलें! तेव्हां भीमसेनानें क्रुद्ध होऊन गदेनें प्रतिपक्षाचा ध्वज, धनुष्य आणि सारथि यांचा चुराडा केला! त्यानें कर्णाचें रथचक्रहि मोडून टाकलें. तरी कर्ण पर्वताप्रमाणें रथांत निष्कंप राहिला. सूर्याचा एकचक्र रथ जसे त्याचे सात अश्व ओढून नेतात, त्याप्रमाणें त्या अश्वांनीं तो कर्णाचा रथ वाहून नेला आणि कर्ण विविधप्रकारच्या शस्त्रांनीं व बाणजालांनीं भीमसेनाशीं युद्ध करूं लागला!

( ४ ) याप्रमाणें युद्ध प्रवृत्त झालें असतां युधिष्ठिर पांचाल व मात्स्य नरवीरांना उद्देशून बोलला, "आमचे प्राण व मस्तकतुल्य असे महारथी धार्तराष्ट्रांशीं युद्ध करीत असतां मूढांनो, तुम्ही सर्व अचेतनांप्रमाणें येथें स्थिर कां राहिलां आहां? जेथें माझे रथी युद्ध करीत आहेत, तेथें चला आणि क्षात्रधर्माचा पुरस्कार करून सर्व भीति सोडून द्या! युद्धांत तुम्हांला जय मिळो अथवा मरण येवो, तुम्ही इष्ट लोकींच जाल! शत्रूंना तुम्हीं जिंकिलें, तर पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ कराल आणि युद्धांत मृत्यु आल्यास देवतुल्य होऊन मोठमोठे लोक तुम्हांला प्राप्त होतील!

युधिष्ठिरानें याप्रमाणें उत्तेजित केल्यावर ते महारथी योद्धे क्षात्रधर्माचा पुरस्कार करून द्रोणावर चालून गेले. एका बाजूनें पांचाल द्रोणावर तीक्ष्ण बाण फेंकूं लागले, तर दुसरीकडून भीमसेनप्रभृति वीर त्याला वेढूं लागले. पांडवांचे त्या ठिकाणीं नकुल, सहदेव व भीमसेन असे तीन महारथी होते. त्यांनीं अर्जुनाला गर्जना करून सांगितलें कीं, 'अर्जुना, त्वरित धांवून जा आणि कौरवांना पांडवांपासून दूर घालवून दे; म्हणजे हे पांचाल त्या निराश्रित द्रोणास मारतील!'

भारता, नंतर अर्जुन एकाएकीं कौरवांवर तुटून पडला आणि द्रोण, धृष्टद्युम्न प्रभृति पांडवांवर धांवून गेला. अशाप्रकारें पांचव्या दिवशीं त्या वीरांचें मोठ्या वेगानें घोर युद्ध होऊन त्यांत एकमेकांचा बराच संहार झाला ! ७. ७. १८९.

---

## अध्याय १९० वा.

[१ द्रोणाविषयीं पांडवांस वाटणारें भय. २ द्रोणाच्या शस्त्रन्यासाकरितां कृष्णाचें पांडवांस युक्तिकथन. ३ विश्वामित्रादि ऋषींचा द्रोणास उपदेश. ४ श्रीकृष्णाचें प्रोत्साहन. ५ युधिष्ठिराचें असत्य भाषण. ]

( १ ) संजय—पूर्वी इंद्रानें दानवांचा क्षय केला, त्याप्रमाणें त्या क्रुद्ध द्रोणानें पांचालांचा संहार चालविला. हे महाराजा, द्रोणाच्या अस्त्रानें रणांत शत्रु मारले जाऊं लागले, तेव्हां पांचाल आणि सृंजय यांकडील मोठमोठे सत्त्ववान् योद्धे द्रोणावर धांवून गेले. परंतु द्रोणाच्या शरवृष्टीनें पांचाल चोहों-कडून आच्छादित होऊं लागले व कित्येकांचा वधहि होऊं लागला. द्रोणा-स्त्रानें पांचालांचा क्षय होऊं लागल्यामुळें पांडवांना मोठें भय वाटूं लागलें. हे महाराजा, नर, अश्व आणि योद्धे यांचा रणांत होणारा भयंकर संहार पाहून पांडव जयाविषयीं निरुत्साह झाले. ते म्हणाले " ग्रीष्मर्तूमध्यें अनल जसा शुष्क तृणाला भस्म करून टाकतो, तसा हा अस्त्रवेत्ता द्रोण आमचा सर्वांचा क्षय करणार नाहींना ? संग्रामांत त्याच्याकडे पाहाण्याला तरी कोण समर्थ आहे ! कांहीं झालें तरी तो धर्मशील अर्जुन आपल्या गुरूशीं कधींहि युद्ध करणार नाहीं ! "

( २ ) द्रोणाच्या बाणांनीं पांडव पीडित झालेले पाहून त्यांच्या हिता-साठीं सर्वदा प्रयत्न करणारा श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, " हातांत धनुष्य असतां इंद्रासह सर्व देवांना याला जिंकणें कधींहि शक्य नाहीं ! त्यानें शस्त्र खालीं ठेवलें, तर मात्र ह्याचा मनुष्याच्या हातून वध होऊं शकेल. म्हणून पांडवहो, यावेळीं धर्म बाजूला ठेवून जेणेंकरून जय मिळेल आणि ज्या योगानें हा द्रोण रणांत आमचा संहार करणार नाहीं, असा कांहीं उपाय योजला पाहिजे. अश्वत्थामा मृत्यु पावला असतां हा युद्ध करणार नाहीं, असें मला वाटतें. तर तो समरांत मेला, असें कोणींतरी त्याला सांगावें ! "

ही युक्ति अर्जुनाला आवडली नाहीं. इतरांना ती मान्य झाली. युधिष्ठिरानेंहि

मोठ्या संकटानें तिला मान्यता दिली. इतक्यांत भीमानें आपल्या पथकांतील मालवपति इंद्रवर्म्याच्या 'अश्वत्थामा'नामक महागजाचा वध केला आणि द्रोणाकडे जाऊन विनयानें 'अश्वत्थामा मारला गेला,' असें मोठ्यानें म्हणाला. अश्वत्थामा गज मारला गेला, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून भीमानें असत्य भाषण केलें ! ( अश्वत्थामा गज न म्हणतां नुसतें अश्वत्थामा मारला गेला असें तो म्हणाला. ) भीमसेनाचें तें अप्रिय भाषण ऐकून पाण्यांत टाकलेल्या सैंधवाप्रमाणें द्रोण मरणोन्मुख झाला ! आपल्या पुत्राचा पराक्रम त्याला विदित असल्यामुळें ती वार्ता खोटी असावी, अशी त्याला शंका आली आणि त्यामुळें त्याचें धैर्य खचलें नाहीं. क्षणांत सावध होऊन त्यानें आपला मृत्यु जो धृष्टद्युम्न त्याच्या वधेच्छेनें त्यावर तीक्ष्ण बाण टाकले. तेव्हां वीस हजार पांचाल त्यावर चोहों बाजूंनीं बाण टाकूं लागले. त्या बाणांनीं आच्छादित झालेला द्रोण वर्षाकाळांतील घनांनीं व्यापलेल्या सूर्यासारखा दिसेनासा झाला. द्रोणानें पांचालांच्या बाणांचा नाश केला आणि त्यांच्या वधासाठीं ब्रह्मास्त्र सोडलें. त्यामुळें द्रोणानें पांचालांचीं मस्तकें आणि त्यांचे परिघाकार बाहू छेदून टाकले. तेव्हां वाऱ्यानें मोडून पडलेल्या वृक्षांप्रमाणें ते सर्वत्र भूमीवर कोसळून पडले ! गज व अश्व पतन पावून त्यांच्या रक्तमांसाचा चिखल झाला आणि भूमीवरून कोणालाहि चालतां येईना. याप्रमाणें त्या द्रोणानें वीस हजार पांचाल महारथ्यांचा संहार केला आणि एका भल्लानें वसुदानाचें मस्तक धडापासून वेगळें केलें ! पुनः द्रोणानें पांचशें मत्स्यांचा व सहा हजार सृंजयांचा वध केला आणि अयुत गज व तितकेच अश्व मारून टाकले !

( ३ ) क्षत्रियांच्या अभावाकरितांच द्रोण समरांत उभा आहे, असें पाहून विश्वामित्र, जमदग्नि इत्यादि ऋषि त्यास ब्रह्मलोकीं नेण्याच्या उद्देशानें अग्निनारायणासह तेथें आले आणि ते सर्व त्याला म्हणाले, "द्रोणा, तूं अधर्मानें युद्ध करीत आहेस, हा तुझा निधनकाल आहे. आम्ही तुझ्यापुढें अवस्थित झालों आहों, हें पाहून तरी तूं शस्त्र खालीं ठेव. यापुढें क्रूरतर कर्म करणें तुला योग्य होणार नाहीं. तूं वेदवेदांगें जाणणारा, सत्यधर्मरत आणि विशेषतः ब्राह्मण आहेस, त्यामुळें हें कृत्य तुला शोभत नाहीं. आयुधाचा त्याग कर आणि शाश्वत मार्गाचा अवलंब कर. ह्या मनुष्यलोकीं राहण्याचा तुझा काळ पूर्ण होत आला आहे. विप्रा, तूं ब्रह्मास्त्रानें अनस्त्रज्ञ जनांना दग्ध केलेंस, हें कृत्य योग्य केलें नाहींस. द्रोणा, रणांत शस्त्र ठेव; विलंब करूं नकोस. हे द्विजश्रेष्ठा, आणखी पापकर्म तुझ्या

हातून होऊं नये, असें आम्ही इच्छितों. असें त्यांचें भाषण व भीमसेनाचें बोलणें ऐकून आणि धृष्टद्युम्नास समोर पाहून द्रोण विमनस्क झाला. शंकाग्रस्त व व्यथित होऊन आपला पुत्र मृत झाला कीं जिवंत आहे, हें युधिष्ठिराला त्यानें विचारलें. त्रैलोक्याचें ऐश्वर्य प्राप्त होत असलें, तरी युधिष्ठिर कधींहि अनृत भाषण करणार नाहीं, असा त्याचा दृढविश्वास होता. म्हणून त्यानें दुसऱ्या कोणालाहि न विचारतां तें धर्मासच विचारलें.

( ४ ) द्रोण आतां निष्पांडवी पृथ्वी करील, ह्या चिंतेनें श्रीकृष्ण व्यथित झाला आणि धर्माला बोलला, "हा क्रुद्ध द्रोण जरी अर्धा दिवस युद्ध करीत राहिला, तरी तुझ्या सर्व सैन्याचा नाश होईल, हें मी सत्य सांगतों. यास्तव युधिष्ठिरा, तूं द्रोणापासून आमचें रक्षण कर. ह्यावेळीं सत्यापेक्षां असत्याची योग्यता विशेष आहे. जीविताच्या रक्षणाकरितां असत्य बोलणाऱ्याला पाप लागत नाहीं."

( ५ ) याप्रमाणें तो बोलत असतां भीमसेन म्हणाला "महाराज, त्या महात्म्या द्रोणाचा वधोपाय ऐकून मीं तुझ्या सेनेंतील मालवपति इंद्रवर्म्याचा अश्वत्थामा नांवाचा गज युद्धांत मारला आणि 'हे ब्रह्मन् , अश्वत्थामा मारला गेला, आतां युद्धापासून निवृत्त हो !' असें द्रोणास बोललों. त्या माझ्या भाषणावर त्यानें विश्वास ठेवला नाहीं. म्हणून आमच्या जयाची इच्छा करणाऱ्या श्रीकृष्णाच्या शब्दाला मान दे आणि अश्वत्थामा मारला गेला, असें द्रोणाला सांग. हे राजा, असें सांगितलें असतां तो कदापि युद्ध करणार नाहीं. तूं सत्यवादी आहेस, अशी या त्रैलोक्यांत ख्याति आहे."

संजय—हे महाराजा, तें त्याचें भाषण ऐकून व त्यास कृष्णाचें प्रोत्साहन मिळून आणि विशेषेंकरून भवितव्यताच तशी असल्यामुळें तो असत्य बोलण्यास प्रवृत्त झाला. असत्याची भीति वाटत होती, पण जयाशेनें 'अश्वत्थामा मारला गेला' असें मोठ्यानें बोलून 'कुंजर' शब्द त्यानें अव्यक्त उच्चारला ! यापूर्वीं युधिष्ठिराचा रथ पृथ्वीपासून चार अंगुळें उंच असे, परंतु त्यानें असें भाषण करतांच रथाश्व एकाएकीं भूमीवर उभे राहिले. युधिष्ठिराच्या तोंडून तें अप्रिय भाषण ऐकतांच द्रोण पुत्रशोकानें संतप्त झाला. त्याला जीविताची आशा राहिली नाहीं. पांडवांचा आपल्या हातून अन्याय झाल्याचें ऋषिवाक्यावरून त्याला वाटूं लागलें. पुत्र हत झाल्याचें ऐकून आणि आपल्यासमोर

धृष्टद्युम्नाला पाहून तो अत्यंत उद्विग्न व उदास झाला. पूर्वीप्रमाणें युद्ध करण्याचें सामर्थ्यहि त्याला आतां राहिलें नाहीं. ७. ७. १९०.

---

## अध्याय १९१ वा.

[ १ द्रोण-धृष्टद्युम्नयुद्ध. २ द्रोणाच्या हातून धृष्टद्युम्नाचें विमोचन. ]

(१) संजय—द्रोण परम उद्विग्न होऊन गेला आहे आणि त्याचें चित्तहि शोकानें व्याकुळ झालें आहे हें पाहून पांचाल राजपुत्र धृष्टद्युम्न त्यावर धांवून गेला. द्रुपद राजानें मोठा यज्ञ करून द्रोणाच्या विनाशासाठींच प्रदीप्त हव्यवाहनापासून ज्याची प्राप्ति करून घेतली, त्या धृष्टद्युम्नानें द्रोणाला मारण्याच्या इच्छेनें मेघासारखा शब्द करणारें, दृढ प्रत्यंचेचें धनुष्य आणि सर्पतुल्य प्रदीप्त बाण घेऊन तो धनुष्याला जोडला. धृष्टद्युम्नानें धनुष्य हातांत घेतलेलें पाहतांच सैनिकांना आणि त्या प्रतापी भारद्वाजालाहि आपला अंतकाल जवळ आला, असें वाटूं लागलें. तेव्हां द्रोणानें त्या बाणाच्या निवारणासाठीं प्रयत्न केला. परंतु त्या महात्म्याचीं अस्त्रेंच प्रकट होईनात. त्याचे चार दिवस आणि एक रात्र शरसंधान करण्यांतच गेले होते आणि तीन प्रहर दिवसास त्याचे बाणांचाहि क्षय झाला होता. तशांत पुत्रशोकामुळें उद्विग्नता, दिव्यास्त्रांची अप्रसन्नता आणि ऋषींच्या भाषणावरून शस्त्रन्यास करण्याची इच्छा, यांमुळें तो पराक्रमी असूनहि पूर्वीप्रमाणें युद्धसामर्थ्य त्याच्या अंगीं नव्हतें. तरी आंगिरस दिव्य धनुष्य आणि ब्रह्मदंडासारखे तेजस्वी बाण घेऊन तो धृष्टद्युम्नाशीं युद्ध करण्यास सज्ज झाला. त्यानें क्रोधाविष्ट होऊन धृष्टद्युम्नावर बाणवृष्टि केली आणि त्याला विद्ध केलें. इतकेंच नव्हे, तर शरांनीं त्याच्या बाणांचें शतधा चूर्ण केलें आणि त्याचा ध्वज, धनुष्य आणि सारथि यांनाहि पाडलें ! तेव्हां धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेतलें आणि हास्यपूर्वक एका तीक्ष्ण बाणानें उरःप्रदेशीं द्रोणाला विद्ध केलें ! द्रोणानें किमपिहि भयभीत न होतां तीक्ष्ण भल्लानें पुनः त्याचें धनुष्य तोडिलें. राजेंद्रा, त्या दुर्धर्ष द्रोणानें गदा व खड्ग यांविरहित जीं जीं धनुष्यादिक शस्त्रें त्याजवळ होतीं, तीं तीं सर्व छेदून टाकलीं आणि नऊ बाणांनीं धृष्टद्युम्नाचा वेधहि केला. हे महाराजा, तेव्हां धृष्टद्युम्नानें ब्रह्मास्त्राची योजना करून आपल्या रथाचे अश्व द्रोणाच्या हयांशीं भिडविले. ते कपोतसदृश, ताम्रवर्ण व चपल अश्व एकमेकांत मिसळून वर्षा-

कालाचे प्रारंभीं विद्युद्युक्त गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें रणाग्रभागीं शोभूं लागले.

इतक्यांत द्रोणानें धृष्टद्युम्नाच्या रथाच्या धुरेचे आणि चक्रांचे बंध तोडून टाकले आणि त्याचें धनुष्य, सारथि व ध्वज यांचाहि नाश केला; तेव्हां धृष्टद्युम्नाला आपल्यावर मोठी आपत्ति कोसळल्यासारखें झालें, तरी त्यानें गदा घेऊन ती तो द्रोणावर फेंकणार, तोंच त्यानें तीक्ष्ण बाणांनीं तिचा नाश केला. अशा स्थितींतहि द्रोणाचा वधकाल सन्निध येत आहे, हें जाणून तो पांचालकुमार खड्ग-चर्म हातीं घेऊन आपल्या रथांतून द्रोणाच्या रथावर चालून जाऊं लागला. त्यावेळीं धृष्टद्युम्नाच्या मनांत दुष्कर कर्म करून द्रोणाचा हृदयभेद करण्याचें होतें. थोडा वेळ युगमध्यावर, तर थोडा वेळ अश्वांच्या जघनार्धभागीं थांबून तो युगाच्या अग्रभागीं आला आणि द्रोणाच्या रक्त अश्वांवर केव्हां आरूढ झाला, हें द्रोणालाहि कळलें नाहीं ! द्रोणहि तितकाच रणकुशल होता. आमिषासाठीं त्वरेनें जाणाऱ्या श्येनपक्ष्याप्रमाणें द्रोण व धृष्टद्युम्न रणांत संचार करीत होते. द्रोणानें केवळ त्याच्या कपोतवर्ण अश्वांवरच रथशक्तीनें प्रहार केले, त्यामुळें ते गतप्राण होऊन तत्काल भूमीवर पडले ! आपले अश्व द्रोणानें मारले हें पाहून धृष्टद्युम्नास सहन झालें नाहीं. तो विरथ वीर खड्ग हातांत घेऊन सर्पावर धांवून जाणाऱ्या गरुडाप्रमाणें द्रोणावर चालून गेला. त्यावेळीं विष्णु जसा हिरण्यकशिपूच्या वधसमयीं भयंकर दिसला, तसें भारद्वाजाचा वध करूं इच्छिणाऱ्या धृष्टद्युम्नाचें स्वरूप दिसूं लागलें ! हातांत खड्ग-चर्म धारण करून भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध, आप्लुत, प्रसृत, सृत, परिवृत्त, निवृत्त, संपात, समुदीर्ण, भारत, कौशिक आणि सात्वत इतक्या प्रकारांनीं[1] तो द्रोणाच्या वधेच्छेनें रणांत संचार करूं लागला ! तेव्हां द्रोणानें हजार बाणांनीं त्याचें चर्म ( ढाल ) व खड्ग हीं छेदून टाकलीं ! त्या घनघोर युद्धामध्यें द्रोणानें जे वैतस्तिक ( वीत लांबीचे ) बाण योजिले, त्यांचा उपयोग आसन्न युद्धामध्येंच करावयाचा असतो. ते बाण कृपाचार्य, पार्थ, अश्वत्थामा, द्रोण, कर्ण, प्रद्युम्न, सात्यकि आणि अभिमन्यु यांविरहित दुसऱ्या कोणाजवळ नव्हते.

---

१ हीं लक्षणें सप्तम खंड, पृष्ठ १५ वर दिलीं असल्यामुळें येथें पुनः दिलीं नाहींत.

( २ ) हे भारता, त्यावेळीं द्रोणानें एक उत्कृष्ट व बळकट बाण घेतला आणि आपला शिष्य व पुत्रसदृश जो धृष्टद्युम्न त्याचा वध करण्याच्या इच्छेनें धनुष्यास जोडला. इतक्यांत सात्यकीनें दहा तीक्ष्ण बाण टाकून कर्ण व दुर्योधन यांच्या समक्ष तें धनुष्य छेदून टाकलें आणि द्रोणाच्या हातून धृष्टद्युम्नाची मुक्तता केली. हे भारता, रथमार्गांतून द्रोण, कर्ण आणि कृपाचार्य यांच्या सान्निध्यांत सात्यकि संचार करीत असतां कृष्ण-धनंजयांनीं पाहिलें आणि त्यांनीं ' धन्य, धन्य ' म्हणून त्याची मोठी प्रशंसा केली ! त्यानंतर कृष्णार्जुनांनीं तुझ्या सैन्यावर चाल केली. तेव्हां अर्जुन कृष्णाला म्हणाला, " केशवा, हा मधुकुलोत्पन्न सात्यकि, आचार्य आणि दुसरे महारथी यांमध्यें कशी क्रीडा करीत आहे पहा ! हा परवीरांतक सात्यकि मला पुनःपुनः हर्षवीत असून माद्रीसुत, भीम आणि राजा युधिष्ठिर यांच्याहि मनाला आनंदवीत आहे. एवढा पराक्रमी असूनहि उद्धत न होतां हा रणांत संचार करीत आहे ! हा महारथ्यांना खेळवीत असून वृष्णिकुलाची कीर्ति वाढवीत आहे. हे सिद्ध आणि सैन्यें सात्यकि रणांत अजिंक्य आहे, हें पाहून विस्मित अंतःकरणानें त्याची ' धन्य, धन्य ' म्हणून प्रशंसा करीत आहेत ! "

हे धृतराष्ट्रा, सात्यकीचा पराक्रम पाहून दोन्ही सैन्यांतील वीरांनीं त्याचें अभिनंदन केलें. ७. ७. १९१.

---

## अध्याय १९२ वा.

[ १ द्रोण-धृष्टद्युम्नयुद्ध. २ द्रोणाचा शस्त्रन्यास. ३ द्रोणाचें तेजोरूपानें अंतरिक्षांत गमन. ४ धृष्टद्युम्नाच्या हातून द्रोणवध. ]

( १ ) संजय—सात्यकीचा तो पराक्रम पाहून दुर्योधनादिक वीर क्रुद्ध होऊन वेगानें चारी बाजूंनीं त्याचें निवारण करूं लागले. हे मारिषा, कृप, कर्ण आणि तुझे पुत्र त्वरेनें धांवून जाऊन त्यांनीं त्यावर तीक्ष्ण शरांची वृष्टि केली. तेव्हां राजा युधिष्ठिर, नकुल-सहदेव आणि भीमसेन हे सात्यकीच्या रक्षणार्थ त्याला वेढून राहिले आणि दुसरीकडून कर्ण, गौतम आणि दुर्योधनादि वीरांनीं त्याला वेढा दिला. सात्यकीनें त्या महारथींशीं युद्ध करून शरवृष्टीचें निवारण केलें आणि महायुद्धांत अनेक दिव्यास्त्रांची योजना

करून शत्रूंच्या अस्त्रांचाहि संहार केला. अशाप्रकारें ते राजपुरुष एकत्र होऊन त्यांजमध्यें भयंकर युद्ध प्रवृत्त झालें ! हे भारता, हस्त, मस्तकें, जीर्ण छत्रें, धनुष्यें आणि चामरें यांच्या राशि समरांगणांत जेथेंतेथें दिसूं लागल्या ! भग्न रथ, इतस्ततः पडलेले ध्वज, मारलेले सादी आणि वीर यांच्या योगानें ती रणभूमि व्याप्त झाली होती. हे कुरुसत्तमा, बाण लागून विद्ध झालेले योद्धे रणांत नानाप्रकारचे अंगविक्षेप करीत होते. देवासुरांप्रमाणें तें युद्ध चालू असतां राजा युधिष्ठिर सर्व क्षत्रियांना उद्देशून बोलला "हे महारथीहो, तुम्ही सर्व दक्षतेनें कुंभयोनि द्रोणावर धांवून जा. कारण हा धृष्टद्युम्न त्याच्याशीं भिडला असून त्याच्या नाशासाठीं यथाशक्ति प्रयत्न करीत आहे. धृष्टद्युम्नाच्या आनंदी मुद्रेवरून तो आज द्रोणाचा वध करणार हें स्पष्ट दिसत आहे ! यास्तव तुम्ही सर्व एकमतानें कुंभयोनि द्रोणाशीं युद्ध करा !"

युधिष्ठिराची अशी आज्ञा होतांच ते सृंजयांचे महारथी भारद्वाजाचा वध करण्याच्या इच्छेनें त्यावर धांवून गेले ! द्रोणहि आज युद्धांत मरायाचें, अशा निश्चयानें वेगानें त्यांवर उलटला. तो निघाला असतां पृथ्वी कांपूं लागली, सोसाट्याचे वारे सुटले आणि एक मोठी उल्का सूर्यापासून निघून उभय सैन्यांना प्रकाशित करीत आणि पुढें मोठें भय उपस्थित होणार असें सुचवीत आकाशांतून पडली ! हे मारिषा, द्रोणाचीं शस्त्रें जळून जाऊं लागलीं, रथांचा मोठा कर्कश ध्वनि होऊं लागला आणि अश्व अश्रू ढाळूं लागले ! भारद्वाजहि हतवीर्य होऊन गेला ! त्याचा वामनेत्र आणि वाम बाहु स्फुरण पावूं लागले ! तशांत धृष्टद्युम्नास आपल्यापुढें पाहून तर तो विमनस्क झाला आणि त्यानें स्वर्गगमनाविषयीं ऋषींचीं वचनें आठवून धर्मयुद्ध करून प्राण सोडण्याचा निश्चय केला ! सभोंवतीं द्रुपदसैन्यानें परिवेष्टित असूनहि क्षत्रियांना दग्ध करीत तो रणांत संचार करूं लागला. त्यानें तीक्ष्ण बाणांनीं वीस हजार क्षत्रियांचा आणि एक लक्ष गजांचा संहार केला आणि क्षत्रियांचा अभाव करण्यासाठीं ब्राह्म अस्त्राचा आश्रय करून धूमरहित प्रदीप्त अग्नीप्रमाणें रणांत स्थिर राहिला. इतक्यांत विरथ होऊन अत्यंत खिन्न झालेल्या धृष्टद्युम्नाकडे भीम गेला आणि त्याला आपल्या रथांत घेऊन व जवळच द्रोण शरसंधान करीत आहे, असें पाहून धृष्टद्युम्नाला म्हणाला "द्रोणाबरोबर युद्ध करूं शकेल, असा तुझ्यावांचून दुसरा कोणीहि धनुर्धर नाहीं. तर त्वरा कर ! आम्हीं द्रोणवधाचा सर्व भार तुझ्यावरच सोंपविला आहे !"




**धनंजय**—द्रुपदपुत्रा, द्रोणाला जिवंत धरून आण, त्याचा शिरच्छेद करूं नकोस। [ द्रोणपर्व, अ० १९२, पृ० २१८ ]

भीमाचें असें भाषण ऐकून धृष्टद्युम्नानें सर्व भार सहन करणारें एक उत्कृष्ट व दृढ धनुष्य घेतलें आणि तो क्रोधानें द्रोणावर शरवृष्टि करीत त्याचें निवारण करूं लागला. त्या दोघांनीं ब्रह्मास्त्रें व दुसरींहि अनेक दिव्यास्त्रें परस्परांवर टाकलीं. हे महाराजा, धृष्टद्युम्नानें भारद्वाजाच्या सर्व अस्त्रांचा नाश करून आपल्या महास्त्रांनीं त्याला झांकून टाकिलें आणि त्याचें रक्षण करणारे वसाति, शिबि व बाल्हीक आणि कौरव यांनाहि दूर पळवून लाविलें! हे राजा, शरजालांनीं समंततः आच्छादित करणारा धृष्टद्युम्न किरणांनीं दशदिशा व्याप्त करणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला! द्रोणानें त्याचें धनुष्य छेदिलें आणि एका शिलीमुखानें त्याला विद्ध करून त्याच्या मर्मांवर प्रहार केले. त्यामुळें तो अत्यंत व्याकुळ झाला! तेव्हां हे राजेंद्रा, क्रुद्ध भीम द्रोणाच्या रथाकडे भिडून त्याला म्हणाला, " स्वकर्मांनीं असंतुष्ट विद्वान् ब्राह्मण युद्धाला प्रवृत्त न झाल्यास क्षत्रियांचा क्षय होणार नाहीं. भूतमात्राविषयीं अहिंसा हाच श्रेष्ठ धर्म होय, असें म्हणतात. त्या धर्माचें ब्राह्मण हे मूळ आहेत. तूं तर ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहेस. असें असतां हे ब्रह्मन्, तूं अज्ञानानें मूढ होऊन पुत्र, स्त्री आणि धन यांच्या इच्छेनें चांडालासारखा म्लेच्छांचा आणि दुसऱ्या पुष्कळांचा संहार चालविला आहेस! एका पुत्राकरितां तूं अधर्मानें कर्मनिष्ठ क्षत्रियांचा संहार केलास, त्याची तुला लज्जा कशी बरें वाटली नाहीं ? ज्याच्याकरितां तूं शस्त्र उचललें आणि ज्याच्याकरितां तूं प्राणधारण करीत आहेस, तो मरून मागें पडला आहे, त्याची तुला वार्ताहि नाहीं! धर्मराजाचे शब्दाविषयीं शंका घेणें तुला योग्य नाही ! "

( २ ) भीमसेनानें असें सांगतांच द्रोणानें धनुष्य खालीं ठेवलें आणि सर्व शस्त्रांचा त्याग करण्याचें मनांत आणून तो धर्मात्मा म्हणाला, " कर्णा, धनुर्धर कर्णा, हे कृपा, हे दुर्योधना, युद्धाची पराकाष्ठा करा, हें माझें तुम्हांला पुनःपुनः सांगणें आहे ! पांडवांपासून तुमचें संरक्षण होवो ! मी आतां शस्त्रन्यास करितों ! "

हे महाराजा, असें बोलून द्रोण अश्वत्थाम्याच्या नांवानें आक्रोश करूं लागला ! रणांगणांत शत्रूंना सोडून आणि रथांतच बसून त्यानें प्राणिमात्रास अभय दिलें, आणि योगाचा अवलंब केला ! तेव्हां धृष्टद्युम्नानें आपणाला ही उत्तम संधि आहे, असें जाणून धनुष्य रथांत ठेवलें आणि हातांत खड्ग घेऊन तो द्रोणावर धांवला ! अशा रीतीनें द्रोण धृष्टद्युम्नाच्या मुष्टिबंधांत सांपडला

आहे, असें पाहून सर्व मनुष्यें व इतर प्राणीहि हाहाकार करूं लागले आणि त्यांनीं ' धिक्कार असो या कर्माला ' असे दुःखोद्गार काढले !

( ३ ) द्रोणानें शस्त्रन्यास करून परमश्रेष्ठ सांख्यमार्गाचें अवलंबन केलें. कर्णादिकांस तसें सांगून आणि योगाचा आश्रय करून त्यानें पुराणपुरुष विष्णूचे ठिकाणीं चित्त स्थिर केलें. त्यावेळीं त्यानें मुख किंचित् उंच केलें असून उरःस्थल पुढें आणलें होतें. त्यानें वासनांचा निरास केला होता व नेत्र निमीलित केलेले असून तो शुद्ध सत्वगुणस्थ झाला होता ! अशा रीतीनें सनातन, देवदेवेश, परम प्रभूचें अर्थात् ॐ ह्या एकाक्षरात्मक ब्रह्माचें ध्यान करून त्या महातपस्वी द्रोणानें मोठमोठ्या साधुसंतांनाहि दुष्प्राप्य अशा स्वर्गलोकाचें आक्रमण केलें. द्रोण तेजोरूपानें अंतरिक्षांत जाऊं लागला, तेव्हां तेथें दोन सूर्य प्रकाशले आहेत, असें आम्हांला वाटलें. सूर्यतुल्य तेजस्वी भारद्वाजरूपी रवि जेव्हां आकाशांत पोंचला, तेव्हां सर्व नभोमंडल ज्योतींनीं व्याप्त झालें आहे असें दिसलें. निमेषमात्रानें ती ज्योति अंतर्धान पावली. देव अत्यंत आनंदित झाले आणि त्यांचा हर्षनाद कानांवर येऊं लागला. हे राजन्, द्रोण देवलोकीं गेला, तेव्हां धृष्टद्युम्न मोहित झाल्यामुळें मनुष्ययोनींत जन्मलेल्या पांच जणांनाच—मी, धनंजय, अश्वत्थामा, श्रीकृष्ण आणि युधिष्ठिर यांनाच— तो परमगतीला जातांना दिसला. दुसऱ्या कोणालाहि भारद्वाजाचा हा महिमा दृष्टोत्पत्तीस आला नाहीं. योगबलानें ऋषिश्रेष्ठांसह ब्रह्मलोकीं जातांना आचार्य द्रोण अज्ञानी मानवांना दृग्गोचर झाला नाहीं.

( ४ ) ज्याचें शरीर शरसमूहांनीं भिन्न झालें असून त्यांतून रक्तस्राव होत आहे व ज्यानें शस्त्रन्यास केला आहे, अशा त्या द्रोणास धृष्टद्युम्नानें, प्राणिमात्र धिक्कार करीत असतांहि, स्पर्श केला आणि गतसत्त्व आचार्यांच्या मस्तकाला हात घालून त्यानें तें छेदून टाकिलें ! तेव्हां त्यानें परम हर्षित होऊन समरांगणांत खड्ग फिरवीत सिंहनाद केला. द्रोणाचे केश आकर्ण शुभ्र झाले होते व त्याचें वय चारशें वर्षांचें होतें. तरी त्यानें षोडश वर्षांच्या तरुणाप्रमाणें तुझ्याकरितां रणांत संचार केला होता !

जेव्हां धृष्टद्युम्न द्रोणाजवळ गेला, तेव्हां कुंतीपुत्र धनंजय त्याला म्हणाला, ' द्रुपदात्मजा, द्रोणाला जिवंत धरून आण; त्याचा वध करूं नकोस !' तुझे सैनिकहि ' याचा वध करूं नको, वध करूं नको,' म्हणून मोठ्यानें आक्रोश

करूं लागले ! दयार्द्र धनंजयानें आणि राजांनींहि त्याला सांगितलें, तरी त्यानें तें न ऐकतां रथांतच द्रोणाचा शिरच्छेद केला ! त्यावेळीं धृष्टद्युम्न रक्तानें माखलेला होता. त्यानें रथांतून खालीं उडी मारली, तेव्हां आरक्त सूर्याप्रमाणें तो लोकांना अगम्य झाला. अशा रीतीनें संग्रामांत द्रोणाचा वध झाला, तें सर्व सैनिकांनीं पाहिलें ! हे राजा, धृष्टद्युम्नानें तें द्रोणाचें मस्तक घेऊन तुझ्या वीरांच्या अग्रभागीं फेंकून दिलें ! तुझे वीर भारद्वाजाचें मस्तक पाहातांच भयभीत होऊन चारी दिशांना पळून गेले ! इकडे आकाशांतून द्रोण नक्षत्रमार्गानें पुढें जाऊं लागला. हे नृपा, कृष्णद्वैपायन ऋषीच्या प्रसादानें द्रोणाचें निधन मला मात्र दिसलें. द्रोणाचार्यांचा वध झाला, तेव्हां कौरव, पांडव आणि संजय निरुत्साह होऊन गेले आणि कौरवसैन्य मोठ्या वेगानें पळत सुटलें ! तुझे सैन्यांतील पुष्कळ लोक तीक्ष्ण शरांनीं मरणोन्मुख झाले. पराजय पावल्यानें व पलायन केल्यानें ऐहिक व पारलौकिक दोन्ही सुखांना ते मुकले, त्यामुळें त्यांचें धैर्य नष्ट झालें. राजे लोक भाराद्वाजाचें शरीर शोधूं लागले, परंतु रणांगण हजारों कबंधांनीं व्यापल्यामुळें तें त्यांस प्राप्त झालें नाहीं. पांडवांनीं रणांत विजय आणि परलोकीं मोठें यश संपादन करून शंख वाजविले आणि बाणध्वनि व सिंहनादहि केले !

राजन्, भीमसेन आणि धृष्टद्युम्न यांनीं परस्परांस आलिंगन दिलें आणि सैन्यामध्यें आनंदानें नाचूं लागले. भीमसेन धृष्टद्युम्नाला म्हणाला, "हे पार्षता, जेव्हां पापी सूतपुत्र आणि दुर्योधन रणांत मारले जातील, तेव्हां मी तुला असेंच आलिंगन देईन !" असें बोलून भीमानें मोठ्या आनंदानें आपले बाहु थोपटले. त्या शब्दानें पृथ्वी कंपायमान केली. त्या नादानें तुझे वीर भयभीत झाले आणि क्षात्रधर्म विसरून पळूं लागले ! हे राजेंद्रा, पांडवांचा जय होऊन ते अत्यंत आनंदित झाले आणि शत्रूंचा नाश झाल्यामुळें त्यांना मोठें समाधान झालें. ७. ७. १९२.

येथें सातवें द्रोणवधपर्व समाप्त झालें.

---

## नारायणास्त्रमोक्षपर्व ८.



### अध्याय १९३ वा.

[ १ कौरवसैन्यपलायन. २ दुर्योधनाच्या सांगण्यावरून कृपाचार्याकडून अश्वत्थाम्याला द्रोणवधवृत्तकथन व त्यामुळें त्यास आलेला क्रोध. ]

( १ ) संजय—राजा, द्रोणाचा वध झाला, त्यावेळीं कौरवांचे प्रमुख वीर पडले होते व कित्येक शस्त्रप्रहारांनीं व्याकुळ झाले होते ! अशारीतीनें विध्वस्त होऊन ते शोकमग्न झाले ! शत्रुसैन्याची उत्तम तयारी पाहून ते थरथरां कांपूं लागले, त्यांच्या डोळ्यांतून दुःखाश्रू वाहूं लागले, ते भयभीत व दीन होऊन गेले, विमनस्क होऊन ते उत्साहशून्य झाले आणि भीतीनें त्यांचें तेजहि नष्ट झालें ! मोठ्यानें आक्रोश करीत ते तुझ्या पुत्रासभोंवतीं जमले. तेव्हां ते धुळीनें भरले होते, चळचळां कांपत होते व भीतिग्रस्त होऊन दाही दिशांकडे पाहात होते ! पूर्वीं हिरण्याक्षाचा वध झाला, त्यासमयीं दैत्यांची जी स्थिति झाली, तशीच त्यांची अवस्था होऊन कंठ दाटून आले. त्यांनीं परिवेष्टिलें असतां तुझ्या पुत्रास त्यांमध्यें उभें राहण्याचें धैर्य होईना ! हे भारता, क्षुधा व तृषा यांनीं आर्त होऊन, सूर्याच्या तेजानें संतप्त झाल्याप्रमाणें, ते अत्यंत विषण्ण झाले होते ! सूर्याचें पतन, समुद्राचें शोषण, मेरूचा विपर्यास किंवा इंद्राचा पराजय व्हावा, त्याप्रमाणें भारद्वाजाचा असह्य वध पाहून ते कौरव अत्यंत त्रस्त होऊन भीतीमुळें पळून गेले ! द्रोणाच्या वधानें शकुनि भयभीत होऊन अन्य रथ्यांसह वेगानें पळूं लागला ! ध्वज-पताकांसह वेगानें पळत सुटलेल्या सैन्यास घेऊन कर्ण मागें फिरला ! रथ-हय-गजयुक्त सेनेला पुढें करून चोहोंकडे पहात शल्य पळूं लागला ! मोठमोठे वीर पतन पावले असतां ध्वज-पताका घेऊन कृपाचार्य हाय-हाय करीत निघून गेला ! अवशिष्ट भोजसैन्य आणि कलिंग, आरट्ट व बाह्लीक वीर यांनीं वेष्टित कृतवर्मा वेगवान् हयांसह मागें फिरला. भयार्दित उलूक पदातिसमूह घेऊन पळत सुटला ! तरुण व शौर्यसंपन्न दुःशासन उद्विग्न होऊन गजांसह पळून गेला ! एक लक्ष रथ व तीन सहस्र गज घेऊन वृषसेन त्वरेनें निघून गेला ! हे महाराजा, महारथी दुर्योधनानें चतुरंग सैन्यासह पलायन केलें ! सुशर्म्यानें हतशेष संशप्तकगणांना घेऊन पळ काढला ! इतर लोक रथांत व गजांवर आरूढ होऊन पळत

सुटले ! आपला पिता, पुत्र, बंधु, मातुल, स्वस्त्रीय, मित्र व संबंधी यांसह ते सर्व कौरव दाही दिशा पळूं लागले ! पळतांना त्यांचे केश इतस्ततः पर्यस्त झाले होते, त्यांचा उत्साह व तेज नष्ट झालें होतें ! आपल्या सर्व सैन्याचा विध्वंस झाला, असें त्यांस वाटूं लागलें ! हे भरतर्षभा, ते सैनिक परस्परांना 'उभा रहा, उभा रहा' असें म्हणत, परंतु आपण मात्र उभे रहात नसत ! कित्येक वीरांनीं आपला सारथि हत झाल्याचें पाहून रथाश्व सोडले आणि त्यांवरच आरूढ होऊन पळ काढला !

याप्रमाणें तें सैन्य त्रस्त व निरुत्साह होऊन पळत सुटलें आणि प्रवाह उलट दिशेनें जात असतांहि ग्राह जसा त्यांत शिरतो, त्याप्रमाणें शत्रुसैन्यांत अश्वत्थाम्यानें प्रवेश केला. शिखंडिप्रमुख वीर, प्रभद्रक, पांचाल आणि केकय यांशीं त्याचें तुमुल युद्ध होऊन त्यानें पांडवांच्या पुष्कळ सेनांचा संहार केला ! तो पराक्रमी वीर मोठ्या प्रयत्नानें शत्रूंच्या हातून मुक्त झाला व आपलें सैन्य पळून जात आहे, असें पाहून तो दुर्योधनाकडे गेला आणि त्याला म्हणाला "भारता, त्रस्त होऊन ही सेना कां बरें पळत सुटली आहे ? राजेंद्रा, ही पळत असतां तुझ्या हातूनहि हिचा निग्रह होत नाहीं ! हे नराधिपा, तुझी मुद्रा पूर्वींप्रमाणें प्रसन्न दिसत नाहीं ! राजा, कर्णप्रभृति वीरहि एके ठिकाणीं स्थिर राहत नाहींत ! इतर युद्धांत तुझ्या सेनेनें असें पलायन कधींहि केलें नाहीं ! तर हे भारता, तुझें सैन्य सुखरूप आहे ना ? हे कौरवा, कोण महारथी वीर हत झाल्यामुळें तुझ्या सैन्याची अशी अवस्था झाली आहे तें मला सांग !"

अश्वत्थाम्याचें भाषण राजा दुर्योधनानें ऐकिलें, परंतु तें घोर आणि अप्रिय वृत्त त्याच्यानें सांगवेना ! अश्वत्थाम्याला रथांत पाहतांच त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले ! नौकाभंग झाल्याप्रमाणें तो शोकसागरांत मग्न होऊन गेला ! त्यावेळीं कृपाचार्यांस दुर्योधन विनयपूर्वक म्हणाला, 'तुझें कल्याण असो ! हें सैन्य कां पळत आहे, तें सर्व वृत्त तूंच याला सांग !'

( २ ) राजा, कृपानें द्रोण समरांत कसा पडला, तें सर्व वृत्त अश्वत्थाम्याला सांगितलें. नंतर तो म्हणाला, "हे नरर्षभा, याप्रमाणें तुझ्या पित्याचा त्या

---

१ द्रोणवधवर्णन अध्याय १९०, १९१, १९२ मध्यें आलेलें असल्यामुळें त्याची पुनरावृत्ति येथें केली नाहीं.

दुष्टानें वध केला आणि त्यामुळें सर्व सैनिक भयभीत होऊन पळत आहेत ! हे अनघा, तुझ्या पित्याचा वध झाल्यामुळें आम्ही निरुत्साह होऊन मागें फिरलों !"

संजय—राजा, पित्याचें तें निधनवृत्त ऐकून अश्वत्थाम्याला भयंकर क्रोध चढला. इंधनांनीं प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें तो संतप्त झाला आणि हस्त चोळून तो दांत-ओंठ खाऊं लागला व सर्पांसारखे निश्वास टाकीत त्यानें नेत्र आरक्त केले !" ७. ८. १९३.

---

## अध्याय १९४ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अधर्मानें आपल्या वृद्ध व ब्राह्मण पित्याचा धृष्टद्युम्नानें वध केला, हें ऐकून अश्वत्थामा काय बरें बोलला? ज्याच्या ठिकाणीं मानव, वारुण, आग्नेय, ब्राह्म, ऐंद्र आणि नारायण हीं अस्त्रें नित्य प्रतिष्ठित असत, त्या धर्मिष्ठ द्रोणाचा धृष्टद्युम्नानें अधर्मानें समरांत वध केला, हें ऐकून अश्वत्थामा काय बोलला? महात्म्या परशुरामापासून तो द्रोण धनुर्वेद शिकला आणि त्यानें आपला पुत्र गुणी व्हावा, या इच्छेनें त्याला दिव्यास्त्रें शिकविलीं. आपल्याहून पुत्र गुणवत्तर व्हावा, अशी साहजिक इच्छा लोक करीत असतात. थोर गुरूंचीं जीं रहस्यें असतात, तीं ते आपल्या पुत्राला किंवा सद्गुणी शिष्याला देत असतात. संजया, ह्या शारद्वतीसुतानें तें सर्वज्ञान सविशेष संपादन केलें असून तो मोठा शूर व समरांत दुसरा द्रोणच झाला आहे. शस्त्रविद्येंत तो परशुरामासारखा असून युद्धकलेंत तो इंद्रासारखा आहे. त्याचें वीर्य कार्तवीर्यासारखें असून बुद्धि बृहस्पतिसमान आहे. त्या तरुणाचें स्थैर्य पर्वतासमान असून तेज अग्नीप्रमाणें आहे. गांभीर्य सागराप्रमाणें असून क्रोध सर्पासारखा आहे. पृथ्वीतलावर तो अद्वितीय रथी असून मोठा धनुर्धर व वज्रदेही आहे. तो वायुसमान शीघ्रगति असून रणांत क्रुद्ध अंतकाप्रमाणें आहे. तो रणांत शरसंधान करूं लागला असतां भूमि त्रस्त होते. तो सत्यपराक्रमी असून संग्रामांत कधींहि व्यथित होत नाहीं. त्यानें ब्रह्मचर्याश्रमाचें उत्तम पालन केलें असून तो वेदविद्या आणि धनुर्विद्या यांत पारंगत आहे. दाशरथि रामाप्रमाणें तो निर्विकार आहे. यज्ञसेनपुत्र धृष्टद्युम्न हा द्रोणाचा जसा

मृत्यु होता, तसाच अश्वत्थामा धृष्टद्युम्नाचा मृत्यु ब्रह्मदेवानें निर्माण केला आहे! तेव्हां त्या पापी, क्रूर आणि अदूरदर्शी दुष्टानें आचार्यांचा वध केल्याचें ऐकून अश्वत्थामा काय म्हणाला? ७. ८. १९४.

---

## अध्याय १९५ वा.

[ १ क्रोधसंतप्त अश्वत्थाम्याकडून युधिष्ठिरादिकांची निंदा. २ नारायणास्त्र-प्राप्तिकथन. ३ पांडवादिकांच्या वधाविषयीं प्रतिज्ञा. ]

( १ ) **संजय**—हे नरर्षभा, त्या पाप्यानें आपल्या पित्याला अधर्मानें मारिलें, हें ऐकून अश्वत्थाम्याचा कंठ भरून आला व तो क्रोधसंतप्त झाला. राजेंद्रा, प्रलयकालीं प्राणिमात्राचा अंत करूं पाहणाऱ्या अंतकाप्रमाणें अश्वत्थाम्याचें शरीर प्रदीप्त दिसूं लागलें. आपले अश्रुपूर्ण नेत्र वरचेवर पुसून तो दुर्योधनाला म्हणाला, "माझ्या पित्यानें शस्त्रन्यास केला असतां त्या क्षुद्रांनीं त्याचा केलेला वध आणि धर्मध्वज मिरविणाऱ्या युधिष्ठिराचें सर्व पापकर्म मला विदित आहे! धर्मपुत्र युधिष्ठिराचें तें नीच व अत्यंत दुष्टकर्म मीं ऐकिलें आहे! हे राजा, जे युद्धाला प्रवृत्त झाले, त्यांचा जय किंवा पराजय हा व्हावयाचाच. संग्रामांत वध होणें हें स्तुत्य आहे. समरांत युद्ध करीत असतां जो न्यायप्रवृत्त वध होतो, तो दुःखाला कारण होत नाहीं, असें विद्वानांचें मत आहे. माझा पिता वीरलोकाला गेला, यांत संशय नाहीं. तेव्हां हे पुरुषश्रेष्ठा, तो निधन पावल्याचा शोक करणें योग्य नाहीं. परंतु माझ्या धर्मप्रवृत्त पित्याचें केशग्रहण हें माझे मर्मांचा छेद करीत आहे! मी जीवंत असतां पित्याचा केशग्रह शत्रूकडून झाला, तर पिते पुत्रापासून सुखाची तरी इच्छा कशी करणार! जे कामानें, क्रोधानें, अज्ञानानें, हर्षानें किंवा अविचारानें अधर्म करीत असतात, त्यांना फलहि तसेंच मिळत असतें. त्या दुष्ट व दुरात्म्या धृष्टद्युम्नानें माझी अवज्ञा करून जें अधर्माचरण केलें, त्याचे दारुण परिणाम त्याला पहावयाला मिळतील! तसेंच असत्य बोलून युधिष्ठिरानें जें अकार्य केलें आहे, त्याचेंहि फल त्याला भोगावें लागेल! ज्यानें कपटानें आचार्याला शस्त्रन्यास करावयास लावलें, त्या धर्मराजाचें रक्त आज भूमि प्राशन करील! मी सत्याची व इष्टापूर्ताची शपथ घेऊन सांगतों कीं, सर्व पांचालांचा संहार केल्याशिवाय मी कधींहि राहणार नाहीं! त्यांच्या वधासाठीं वाटेल तो प्रयत्न मी करीन.

समरांत मी पापी धृष्टद्युम्नाचा कोणत्या तरी मृदु किंवा दारुण उपायानें वध करीन ! त्या पांचालांचा वध केल्यानेंच मला शांति मिळेल ! हे पुरुषश्रेष्ठा, ह्या लोकीं किंवा परलोकीं आपलें मोठ्या संकटापासून रक्षण करावें, इतक्याच साठीं पुत्राची इच्छा लोक करितात. मी पर्वतासारखा वाढून जीवंत असतां माझ्या पित्याची तशी अवस्था व्हावी, त्याअर्थीं धिक्कार असो माझ्या दिव्या-स्त्रांना, बाहूंना आणि पराक्रमाला ! मी जीवंत असतां पित्याला केशग्रहणाचें दुःख प्राप्त व्हावें ना !

( २ ) हे भारतसत्तमा, जेणेंकरून परलोकीं गेलेल्या पित्याच्या ऋणांतून मी मुक्त होईन, असा कांहीं पराक्रम करून दाखवीन. आर्यानें आपली स्तुति कधींहि करूं नये. परंतु पित्याचा वध सहन होत नसल्यामुळेंच माझा पराक्रम मी आज सांगत आहें. आज मी सर्व सैन्याचा संहार करीत असतां कृष्णासह पांडव माझा पराक्रम पाहोत ! आज रणांत माझा पराभव करण्यास देव, गंधर्व, असुर आणि राक्षसहि समर्थ नाहींत, तेथें मनुष्यांची कथा ती काय ? मी किंवा अर्जुन यांविरहित दुसरा अस्त्रज्ञ वीर या जगांत कोठेंहि नाहीं. मी आज त्यांच्या सैन्यांत जाऊन दिव्यास्त्रांचा प्रयोग करीन ! आज महायुद्धांत माझ्या धनुष्यापासून सुटलेले बाण आपल्या सामर्थ्यानें पांडवांना जर्जर करून सोडतील ! महावात जसा वृक्षांना उडवून टाकतो, त्याप्रमाणें सर्वत्र शरजालें पसरून शत्रूंचा मी आज संहार करीन ! मला जें अस्त्रांचें सप्रयोग व सोपसंहार ज्ञान आहे, तें अर्जुनाला, कृष्णाला, भीमाला, नकुल-सहदेवांना व धर्मराजाला नाहीं. दुरात्म्या धृष्टद्युम्नाला, शिखंडीला किंवा सात्यकीलाहि त्यांचें ज्ञान नाहीं. पूर्वी माझ्या पित्यानें नारायणाला विधिपूर्वक प्रणाम केला आणि वैदिक मंत्रांनीं त्याची स्तुति केली. तेव्हां प्रसन्न होऊन भगवंतानें त्याला वर दिला. माझ्या पित्यानें 'नारायण'नामक महाअस्त्र मागितलें. त्या वेळीं भगवान् देवाधिदेव त्याला म्हणाला, "तुझ्यासमान युद्धांत दुसरा कोणी वीर होणार नाहीं. परंतु ब्रह्मन्, या अस्त्राचा प्रयोग तूं सहसा करूं नये ! हें अस्त्र शत्रूचा वध केल्याशिवाय कधीं मागें फिरणार नाहीं ! हे प्रभो, याचा नाश कशानें होईल, हें समजणेंहि शक्य नाहीं ! अवध्याचाहि वध हें करूं शकेल; म्हणून याचा प्रयोग सहसा करूं नये ! रथहीन, शस्त्रहीन किंवा प्राणदानाची याचना करणारे यांचा तूं वध करूं नये ! हे हें अस्त्र न योजण्याचे प्रकार होत. दुसऱ्या शस्त्रांनीं जरी यास प्रतिबंध

केला, तरी अवध्याचाहि नाश हें अस्त्र करील!" माझ्या पित्यानें त्या अस्त्राचा स्वीकार केला, तेव्हां तो प्रभु म्हणाला, 'या अस्त्राच्या योगानें तूं रणांत अनेक शरवृष्टींचा नाश करशील आणि महातेजस्वी होऊन शोभशील!'

( ३ ) हे राजा, असें सांगून तो प्रभु स्वर्गलोकीं निघून गेला. मजवर पित्याची कृपा असल्यामुळें हें अस्त्र नारायणापासून मला प्राप्त झालें. त्याच्या योगानें शचीपति जसा असुरांस पळवून लावितो, त्याप्रमाणें मी पांडव, पांचाल, मत्स्य आणि केकय यांना पळवीन! हे भारता, शत्रूंनीं रणांत कितीहि पराक्रम केला, तरी माझे बाण त्यांवर पडतील! रणांत स्थिर होऊन मी यथेष्ट पाषाणवृष्टि करीन, अयोमुख बाणांनीं मी महारथ्यांना पळवीन, तीक्ष्ण परशु त्यांजवर टाकीन आणि नारायणास्त्राच्या योगानें पांडवांना तृणतुल्य समजून शत्रूंचा विध्वंस करीन! मित्र, ब्राह्मण आणि गुरु यांचा द्रोह करणारा तो अतिनीच पांचालाधम माझ्या हातून कधीं जीवंत सुटणार नाहीं!

द्रोणपुत्र अश्वत्थाम्याचें तें भाषण ऐकून सैन्य मागें फिरलें. सर्व नरवीरांनीं मोठ्यानें शंखनाद केला आणि हर्षभरानें सहस्रशः भेरी आणि डिंडिम यांचे ध्वनि होऊं लागले. खुर-नेमींच्या शब्दांनीं भूमि दणदणूं लागली. तो तुमुल ध्वनि पृथ्वी, आकाश आणि स्वर्ग यांमध्यें दुमदुमून राहिला. पर्जन्यनिनदासारखा मोठा ध्वनि ऐकून पांडवांकडील मोठमोठे रथी एकत्र होऊन विचार करूं लागले. हे भारता, इकडे अश्वत्थाम्यानें तसें बोलून आणि उदकस्पर्श करून तें दिव्य नारायणास्त्र प्रकट केलें! ७. ८. १९५.

---

## अध्याय १९६ वा.

[ १ नारायणास्त्रोदयकालीं झालेलीं दुश्चिन्हें. २ युधिष्ठिराचा अर्जुनास प्रश्न. ३ अर्जुनाचें उत्तर. ]

( १ ) **संजय**—तें नारायणास्त्र प्रादुर्भूत झालें असतां आकाश निरभ्र असूनहि मेघगर्जना होऊं लागली आणि सोसाट्याचा वारा सुटून पर्जन्यबिंदु पडूं लागले. पृथ्वी कांपूं लागली, महोदधि क्षुब्ध झाला, नद्यांचे ओघ उलट वळले आणि पर्वतशिखरें विदीर्ण होऊन गेलीं! हे भारता, सूर्य मलिन झाला आणि मांसाहारी प्राणी मोठ्या आनंदानें संचार करूं लागले! हे राजेंद्रा, देव-दानव-गंधर्वहि त्रस्त झाले आणि सर्व व्याकुळ होऊन 'आतां पुढें काय

करावें' ही एकच चिंता त्यांस उत्पन्न झाली. राजा, अश्वत्थाम्याचें घोर व भयंकर अस्त्र पाहून सर्व राजे भयभीत व व्यथित झाले!

धृतराष्ट्र—संजया, पित्याचा वध सहन न होऊन अश्वत्थाम्यानें सैन्यें मागें फिरविलीं, तेव्हां कौरव आपल्यावर चालून येत आहेत, असें पाहून धृष्टद्युम्नाच्या रक्षणार्थ पांडवांनीं काय उपाय योजला, तें मला सांग!

(२) संजय—धार्तराष्ट्रांनीं पलायन केल्याचें युधिष्ठिरानें पूर्वींच पाहिलें होतें आणि आतां पुनः तुमुल शब्द ऐकूं येऊं लागतांच तो अर्जुनाला म्हणाला "धनंजया, धृष्टद्युम्नानें आचार्यांचा वध केला असतां युद्ध करून जय मिळविण्याविषयीं कौरवांची निराशा झाली आणि दीन होऊन आपल्या प्राणरक्षणार्थ त्यांनीं रणांतून पळ काढला. ज्यांचे पार्ष्णिसारथि मारले गेले, ध्वज, पताका आणि छत्रें भग्न झालीं, घोडे विद्ध झाले, रथकूबर आणि नीड छिन्न झालीं, अशा कित्येक राजांनीं पळ काढला. भयभीत होऊन कित्येक दुसऱ्या रथांवर आरूढ झाले आणि पादांनीं अश्वांस ताडण करीत पळत सुटले! कोणी छिन्नभिन्न रथांतून पळूं लागले! कोणी हयसादी अर्धासनें च्युत झालीं असतांहि त्यांना चिकटून तसेच पळून जात होते! कित्येकांना शरपीडित होऊन धावणाऱ्या गजांनीं दशदिशा पळविलें! कवचहीन व शस्त्रहीन होऊन कित्येक वीर आपल्या वाहनांवरून खालीं पडले आणि रथचक्रांनीं भिन्न होऊन हयगजांच्या पदांनीं चूर्ण झाले! दुसरे कोणी 'हे ताता, हे पुत्रा,' असें मोठ्यानें ओरडून भीतीनें दूर पळाले! भयानें ते इतके संभ्रांत झाले होते कीं, ते अन्योन्यांना ओळखूंहि शकेनात! कित्येक विशेष विद्ध झालेले आपले पुत्र, पिते, मित्र व बंधु यांसह आपल्या वाहनांवर बसून जात होते! असो. द्रोण रणांत पडला आणि सैन्याची अशी दुरवस्था होऊन तें पळून जात असतां त्यास माघारें कोणीं फिरविलें, हें तुला विदित असल्यास मला सांग! रथनेमींच्या निनादांत अश्वांचें खिंकाळणें आणि गजांचा चीत्कार शब्द मिसळून त्यांचा प्रचंड शब्द ऐकूं येत आहे. ते अत्यंत तीव्र शब्द कौरवांच्या सैन्यसागरांत होत आहेत. त्यांचे योगानें माझे लोक भीतीनें थरथर कांपत आहेत. अर्जुना, अंगावर रोमांच उठविणारा तुमुल शब्द इंद्रासह त्रैलोक्यालाहि ग्रस्त करील, असें मला वाटतें. हा भीषण ध्वनि इंद्राचा असावा, अशी माझी कल्पना आहे. कारण, द्रोणाचा वध झाल्यावर कौरवांच्या रक्षणाकरितां हा

इंद्रच धांवून येत असला पाहिजे! धनंजया, शत्रूकडील ही गर्जना ऐकून आपले मोठमोठे रथिश्रेष्ठ रोमांचित व उद्विग्न झाले आहेत! तेव्हां इंद्रासारखा कोण महारथी युद्धासाठीं कौरवांना स्थिर करून मागें फिरवीत आहे?"

(३) अर्जुन—ज्याच्या पराक्रमाच्या आश्रयानें कौरव उग्रकर्म करण्यास सज्ज झाले असून शंख वाजवीत आहेत आणि न्यस्तशस्त्र आचार्यांच्या वधानंतर कौरवांस स्थिर करून कोण गर्जना करीत आहे, म्हणून तूं विचारीत आहेस, तर तो वीर दुसरा कोणी नसून विनयशील, महाबाहु, उग्रकर्मा, कौरवहितकर्ता अश्वत्थामा आहे! त्याच्या जन्मकालीं द्रोणानें मोठमोठ्या विद्वान् ब्राह्मणांस शंभर गाई दिल्या, तसेंच ह्यानें जन्मतांच उच्चैःश्रव्याप्रमाणें किंकाळी फोडून भूमि व तिन्ही लोक कंपित करून सोडले! ती ऐकतांच आकाशवाणी होऊन त्याचें नांव 'अश्वत्थामा' (ज्याचें स्थाम-बल, अश्वाप्रमाणें आहे) ठेवण्यांत आलें. अनाथाप्रमाणें ज्याचा नृशंस धृष्टद्युम्नानें वध केला, त्या द्रोणाचा नाथ हा रणांत अश्वत्थामा उभा आहे! माझ्या गुरूचा केशग्रह धृष्टद्युम्नानें केला, ह्याची द्रौणि कधींहि क्षमा करणार नाहीं! तूं राज्यलोभामुळें आचार्यांकडे अनृत भाषण केलेंस! तूं धर्मज्ञ असूनहि मोठा अधर्म केला आहेस! वालीच्या वधामुळें रामाची अपकीर्ति सर्वत्र पसरली आहे, तशी तुझीहि अकीर्ति चराचर त्रैलोक्यामध्यें चिरकाल राहील! हा सर्वधर्मज्ञ असून आपला शिष्य आहे, हा कधींहि अनृत बोलणार नाहीं, असा तुझ्यावर आचार्यांचा विश्वास होता. आचार्यांनें तुला प्रश्न केला असतां तूं जरी 'कुंजर मारला गेला' असें सांगितलेंस, तरी तूं वास्तविक सत्याचें कवच परिधान करून असत्यच भाषण केलेंस! तुझ्या भाषणावरून त्यानें शस्त्रन्यास केला, तो निरिच्छ झाला, त्याची चेतना नष्ट झाली, आणि तो अत्यंत विह्वल होऊन पडला, हें तूं पाहिलेंच आहेस! राजा, तो पुत्रवत्सल द्रोण शोकाकुल होऊन विमुख झाला तेव्हां तूं शाश्वत धर्माचा त्याग करून त्या गुरूचा घात करविलास! तुझ्या अंगांत सामर्थ्य असल्यास संतप्त झालेल्या आचार्यपुत्राच्या हातून धृष्टद्युम्नाचें रक्षण करून दाखीव! आम्हां सर्वांच्याहि हातून आज त्याचें रक्षण होणें शक्य नाहीं. सर्व भूतांचे ठिकाणीं दया दाखविणारा अश्वत्थामा पित्याचें केशग्रहण ऐकून आज आम्हांला रणांत दग्ध करून टाकील! आचार्यांच्या प्राणरक्षणासाठीं मी आक्रोश करीत असतांहि धर्माचा त्याग करून शिष्यानें गुरूचा वध केला! आमचें बहुतेक आयुष्य क्षीण झालें असून त्याचा अल्पांश

सांप्रत राहिला आहे, तेव्हां हा मोठा अधर्म म्हणजे त्या वृद्धावस्थेचाच परिणाम होय. ज्याचें आपल्यावर पितृतुल्य सौहार्द असे आणि धर्मतःहि जो आम्हांला पित्यासमान होता, त्या गुरूचा क्षणिक राज्यलोभासाठीं तूं घात करविला आहेस !

हे विशांपते, धृतराष्ट्रानें भीष्माला आणि द्रोणाला सर्व पृथ्वी आपल्या पुत्रांसह अर्पण केली होती. राजा, शत्रूकडून त्याचा इतका आदर होत असतांहि तो स्वतःच्या पुत्रापेक्षांहि माझ्यावर अधिक लोभ दाखवीत असे. शस्त्रन्यास केल्यावर माझ्याकडे व तुझ्याकडे पाहत असतांनाच आचार्य मारला गेला ! समरांत युद्ध करीत असतां प्रत्यक्ष इंद्राच्यानेंहि त्याला मारवलें नसतें ! नित्य आमच्यावर उपकार करणाऱ्या त्या आचार्यांचा केवळ राज्यलोभानें आम्हीं अनार्यांनीं द्रोह केला ! राज्यसुखलोभानें साधु द्रोणाचा घात करविला, हें आम्हीं मोठें दारुण महत् पापकर्म केलें आहे. अर्जुन माझ्यासाठीं पुत्र, बंधु, पिता, स्त्री व आपले प्राणहि अर्पण करील, असा ज्याचा विश्वास होता, त्या आचार्यांचा आज घात होत असतां राज्यलोभानें मीं उपेक्षा केली ! हे राजा, त्यामुळेंच खालीं मस्तक होऊन मी नरकांत पडलों आहें ! ब्राह्मण, महामुनि, तशांत वृद्ध आणि आमचा गुरु अशाचा राज्याकरितां घात केला, त्याअर्थीं आम्हांला जीवितापेक्षां मृत्युच श्रेयस्कर होय ! ७. ८. १९६.

---

## अध्याय १९७ वा.

[ १ अर्जुनाच्या भाषणाचा निषेध करून अश्वत्थाम्याला जिंकण्याविषयीं भीमसेनाची प्रतिज्ञा. २ धृष्टद्युम्नकृत द्रोणवधसमर्थन. ]

( १ ) संजय—अर्जुनाचें भाषण ऐकून त्यावर कोणीहि महारथी प्रिय किंवा अप्रिय असें कांहींच बोलला नाहीं. परंतु हे भरतर्षभा, भीमसेन मात्र क्रोधाविष्ट होऊन त्याला निर्भर्त्सनापूर्वक म्हणाला, "पार्था, एखादा अरण्यवासी मुनि किंवा धर्मिष्ठ व क्षमी ब्राह्मण यांप्रमाणें तूं धर्मवचनें सांगत आहेस ! जो अपकारापासून रक्षण करितो, संकटांतून निभावून नेतो आणि स्त्री किंवा सत्पुरुष यांजवर दया दाखवितो, त्याला राज्यप्राप्ति होऊन धर्म, यश आणि संपत्ति यांचाहि लाभ होतो. तूं सर्व क्षत्रियगुणांनीं युक्त असून स्वकुलांतील श्रेष्ठ पुरुष आहेस ! यास्तव आजचें तुझें असमंजस भाषण तुला शोभत नाहीं.

कौंतेया, तुझा पराक्रम शचीपति इंद्रासमान आहे. महोदधि जसें मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं, तसें तूंहि कधीं धर्माचें अतिक्रमण केलें नाहींस ! तेरा वर्षें क्रोधाला बाजूला सारून तूं धर्मप्रवृत्त होऊन राहिलास, तेव्हां तुझी कोण बरें स्तुति करणार नाहीं ? सुदैवानें आजहि तुझें चित्त स्वधर्माला अनुसरलें आहे ! तुझी बुद्धि सतत अशीच दयाशील राहो ! तूं धर्मशील असतां शत्रूंनीं तुझें राज्य अधर्मानें घेतलें आणि द्रौपदीला सभेंत आणून तिची विटंबना केली ! तेरा वर्षें अन्यायानें वल्कलें परिधान करवून शत्रूंनीं आम्हांला वनवासाला पाठविलें ! हे अनघा, क्षत्रधर्माच्या ठिकाणीं रत होऊन ह्या संतापजनक गोष्टी मीं सहन केल्या आणि त्याप्रमाणें वर्तनहि केलें. त्या नीच व अधार्मिक गोष्टींचें स्मरण होऊन तूं व मी मिळून या क्षुद्र राज्यहारकांचें समूळ उत्पाटन करून टाकूं असें वाटत होतें ! युद्धाला आपण निघालों असतां सामर्थ्याची पराकाष्ठा करूं, असें तूंहि मागें बोलला होतास ! परंतु त्या वचनाला सांप्रत तूं पराङ्मुख झाला आहेस ! धर्म जाणण्याची तुझी इच्छा आहे, परंतु तुझें भाषण मात्र सत्य नाहीं ! आम्ही भयविह्वल झालों असतां आमच्या मर्मांवर तूं वाक्प्रहार करीत आहेस ! हे शत्रुकर्शना, तूं जणुंकाय क्षतांच्या व्रणांवर क्षार ओतीत आहेस ! तुझ्या वाक्शल्यांनीं पीडित झालेलें माझें हृदय विदीर्ण होत आहे ! स्वतः तूं आणि आम्ही प्रशंसेला पात्र असतांहि तूं प्रशंसा करीत नाहींस ! हे धनंजया, वासुदेवाला सोडून तुझ्या षोडषांश कलेचीहि ज्याची योग्यता नाहीं, त्या द्रोणपुत्राची मात्र तूं स्तुति करीत आहेस ! आपले स्वतःचे दोष सांगतांना तुला लज्जा कशी बरें वाटत नाहीं ? मी क्रुद्ध झालों तरी ही सर्व पृथ्वी विदीर्ण करून टाकीन, पर्वतांचाहि भंग करीन आणि ह्या सुवर्णभूषित गदेच्या प्रहारानें पर्वतप्राय मोठमोठे वृक्षहि वायूप्रमाणें मोडून टाकीन ! पार्था, इंद्रासह सर्व देव आणि राक्षस, असुर, उरग व मानव एकत्र होऊन आले, तरीहि त्यांना पळवून लावीन ! हे पार्था, असा तुझा बंधु मी आहें, हें जाणूनहि द्रोणपुत्राचें भय धरणें तुला योग्य नाहीं ! अथवा हे बीभत्सो, तूं दुसऱ्या बंधूंसह स्वस्थ बसून राहा, मीच एकटा गदेनें याला महायुद्धांत जिंकीन." त्यानंतर क्रोधसंपन्न पांचालराजपुत्र धृष्टद्युम्न पार्थाला म्हणाला—

( २ ) धृष्टद्युम्न—बीभत्सो, याजन, अध्यापन, दान, यज्ञ, प्रतिग्रह आणि अध्ययन हीं सहा ब्राह्मणांचीं कर्में विद्वानांनीं मानलीं आहेत. यांपैकीं

कोणतें कर्म द्रोण आचरीत होता ? याकरितांच मीं त्याचा वध केला आहे ! पार्था, त्याचा दोष तूं मला कां देतोस ? हा स्वधर्मापासून च्युत होऊन क्षात्र-धर्मानें वागत असे आणि दिव्यास्त्रानें आमचा वध करूं पाहत होता. अर्जुना, त्या मायावी व दांभिक ब्राह्मणाचा मीं कपटानें वध केला, यांत अयोग्य तें काय केलें ? अशा त्या द्रोणाला मीं मारिलें असतां अश्वत्थामा जर क्रोधानें गर्जना करीत असेल, तर त्यांत माझें काय जातें ? कौरवांचें रक्षण करण्या-विषयीं असमर्थ अश्वत्थामा त्यांचा युद्धाच्या निमित्तानें वध करील, तर त्यांत मला आश्चर्य वाटणार नाहीं ! तूं धार्मिक असून मला गुरुघातक म्हणतोस, तरी मी पांचालराजपुत्र त्याच्या वधासाठींच अनलापासून उत्पन्न झालों आहें !

हे धनंजया, युद्ध करीत असतां ज्याला कार्य काय किंवा अकार्य काय, सारखींच वाटत असत, त्याला ब्राह्मण किंवा क्षत्रिय तरी तूं कसें म्हणणार ? जो क्रोधाविष्ट होऊन अनस्त्रज्ञ लोकांस ब्रह्मास्त्रानें मारूं पहातो, त्याचा वध कोणत्याहि उपायानें कसा करूं नये ? हे पुरुषसत्तमा, विशेषतः जो माझा पितृघातकी असून ज्या दुष्टानें माझ्या बांधवांचाहि रणांत वध केला, त्याचा वध मीं कां बरें करूं नये ? त्या दुष्टाला गांठून मीं रथांतच मारिलें, ह्याकरितां मज अनिंद्याचें अभिनंदन तूं कां करीत नाहींस ? कालानलासमान व अग्नि, रवि किंवा विष यांसदृश भयंकर द्रोणाचें मस्तक मीं छिन्न केलें, यास्तव माझी प्रशंसा तूं कां करीत नाहींस ? दुसऱ्या कोणाचे बंधु न मारतां त्यानें माझेच बंधु मारले, म्हणून त्याचें मस्तक छेदूनहि माझा क्रोध नाहींसा झाला नाहीं ! जयद्रथाचें शिर तूं फेंकलेस तसें त्याचें मस्तक निषादांच्या प्रदेशांत मीं फेंकून दिलें नाहीं, ही गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली आहे ! अर्जुना, शत्रूचा वध न करणें, हा अधर्म मानिला आहे आणि मारावें किंवा मरावें, हा क्षत्रियांचा धर्म होय ! तुझ्या पित्याचा मित्र भगदत्त याचा जसा वध तूं केलास, तसाच तो द्रोणशत्रु मीं युद्धांत धर्मानें मारिला आहे ! पितामहाचा रणांत वध करणें, हें तूं धर्मकृत्य समजतोस आणि पापी शत्रूचा मीं वध केला, तें मात्र तुला तसें वाटत नाहीं, हें कां बरें ? पार्था, ज्ञातिभावामुळें मी तुझ्याशीं नम्रतेनें वागतों, म्हणून तूं असें बोलणें योग्य नव्हे ! द्रौपदी आणि द्रौपदेय यांकरितांच तुला मी या मर्यादातिक्रमाची क्षमा करितों ! माझें आणि आचार्यांचें वैर कुलपरंपरागत आहे, हें प्रसिद्ध आहे. सर्व लोकांना तें माहीत असतां तुम्हां पांडुनंदनांनाच तें विदित नाहीं ! अर्जुना, धर्मराजानें

अनृत भाषण केलें नाहीं आणि मीहि अधर्मानें वागलों नाहीं. तो पापी शिष्यद्रोही मारला गेला ! अर्जुना, युद्ध कर, विजय हा तुझा आहेच ! ७. ८. १९७.

---

## अध्याय १९८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ सात्यकि व धृष्टद्युम्न यांनीं केलेली अन्योन्य निर्भर्त्सना. ३ धृष्टद्युम्नावर चालून जाणाऱ्या सात्यकीचें भीमाकडून निवारण. ४ पुनः युद्धोद्यम. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—ज्या महात्म्यानें सर्व वेद सांग व यथान्याय अधीत केले होते, ज्याच्या ठिकाणीं धनुर्वेद व विनय हे मूर्तिमंत वास करून राहत असत आणि ज्याच्या प्रसादानें देवांनाहि दुष्कर अशीं अमानुष कर्में नरश्रेष्ठ संग्रामांत करूं शकत असत, त्या द्रोणाचार्यांची एका पापी, नीच, क्षुद्र व गुरुघातकी दुरात्म्याकडून आपल्या समक्ष निंदा होत असतां कोणाहि क्षत्रिय वीराला कोप येऊं नये ना ! त्यांच्या क्षात्रधर्मास आणि अक्रोधित्वाला धिक्कार असो ! पांडव, सर्व राजे व पृथ्वीतलावरील धनुर्धर तें भाषण ऐकून हे संजया, धृष्टद्युम्नाला काय बोलले तें मला सांग !

( २ ) **संजय**—हे राजेंद्रा, धृष्टद्युम्नाचें तें भाषण ऐकून सर्व राजे स्तब्ध राहिले. अर्जुनानें मात्र धृष्टद्युम्नाकडे वांकड्या नजरेनें पाहिलें आणि डोळ्यांत आसवें आणून व दीर्घ निश्वास टाकून त्याचा धिक्कार केला. युधिष्ठिर, भीष्म, नकुल-सहदेव, कृष्ण आणि इतर लोक लज्जित होऊन राहिले ! त्या वेळीं सात्यकि मात्र बोलला कीं, "अनिष्ट भाषण करणाऱ्या ह्या पापी नराधमाचा शीघ्र वध करील, असा येथें कोणी वीर नाहीं काय ? ब्राह्मण चांडाळाची निंदा करितात, त्याप्रमाणें हे सर्व पांडव ह्या पापकर्मामुळें तुझी निर्भर्त्सना करीत आहेत ! हें महत्पाप केल्यामुळें सर्व सज्जन लोक तुझा उपमर्द करीत असतां त्या सत्पुरुषांच्या मंडळीपुढें तुला बोलायाला लज्जा कशी वाटत नाहीं ? तुझी जिह्वा आणि मस्तक शतधा विदीर्ण कसें होत नाहीं ? क्षुद्रा, गुरूची निंदा करितांना अधर्मानें तुझा निःपात कसा बरें होत नाहीं ? हें अशुचि कृत्य करून तूं लोकसमूहामध्यें प्रौढी मिरवीत आहेस, यास्तव तूं सर्व पांडव, अंधक आणि वृष्णि यांच्या निंदेस पात्र आहेस ! अशा प्रकारचें

अकार्य करून तूं आणखी गुरूची निंदा करीत आहेस, त्याअर्थी तुझा वधच केला पाहिजे! तूं मुहूर्तभरहि जीवंत राहण्यांत अर्थ नाहीं! हे पुरुषाधमा, धर्मात्म्या सच्छील गुरूचे केश धरून तूं वध केलास! असलें काम तुजवांचून दुसरा कोण आर्य करणार आहे! तुजसारखा कुलांगार पुत्र झाल्यामुळें तुझे सात पूर्व व सात अवर पुरुष सत्कीर्तीला मुकून नरकांत पडले आहेत! हे नरर्षभा, भीष्मवधासंबंधीं तूं अर्जुनाला बोललास, त्यास त्या महात्म्यानेंच आपला अंत करून घेतला आणि त्याचा घात करणाराहि तुझा तो महापापी बंधु! पांचालपुत्रांपेक्षां अधिक पापी पुरुष पृथ्वीतलावर कोणी नाहीं! त्या शिखंडीला तुझ्याच पित्यानें भीष्माच्या अंताकरितांच जन्म दिला होता. भीष्मानें शिखंडीचें रक्षण केलें आणि शिखंडीच त्या महात्म्याचा मृत्यु झाला! मित्र आणि गुरू यांचा द्रोह करणारे नीच पांचाल तूं आणि तुझा बंधु यांना जन्म देऊन धर्मच्युत झाले आहेत! अशाप्रकारचें भाषण जर तूं पुनः माझ्यासमोर करशील, तर वज्रसदृश माझ्या या गदेनें तुझें मस्तक तोडून टाकीन! तूं ब्रह्महत्या केली आहेस, आणि त्यामुळें ब्रह्मघातक लोक तुला पाहून सूर्याकडे पाहत असतात. अरे अतिदुष्ट पांचालका, माझ्यापुढें गुरूची आणि गुरूच्याहि गुरूची निंदा करतांना तुला लज्जा कशी वाटत नाहीं? थांब, थांब, माझ्या गदेचा एकच प्रहार सहन कर पाहूं! मीहि तुझे अनेक गदाप्रहार सहन करण्यास तयार आहें!"

याप्रमाणें सात्यकीनें निर्भर्त्सना केली. ती ऐकून धृष्टद्युम्न क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें त्या संतप्त सात्यकीला हंसतहंसत कठोरपणानें उत्तर दिलें.

धृष्टद्युम्न—माधवा, ऐकलें, तुझें बोलणें ऐकिलें! त्याची मी तुला क्षमा करितों! अनार्य व पातकी पुरुष सर्वदा साधु पुरुषाची निर्भर्त्सना करूं इच्छितो. क्षमेची लोकांनीं जरी प्रशंसा केली, तरी पापी मनुष्य क्षमेला पात्र नाहीं. कारण, क्षमावंताला पापी मनुष्य आपण जिंकलें असें समजतो. सात्यके, तुझें आचरण नीच असून तुझे विचारहि पापी आहेत! नखशिखांत तूं पापी असतां दुसऱ्याचे दोष काढूं पाहतोस! तो भग्नहस्त भूरिश्रवा प्रायोपवेशन करून बसला असतां आणि लोकांनींहि तुझें निवारण केलें असतां तूं त्याचा वध केलास, याहून अधिक पापकर्म तें कोणतें? युद्धांत दिव्यास्त्रानें सैन्याची दाणादाण करणाऱ्या द्रोणाचा त्यानें शस्त्रन्यास करतांच मीं वध केला, यांत दुष्कर्म तें कोणतें केलें? प्रायोपवेशन करून बसणाऱ्या छिन्नबाहु मुनीला मारणाऱ्यानें दुस-

त्याला दोष कसा द्यावा ? तुला लत्तेनें भूमीवर पाडून वीर्यवान् भूरिश्रवा ओढीत असतांना त्याचा वध तूं कां केला नाहींस ? पूर्वींच अर्जुनानें जिंकलेल्या त्या प्रतापी सौमदत्तीचा त्वां अनार्यानें वध केला ! जेथें-जेथें पांडवांच्या सैन्याला द्रोण पळवीत असे, तेथें-तेथें हजारों बाण टाकीत मी जात असें ! अशाप्रकारचें चांडाळासारखें कृत्य तूं स्वतः करून दुसऱ्याला कठोर शब्द बोलतोस, तें कां बरें ? वृष्णिकुलाधमा, हें पापकर्म तुझें आहे, माझें नाहीं ! पापकर्मांचें तूं निवासस्थान आहेस ! पुनः असें बोलूं नकोस ! मौन धारण कर पाहूं ! आतां यापुढें मूर्खपणें माझ्याशीं असें भाषण करशील, तर मी तुला बाणांनीं यमसदनीं पाठवीन ! मूर्खा, सदोदित धर्मानेंच वर्तन करणें शक्य नसतें. त्या कौरवांनींहि अशाच प्रकारचें अधर्माचरण केलें आहे, तें सांगतों, ऐक. सात्यके, त्यांनीं पूर्वी युधिष्ठिराची अधर्मानें वंचना केली, द्रौपदीची अधर्मानें छळणा केली, द्रौपदीसह सर्व पांडवांना वनांत पाठविलें आणि त्यांच्या सर्वस्वाचा अधर्मानेंच अपहार केला ! दुर्मते, मद्रराज शल्याला त्यांनीं अधर्मानेंच आपल्याकडे ओढलें ! बाल सौभद्राचाहि त्यांनीं अधर्मानेंच वध केला ! त्याचप्रमाणें आम्हीं परपुरंजय भीष्माचा अधर्मानें वध केला आणि तूं धर्मज्ञ असूनहि भूरिश्रव्याचा अधर्मानेंच वध केलास ! याप्रमाणें हे सात्वता, कौरव काय किंवा पांडव काय, धर्मज्ञ असूनहि त्यांनीं जयाचें रक्षण करण्याकरितांच अधर्माचें आचरण केलें आहे ! श्रेष्ठ धर्म कोणता किंवा अधर्म कोणता हें जाणणें शक्य नाहीं ! तूं कौरवांशीं युद्ध कर ! अशा वर्तनानें पितृलोकीं जाण्याची इच्छा करूं नकोस !

( ३ ) संजय—अशाप्रकारें धृष्टद्युम्नाचें कठोर आणि क्रूर बोलणें सात्यकीनें ऐकून घेतलें. तो किमपिहि भ्याला नाहीं. त्याचें बोलणें ऐकून सात्यकीनें रक्तासारखे डोळे लाल केले आणि आपली गदा हातांत घेतली ! सर्पासारखे दीर्घ निश्वास टाकीत त्यानें आपलें धनुष्य रथांत ठेवलें आणि धृष्टद्युम्नावर धांवत जाऊन क्रोधानें तो म्हणाला, ‘ तुला मी कठोर बोलत नाहीं. तूं वधाला योग्य आहेस, त्याअर्थीं तुझा मी आतांच वध करतों !’

अंतकाप्रमाणें महाबलवान् सात्यकी धृष्टद्युम्नावर धांवून आल्याचें पाहून श्रीकृष्णानें भीमसेनाला खुणाविलें. तेव्हां भीमानें रथांतून उडी टाकून सात्यकीला आंवरिलें. इतक्यांत सहदेवहि तेथें धांवून आला आणि गोड

शब्दांनीं सात्यकीला बोलला, "हे नरश्रेष्ठा, आम्हांला वृष्णि, अंधक किंवा पांचाल यांविरहित दुसरा प्रिय मित्र कोणी नाहीं. वृष्णि व अंधक यांनाहि–विशेषतः श्रीकृष्णाला–आमच्यावांचून दुसरा कोणी प्रिय मित्र नाहीं! समुद्रापर्यंत शोधून पाहिलें, तरी पांचालांनाहि वृष्णि व पांडव यांच्याइतकें मित्रत्व अन्यत्र सांपडणार नाहीं! धृष्टद्युम्न तुला आपला मित्र मानतो आणि तूंहि त्याला तसेंच समजतोस! तुम्ही आमचे मित्र आहां, तसेच आम्हीहि तुमचे मित्र आहों. म्हणून हे सर्वधर्मज्ञा सात्यके, मित्रधर्म ध्यानांत आण व धृष्टद्युम्नावरील क्रोधाचा निग्रह कर आणि शांत हो! तूं धृष्टद्युम्नाला क्षमा कर, तोहि तुला क्षमा करील. आम्हीहि सहनशील आहों! क्षमेसारखें दुसरें श्रेष्ठ जगांत काय आहे?"

हे मारिषा, याप्रमाणें सहदेव सात्यकीचें समाधान करीत असतां, धृष्टद्युम्न हंसतच म्हणाला, "भीमा, युद्धमदानें चढलेल्या या शिनीच्या पौत्रास सोड, सोड पाहूं! पर्वतावर जसा वायु चालून येतो, तसा हा मजवर चालून येवो, म्हणजे मी तीक्ष्ण बाणांनीं त्याचा क्रोध, युद्धश्रद्धा आणि जीवित हीं नष्ट करून टाकतों! ते पहा कौरव आम्हांवर तिकडे धांवून येत आहेत, तर पांडवांचें कोणतें कार्य मीं केलें पाहिजे, तें सांग! अथवा अर्जुन त्या सर्वांचें रणांगणावर निवारण करील, मी बाणांनीं याचें मस्तक छेदून टाकतों! रणांतील भग्नहस्त भूरिश्रवाच हा मला समजतो आहे! याला सोड. आज मी याचा वध करीन किंवा तो तरी माझा वध करील!"

(४) बलवान् सात्यकीला या वेळीं भीमानें बाहूंनीं आंवळून धरिलें होतें, तरी धृष्टद्युम्नाचें भाषण चाललें असतां सर्पाप्रमाणें तो दीर्घ निश्वास टाकीत होता! ते दोघे बाहुशाली वीर एकमेकांवर वृषभांप्रमाणें गर्जना करीत असतां श्रीकृष्ण आणि धर्मराज त्वरेनें तेथें आले आणि त्यांनीं मोठ्या प्रयत्नानें त्या दोघांचें निवारण केलें. अशा रीतीनें आरक्तनेत्र झालेल्या त्या उभयतांचें सांत्वन केल्यावर ते सर्व मोठमोठे वीर समरांगणांत युद्धार्थ आलेल्या शत्रूंवर धांवून गेले! ७. ८. १९८.

## अध्याय १९९ वा.

[ १ अश्वत्थाम्याकडून नारायणास्त्राचा प्रयोग. २ कृष्णाच्या वचनावरून यानावरोहण व शस्त्रन्यास यांहींकरून वीरांचें आत्मरक्षण. ३ शस्त्रधारी भीम युद्धास प्रवृत्त झाल्यामुळें त्याच्या मस्तकावर अस्त्रप्रज्वलन. ]

( १ ) **संजय**—त्या वेळीं युगांतीं सर्व भूतांचा संहार करणाऱ्या अंतकाप्रमाणें द्रोणपुत्रानें रिपूंचा नाश केला. भल्लांनीं शत्रुसैन्याचा नाश करून त्यानें त्यांच्या प्रेतांचा एक पर्वतच तयार केला. ध्वज हे त्या पर्वतावरील वृक्ष असून शस्त्रें हीं शृंगें होतीं. मरून पडलेले गज ह्या त्यावरील महाशिला होत्या. अश्व हे तेथील किंपुरुष असून धनुष्यें ह्या लता होत्या. मांसाहारी पक्षी आणि भूत-यक्षगण यांनीं तो व्याप्त होता. त्या नरश्रेष्ठानें मोठ्या वेगानें गर्जना करून पुनः आपली प्रतिज्ञा तुझ्या पुत्राला ऐकविली कीं, ज्याअर्थीं कुंतीपुत्र युधिष्ठिरानें धर्माचे प्रावरणाखालीं कपटानें आचार्याला शस्त्रन्यास करण्याला सांगितलें, त्याअर्थीं त्याच्या डोळ्यांदेखत त्याच्या सैन्याचा निःपात करीन आणि सर्वांस पळावयास लावून त्या पांचाल्यांचा वध करीन! जर हे मजबरोबर युद्ध करतील, तर या सर्वांचा मी घात करीन! हें मी तुला सत्य सांगत आहें. सैन्याला मागें फिरीव."

द्रोणपुत्राचें तें भाषण ऐकून तुझ्या पुत्रानें सैन्य मागें फिरविलें आणि मोठ्यानें सिंहनाद केला. त्यामुळें सर्व सैनिकांची भीति पार नाहींशी झाली! नंतर दोन जलपूर्ण सागर जसे एकमेकांवर येऊन आदळतात, त्याप्रमाणें कौरव-पांडवांच्या सैन्यांची गांठ पडून तुमुल संग्रामाला प्रारंभ झाला! भयग्रस्त झालेल्या कौरवांना अश्वत्थाम्यानें स्थिर केलें! द्रोणाच्या निधनामुळें पांडव आणि पांचाल हे तर अतिहर्षोन्मत्त झाले होते. हे राजेंद्रा, उभय पक्षांनाहि आपलाच जय होणार असें वाटत होतें! त्यामुळें त्या क्षुब्ध झालेल्या दोन्ही पक्षांकडील वीरांना आलेला आवेश उघड दिसून येत होता. ज्याप्रमाणें पर्वतावर पर्वत किंवा सागरावर सागर सहसा आदळावा, त्याप्रमाणें कौरव-पांडवांची गांठ पडून युद्ध जुंपलें! तेव्हां दोहोंकडील सैनिकांनीं हजारों शंख आणि अयुतावधि भेरी वाजविल्या. मंथनाचे वेळीं सागराचा जसा ध्वनि झाला, तसा त्या सैन्यांचा अपूर्व आणि अत्यद्भुत शब्द झाला! अश्वत्थाम्यानें पांडवांच्या व पांचालांच्या सैन्यावर नारायणास्त्र प्रकट केलें! तेव्हां प्रज्वलित

अस्त्रांचे सहस्रावधि बाण आकाशांत प्रादुर्भूत झाले आणि दीप्तमुख सर्पांप्रमाणें ते पांडवांचा नाश करणार असें वाटूं लागलें! त्या बाणांनीं क्षणांत सर्व दिशा, आकाश व सैन्य सूर्याच्या किरणांप्रमाणें व्यापून टाकलें! हे महाराजा, तसेच दुसरे लोहगोळ स्वच्छ आकाशांत प्रकट होऊन नक्षत्रांसमान चकाकूं लागले! दोन चक्रांच्या, चार चक्रांच्या शतघ्नी, पुष्कळ गदा व सूर्यमंडल-सदृश क्षुरधारेचीं उज्ज्वल चक्रें आकाशांत दिसूं लागलीं! हे नरश्रेष्ठा, शस्त्राकृतींनीं अंतरिक्ष व्याप्त झालेलें पाहून पांडव, पांचाल आणि सृंजय हे अत्यंत उद्विग्न झाले! हे जनाधिपा, जसजसे पांडवांचे महारथी अधिकाधिक युद्ध करूं लागले, तसतसें तें अस्त्र अतिशय वाढूं लागलें! त्या नारायणास्त्रानें त्यांचा नाश होऊं लागला! शिशिर ऋतूच्या अंतीं अग्नि गवत जाळून टाकतो, त्याप्रमाणें हे राजा, तें अस्त्र पांडवसेनेला दग्ध करीत चाललें!

त्या अस्त्रानें क्षीण होत चाललेलें आपलें सैन्य पाहून धर्मपुत्र युधिष्ठिर संत्रस्त झाला. आपलें सैन्य निर्जीव होऊन पळून जात आहे आणि अर्जुन निरुत्साह झाला आहे, असें पाहून तो म्हणाला "धृष्टद्युम्ना, तूं पांचालसेनेला घेऊन पळून जा! सात्यके, तूंहि वृष्णि व अंधक यांसह निघून जा! धर्मात्मा वासुदेव आपल्या रक्षणाला योग्य वाटेल तें करण्याला समर्थ आहे! जो सर्व लोकांना कल्याणाचा मार्ग दाखवितो, त्याला स्वतःचें हित कसें बरें करून घेतां येणार नाहीं? 'आतां युद्ध करूं नका' असें माझें सर्व सैन्यास सांगणें आहे! मी तर बंधूंसह अग्निप्रवेश करीन! रणांगणावर भीरूंना दुस्तर अशा भीष्म—द्रोणांसारखे अर्णव तरून जे आम्ही गेलों, तेच सांप्रत द्रोणपुत्ररूपी गोष्पदजलांत सर्व गणांसह बुडून जात आहों! आमच्या कल्याणकर्त्या द्रोणास रणांत मीं मारविलें, त्याअर्थीं माझ्या संबंधानें अर्जुनाची तरी इच्छा आज सफल होवो! ज्यानें युद्धकलानभिज्ञ बाल सौभद्राचा पुष्कळ बलवान् आणि क्रूर वीरांकडून वध करविला, सभेंत द्रौपदी आणविली असतां आणि ती आपल्या दासीभावाच्या न्याय्यतेसंबंधीं प्रश्न विचारीत असतां ज्यानें आपल्या पुत्रासह तिची उपेक्षा केली, जयद्रथाचे रक्षणार्थ अर्जुनाचा वध करूं पाहणाऱ्या दुर्योधनाच्या अंगांत ज्यानें कवच घातलें, ज्या ब्रह्मास्त्रवेत्यानें माझ्या जयार्थ यत्न करणाऱ्या सत्यजित्प्रभृति पांचालांचा वध केला आणि ज्यानें अधर्मानें आम्हांला राज्यांतून घालविण्याचे वेळीं विदुरादिकांनीं निवारण केलें असतांहि आमच्या वनवा-

साला अनुमोदन दिलें आणि अशाप्रकारें ज्यानें आमच्यावर परम प्रेम दाखविलें, त्या द्रोणाचा वध झाला म्हणून मी आज बंधूंसह अग्निप्रवेश करणार !"

(२) संजय–अशाप्रकारें धर्म बोलत आहे, तोंच कृष्णानें हस्तसंकेत करून सैन्याचें त्वरित निवारण केलें आणि म्हणाला, "वीरहो, तुम्ही आपलीं शस्त्रें शीघ्र खालीं ठेवा आणि वाहनांवरून उतरा ! ह्या अस्त्राच्या प्रतिघाताचा हाच उपाय सांगितला आहे ! गज, अश्व, रथ यांवरून तुम्ही सर्व खालीं उतरा ! तुम्ही निरायुध भूमीवर राहिल्यानें हें अस्त्र तुम्हांला मारूं शकणार नाहीं ! जे कोणी मनानें कां होईना, याच्याशीं युद्ध करूं इच्छितील, त्या सर्वांचा, मग ते रसातळीं गेलेले कां असेनात, हें घात करील, यांत संशय नाहीं !"

(३) हे भारता, वासुदेवाचें तें भाषण ऐकून शस्त्रें टाकून देण्याचा सर्वांनीं विचार केला. इतक्यांत भीमसेन त्यांस प्रोत्साहनपर शब्दांनीं बोलला, "कोणींहि शस्त्रें टाकूं नयेत, मी माझ्या बाणांनीं द्रोणपुत्राच्या अस्त्राचें निवारण करीन ! मी सुवर्णाच्छादित गदेनें यमाप्रमाणें रणांत आघात करीन आणि द्रौणीच्या अस्त्राचा प्रतिकार करीन ! ज्याप्रमाणें सूर्यासारखें दुसरें तेज नाहीं, त्याप्रमाणें पृथ्वीवर माझ्या सारखा कोणीहि पराक्रमी वीर नाहीं. गजशुंडेप्रमाणें माझ्या महाबाहूंच्या योगानें हिमाचलासारख्या पर्वताचाहि निःपात मी करीन ! मनुष्यांमध्यें माझें सामर्थ्य अयुत नागबलाइतकें आहे. जी स्वर्गांत देवांमध्यें इंद्राची बलसंबंधानें ख्याति आहे, तशी माझीहि येथें आहे ! द्रौणीच्या प्रदीप्त अस्त्राचें निवारण करीत असतां आज माझ्या या पुष्ट बाहूंचें वीर्य पहा ! नारायणास्त्राशीं संग्राम करणारा वीर जर कोणी नाहीं, तर आज मी कुरु-पांडवांच्या देखत त्याच्याशीं युद्ध करीन ! अर्जुना, हे अर्जुना, रे बीभत्सो, तूं गांडीव खालीं ठेवूं नकोस ! तसें केल्यास चंद्रास कलंकाप्रमाणें तुझ्या विमल कीर्तीस लांछन लागेल !"

अर्जुन—भीमा, नारायणास्त्र, गाई व ब्राह्मण यांवर गांडीवाचा प्रयोग करावयाचा नाहीं, असें माझें व्रत आहे.

असें अर्जुनाचें भाषण झाल्यावर सूर्यासमान तेजस्वी रथांत बसून मेघाप्रमाणें गर्जना करीत अरिंदम द्रोणपुत्रावर भीमसेन चालून गेला आणि त्यानें आपल्या बाणजालांनीं द्रौणीला आच्छादून टाकलें. द्रौणीनेंहि हास्यपूर्वक

मोठ्या चपलाईनें आपल्या अभिमंत्रित प्रज्वलित शरांनीं त्यावर प्रहार केला! तेव्हां प्रदीप्तमुख सर्पसदृश व मुखांतून अग्निकण टाकणाऱ्या बाणांनीं भीमाचें शरीर इतकें व्याप्त होऊन गेलें कीं, तो जणुंकाय सुवर्ण स्फुलिंगांनींच आच्छादित झाला होता! तो सायंकाळीं खद्योतांनीं व्याप्त झालेल्या पर्वताप्रमाणें रणांत दिसूं लागला! हे महाराजा, भीम जों जों त्या अस्त्राला प्रतिबंध करूं लागला, तों तों तें अस्त्र वायूनें प्रज्वलित होणाऱ्या अग्नीसमान अधिकाधिक वृद्धिंगत होत चाललें! अशाप्रकारें विवर्धमान होणारें तें भीमविक्रमी अस्त्र पाहून एका भीमसेनाविरहित सर्व पांडवांचें सैन्य भयभीत होऊन गेलें! त्या सर्वांनीं आपलीं शस्त्रें भूमीवर टाकलीं आणि रथ, गज व अश्व यांवरून ते सर्व खालीं उतरले! तेव्हां त्या अस्त्राची सर्व महाशक्ति एका भीमसेनाच्याच मस्तकावर पतन पावली!

याप्रमाणें भीम त्या अस्त्रानें सवृत झाला असतां सर्व भूतगण आणि विशेषतः पांडव यांमध्यें एकच हाहाकार उडाला! ७. ८. १९९.

---

## अध्याय २०० वा.

[ १ नारायणास्त्राची शांति. २ धृतराष्ट्रप्रश्न व संजय याचें उत्तर. ३ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—भीमसेन नारायणास्त्रानें आच्छादित झालेला पाहून धनंजयानें त्या तेजाच्या प्रतिकाराकरितां वारुणास्त्राची योजना केली. तें अस्त्र नारायणास्त्राचे तेजांत लोपून गेल्यामुळें वारुणास्त्रानें आच्छादित झाल्याचें कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. अश्व, सारथि व रथ यांसह भीम द्रोणपुत्राच्या अस्त्रानें व्याप्त होऊन गेला. या वेळीं भीमाकडे पहाणेंहि अवघड झालें होतें. राजा, ज्याप्रमाणें रात्रीचा क्षय झाला असतां नक्षत्रें अस्ताचलावर जातात, त्याप्रमाणें भीमाच्या रथावर सारखे बाण पडूं लागले! हे मारिषा, द्रोणपुत्रानें भीम, त्याचा रथ, अश्व आणि सारथी यांना आपल्या बाणांनीं आच्छादून टाकल्यामुळें ते सर्व अग्नीच्या मुखांतच सांपडल्यासारखे झाले! प्रलयकाळीं सर्व चराचर विश्वाचें भक्षण करून वह्नि जसा परमेश्वराच्या मुखांत प्रवेश करितो, त्याप्रमाणें त्या अस्त्रानें भीमसेनाला आच्छादिलें! सूर्याचे ठिकाणीं अग्नीनें प्रवेश केला किंवा अग्नींत सूर्यानें प्रवेश केला, तरी अग्नि असा दिसेनासा होतो, त्याप्रमाणें त्या तेजानें भीमाचे अंगांत प्रवेश करितांच

तो दुर्ज्ञेय झाला! भीमाचा रथ अस्त्रानें व्यापून टाकला आहे, द्रोणपुत्र रणांगणांत उभा आहे, त्याच्याशीं युद्ध करण्यास कोणी तयार नाहीं, पांडवांचे सर्व सैन्यानें शस्त्रें टाकलीं आहेत, ते निर्जीव होऊन गेले आहेत आणि युधिष्ठिरादि महारथी विमुख झाले आहेत, असें पाहून महातेजस्वी कृष्णार्जुनांनीं रथांतून खालीं उड्या घेतल्या आणि ते भीमाकडे धांवत गेले! नंतर द्रोणपुत्राच्या अस्त्रबलापासून उत्पन्न झालेल्या तेजांत ते मायेच्या योगानें शिरले! या वेळीं त्यांनीं शस्त्रें टाकिल्यामुळें, वारुणास्त्राच्या प्रयोगामुळें आणि त्यांच्या अंगच्या वीर्यामुळें त्या नारायणास्त्रापासून उत्पन्न झालेला अग्नि त्यांस जाळूं शकला नाहीं! त्या नर-नारायणांनीं—कृष्णार्जुनांनीं—नारायणास्त्राच्या शांतीकरितां भीम आणि त्याचीं सर्व शस्त्रायुधें खालीं ओढून घेतलीं! जोंजों ते भीमाला खालीं ओढूं लागले, तोंतों भीम मोठ्यानें गर्जना करूं लागला आणि त्या योगानें तें दुर्जय व घोर अश्वत्थाम्याचें अस्त्र वाढूं लागलें! तेव्हां श्रीकृष्ण भीमाला बोलला, "पांडुनंदना भीमा, आम्ही निवारण करीत असतांहि तूं युद्धापासून परावृत्त कां बरें होत नाहींस? युद्ध करून जर हे कौरव जिंकतां आले असते, तर आम्ही व या सर्व थोर वीरांनीं युद्ध केलें असतें! परंतु आम्ही सर्व व तुझ्या पक्षाकडीलहि वीर रथांतून उतरले आहेत, त्याअर्थीं तूंहि रथांतून शीघ्र उतर!"

असें बोलून कृष्णानें त्याला रथांतून जमिनीवर ओढलें! तेव्हां त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले व तो सर्पासारखे निश्वास टाकूं लागला! जेव्हां त्यांनीं त्याला रथांतून उतरविलें आणि त्याजकडून शस्त्रें जमिनीवर टाकविलीं, तेव्हां तें शत्रुतापन नारायणास्त्र शांत झालें!

अशाप्रकारें तें दुःसह तेज शांत झालें असतां सर्व दिशा व प्रदिशा स्वच्छ झाल्या, मंगल वारे वाहूं लागले आणि पशु-पक्षीहि शांत झाले. हे भारता, तें घोर तेज नाश पावलें असतां निशावसानीं उदयाला आलेला सूर्य जसा शोभतो, तसा तो भीम शोभूं लागला. पांडवांचें शेष राहिलेलें सैन्य अस्त्राची शांति झाली असतां आनंदित झालें आणि तुझ्या पुत्राचा घात करण्याच्या इच्छेनें तयार होऊन राहिलें!

हे महाराजा, नंतर पांडवांचें सैन्य व्यवस्थितपणें युद्धाला सज्ज झालेलें पाहून दुर्योधन द्रोणपुत्राला म्हणाला 'अश्वत्थामन्, पुनः एकदां हें अस्त्र शत्रूवर शीघ्र योज! हे विजयेच्छु पांचाल युद्धास पुनः प्रवृत्त झाले आहेत पहा!'

हे मारिषा, तुझ्या पुत्रानें असें सांगितलें असतां अश्वत्थामा खिन्न झाला आणि निश्वास टाकून दुर्योधन राजाला बोलला, "राजन्, हें अस्त्र मागें घेतां येत नाहीं किंवा ह्याचा उपयोगहि दोनदां करतां येत नाहीं. तसेंच हें अस्त्र मागें फिरविण्याचा यत्न केल्यास तें प्रयोक्त्याच्या वरच येऊन आदळेल, यांत संशय नाहीं. ह्या अस्त्राचा प्रतिघात वासुदेवानेंच केला आहे. तसें नसतें, तर आज शत्रूंचा वध रणांगणांत झालाच होता. पराजय किंवा मृत्यु या दोहोंमध्यें मृत्युच श्रेयस्कर आहे. शत्रूंना आम्हीं पराजित करून टाकलें आहे आणि त्यांनीं शस्त्रन्यास केल्यामुळें ते मेल्यासारखेच झाले आहेत!"

दुर्योधन—आचार्यपुत्रा, हें अस्त्र दोनदां योजतां येण्यासारखें नाहीं, तर दुसऱ्या कांहींतरी अस्त्रांनीं या गुरुघातक्यांचा वध करावा! त्या अमिततेजस्वी त्र्यंबकाजवळ आणि तुजजवळच हीं दिव्य अस्त्रें आहेत. तूं मनांत आणशील, तर क्रोधायमान इंद्रहि तुजपासून सुटणार नाहीं!"

(२) धृतराष्ट्र—द्रोण कपटानें मारला गेला, त्या अस्त्राचाहि नाश झाला, व त्यावर पुनः दुर्योधनानें असें सांगितलें, तेव्हां त्या द्रोणपुत्रानें पुढें काय केलें? तसेंच नारायणास्त्रापासून मुक्त झालेले पांडव पुनः सैन्याच्या अग्रभागीं हालचाल करीत आहेत, असें पाहून त्यानें काय करण्याचें योजिलें?

संजय—पित्याचे निधनानें संतप्त झालेल्या अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नावर धांवत जाऊन पंचवीस बाणांनीं त्याला विद्ध केलें! त्यावर धृष्टद्युम्नानेंहि अग्नीसमान देदीप्यमान त्रेसष्ट बाण अश्वत्थाम्यावर टाकले आणि त्याच्या सारथ्यावरहि तीक्ष्ण अग्रांचे वीस सुवर्णपुंख बाण सोडले व चार तीक्ष्ण शरांनीं त्याचे चार अश्वांचा वेध केला! अश्वत्थाम्याला वारंवार विद्ध करून त्यानें एवढी गर्जना केली कीं, जणुं पृथ्वी कांपूं लागली आणि रणांगणांतील सर्व लोकांचे प्राण यानें हरण केले आहेत असें वाटूं लागलें! हे राजन्, धृष्टद्युम्न हा बलवान्, अस्त्रज्ञ आणि निश्चयी असल्यामुळें मृत्यूची भीति न बाळगतां तो अश्वत्थाम्यावर चालून गेला आणि त्यानें द्रोणपुत्राच्या मस्तकावर बाणवृष्टि केली! तेव्हां अश्वत्थाम्यानें त्याला समरांत बाणांनीं आच्छादिलें आणि पित्याचा वध लक्ष्यांत आणून त्याला दहा बाणांनीं विद्ध केलें, दोन क्षुरबाणांनीं त्या पांचालराजाचा ध्वज व चाप हीं छिन्न केलीं आणि रणांत त्याचे अश्व व सारथि यांचा वध करून त्याला रथहीन करून सोडलें! आणि त्याच्या सर्व अनुचरांवर बाण सोडून त्यानें त्यांस पळावयास लाविलें. राजेंद्रा! नंतर पांचालसैनिकांनीं पळ काढला. त्या वेळीं



कृष्ण—भीमा, युद्ध करून जर हे कौरव जिंकतां आले असते, तर आम्ही व या सर्व वीरांनीं युद्ध केलें असतें, परंतु आम्ही सर्व व तुझ्या पक्षाकडीलहि वीर रथांतून उतरले आहेत, त्याअर्थी तूंहि रथांतून खालीं उतर !

[ नारायणास्त्राची शांति. अ० २००. पृ० २३९. ]

ते इतके संभ्रांत होऊन गेले होते कीं, त्यांनीं पळून जातांना एकमेकांकडे पाहिलेंहि नाहीं !

( ३ ) अशाप्रकारें आपले योद्धे विमुख झाले आहेत व धृष्टद्युम्न पीडित झाला आहे, असें पाहून सात्यकीनें आपला रथ द्रौणीच्या रथाकडे नेला आणि आठ तीक्ष्ण बाण त्यानें अश्वत्थाम्यावर टाकले आणि पुनः संतापानें त्याला आणि त्याच्या सारथ्याला विद्ध केलें ! तसेंच त्यानें चार बाणांनीं त्याचे चारहि अश्व विद्ध केले आणि मोठ्या चपळाईनें त्याचें चाप व धनुष्य हीं छेदून टाकिलीं ! नंतर त्यानें अश्वत्थाम्याचा सुवर्णभूषित रथ दूर उडविला, आणि तीस बाण त्याच्या हृदयावर मारिले ! अशाप्रकारें तो अश्वत्थामा अतिव्याकुळ झाला व आतां पुढें काय करावें, हेंहि त्याला सुचेनासें झालें ! गुरुपुत्राची ती करुणावस्था पाहून तुझा पुत्र कृप आणि कर्णादि वीर यांनीं त्या सात्यकीला बाणांनीं आच्छादून टाकिलें. दुर्योधन, कृपाचार्य, कृतवर्मा, कर्ण, दुःशासन आणि वृषसेन यांनीं बाण मारून सात्यकीला विद्ध केलें ! तेव्हां त्या महारथी सात्यकीनें त्या सर्वांस विरथ करून टाकिलें ! हे भरतर्षभा, इकडे अश्वत्थामा सावध झाला आणि दुसऱ्या रथावर उडी मारून शेंकडो बाणांनीं त्यानें सात्यकीचें निवारण केलें ! सात्यकीनेंहि अश्वत्थामा आपल्यावर धांवून येत आहे असें पाहतांच पुनः त्यास विरथ केलें !

राजा धृतराष्ट्रा, सात्यकीचा तो पराक्रम पाहून पांडवांनीं शंख वाजविले व सिंहनाद केले ! त्या सत्यविक्रमी सात्यकीनें त्या अश्वत्थाम्यास विरथ केल्यावर वृषसेनाच्या तीन हजार महारथ्यांचा त्यानें संहार केला, कृपाचार्यांचे एक अयुत गज मारिले आणि शकुनीचे पंचायुत अश्व त्यानें कापून काढिले ! तेव्हां अश्वत्थामा सात्यकीचा वध करण्याच्या इच्छेनें त्यावर धांवून गेला ! अश्वत्थामा आपल्यावर चालून येत आहे, हें पाहून सात्यकीनें त्यास तीक्ष्ण बाणांनीं पुनः विद्ध केलें ! तेव्हां तो अश्वत्थामा हंसतहंसतच सात्यकीला म्हणाला, "सात्यके, आचार्यांचा वध करणाऱ्या धृष्टद्युम्नावर तुझें किती प्रेम आहे, हें मला ठाऊक आहे. परंतु माझ्या हातांत तूं सांपडल्यावर, जेथें तूं स्वतःचें रक्षण करण्यास असमर्थ आहेस, तेथें त्याचें रक्षण तूं कसें करणार ? शैनेया, आज मी माझ्या गळ्याची, सत्याची आणि तपाची शपथ घेऊन सांगतों कीं, 'सर्व पांचालांचा वध केल्याशिवाय मी कधींहि स्वस्थ बसणार नाहीं. पांडवांचें जें कांहीं

सैन्य असेल तें आणि वृष्णींचें सर्व सैन्य एकत्र होऊन तीं जरी मजवर आलीं, तरी मी सोमकांचा वध केल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं !'"

असें बोलून इंद्रानें वृत्रावर ज्याप्रमाणें वज्र सोडलें, त्याप्रमाणें सूर्यकिरणांसारखा तेजस्वी व अति तीक्ष्ण बाण अश्वत्थाम्यानें सात्यकीवर टाकिला. त्या बाणानें सात्यकीचें शरीर कवचासुद्धां भेदून टाकिलें. नंतर तो बाण बिळांत शिरणाऱ्या सर्पाप्रमाणें भूमींत शिरला ! त्या योगानें कवचाचा भेद होऊन अंकुशानें टोंचलेल्या गजाप्रमाणें त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या, हस्तांतून सशर चाप गळून पडलें आणि तो फार विह्वल झाला ! रक्तानें भिजून जाऊन तो रथांतच पडून राहिला. तेव्हां त्याच्या सारथ्यानें द्रोणपुत्रापासून त्याला शीघ्र दूर पळविलें ! नंतर त्या अश्वत्थाम्यानें एक आनतपर्व बाण धृष्टद्युम्नाच्या भुंवयांच्या मध्यभागीं मारला ! आधींच विद्ध झालेला धृष्टद्युम्न पुनः अत्यंत विह्वल होऊन ध्वजाची काठी धरून खालीं बसला.

राजा, सिंहानें पीडित केलेल्या गजाप्रमाणें अश्वत्थाम्यानें बाणांनीं धृष्टद्युम्नाला त्रस्त केलेलें पाहून पांडवांकडून अर्जुन, भीमसेन, पुरुकुळांतील वृद्धक्षत्र, चेदींचा युवराज आणि मालवाधिपति सुदर्शन हे पांच महारथी त्यावर धांवून आले आणि धनुष्यें सज्ज करून त्यांनीं अश्वत्थाम्याला चारी बाजूंनीं वेढिलें. त्यांनीं प्रत्येकीं पांच पांच बाण अश्वत्थाम्यावर टाकले ! अश्वत्थाम्यानें पंचवीस तीक्ष्ण बाणांनीं त्यांचा नाश केला ! मग त्यानें पौरवावर सात, माळवावर तीन, अर्जुनावर एक आणि भीमसेनावर सहा तीक्ष्ण बाण टाकले. राजा, नंतर त्या सर्व महारथींनीं अश्वत्थाम्यावर एकत्र व पृथक्पणें सुवर्णपुंख बाण फेंकले ! युवराजानें वीस, अर्जुनानें आठ आणि बाकीच्यांनीं तीन-तीन बाण त्या अश्वत्थाम्यावर मारिले ! अश्वत्थाम्यानेंहि उलट अर्जुनावर सहा, कृष्णावर दहा, भीमावर पांच, युवराजावर चार आणि मालव व पौरव यांवर प्रत्येकीं दोन बाण टाकले, सहा बाणांनीं भीमाच्या सारथ्याला विद्ध केलें, आणि दोन बाण मारून भीमाचें चाप व ध्वज छेदून टाकिलीं ! अश्वत्थाम्यानें पुनः अर्जुनावर शरवृष्टि केली आणि मोठा सिंहनाद केला ! यानें मागेंपुढें टाकिलेल्या त्या तीक्ष्ण बाणांनीं पृथ्वी, आकाश, द्यौ, दिशा व उपदिशा सर्व व्यापून गेलीं. मग त्या इंद्राप्रमाणें वीर्यवान् अश्वत्थाम्यानें तीन बाणांनीं रथांत बसलेल्या सुदर्शनाचें मस्तक व इंद्रध्वजासारखे बाहु तोडले ! नंतर रथशक्तीनें पौरवाचा

वध करून त्याच्या रथाचे शरांनीं तिलशः तुकडे केले! त्याचे चंदनलिप्त बाहु तोडून टाकिले आणि एक भल्लबाण मारून त्याचें मस्तकहि उडविलें! नंतर त्यानें त्वरा करून तरुण व नीलवर्ण कमलासमान शोभणाऱ्या युवराजाला प्रज्वलित अग्निसदृश शरांनीं विद्ध केलें आणि त्यास अश्व व सारथि यांसह यमलोकीं पाठविलें!

राजा, मालव, पौरव आणि चेदिपति युवराज यांचा द्रौणीनें आपल्या देखत वध केला, हें पाहून भीमसेन अत्यंत संतापला आणि क्रुद्ध सर्पसदृश शेंकडो तीक्ष्ण बाणांनीं त्यानें अश्वत्थाम्याला रणांगणांत आच्छादून टाकलें. द्रौणीनेंहि त्या शरवृष्टीचा नाश करून क्रोधानें तीक्ष्ण बाणवृष्टि करून भीमाला विद्ध केलें. नंतर महाबाहु भीमानें रणांत क्रोधानें एका क्षुरप्रानें द्रौणीचें धनुष्य तोडून टाकिलें आणि एका बाणानें त्याला विद्ध केलें. नंतर अश्वत्थाम्यानें तें छिन्न धनुष्य टाकून दिलें आणि दुसरें धारण केलें. त्यानें भीमावर सारखी बाणांची वृष्टि केली! राजा, अश्वत्थामा व भीमसेन हे सारखेच मोठे पराक्रमी होते. त्यांनीं वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें रणांत सारखा बाणांचा वर्षाव केला. मेघसमुदाय सूर्यास आच्छादितात, त्याप्रमाणें भीमनामांकित सुवर्णपुंख बाण अश्वत्थाम्यास झांकून टाकूं लागले! इकडे अश्वत्थाम्यानें लक्षावधि नतपर्व बाण भीमावर सोडले. तरीहि त्यांची यत्किंचित् देखील भीति भीमाला वाटली नाहीं. हें भीमाचें कृत्य खरोखरच अत्यंत आश्चर्यकारक होतें. हे महाराजा, नंतर भीमानें सुवर्णविभूषित, यमदंडासमान दहा नाराच बाण अश्वत्थाम्यावर टाकिके. ते बाण हे मारिषा, द्रोणपुत्राच्या ग्रीवास्थीवर पडले आणि त्याला विद्ध करून बिळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें त्याच्या शरीरांत घुसले. त्यावेळीं अश्वत्थामा रक्तानें अगदीं माखून गेला होता. अशा रीतीनें अतिविह्वल झाला असतां मूर्च्छा येऊन ध्वजयष्टीचा आश्रय करून व नेत्र झांकून तो स्वस्थ राहिला!

हे नराधिपा, मुहूर्तमात्रानें तो देहभानावर आला आणि अत्यंत क्रोधसंतप्त झाला. भीमसेनानें त्याला अत्यंत व्यथित केल्यामुळें तो क्षुब्ध होऊन भीमसेनाच्या रथावर वेगानें धांवून गेला आणि हे भारता, त्यानें धनुष्य आकर्ण ओढून शंभर तेजस्वी सर्पांसमान भयंकर बाण त्याच्या वक्षःस्थळावर मारिले. युद्धश्लाघी भीमानेंहि अश्वत्थाम्याच्या पराक्रमाची गणना न करितां त्याजवर भयंकर शरवृष्टि केली. नंतर हे महाराजा, त्या अश्वत्थाम्यानें आपल्या बाणांनीं

भीमाचें धनुष्य भंगून त्याच्या छातीवर तीक्ष्ण बाण टाकिले. नंतर भीमानें दुसरें धनुष्य घेतलें आणि रणांगणावर त्या अश्वत्थाम्यावर पांच तीक्ष्ण बाण मारले ! घर्मांतीं जलवृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें त्यांनीं बाणांच्या वर्षावानें परस्परांस आच्छादून टाकिलें. आपल्या घोर तलशब्दांनीं त्यांनीं परस्परांस भिवविण्याचा प्रयत्न केला आणि अत्यंत क्षुब्ध होऊन आघाताला प्रत्याघात करण्याच्या इच्छेनें ते युद्ध करूं लागले ! नंतर भीम आपलें सुवर्णभूषित धनुष्य खेंचून आपल्यावर शरसंधान करीत आहे असें अश्वत्थाम्यानें पाहिलें. यावेळीं द्रोणपुत्र शरत्कालीन मध्याह्नींच्या सूर्याप्रमाणें दिसत होता. तो बाण केव्हां घेतो, केव्हां जोडतो, धनुष्य केव्हां ओढतो आणि बाण केव्हां सोडतो, यांतील अंतर लोकांना समजत नसे ! हे महाराजा, बाण टाकीत असतां अलातचक्राप्रमाणें अश्वत्थाम्याचें धनुष्य मंडलाकार फिरत असतांना दिसत होतें. त्याच्या धनुष्यापासून सुटलेले शेंकडों हजारों बाण शलभांच्या समूहांप्रमाणें आकाशांत दिसत असत. द्रौणीनें सोडलेले ते हेमविभूषित बाण भीमाच्या रथावर सारखे पडत असत ! हे भारता, त्या ठिकाणीं भीमाचा विक्रम, बल, वीर्य, प्रभाव आणि व्यवसाय यांतील अद्भुतता आम्हांला दिसून आली ! उष्णकालाच्या शेवटीं मेघांपासून जलवृष्टि होते, त्याप्रमाणें चारी बाजूंनीं होणारी बाणवृष्टि पाहून भीमानें अश्वत्थाम्याच्या वधाची इच्छा करून त्यावर सारखी बाणवृष्टि केली ! ती वर्षाकालांतील मेघांच्या जलवृष्टीप्रमाणें होती. महारणांत भीमाचें भयंकर धनुष्य पाहून तें दुसरें इंद्रधनुष्यच आहे कीं काय, असें भासत होतें. त्यापासून सुटणारे शेंकडों हजारों बाण रणांगणांत शोभणाऱ्या द्रौणीला आच्छादून टाकीत होते.

हे महाराजा, याप्रमाणें ते दोघे परस्परांवर बाणवृष्टि करीत असतां मध्यें शिरकाव होण्याला वायूलाहि अवकाश नव्हता. भीमाप्रमाणें अश्वत्थाम्यानेंहि हेमविभूषित बाण भीमसेनाच्या वधेच्छेनें त्यावर सोडले. परंतु भीमानें आकाशांतच त्या प्रत्येक बाणाचे तीन-तीन तुकडे करून टाकिले आणि अश्वत्थाम्याला 'थांब-थांब' म्हणून मोठ्यानें आरोळी मारली ! द्रोणपुत्राच्या वधार्थ त्या क्रुद्ध व बलवान् भीमसेनानें पुनः त्यावर शरवृष्टि केली. तेव्हां अस्त्रवेत्त्या अश्वत्थाम्यानें अस्त्रमायेनें शरवृष्टि निवारण करून भीमाचें धनुष्य छेदिलें आणि पुष्कळ बाण मारून क्रोधावेशानें त्याला रणांत विद्ध केलें ! भीमानेंहि आपल्या धनुष्याचा भंग झाल्याचें पाहून एक भयंकर रथशक्ति अश्वत्थाम्यावर वेगानें फेंकली ! एकाएकीं आपल्यावर महोल्केप्रमाणें येणारी ती रथशक्ति पाहून

द्रौणीनें आपल्या तीक्ष्ण शरांनीं ती तोडून टाकिली आणि आपलें हस्तकौशल्य दाखविलें. इतक्यांत भीमानें दुसरें बळकट धनुष्य घेतलें आणि हंसतहंसतच अश्वत्थाम्यावर बाणांचा वर्षाव केला! हे महाराजा, तेव्हां त्या द्रोणपुत्रानें भीमसेनाच्या सारथ्यावर एक आसन्नपर्व बाण मारून त्याचा ललाटप्रदेश विदीर्ण केला! हे राजा, बलवान् द्रोणपुत्राकडून तो सारथि अतिविद्ध झाला आणि अश्वांचे रज्जु सोडून तो मूर्च्छा पावला. सारथि मूर्च्छित झाल्याचें पाहून सर्व धनुर्धरांसमक्ष त्या भीमाच्या अश्वांनीं पळ काढला!

अश्व उधळून त्यांनीं भीमाला रणांगणांत दूर नेल्याचें पाहून अश्वत्थाम्याला परम हर्ष झाला आणि त्यानें आपला शंख जोरानें वाजविला! तेव्हां सर्व पांचाल आणि भीमसेन भयभीत होऊन धृष्टद्युम्नाचा रथ सोडून चारी दिशांना पळून गेले. तेव्हां दाणादाण झालेल्या सैन्यावर पाठीमागून बाण मारीत द्रौणि त्याचा संहार करीत चालला. याप्रमाणें रणांत द्रोणपुत्राकडून मारले जाणारे ते सर्व राजे भयभीत होऊन दशदिशांना पळून गेले! ७. ८. २००.

---

## अध्याय २०१ वा.

[ १ अर्जुनाचें अश्वत्थाम्याला युद्धार्थ आह्वान. २ धृतराष्ट्राचा प्रश्न व संजयाचें उत्तर. ३ द्रोणपुत्राकडून आग्नेयास्त्राचा प्रयोग. ४ त्याचा अर्जुनाकडून संहार व द्रौणीचें शस्त्रन्यासपूर्वक रणांगणांतून निवर्तन. ५ द्रौणीला व्यासदर्शन व त्यास द्रौणीचा अस्त्रवैफल्यकरणप्रश्न. ६ कृष्णार्जुन हेच नरनारायण होत, असें व्यासांनीं सांगतांच अश्वत्थाम्याचा सैन्यावहार. ]

( १ ) संजय—आपल्या सैन्याचा पराभव झाल्याचें पाहून धनंजयानें अश्वत्थाम्याला जिंकण्याच्या इच्छेनें त्याला मार्गे फिरविण्याचा यत्न केला. हे राजा, त्या सर्व सैनिकांस थांबविण्याचा कृष्णार्जुनांनीं पुष्कळ यत्न केला असतांहि ते उभे राहिले नाहींत. नंतर एकटा अर्जुन सोमकांचे मांडलिक व मात्स्यवीर यांशीं सख्य करून कौरवांवर चालून गेला आणि त्यानें त्यांस थांबवून अश्वत्थाम्याला म्हटलें, "अश्वत्थामन्, जें विज्ञान, जें वीर्य, जें पौरुष, धार्तराष्ट्रांच्या ठिकाणीं तुझें असलेलें जें प्रेम, आमच्याविषयींचा जो द्वेष, तसेंच तुझ्या ठिकाणीं आणखी जें कांहीं तेज असेल, तें सर्व मला दाखीव! द्रोणहन्ता तो धृष्टद्युम्नच तुझा सर्व नाश करून टाकील. पांचालकुमार म्हणजे प्रलयकाळचा

अग्नि असून शत्रूंना अंतकाप्रमाणें आहे. त्या पांचाल्याशीं आणि कृष्णासह माझ्याशीं युद्ध कर! रणांगणावर उन्मत्त झालेल्या, तुझा गर्व आज मी नाहींसा करून टाकीन!"

( २ ) धृतराष्ट्र—संजया, आचार्यपुत्र मानार्ह असून बलवान् आहे आणि त्याची अर्जुनावर प्रीति आहे व अर्जुनालाहि तो तसाच प्रिय आहे. अशा-प्रकारचें कठोर वाक्य अर्जुन त्याला पूर्वी कधींहि बोलला नाहीं. मग ह्याच वेळीं अर्जुन आपल्या मित्राला इतकें रूक्ष कसें बोलला बरें?

संजय—युवराज चेदिपति, पौरव वृद्धक्षत्र आणि बाणास्त्रविद्याकुशल मालवाधिपति सुदर्शन हे मारले गेले. धृष्टद्युम्न, सात्यकि व भीमसेन यांचा पराजय झाला. तसेंच धर्मराजाचीं तीं भाषणें त्याच्या मर्मस्थानीं लागून त्याचें हृदय विदीर्ण झालें; पुत्रवधादि दुःखांचें स्मरण होऊन आज त्याला अभूतपूर्व त्वेष उत्पन्न झाला आणि यामुळेंच तो एकाद्या नीच मनुष्यास बोलावें, तसें अप्रिय, अश्लील व अयोग्य आचार्यपुत्राला बोलला!

( ३ ) राजा, असें अर्जुनाचें भाषण ऐकून तो अश्वत्थामा अर्जुनावर व विशेषतः कृष्णावर अत्यंत संतापला. नंतर रथांत सज्ज होऊन आणि उदकस्पर्श करून सर्व दृश्य व अदृश्य शत्रुगणांस उद्देशून देवांनाहि असह्य असें आग्नेयास्त्र त्यानें प्रकट केलें! इतकेंच नव्हे, तर त्यानें क्रोधाला पेटून एक बाण मंत्रित केला आणि धूमरहित अग्नीप्रमाणें तो प्रदीप्त बाण शत्रूवर सोडला. त्यामुळें आकाशांतून शरवृष्टि होऊं लागली आणि अग्निज्वालांसारखे ते बाण अर्जुनासभोंवतीं पडूं लागले. अंतरिक्षांतून उल्का पडण्यास आरंभ झाला आणि दिशाहि दिसेनाशा झाल्या व सैन्यासभोंवतीं दाट अंधकार पडला! राक्षस आणि पिशाच्चें एकत्र होऊन आरोळ्या ठोकूं लागलीं! उष्ण वारे वाहूं लागले, सूर्याचा ताप कमी वाटूं लागला आणि सर्व दिशांस पक्षी भयंकर शब्द करूं लागले! मेघांचा गडगडाट होऊन आकाशांतून रक्ताची वृष्टि होऊं लागली! पशु, पक्षी, गाई किंकाळ्या फोडूं लागल्या आणि सुव्रत योग्यांनाहि शांति मिळेनाशी होऊन ते समाधिच्युत झाले. सर्व महाभूतें भ्रांत होऊन गेलीं. सूर्य भ्रमण करीत असल्याचें दिसूं लागलें. ज्वर आल्याप्रमाणें त्रैलोक्य संतप्त होऊन गेलें. गज व भूमीवर संचार करणारे प्राणी अस्त्रतेजानें पीडित होऊन दीर्घ निश्वास टाकीत पळत सुटले!

भारता, जलाशय तापून गेल्यामुळें जलचर प्राण्यांनाहि दाह होऊं लागला. दिशा, विदिशा, आकाश व भूमि यांपासून गरुड किंवा वायु यांसमान वेगवान् लहानमोठ्या शरवृष्टि होऊं लागल्या व बाणांनीं पीडित झालेले शत्रु अग्नीनें दग्ध झालेल्या वृक्षांप्रमाणें खालीं पडूं लागले! मोठमोठे गज दग्ध होऊन मेघगर्जनेप्रमाणें भयंकर किंकाळ्या फोडीत चोहींकडे जमिनीवर पडलेले दिसत होते. राजेंद्रा, दुसरेहि कित्येक गज भयभीत होऊन सर्वत्र पळत सुटले! हे भारता, अश्व व रथ यांचे समूह अस्त्रतेजानें ज्वलित होऊन वणव्यांत दग्ध झालेल्या द्रुमशिखरांप्रमाणें दिसत होते. जिकडेतिकडे रथसमुदाय दग्ध होऊन पडलेले होते. युगांतीं संहारक अग्नि जसा सर्व भूतांना दग्ध करून टाकितो, त्याप्रमाणें त्या भयभीत झालेल्या सैन्याला तो अस्त्राग्नि जाळून टाकूं लागला!

हे राजा, पांडवांची सेना युद्धामध्यें जळूत जात असल्याचें पाहून तुझ्या लोकांना परमहर्ष झाला आणि मोठ्या गर्वानें त्यांनीं सिंहनाद केले आणि भारता, नानाप्रकारचीं इतर वाद्येंहि वाजविलीं. त्या महारणांत ती सर्व अक्षौहिणी सेना व अर्जुनहि अंधकारानें दिसेनासा झाला. द्रोणपुत्रानें टाकलेल्या अस्त्रासारखें अस्त्र आजपर्यंत कोणीं पाहिलें नाहीं किंवा ऐकलेंहि नाहीं!

( ४ ) हे महाराजा, नंतर पद्मयोनि ब्रह्मदेवानें सर्व अस्त्रांच्या निरसनासाठीं निर्माण केलेलें ब्रह्मास्त्र अर्जुनानें योजिलें. तेव्हां क्षणभरानें तो सर्व अंधकार नाहींसा झाला, थंड वारा वाहूं लागला आणि दिशा स्वच्छ झाल्या. तेव्हां ती सर्व अस्त्रतेजानें दग्ध अक्षौहिणी सेना मृत होऊन पडलेली दिसत होती. तींतील कोणीहि ओळखतां येत नव्हता. ते दोघे वीर कृष्णार्जुन अस्त्रमुक्त होऊन आकाशांत एकत्र झालेल्या चंद्रसूर्यांप्रमाणें दिसूं लागले. ते दोघेहि अक्षत होते व त्यांच्या रथावरील पताका, ध्वज, अश्व, अनुकर्ष व आयुधेंहि उत्तम स्थितींत होतीं. तो रथ येतांना पाहून तुझ्या लोकांना फार भीति वाटूं लागली. पांडवांना परम हर्ष झाला आणि त्या आनंदांत शंखभेरींचे नाद होऊं लागले. कृष्णार्जुन त्या अस्त्रतेजानें दग्ध झाले असावेत, असा उभय सैन्यांचा समज झाला होता; परंतु ते अक्षत असून आनंदानें शंख वाजवीत वेगानें चालून येत आहेत, असें पाहून पांडव हृष्ट व तुझे लोक व्यथित झाले. कृष्णार्जुन अस्त्रमुक्त झाल्याचें पाहून अश्वत्थामा परम दुःखी झाला. 'असें कसें झालें' ह्याचा क्षणभर तो विचार करूं लागला. कांहीं वेळ विचार केल्यावर तो चिंता व शोक

यांत मग्न झाला. त्यानें दीर्घ व उष्ण निश्वास सोडला आणि त्याचें मन उदास झालें. त्यानें धनुष्य टाकिलें आणि तो रथाखालीं वेगानें उतरला आणि 'धिक्, धिक्, हें सर्व मिथ्या आहे,' असें म्हणून रणांतून वेगानें निघून गेला !

(५) नंतर वेदांचें वसतिस्थान, स्निग्धघनश्याम व निर्विकार असा वेदव्यास त्याच्या दृष्टीस पडला. तो कुरुकुलश्रेष्ठ आपल्यासमोर उभा आहे, असें पाहून अश्वत्थाम्यानें सद्गदित होऊन त्याला वंदन केलें आणि नम्रपणानें तो त्याला बोलला, "ऋषे, ही काय माया आहे कीं यदृच्छा—अस्त्रशक्तीचाच अनियम—आहे किंवा दैव आहे, हें कांहीं समजत नाहीं. माझें अस्त्र विफल कां बरें व्हावें ? त्याच्या योजनेंत माझ्या हातून कांहीं दोष झाला काय ? किंवा कांहीं विपरीत घडलें नाहीं ना ? ज्याअर्थी हे कृष्णार्जुन अजून जीवंत आहेत, त्याअर्थी कालच दुरतिक्रम आहे, दुसरें काय ? हें मीं सोडलेलें अस्त्र विफल करण्याची शक्ति असुर, गंधर्व, पिशाच किंवा राक्षसादिकांनाहि नाहीं, मग तें केवळ अक्षौहिणी सेनेचा घात करून कसें शांत झालें ? हें माझें दारुण अस्त्र सर्वांचाच संहार करणारें असून या मर्त्यधर्म कृष्णार्जुनांचाच वध त्यानें कसा केला नाहीं ? भगवन्, मी तुला विचारीत आहें, तर मला सत्य सांग ! हे महामुने, हें सर्व तत्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे.

व्यास—तूं विस्मयचकित होऊन हा महत्त्वाचा प्रश्न विचारीत आहेस. तर मी तुला सांगतों, तें नीट ऐक. ज्याला नारायण म्हणतात, तो आमच्या पूर्वजांचाहि पूर्वज आहे. त्या विश्वकार्यकर्त्या नारायणानें कांहीं कार्यासाठीं धर्माच्या उदरीं जन्म घेतला. हिमालय पर्वतावर बसून त्यानें घोर तपश्चर्या केली, नंतर अग्नि-सूर्यासमान तो कमलनयन महातेजस्वी ऊर्ध्व बाहु करून बसला आणि त्यानें सहासष्ट हजार वर्षें वायुभक्षण करून आपलें शरीर शुष्क करून घेतलें आणि पूर्वीच्या द्विगुणित कालपर्यंत मोठें तप करून आपल्या तेजानें पृथ्वी व आकाश यांमधील अंतर व्यापून टाकिलें ! जेव्हां त्या तपाच्या योगानें तो ब्रह्माप्रमाणें निर्लेप झाला, तेव्हां जो विश्वाचा ईश्वर, उत्पादक—निर्माणकर्ता—व पालनकर्ता प्रभु त्यानें त्याला दर्शन दिलें. तो प्रभु अत्यंत दुर्धर्ष असून सर्व देव त्याची स्तुति करीत असतात. तो सूक्ष्मापेक्षांहि सूक्ष्म असून अत्यंत स्थूलपदार्थांपेक्षांहि स्थूल आहे. तो ब्रह्मादिकांनाहि श्रेष्ठ आहे. त्याला रुद्र, हर किंवा शंभु म्हणतात. त्याच्या मस्तकावर मोठा जटाकलाप आहे. सर्व प्राण्यांना चेतना

देणारा तो आहे. तो स्थावरजंगमांचें उत्पत्तिस्थान आहे. त्याचें निवारण करणें कोणालाहि शक्य नाहीं. सामान्य जनांना तो दृग्गोचर होत नाहीं. त्याचा क्रोध ( दुष्टांच्या ठिकाणीं ) अत्यंत प्रखर आहे. तो महात्मा सर्वांचा संहार करणारा आहे. त्याचें अंतःकरण ( साधु पुरुषांचे ठिकाणीं ) उदार आहे. तो दिव्य धनुष्य व तूणीर धारण करितो. त्याचें कवच सुवर्णाचें आहे. त्याचें वीर्य कधींहि नाश न पावणारें आहे. त्याच्या हातांत पिनाक, वज्र, दीप्तशूल, परशु, गदा, खड्ग, मुसल, परिघ व दंड आहेत. त्याच्या मस्तकावर जटा असून तो चंद्रमौलि आहे. तो व्याघ्राजिन परिधान करितो. त्याचीं बाहुभूषणें रमणीय असून त्याचें नागाचें यज्ञोपवीत आहे. सर्व प्राण्यांनीं आणि भूतपिशाच्चसंघांनीं तो सर्वदा शोभत असतो. तो सर्व विश्वास व्यापून राहणारा असून सर्व तपांचा निधि आहे. वृद्ध लोक इष्ट वचनांनीं त्याची स्तुति करितात.

जल, दिशा, आकाश, पृथ्वी, चंद्र-सूर्य, वायु आणि अग्नि तोच असून जगाचा परिमापक कालहि तोच आहे. तो ब्रह्मद्वेषी लोकांचा संहार करणारा असून मोक्षाचें कारण आहे आणि म्हणून दुराचारी लोकांना तो दृष्टिगोचर होत नाहीं. केवळ साधुवृत्त ब्राह्मण पापाचा क्षय होऊन शोकातीत झाल्यावर अंतर्दृष्टीनें त्याला पाहतात. अशा त्या तपानें व भक्तीनें विश्वरूप झालेल्या धर्ममूर्तीचें नारायणाला दर्शन झालें. त्याला पाहून वाणी, मन, बुद्धि आणि देह यांच्या योगानें वासुदेवाचा हर्ष व्यक्त झाला. अक्षमालेनें परिवेष्टित आणि सर्व तेजांचें निधान, विश्वसंभव, वरद, पार्वतीसह रममाण होणारा, भूतसंघांशीं परिवेष्टित, महात्मा, अज, ईशान, अव्यक्त, कारणात्मा व अच्युत अशा त्या रुद्राला पाहतांच नारायणानें त्याला नमन केलें. अंधकासुराचा वध करणाऱ्या त्या रुद्राला अभिवादन करून त्या भक्तिमान् कमलनयन नारायणानें त्याची स्तुति केली.

नारायण—हे वरेण्य आदिदेवा, ह्या पृथ्वीवर येऊन ज्यांनीं तुझ्या पुराण देवसृष्टीचें रक्षण केलें, ते प्रजापति—ह्या जगताचे संरक्षक—तुझ्याच पासून निर्माण झाले आहेत. सुर, असुर, नाग, राक्षस, पिशाच्च, मनुष्य, पक्षी, गंधर्व, नानाप्रकारचे भूतसंघ आणि सर्व विश्वें तुझ्यापासूनच उत्पन्न झालीं आहेत, हें आम्ही जाणतों. इंद्र, यम, वरुण, कुबेर, त्वष्टा आणि सोम यांच्यासाठीं जें कर्म आम्ही करितों, तें सर्व तुजकरितांच होय. रूप व ज्योति, शब्द व

आकाश, वायु व स्पर्श, रस व सलिल, गंध आणि पृथ्वी, तसेंच काल, ब्रह्मा, वेद आणि ब्राह्मण व सर्व स्थावरजंगमात्मक विश्व तुजपासूनच निर्माण झालें आहे. समुद्रापासून जसे जलबिंदु वेगवेगळे होतात, परंतु प्रलयकाल होतांच ते सर्व जसे पुनः समुद्रामध्येंच ऐक्य पावतात, तसे सर्व प्राणी तुझ्या ठिकाणीं उत्पत्ति व लय पावतात. हें ध्यानांत आणून विद्वान् पुरुष तुझ्याच ठिकाणीं ऐक्य पावतो. माया आणि अविद्या यांमध्यें प्रतिबिंबित झालेले, शासक-शास्य-भावानें अभिव्यक्त होणारे, वृक्षगत पक्ष्याप्रमाणें देहोपाधीनें संसक्त न होणारे हृदयस्थ ईश्वर आणि जीव व त्यांचीं अधिष्ठेय जीं महत्तत्त्व, अहंकार आणि पंच-तन्मात्रें हे सात पिप्पल व त्यांचे रक्षक ( या सर्वांच्या वासना वाढविणारीं ) पंच-भूतात्मक शरीराला धारण करणारीं इंद्रियें हीं सर्व तूंच निर्माण केलीं असून तूं त्यांच्या पलीकडचा आहेस. भूत, भविष्य व वर्तमान, चौदा भुवनें व विश्वें तुजपासूनच निर्माण झालीं आहेत. मी तुझा भक्त आहें. मजवर प्रसन्न हो आणि माझ्या हृदयांत कामादिकांचा प्रवेश करवून माझा घात करूं नकोस. तूं आत्म्या-चाहि आत्मा आहेस. आणि तुझें खरें स्वरूप जो जाणतो, तो निरवद्य ब्रह्मस्वरूप पावतो. हे देववर्या, अहंकारादिकांनीं मी युक्त आहें आणि तूं अत्यंत स्तुत्यर्ह आहेस. म्हणून मी तुझी स्तुति यथामति करीत आहें. तिनें प्रसन्न होऊन तूं मला इष्ट वर दे आणि आपली माया दूर कर !

व्यास—नारायण ऋषीची ती स्तुति ऐकून अचिन्त्य पिनाकपाणि नीलकं-ठानें त्या देवाधिदेव नारायणाला इच्छित वर दिले.

श्रीभगवान्—नारायणा, माझ्या प्रसादानें तूं मनुष्यांमध्येंच नव्हे, तर देव-गंधर्वादिकांमध्येंहि अप्रमेय बलवान् होशील. तुझ्या पराक्रमापुढें देव, असुर, महोरग, पिशाच्च, गंधर्व, यक्ष, राक्षस, पक्षी, गज, सिंह आणि व्याघ्रादि पशु हे टिकूं शकणार नाहींत. कोणी देवहि समरांत तुला जिंकूं शकणार नाहीं. माझ्या प्रसादानें कोणीहि शस्त्रानें, वज्रानें, अग्नीनें किंवा वायूनें, आर्द्र-शुष्क पदार्थानें किंवा कांहीं स्थावर-जंगमानें तुला व्यथा करूं शकणार नाहीं. समरांत माझी तुझ्याशीं गांठ पडल्यास तूं माझ्यापेक्षांहि बलवत्तर ठरशील !

( ६ ) अश्वत्थाम्या, श्रीकृष्णानें पूर्वीं असे वर मिळविले आहेत, हें ध्यानांत ठेव. तोच हा नारायण देव सर्व विश्वाला आपल्या मायेनें मोहित करून संचार करीत आहे. त्याच्या तपानें नरनामक महामुनि त्याच्याच योग्यतेचा झाला आहे आणि

तोच हा अर्जुन होय, हें सर्वदा चित्तांत बाळग. तेच हे ब्रह्मादिकांपेक्षांहि श्रेष्ठ व तपःसंपन्न मुनि लोकयात्रा नीट चालावी म्हणून युगायुगाच्या ठिकाणीं जन्म घेत असतात.

महामति अश्वत्थाम्या, तुझीहि उत्पत्ति रुद्रापासूनच झाली असून तुझ्या धर्मकृत्यांनीं व तपश्चर्येनें या दोघांसारखाच तूंहि मोठें तेज व क्रोध धारण करणारा झाला आहेस. तूंहि नारायणाप्रमाणेंच मोठा ज्ञानी असून हें सर्व विश्व शिवमयच आहे, असें जाणून त्या शिवाच्या प्रीतीकरितां आपलें शरीर नियमादिकांनीं कृश करून घेतलेंस आणि हविर्द्रव्याची महापुरुषाच्या आकाराची मूर्ति करून जप, होम आणि उपहार यांहीं करून तिचें अर्चन केलेंस. याप्रमाणें पूर्वजन्मीं शंकराची आराधना करून तूं त्याला संतुष्ट केलेंस, त्यामुळें त्यानें तुला पुष्कळ इच्छित वर दिले.

अशा रीतीनें तुझीं जन्म, कर्म, तप आणि योग हीं त्यांच्याचप्रमाणें फार मोठीं आहेत. प्रत्येक युगांत त्यांनीं लिंगरूप ईश्वराची उपासना केली आणि तूं प्रतिमा करून त्याचें पूजन केलेंस. ईश्वर सर्वरूप आहे, असें जाणून जो लिंगाचे ठिकाणीं त्याची उपासना करितो, त्याची सर्वच ब्रह्म आहे, अशी भावना होते. म्हणून देव, सिद्ध आणि मोठमोठे ऋषि सर्व श्रेष्ठ शंकराची लिंगरूपानें उपासना करितात. केशव हा रुद्राचा भक्त असून त्याच्याचपासून उत्पन्न झाला आहे. म्हणून यज्ञ करून त्या सनातन कृष्णाचें भजन करावें. सर्व भूतांचा उत्पादक ईश्वर आहे, असें जाणून जो त्याच्या लिंगाचें पूजन करितो, त्यावर वृषभध्वज अधिक प्रेम करितो.

संजय—व्यासाचें भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें रुद्रास वंदन केलें आणि त्याच्या मनांत कृष्णाविषयीं अधिकच आदरभाव उत्पन्न झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यानें व्यासाला अभिवंदन केलें आणि सैन्याकडे पाहून त्यास युद्ध थांबविण्याची आज्ञा केली. राजेंद्रा, नंतर पांडवांनीं युद्ध थांबविलें आणि द्रोण युद्धांत पडल्यामुळें दीन झालेले कौरवहि युद्धापासून थांबले. अशाप्रकारें पांच दिवस युद्ध करून आणि पुष्कळ पांडवसैन्याचा संहार करून तो वेदपारंगत ब्राह्मण द्रोण ब्रह्मलोकाला गेला. ७. ८. २०१.

---

## अध्याय २०२ रा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ यदृच्छेनें प्राप्त झालेल्या व्यासास अर्जुनाचा प्रश्न. त्याचें उत्तर. ३ व्यासमुखें रुद्राची स्तुति व त्याचें गुणवर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अतिरथी द्रोण युद्धांत हत झाला असतां माझ्या पुत्रांनीं व पांडवांनीं पुढें काय केलें ?

( २ ) संजय—भरतर्षभा, धृष्टद्युम्नाच्या हातून द्रोणाचार्य मारला जाऊन कौरवसैन्याचा भंग झाला असतां कुंतीपुत्र अर्जुनाला पांडवांना विजयावह असा एक अत्यंत आश्चर्यकारक प्रकार दृष्टीस पडला. तो पाहून त्यानें सहजगत्या प्राप्त झालेल्या व्यासाला त्यासंबंधीं विचारिलें.

अर्जुन—रणांगणावर शरांनीं मी शत्रूंचा संहार करीत असतां अग्नीसारखा देदीप्यमान कोणी पुरुष माझ्या पुढें जात असतां मीं पाहिला. महामुने, प्रदीप्त शूल धारण करून तो ज्या ज्या दिशेला जात असे, त्या त्या ठिकाणीं माझ्या शत्रूंचा संहार होत असे. त्यानें केलेला शत्रूंचा नाश मींच केला असें लोक समजतात. वास्तविक त्यानेंच शत्रूंचा पराजय केला असून तो जिकडे जात असे, तिकडे त्याच्या मागून मी जात असें. भगवन्, तेजानें सूर्यसमान दिसणारा मीं पाहिलेला तो शूलपाणि कोण पुरुषश्रेष्ठ आहे, हें मला सांग. त्याचे पाय भूमीस लागत नसत किंवा तो शूलहि टाकीत नसे. तरी त्याचे तेजानें एका शूलापासून हजारों दुसरे शूल उत्पन्न होत असत !

( ३ ) व्यास—ब्रह्मा, विष्णु, रुद्र यांचा उत्पादक, चिन्मात्ररूप, सर्व शरीरांमध्यें शयन करणारा व त्यांवर सत्ता चालविणारा, आकाश, पृथ्वी व अंतरिक्ष अर्थात् त्रैलोक्य हें ज्याचें शरीर, सर्वलोकेश्वर व सर्वशक्तिमान्, भुवनव्यापी, सर्वाधिपति, वरद रुद्राचें तुला दर्शन झालें. त्या भुवनेश्वराला तूं शरण जा ! तो महादेव जटाधारी, सर्व विश्वाचा अधिपति, त्रिनेत्र, महाबाहु व वल्कलधारी असून त्याला रुद्र, हर व स्थाणु हीं नांवें आहेत. तो सर्व विश्वांत प्रधानपुरुष, अजित, जगदानंदकर, निरुपाधि व चिन्मात्र आहे. तो जगाचा उत्पत्तिकर्ता व कारण म्हणजे जगाला मातृपितृरूप असून त्या जगाचा लयहि त्यामध्येंच होत असतो. तो सदा विजयी आहे. तो विश्वाचा आत्मा, विश्वाचा उत्पत्तिकर्ता व विश्वरूप आहे. तो विश्वाचा ईश्वर असून त्यास वागविणारा आहे. तो सकल कर्मांचा अधिपति आहे. त्याला शंभुहि म्हणतात. तो स्वयंभु असून

सर्व भूतांचा स्वामी आहे. तसाच तो भूत, भविष्य व वर्तमान यांचा उद्भव आहे. तो कर्मयोगादिरूप असून योग्यांना फल देणारा योगेश्वर आहे. तो सर्वात्मक असून सर्वलोकेश्वरांचाहि ईश्वर आहे. तो जगाच्याहि पलीकडील असून सर्वश्रेष्ठ असल्यामुळें त्याला परमेष्ठी असेंहि नांव आहे. तो तिन्ही लोकांचा उत्पत्तिकर्ता असून त्यांचा आधारहि तोच आहे. तो शुद्धात्मा असून त्याला भव व भीम असेंहि म्हणतात. त्याच्या मस्तकावर चंद्र आहे. तो शाश्वत, विश्वाचा आधार व सर्व वागीश्वरांचाहि ईश्वर आहे. अनधिकारी जनांना तो अत्यंत दुष्प्राप्य आहे. तो जगन्नाथ असून जन्म, मृत्यु व जरा यांपलीकडचा आहे. तो ज्ञानस्वरूप असून ज्ञानानेंच गम्य होणारा आहे. त्या ज्ञानरूपी परमात्म्याला जाणणें अत्यंत कठीण आहे. तो भक्तांना प्रसन्न होऊन त्यांना इच्छित वर देत असतो.

त्या प्रभूचे दिव्य पारिषद ( गण ) नानाप्रकारचीं रूपें धारण करीत असतात. कांहीं वामनाकृति, कित्येक जटाधारी, कोणी मुंड, कोणी ह्रस्वग्रीव, कित्येक महोदर, कित्येक महाकर्ण व कित्येक महोत्साही आहेत. पार्था, याप्रमाणें वेडींवांकडीं तोंडें, पाय वगैरे करून व विलक्षण वेष धारण करून हे गण त्या महेश्वर महादेवाची सर्वदा पूजा करीत असतात. अंगावर रोमांच उभे करणाऱ्या त्या घोर संग्रामांत तेजस्वी शिव तुजवरील प्रेमामुळेंच नित्य तुझ्या अग्रभागीं चालत असे. अश्वत्थामा, कर्ण, कृप यांसारख्या महाधनुर्धर वीरांनीं रक्षण केलेल्या सेनेचा भंग करण्याचें त्या बहुरूपी महेश्वरावांचून दुसरा कोण मनांत आणूं शकेल ? तो रुद्र आपल्या अग्रभागीं उभा असतां तीनहि लोकांत त्याच्याशीं टिकाव कोणी धरूं शकणार नाहीं. तो क्रोधानें संतप्त झाला असतां संग्रामांत त्याच्या अंगच्या वासानें केवळ शत्रु मूर्च्छित होऊन, त्यांतील बरेच जण मृत्युमुखीं पडतात. त्याची उपासना करणारे देव नित्य स्वर्गांत राहतात. पृथ्वीवरील जे कोणी अनन्यभावानें त्या वरद, कल्याणप्रद उमापति रुद्राची उपासना करितात, ते इहलोकीं सुख मिळवून परम गतीला पोंचतात.

हे कौंतेया, तूं त्या शांताला, अतिशय सूक्ष्म, अत्यंत दीप्तिमंत नीलकंठ रुद्राला सर्वदा नमन करीत जा. त्या अत्यंत तेजःसंपन्नाला तूं अनन्यभावानें भजत जा. तो जटाधारी व भयंकर स्वरूपाचा असून कुबेरालाहि तोच वर देणारा आहे. प्रहरादिकांचा कर्ता काल तोच असून त्याचें तेज मायेनें वेष्टित असल्यामुळें

अस्पष्ट दिसतें. तो भक्तांचें कल्याण करणारा व सर्वांना स्पृहणीय आहे. त्याचे नेत्र पिंगट वर्णाचे आहेत. तो स्थाणु व आदिपुरुष आहे. त्याचे केंस हरिद्वर्ण असून तो सर्वदा मुंड असतो. तपोनिष्ठत्वामुळें तो नित्य कृश असतो. संसारांतून मानवांना तारणारा तोच आहे. तो सर्वांना प्रकाश देणारा असून अत्यंत पवित्र आहे. तो देवांचाहि देव आहे व अतिवेगवान्‌हि आहे. तो अनेक रूपें धारण करितो. सर्व शुभकारक विधि त्याला प्रिय असून चंद्रहि तोच आहे. त्याचें शिरोभूषण मनोहर असून मुखहि अत्यंत सुंदर आहे. तो सहस्राक्ष असून वृष्टिकर्ताहि तोच आहे. तो पर्वतावर शयन करणारा असून अत्यंत शांत वृत्तीचा आहे. तो सर्वांचें पालन करणारा असून वल्कलधारी आहे. त्याचे बाहु सुवर्णालंकृत आहेत. त्याचें स्वरूप उग्र असून तो दिशांचा व भूतांचा अधिपति आणि पर्जन्याचा स्वामी आहे. अशा त्या शंकराला नमस्कार कर. वृक्षांचा व गाईंचाहि तोच अधिपति आहे. त्याला वंदन कर. तो सर्वदा वृक्षाच्छादित असतो. तो उत्तम प्रकारचा सेनापति असून सर्वांच्या अंतर्यामीं वसति करणारा आहे. यज्ञांमध्यें अध्वर्यु होऊन तोच स्रुवा हस्तांत घेतो. धन्वी भार्गवरामहि तोच होय. नानारूपें धारण करून विश्वाचें पालन करणारा तोच आहे. तो तृणतंतुमय वस्त्रें परिधान करितो. कौंतेया, त्याला सहस्र मस्तकें, सहस्र नयन, सहस्र बाहु आणि सहस्र चरण आहेत. अशा त्या वरद व भुवनेश्वराला तूं शरण जा. तो उमापति, विरूपाक्ष, दक्षयज्ञाचा विध्वंसक, भूतांचा व प्रजांचा पति, अनाकुल व अविनाशी आहे. हा कपर्दी मोठमोठ्या ब्रह्मदेवादिकांसारख्यांनाहि मायेनें भ्रम पाडीत असतो. त्याची नाभि मोठी असून त्याच्या ध्वजावर वृष आहे. त्याचा अहंकार त्रैलोक्यसंहारक्षम असून तो धर्माचा पति आहे. तो इंद्रादि फलदात्यांपेक्षांहि थोर आहे. त्याच्या ध्वजावर वृष आहे. तो धर्मनिष्ठांना फलप्रद होणारा आहे. त्याचा साक्षात्कार धर्मानेंच होत असतो. त्याचे नेत्र वृषभाप्रमाणें आहेत. त्याचीं आयुधें श्रेष्ठ प्रकारचीं असून विष्णु हा त्याचा बाण आहे. त्याचें शरीर धर्मरूप आहे. तो दक्षयज्ञाचा नियंता आहे. अनेक कोटिब्रह्मांडें त्याच्या उदरांत राहिलीं असून त्रैलोक्य हें त्याचें शरीर आहे. तो निरंतर व्याघ्रचर्माच्छादित असतो. तो लोकेश, वरदायक आणि ब्रह्मनिष्ठ असून ब्राह्मणांवर प्रेम करणारा आहे. त्याच्या हातांत त्रिशूल, खड्ग, ढाल, पिनाक हीं आयुधें असून तो सर्व लोकांचा पति आहे, तसाच तो सर्वशक्तिवान्‌हि आहे. त्या शरण्य देवाला मी शरण जात असतों. ज्याचा मित्र कुबेर आहे, अशा त्या सुरेशाला

माझा नमस्कार असो. देवा, तूं मोठा धनुर्धर आहेस, तुला धनुष्य प्रिय असून तूं स्वतः बाणरूप आहेस. तुला माझा नमस्कार असो. प्रत्यंचा आणि धनुष्य हीं तुझींच रूपें आहेत. तूं धनुर्वेदाचा आदिपुरुष आहेस. तुला नमस्कार असो. तुझीं आयुधें उग्र आहेत. तूं सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहेस. तूं अनेक रूपें धारण करणारा आहेस. तुझे धनुर्धरगणहि अनेक आहेत. तुला माझा नमस्कार असो. त्या स्थाणूला, तपस्विश्रेष्ठाला, त्या त्रिपुरनाशकाला, त्या भगनेत्रहराला माझा नमस्कार असो. वनस्पति, नर, माता, गण, पशु, यक्ष यांच्या पतीला माझा नमस्कार असो. तसेंच जल आणि देव यांचा पति जो शंकर त्याला माझा नमस्कार असो. त्या त्रिनेत्रधारी व वरद शंकराला माझा नमस्कार असो. ज्याचा कंठ नीलवर्ण, शरीर पिंगट वर्ण व केंस सोनेरी आहेत, त्या रुद्राला माझा नमस्कार असो.

त्या धीमान् रुद्राचीं जीं दिव्य कर्में मला माहीत आहेत, तीं सर्व आतां तुला सांगतों. तो शंकर क्रुद्ध झाला असतां सुरासुर, गंधर्व, राक्षस जरी पातालांत लपून राहिले, तरी तेथेंहि त्यांस सुखप्राप्ति होणार नाहीं. पूर्वी एकदां दक्षप्रजापतीनें विधिवत् यज्ञाला प्रारंभ केला असतां क्रुद्ध महादेवानें अत्यंत निष्ठुरतेनें त्याचा संहार करून टाकला. त्यानें धनुष्याला बाण जोडून मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां तेथें जमलेल्या लोकांना सुख किंवा शांति तरी कोठून मिळणार? महेश्वर कुपित होऊन यज्ञनारायण पळून जात असतां सर्व लोक उद्विग्न झाले. महादेवानें प्रत्यंचा व तलहस्त यांच्या ध्वनीनें तिन्ही लोक त्रस्त करून सोडले. नंतर सर्व सुरासुरांनीं शंकराला वश होऊन साष्टांग नमस्कार घातला. तो ध्वनि होऊं लागला असतां सर्व जलाशय क्षुब्ध झाले, पृथ्वी कांपूं लागली, पर्वत विदीर्ण झाले आणि नाग मोहित होऊन गेले. जिकडेतिकडे अंधकार पडून दिसेनासें झालें आणि नक्षत्रांचें तेज नाहींसें झालें. ऋषिजनांनीं भयभीत होऊन आपल्या व सर्व भूतांच्या सुखाकरितां शांति केली. त्यावेळीं पूषा पुरोडाश भक्षण करीत असल्याचें पाहून शंकरानें त्याचे दांत तत्काल उपटिले. तें पाहून सर्व देव थरथर कांपूं लागले. त्यांनीं रुद्रास नमस्कार घातला. परंतु संतुष्ट न होतां त्या रुद्रानें त्यांवर तीक्ष्ण बाण टाकले. तेव्हां सर्व देवांनीं प्रणिपातपूर्वक यज्ञांत कांहीं विशिष्ट भाग रुद्रास देण्याचें ठरविलें. हे राजा, याप्रमाणें त्याला भिऊन देव शरण आले. त्यामुळें रुद्र शांत झाला आणि त्यानें तो यज्ञ पुनः घडवून आणला. तेव्हांपासून देव अद्यापि त्या रुद्रास भीत असतात.

पूर्वी स्वर्गामध्यें पराक्रमी असुरांचीं तीन नगरें होतीं. एक लोहमय, एक राजत व एक सौवर्ण अशीं तीं नगरें होतीं. सुवर्णनगराचा कमलाक्ष, राजत नगराचा तारकाक्ष व लोहमय नगराचा विद्युन्माली असे तीन राक्षस त्या नगरांचे अधिपति होते. इंद्रालाहि आपल्या सर्व आयुधांनीं त्यांचा भेद करवला नाहीं. त्या राक्षसांनीं पीडलेले सर्व देव रुद्राला शरण गेले आणि त्याला म्हणाले, "हे त्रिपुरवासी राक्षस ब्रह्मदेवापासून मिळालेल्या वरांमुळें अत्यंत उन्मत्त होऊन त्रैलोक्याला पीडा देत आहेत. देवदेवेशा, यांचा नाश तुझ्यावांचून दुसरा कोणीहि करूं शकणार नाहीं. तरी तूं या सुरद्वेष्ट्यांचा त्वरित नाश कर. मग हे रुद्रा, सर्व यज्ञपशु त्यांना अर्पण न होतां तुलाच अर्पण होतील. हे भुवनेश्वरा, या असुरांचा निःपात तूंच करूं शकशील !"

अशाप्रकारें देवांनीं केलेली प्रार्थना ऐकून त्यांचें हित करण्याच्या उद्देशानें 'ठीक आहे' असें शंकरानें म्हटलें आणि तत्काल एक विलक्षण प्रकारचा रथ तयार करविला. शंकरानें विंध्य व गंधमादन पर्वतांच्या पताका केल्या आणि सागर व वनें यांसह पृथ्वीचा रथ केला. नागेंद्राचा आंस केला आणि चंद्र-सूर्य हीं रथाचीं चक्रें बनविलीं. त्यानें एकपत्र व पुष्पदंत हे अणी ( खिळे ) बनविले. मलयाचें जूं तयार करून तक्षकाचा बंधनरज्जु बनविला. सर्पादि प्राण्यांचे त्यानें तंग करून चार वेदांचे चार हय बनविले. त्या लोकत्रयेश्वरानें उपवेद हे अश्वांच्या तोंडांतील प्रग्रह ( लगाम ) केले आणि गायत्री व सावित्री हे दोन निग्रहरश्मि बनविले. ॐकार हा प्रतोद व ब्रह्मदेव हा सारथि केला. मंदर-पर्वताला गांडीव बनविलें व वासुकि ही त्याची प्रत्यंचा केली. विष्णु हा बाण कल्पून अग्नि हें बाणाग्र बनविलें. वायूचे दोन पंख केले व वैवस्वत यमाला त्या पुंखावर बसविलें. विजेला शाणाश्म ( निसणा ) केलें व मेरुपर्वताला ध्वज बनविलें. अशा सर्व देवमय दिव्य रथावर तो वीरवर, असुरविनाशक, अतुल-पराक्रमी शंकर त्रिपुरासुराच्या नाशाकरितां आरूढ झाला. त्यावेळीं सर्व देव आणि तपस्वी ऋषि त्याची स्तुति करूं लागले. त्या शंकरानें माहेश्वरनामक दिव्य आणि अप्रतिम आसन घातलें होतें. तेथें तीन हजार वर्षे तो बसून होता. नंतर जेव्हां तीं तीन नगरें अंतरिक्षांत एकत्र झालीं, तेव्हां त्या शंकरानें विष्णु, वायु व वैवस्वत यमरूपी पर्वांच्या व गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय अशा अग्निरूपी त्रिशल्य बाणानें त्या त्रिपुरांचा अंत केला !

तो बाण कालाग्नीनें संयुक्त असून विष्णु व सोम यांचा बनविलेला होता.

तो बाण तीं नगरें जाळीत असतां देवी पार्वती तो चमत्कार पाहण्यासाठीं तेथें आली. तिच्या मांडीवर पंचशिखा मस्तकावर असलेला एक बालक होता. पार्वती देवीनें 'हा बालक कोण आहे बरें,' असें जिज्ञासेनें देवांना विचारिलें. तेव्हां इंद्राला मत्सर उत्पन्न होऊन तो आपल्या वज्राचा प्रहार त्या बालकावर करणार, इतक्यांत त्या प्रभूनें (बालकानें) त्या इंद्राचा उभारिलेला हस्त तसाच कुंठित केला!

नंतर तो इंद्र आपला कुंठित हात धरून देवगणांसह ब्रह्मदेवाजवळ गेला आणि सर्वांनीं त्याला वंदन केलें. मग हात जोडून ते त्याला म्हणाले "ब्रह्मन्, पार्वतीच्या मांडीवर बालरूप घेऊन बसलेला कोणी अद्भुत जीव आम्हीं पाहिला, परंतु आम्हीं त्याजकडे दुर्लक्ष्य केलें. मग त्या बालकानें युद्धादि कांहीं न करितां आम्हांला सहज जिंकिलें. तेव्हां तो बालक कोण हें विचारण्याकरितां आम्हीं आलों आहों!"

त्यांचें तें भाषण ऐकून ब्रह्मदेवानें किंचित्काल विचार केला आणि तो बालक म्हणजे अत्यंत तेजस्वी शंभूच होय, असें जाणलें. मग ब्रह्मदेव त्या शक्रादि देवांना म्हणाला, "तो उमेजवळ तुम्हीं पाहिलेला बालक म्हणजे चराचर सृष्टीचा प्रभु शंकरच होय. त्याहून श्रेष्ठ दुसरा कोणी नाहीं. तें बालरूप

---

१ या गोष्टीचें तात्पर्य असें आहे कीं स्थूल, सूक्ष्म, कारण हीं तीन शरीरें म्हणजेच त्रिपुरें होत. अतिप्रेमकरत्व, अल्पसुखकरत्व, आणि मोहमयत्व यांयोगें तीं सौवर्ण, राजत व लोहमय होतीं. कामादिक हे असुर व शमादिक हे देव होते. त्या देवांवर प्रेम करणारा रुद्र म्हणजे आत्मा, पृथ्वीरूप रथ हें त्याचें शरीर आणि त्या रथाला चालना देणारीं चक्रें म्हणजे चंद्र-सूर्यरूपी मन व चक्षु. वेद हे इष्टस्थळीं पोंचविणारे त्या रथाला जोडलेले अश्व होत. विष्णूच्या ठिकाणीं अधिष्ठित सूक्ष्मबुद्धि हा तेथील बाण होता. त्याच्या एकाग्र्यानें शरीरत्रयाचा भेद होऊन ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां कामादिकांचा नाश होतो व शमादिकांची वृद्धि होते. ते वर्धमान झाले असतां रुद्र (आत्मा) हा बालकाप्रमाणें रागद्वेषशून्य ब्रह्मविद्यारूप उमेला वश होतो.

२ ब्रह्मभूत झालेल्या त्या बालकाचा द्वेष करणाऱ्या इंद्रादि कर्मठांना त्यानें योगाच्या तेजानें जिंकल्यावर ते त्याला शरण गेले.

त्यानें पार्वतीसाठींच धरिलें आहे. देवहो, आपण सर्व आतां त्याकडे चला जाऊं !"

तो भगवान् देव सर्व लोकांचा ईश्वर व प्रभु होता. नंतर ते सर्व देव बालार्क-समान त्या तेजस्वी बालाजवळ आले. नंतर ब्रह्मदेवानें त्या बालाला पाहिलें आणि तो प्रत्यक्ष शंकरच आहे असें जाणून त्याला नमन केलें.

ब्रह्मदेव—तूं यज्ञनारायण आहेस, तूं या भुवनाचा पालक आहेस आणि त्याचें लयस्थान तूंच आहेस. तसेंच त्याचें उत्पत्तिकारणहि तूंच आहेस. तूं महा-देव आहेस. तूं सर्वांचें निजधाम असून परम पदहि तूंच आहेस. हें सर्व स्थावर-जंगमात्मक विश्व तूंच व्यापिलें आहेस. हे भगवन्, भूतभविष्यांवर सत्ता चाल-विणारा तूंच आहेस. हे लोकनाथा, हे जगत्पते, हा इंद्र तुझ्या कोपानें पीडित झालेला आहे, तरी त्यावर प्रसाद कर !

व्यास—ब्रह्मदेवाच्या भाषणानें महेश्वर संतुष्ट झाला. इंद्रावर प्रसाद कर-ण्याचें मनांत आणून तो मोठ्यानें हंसला. मग त्या देवांनीं उमेची व शंकराची स्तुति करून त्यांना प्रसन्न केलें. नंतर इंद्राचा हात पूर्वीप्रमाणें झाला. बा अर्जुना, तोच भगवान् रुद्र, तोच शिव आणि तोच अग्नि होय. तो सर्वज्ञ असून इंद्र, वायु, अश्विनीकुमार आणि विद्युतहि तोच आहे. तो भव पर्जन्य असून सनातन महादेवहि तोच आहे. तो चंद्रमा व ईशान असून सूर्य-वरुणहि तोच आहे. काल, अंतक, मृत्यु, यम आणि दिवसरात्रहि तोच आहे. मास, पक्ष, ऋतु, दोन संधिकाल आणि वर्षहि तोच आहे. धाता, विधाता, विश्वात्मा व विश्वकर्ता तोच आहे. तो देहातीत असून त्यानें सर्व देवांचीं शरीरें धारण केलीं आहेत. सर्व देव त्याची स्तुति करितात. तो एक आहे, तसा अने-कहि आहे. एक घोर आणि दुसरें मंगल अशीं त्या देवाचीं दोन रूपें आहेत, असें वेदज्ञ ब्राह्मण समजतात. तीं रूपेंहि पुनः अनेक प्रकारचीं आहेत. अग्नि, विष्णु व सूर्य हीं घोर रूपें व उदक, नक्षत्रें व चंद्र हीं मंगल रूपें होत. वेद, वेदांगें, उपनिषदें, पुराणें व अध्यात्म ग्रंथ हें त्या महेश्वराचें स्वरूप आहे. हा महेश्वर अशा प्रकारचा असून शिवाय अजहि आहे. त्या भगवंताचे सर्व गुण सांगण्यास हजारों वर्षें पुरीं होणार नाहींत. दुष्ट ग्रहांनीं पीडित व सर्व पापांनीं युक्त मनुष्य त्या शंकराला शरण गेला, तर तो प्रसन्न होऊन त्याला तत्काल मुक्त करितो. आयुष्य, आरोग्य, वित्त, अनेक भोग मनुष्यांना तोच देतो आणि

पुनः त्यांचें हरणहि तोच करितो. इंद्रादि देव भोगीत असलेलें ऐश्वर्य त्याचेंच आहे. मनुष्याचें शुभाशुभ हाच करीत असतो. तोच सर्व काम ( इच्छा ) पुरविणारा ईश्वर आहे. अनेक प्रकारचीं रूपें धारण करून त्यानें सर्व विश्व व्यापिलें आहे. त्या देवाचें तोंड समुद्रांत आहे, त्याला वडवा मुख म्हणतात. या मुखानें तो उदकमय हवि प्राशन करितो. त्या देवाचा वास काशींत नित्य असतो. तेथें सर्व लोक त्याचें भजन करितात. त्याचे दीप्त व घोर स्वरूपावरून लोक त्याला अनेक नांवांनीं संबोधितात. तीं नांवें त्याच्या महत्त्वावरून, विभुत्वावरून आणि कर्मावरून पडलीं आहेत. वेदामध्यें शतरुद्रिय म्हणून त्याच्या संबंधीं एक प्रपाठक सांगितला आहे, त्याला अनंतरुद्र म्हटलें असून तो त्या महात्म्याचें उपस्थान आहे. तो देव सर्वव्यापक असून सर्वसत्ताधीशहि आहे. ब्राह्मण व मुनि त्याला महाभूत म्हणत असतात. तोच देवांचा प्रजापति असून त्याच्या मुखांतून अग्नीची उत्पत्ति झाली आहे, तो पशूंचें सर्व प्रकारें पालन करितो, त्यांच्यांशीं रममाण होतो आणि तो त्यांचा अधिपतिहि आहे, म्हणून त्याला पशुपति म्हणतात, हा त्रैलोक्यास मोठेपणा देतो, म्हणून यास महेश्वर म्हणत असतात.

ऋषि, देव, गंधर्व आणि अप्सरा ह्याच्या लिंगाचें पूजन करितात. त्या पूजनानें त्याला आनंद, सुख, संतोष आणि परम हर्ष होतो. भूत, भविष्य व वर्तमानकालीं त्याचें अनेक प्रकारचें रूप असल्यामुळें त्याला बहुरूप म्हणतात. तो एकाक्ष असून अत्यंत जाज्वल्य आहे. तो क्रुद्ध झाला असतां सर्व विश्वांत संचार करितो, म्हणून त्याला सर्व ही संज्ञा दिली आहे. क्रोधानें धूम्राप्रमाणें त्याचें रूप असल्यामुळें त्याला धूर्जटि हें नांव पडलें आहे. विश्वेदेवांचा त्याच्याचमध्यें अंतर्भाव होत असल्यामुळें त्याला विश्वदेव म्हणतात. तो भुवनेश्वर स्वर्ग, जल व पृथ्वी या तीन देवतांचें–अंबांचें–पालन करितो, म्हणून त्यास त्र्यंबक संज्ञा प्राप्त झाली आहे. तो सर्वदा लोकांची संपत्ति वृद्धिंगत करून त्यांचें कल्याण इच्छितो, म्हणून त्याला शिव म्हणत असतात. त्याला हजार, तसे सर्व बाजूंनींहि नेत्र आहेत ! ह्या महत् विश्वाचें तो पालन करितो, म्हणून त्याला महादेव नांव पडलें आहे. विश्वाच्या उत्पत्तीपूर्वीं तो होता, आणि सृष्टिकालीं प्राणरूपानें आहे. असा सर्व रूपांमध्यें तो निर्विकार राहूं लागल्यामुळें त्याला स्थाणु म्हणतात. सूर्य-चंद्रांचे जे किरण पृथ्वीवर पसरतात, ते ह्या शंकराचे केश होत. म्हणून त्याला व्योमकेश ही संज्ञा पडली आहे.

भूत, भविष्य व वर्तमान हें सारें विश्व त्याचेंच स्वरूप असून त्याचा उगमहि त्यापासूनच आहे, म्हणून त्याला भव म्हणतात. कपि म्हणजे श्रेष्ठ आणि वृष म्हणजे धर्म, म्हणून त्या देवदेवाला वृषाकपि ही संज्ञा आहे. ब्रह्मा, वरुण, यम व कुबेर यांना स्वाधीन ठेवून तो त्यांचें हरण करितो, म्हणून त्याला हर म्हणतात. त्या महेश्वरानें आपले दोन्हीं नेत्र मिटून ललाटाच्या ठिकाणीं तिसरा नेत्र उत्पन्न केला म्हणून त्याला त्र्यक्ष हें नांव पडलें. तो प्राण्यांच्या देहांत प्राणायामादि वायुरूपानें राहतो. जो त्या महात्म्याच्या प्रतिमेची, विशेषतः केवळ लिंगाचीच पूजा करितो, तो मोठें ऐश्वर्य पावतो. त्याच्या ऊरूखालचा अर्धा भाग अग्नि असून वरील मंगलप्रद चंद्र आहे. तसेंच त्याच्या आत्म्याचेहि अग्नि आणि सोम असे दोन भाग कल्पिले आहेत. त्याची जी शिवा-मंगलकारक-तनु आहे, ती स्वर्गांत—देवलोकांत—असून अत्यंत विस्तृत, तेजस्वी व दिव्य स्वरूपाची आहे व दुसरी उग्र व घोर असून ती मनुष्यलोकांत आहे. पहिलीच्या योगानें हा ब्रह्मचर्याचें आचरण करितो व दुसरीमुळें हा सर्वांचा नाश करितो. तो शस्त्राप्रमाणें तीक्ष्ण, यमाप्रमाणें उग्र व कालाप्रमाणें प्रतापी असून मांस व शोणित भक्षण करितो, म्हणून त्याला रुद्र म्हणतात. हे पार्था, तुझ्या अग्रभागीं शत्रूंचा वध करीत असतां जो तूं पाहिलास, तो हा महादेवच होय. हे अनघा, तूं जयद्रथाच्या वधाची प्रतिज्ञा केल्यावर कृष्णानें ज्याचें दर्शन तुला हिमाचलाच्या माथ्यावर करविलें, तोच हा भगवान् शंकर रणांगणांत तुझ्या अग्रभागीं जात असे. ज्या अस्त्रांनीं तूं दानवांचा संहार केलास, तीं अस्त्रें तुला ह्यानेंच दिलीं आहेत.

पार्था, त्या देवाधिदेवाचें धन्य, यशोदायक, आयुष्यवर्धक, पुण्यकारक असें वेदसंमत शतरुद्रिय स्तोत्र तुला सांगितलें. हें सर्वार्थसाधक असून सर्व पापांचा नाश करणारें आहे. तसेंच सर्व दुःखांचें व भयांचें हरण करणारें आहे. हें चतुर्विध स्तोत्र जो नित्य श्रवण करितो, तो सर्व शत्रूंना जिंकितो आणि रुद्रलोकीं थोर पद पावतो. हें महेश्वराचें स्तोत्र रणांगणावर अवश्य पठण करावें, असें सांगितलें आहे. जो शंकराच्या ह्या स्तोत्राचें नित्य पठण किंवा श्रवण करितो, त्यावर त्र्यंबक प्रसन्न होतो व त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण करितो. कौंतेया, जा आणि युद्ध कर! ज्या तुझा मंत्री व रक्षक जनार्दन स्वतः तुझ्या पार्श्वभागीं उभा आहे, त्या तुझा पराजय कधींहि होणार नाहीं.

संजय—हे अरिंदमा, पराशरसुत व्यास अर्जुनाला याप्रमाणें सांगून निघून गेला. राजन्, असे पांच दिवस घोर युद्ध करून तो महाबलिष्ठ ब्राह्मण मृत होऊन ब्रह्मलोकीं गेला.

वेदाचे अध्ययनानें जें पुण्य प्राप्त होतें, तें या पर्वाच्या श्रवणानेंहि मिळतें. धैर्यसंपन्न क्षत्रियांना याचे श्रवणानें मोठें यश लाभतें. जो हें पर्व नित्य पठण करितो किंवा श्रवण करितो तो सर्व महापापांपासून किंवा घोर कर्मांपासून मुक्त होतो. याच्या योगानें ब्राह्मणाला यज्ञ केल्याचें फल मिळतें व क्षत्रियांना घोर युद्धामध्यें यशःप्राप्तीचा लाभ होतो. शेष राहिलेल्या वर्णांच्या पुत्रपौत्रादि इष्ट कामना परिपूर्ण होतात. ७. ८. २०२.

( येथें नारायणास्त्रमोक्षपर्व नांवाचें आठवें उपपर्व समाप्त झालें. )

[ सातवें द्रोणपर्व संपूर्ण. ]

---

यापुढें आठवें कर्णपर्व लागेल. त्याचा पहिला श्लोक हा आहे—

वैशंपायन—ततो द्रोणे हते राजन् दुर्योधनमुखा नृपाः ।
भृशमुद्विग्नमनसो द्रोणपुत्रमुपाद्रवन् ॥

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



### अष्टम खंड.

## ८ कर्णपर्व.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥



### अध्याय १ ला.

[ १ दुर्योधनादिक राजे अश्वत्थाम्याकडे जातात. २ कौरव-पांडवसैन्यामध्यें घनघोरयुद्ध. ३ जनमेजयाचा प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन—हे राजन्, द्रोणाचा वध झाला असतां दुर्योधनादिक राजे अत्यंत उद्विग्न होऊन अश्वत्थाम्याकडे गेले. शोकावेग तीव्र होऊन त्यांचें सामर्थ्य खचून गेलें आणि आचार्यांविषयीं शोक करीत ते अश्वत्थाम्यासभोंवतीं बसले. थोड्या वेळानें चित्ताची स्वस्थता झाल्यावर प्रदोषकालीं ते सर्व राजे आपापल्या स्थानीं परत गेले. आतां पुढें मोठा क्षय होणार, ही गोष्ट त्यांच्या मनांत येऊन ते दुःखानें व्याप्त झाले. त्यांत मुख्यत्वें राजा दुर्योधन, कर्ण, दुःशासन आणि शकुनि हे विशेषच चिंताग्रस्त झाले होते! त्या रात्रीं ते दुर्योधनाचेच शिबिरांत राहिले. त्यांनीं पांडवांना आजपर्यंत दिलेले क्लेश व विशेषतः द्रौपदीला सभेंत आणवून तिचा केलेला छळ हे विचार त्यांच्या मनांत येऊन ते अत्यंत दुःखाकुल झाले होते! तसेंच कपटद्यूतानें पांडवांना**

वेळोवेळीं दिलेल्या क्लेशांचें व द्रौपदीच्या कचग्रहणादिकांचें स्मरण होऊन त्यांना ती रात्र वर्षशतासमान गेली.

( २ ) नंतर प्रभातकाल प्राप्त होतांच सर्वांनीं आपापलीं नित्यकर्मैं यथाविधि आटोपलीं. हे भारता, नंतर अल्पावकाशानें मनःस्वास्थ्य प्राप्त झाल्यावर ते सर्व तयार होऊन युद्धाला निघाले. त्यांनीं कर्णाला सेनापतिपद दिलें आणि कंकणबंधनादि मंगलाचार केले. दधिपात्र, घृत आणि अक्षतादिकांनीं द्विजश्रेष्ठांचें त्यांनीं पूजन केलें आणि गाई, अश्व, निष्क, वस्त्रें आणि मोठमोठ्या दक्षिणा वांटल्या. तसेंच सूत, मागध, स्तुतिपाठक इत्यादिकांचे आशीर्वाद संपादन करून ते युद्धाकरितां निघाले. हे राजा, पांडवांनींहि आपलीं पूर्वाह्णिक कर्मैं संपविलीं आणि आपापल्या शिबिरांतून युद्धार्थ प्रयाण केलें !

नंतर त्या जयाभिलाषी पांडव-कौरवांचें अंगावर रोमांच उभे करणारें तुमुल युद्ध झालें ! कर्णाचे सेनापतित्वाखालीं तें अद्भुत युद्ध दोन दिवस सारखें चाललें होतें ! त्या युद्धांत कर्णानें शत्रूंचा भयंकर क्षय केला, परंतु अंतीं धृतराष्ट्रपुत्रांच्या समक्ष अर्जुनानें त्याचा वध केला ! नंतर संजय तत्काल हस्तिनापुराला गेला आणि रणांगणांत घडलेला सर्व वृत्तांत त्यानें धृतराष्ट्राला कथन केला !

( ३ ) जनमेजय—द्विजश्रेष्ठा, गंगासुत भीष्म आणि महारथ द्रोण रणांत हत झाल्याचें समजतांच ज्याला अत्यंत दुःख झालें, त्या वृद्ध धृतराष्ट्राला दुर्योधनहितैषी कर्णाचा वध झाल्याचें समजतांच त्यानें आपले प्राण कसे बरें धारण केले? ज्या कर्णाला सेनापति केलें असतां आपल्या पुत्राला निःसंशय जय मिळेल, अशी धृतराष्ट्राला मोठी आशा होती, तो कर्ण मृत झाल्याचें ऐकून तो जीवंत तरी कसा राहिला? कर्णाचा वध झाल्याचें श्रवण करून धृतराष्ट्रानें प्राण सोडिला नाहीं, त्याअर्थी मनुष्य कितीहि संकटांत पडला, तरी दुःखानें मरून जाणें त्याच्या हातांत नाहीं, असें मला वाटतें. हे द्विजवर्या, भीष्म, बाल्हीक, द्रोण, सोमदत्त, भूरिश्रवा, इतर आप्त आणि पुत्र-पौत्र हे हत झाल्याचें श्रवण करूनहि धृतराष्ट्रानें प्राण सोडला नाहीं, त्याअर्थी प्राणत्याग करणें हें अत्यंत दुष्कर आहे, असें मी म्हणतों. हे महामुने, हें सर्व वर्तमान तूं मला विस्तारानें कथन कर ! आपल्या पूर्वजांचें महत् चरित्र कितीहि श्रवण केलें, तरी माझी तृप्ति होत नाहीं. ८. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ धृतराष्ट्र-संजयसंवाद. ]

( १ ) वैशंपायन—हे महाराजा, कर्णाचा वध झाल्यावर अत्यंत उद्विग्न होऊन संजय वायुवेगानें अश्व चालवून हस्तिनापुराला आला व दीन वदनानें धृतराष्ट्राच्या सदनीं गेला. तेथें त्याचे आप्तेष्ट वगैरे कोणी विशेषसे नव्हते. यावेळीं धृतराष्ट्राचा चेहरा काळजीनें निस्तेज झालेला दिसत होता. संजयानें दोन्हीं हात जोडून धृतराष्ट्राचे पायांचें वंदन केलें. नंतर यथान्याय त्याचें पूजन करून 'हायहाय' असे उद्गार काढून त्यानें बोलण्यास प्रारंभ केला. तो म्हणाला, " हे क्षितिपते, मी संजय आहें. तुझें कुशल आहेना ? आपल्याच अपराधांनीं तूं संकटांत पडला आहेस ! तुझें चित्त स्थिर आहे ना ? विदुर, द्रोण, भीष्म, केशव यांनीं तुझ्या हिताच्या अनेक गोष्टी सांगितल्या असतां तूं त्यांकडे दुर्लक्ष्य केलेंस ! त्यांच्या स्मरणानें तुला खेद नाहींना होत ? परशुराम, नारद, कण्व आदिकरून थोर पुरुषांनीं तुझें कल्याण कशांत आहे, हें तुला सभेमध्यें सांगितलें असतांहि त्याचा तूं स्वीकार केला नाहींस ! त्यामुळें तूं व्यथित होत नाहींसना ? तसेंच हे राजा, तुझ्या हिताकरितां झटणारे भीष्मद्रोणादि शत्रूंकडून युद्धांत मारले गेले, त्याची स्मृति होऊन तुला क्लेश होत नाहींत ना ?

संजयानें हात जोडून असें बोलल्यावर धृतराष्ट्रानें दीर्घ निश्वास टाकला व अत्यंत कष्टी होऊन बोलला.

धृतराष्ट्र—संजया, दिव्यास्त्रवेत्ता शूर भीष्म आणि महाधनुर्धर द्रोण यांच्या वधानें माझें मन अति व्यथित झालें आहे. त्या तेजस्वी वसुसंभव भीष्माला प्रत्येक दिवशीं दशसहस्र कवचवेष्टित रथ्यांचा वध करण्याची शक्ति होती ! ज्याला साक्षात् भार्गवरामानें दिव्यास्त्र अर्पण केलें व बालपणीं धनुर्वेद शिकविला, त्या भीष्माचा अर्जुनानें यज्ञसेनपुत्र शिखंडीकडून वध करविला, हें ऐकून मला अत्यंत खेद झाला ! तसेंच ज्याच्या प्रसादानें पांडव व दुसरेहि कित्येक राजे महारथी झाले, त्या सत्यप्रतिज्ञ महाधनुर्धर द्रोणाला धृष्टद्युम्नानें रणांत मारलें, ह्या गोष्टीनें माझ्या अंतःकरणाला भयंकर वेदना होत आहेत. संजया, शरयुद्ध, बाणयुद्ध, खड्गयुद्ध आणि अस्त्रयुद्ध या चारी प्रकारच्या युद्धांत ज्यांची बरोबरी करणारा कोणी वीर नाहीं, त्या भीष्मद्रोणांची वधवार्ता ऐकून मला क्लेश होत आहेत ! अस्त्रविद्येंत ज्याच्या तोडीचा योद्धा

त्रैलोक्यांतहि आवळून यावयाचा नाहीं, त्या द्रोणाचा वध झाल्यावर माझ्या वीरांनीं काय केलें? संजया, महात्म्या अर्जुनानें संशप्तकांचें सैन्य यमलोकीं पाठविल्यावर आणि अश्वत्थाम्याच्या नारायणास्त्राचा संहार झाल्यावर सैन्याची सर्वत्र पळापळ सुरू झाली, तेव्हां माझ्या वीरांनीं काय बरें केलें? नौका समुद्रांत फुटून पाण्यांत बुडणारे लोक प्राणरक्षणार्थ जसा हरएक प्रकारचा प्रयत्न करितात, त्याप्रमाणें द्रोणाच्या वधानंतर माझ्या सैनिकांनीं जीविताशेनें पलायन केलें, असें मला वाटतें. सैन्य पळून जात असतां दुर्योधन, कर्ण, भोजराज, कृतवर्मा, मद्रराज, शल्य, कृपाचार्य, द्रौणि, माझे अवशिष्ट पुत्र आणि इतर योद्धे यांचे चेहरे कसे दिसत होते, हें सर्व, हे संजया, तूं मला इत्थंभूत सांग! तसेंच पांडव व माझ्या पुत्रांनीं केलेल्या पराक्रमाचेंहि निवेदन मला कर!

संजय—तुझ्या अपराधामुळें कौरवांच्या हातून जें कांहीं घडलें, तें ऐकून तूं शोक करूं नकोस! दैवानें घडणाऱ्या गोष्टींवरून सुज्ञलोक कधींहि दुःख करीत नसतात. एखादी गोष्ट घडणें किंवा न घडणें हें दैवावर अवलंबून आहे. म्हणून घडली काय किंवा न घडली काय, शहाणे पुरुष तीबद्दल खेद करीत नाहींत.

धृतराष्ट्र—संजया, दैवानेंच ह्या सर्व गोष्टी ठरल्या असल्यामुळें मला त्यामुळें दुःख वाटत नाहीं. तुला सांगायाचें असेल, तें तूं मला सांग! ८. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ दुर्योधनकृत कर्णपराक्रमवर्णन. २ संजयकृत युद्धवर्णन व अंतीं कर्णवधकथन. ]

( १ ) संजय—महाधनुर्धर द्रोणाचा वध झाला असतां तुझे महारथी पुत्र अस्वस्थचित्त, दुःखी आणि परम विमनस्क झाले. हे राजा, सर्व शस्त्रधारी वीर अवाङ्मुख होऊन एकमेकांकडे पाहत राहिले. शोकामुळें त्यांच्यानें बोलवेना. त्यांची अशी स्थिति पाहून हे भारता, तुझें सैन्य दुःखग्रस्त होऊन आकाशाकडे पाहत तटस्थ राहिलें. राजेंद्रा, युद्धांत द्रोण पडल्याचें समजतांच त्यांच्या हातांतील रक्तानें लिप्त झालेलीं आयुधें भीतीनें एकदम गळून पडलीं आणि तीं पाहून पुढील अरिष्टसूचक नक्षत्रें आकाशांतून खालीं पडत आहेत असें भासलें. सैन्य निर्वीर्य झाल्याचें पाहून दुर्योधन म्हणाला, “तुमच्या बाहुवीर्यावर विश्वास

ठेवून मीं पांडवांना युद्धार्थ आह्वान केलें आणि नंतर युद्ध प्रवृत्त झालें! परंतु द्रोणाचा वध होतांच तें तुमचें वीर्य निःसत्त्व दिसत आहे. योद्ध्यांचा वध हा युद्धांत सर्वदा व्हावयाचाच. जय किंवा वध ह्यांपैकीं एक युद्धांत वीरांच्या वांट्याला यावयाचें, यांत आश्चर्य तें कसलें? वीरहो, तुम्ही सर्वत्र नजर ठेवून युद्धाला लागा! पहा हा बलवान् महाधनुर्धर वैकर्तन कर्ण रणभूमीवर कसा संचार करीत आहे? याजकडील दिव्यास्त्रांमुळें याशीं युद्ध करण्यास कुंतीपुत्र धनंजयहि असमर्थ आहे! सिंहापुढें क्षुद्र हरिणाप्रमाणें ह्याच्यापुढें मंद होऊन तो सर्वदा निघून जातो. दशसहस्र नागांचें बळ असणाऱ्या बलवान् भीमाची यानें कशी दुर्दशा केली, ते तुम्हीं पाहिलेंच आहे! ज्यानें मोठी गर्जना करून आपल्या अमोघ शक्तीनें दिव्यास्त्रवेत्त्या शूर आणि मायावी घटोत्कचाचा वध केला, त्या अतुलपराक्रमी, सत्यप्रतिज्ञ आणि बुद्धिमान् कर्णाचें अक्षय्य बाहुवीर्य आज रणांगणावर अवलोकन करा! पराक्रमी द्रोणपुत्र अश्वत्थामा आणि राधेय कर्ण यांचें समरशौर्य विष्णु व इंद्र यांच्या पराक्रमा-प्रमाणें आज पांडव पाहोत! तुम्हांपैकीं प्रत्येक वीर रणांत ससैन्य पांडवांचा वध करण्यास समर्थ आहे, मग तुम्हीं सर्व एकत्र झाल्यावर पांडवांचा नाश कराल, यांत नवल तें काय! म्हणून तुम्हीं तुमचा पराक्रम व रणनैपुण्य आज पर-स्परांना दाखवा!"

( २ ) हे अनघा, असें बोलून तुझ्या दुर्योधनपुत्रानें कर्णाला सेनापतिपद देण्याचें बंधुवर्गाशीं निश्चित केलें आणि त्याप्रमाणें त्याला तें दिलें. कर्णाला सेनापतित्व प्राप्त होतांच त्यानें मोठ्यानें सिंहनाद केला आणि तो मोठ्या रणोत्साहानें युद्ध करूं लागला. त्यानें सर्व सृंजयांचा, पांचालांचा, केकयांचा व विदेहांचा मोठा क्षय केला. त्या कर्णाच्या शरासनापासून सुटणाऱ्या शेंकडो बाणांचे पुंख दुसऱ्या बाणांच्या अग्रांशीं संसक्त झाल्यामुळें जणुंकाय भ्रमरपंक्तीच जात असल्याचें भासत होतें. त्यानें पांचालांचा आणि तेजस्वी पांडवांचा उच्छेद करून हजारों योद्ध्यांचा संहार केला. शेवटीं अर्जुनानें त्या कर्णाचा वध केला! ८. १.

## अध्याय ४ था.

[ १ धृतराष्ट्रविलाप. २ युद्धविषयक धृतराष्ट्राचा प्रश्न व संजयाचें उत्तर. ]

( १ ) वैशंपायन—हे महाराजा, याप्रमाणें संजयाचे मुखानें कर्णाचा वध झाल्याचें ऐकून अंबिकासुत धृतराष्ट्राला अनावर शोक झाला. त्याला आपला पुत्र दुर्योधन याचाच वध झाल्यासारखें वाटून तो संज्ञाहीन होऊन हत्तीसारखा भूमीवर पडला. तो राजश्रेष्ठ मूर्च्छित पडल्याचें ऐकून हे भरतसत्तमा, सर्व स्त्रियांनीं मोठा शोक केला ! त्या आक्रोशानें सर्व पृथ्वी व्याप्त झाली. कौरव-स्त्रिया दुःखसागरांत शोकमग्न होऊन दीनस्वरानें रुदन करूं लागल्या ! हे भरतवर्षभा, गांधारी धृतराष्ट्राजवळ गेली आणि त्याला पाहून तीहि निःसंज्ञ होऊन भूमीवर पडली ! इतर स्त्रियांचीहि तीच स्थिति झाली !

हे राजन्, शोकानें नेत्रांतून अश्रू ढाळणाऱ्या त्या स्त्रियांचें विदुरानें आश्वासनपर शब्दांनीं समाधान केलें. तथापि वाऱ्यानें हालवून सोडलेल्या कदलीं-प्रमाणें भयानें त्या कांपतच होत्या. मग विदुरानें धृतराष्ट्रावर जलसेक केल्यावर तो हळूहळू देहभानावर आला. त्यानें अंतःपुरांतील स्त्रियांकडे पाहिलें, तों त्यांची ती करुणाजनक स्थिति पाहून तो अगदीं भ्रांतचित्त झाला. नंतर कांहीं वेळ विचार करून व पुनः पुनः निश्वास टाकून त्यानें आपल्या पुत्रांची निर्भर्त्सना व पांडवांची प्रशंसा केली. त्यानें आपल्या व शकुनीच्या बुद्धि-मत्तेचा तिरस्कार केला. बराच काळ त्यानें चिंतनांत घालविला व तो सारखा कांपूं लागला. शेवटीं त्यानें मन शांत करून व धैर्य धरून संजयाला विचारिलें—

(२) धृतराष्ट्र—संजया, तूं मला सांगितलेंस, तें मीं सर्व ऐकिलें. सूता, सर्वदा जयाची आशा बाळगणारा व सांप्रत त्यासंबंधीं निराश झालेला माझा पुत्र यमसदनीं गेला तर नाहीं ना ? संजया, तूं सांगितलेली हकीकत पुनः एकदां मला विस्तारानें सांग पाहूं !

जनमेजया, धृतराष्ट्रानें विचारल्यावरून संजय त्याला बोलला, "राजा, आपले पुत्र, महाधनुर्धर बंधु व प्राणांचीहि पर्वा न करून युद्ध करणारे सूतपुत्र यांसह महारथ कर्णाचा वध झाला तसेंच त्या यशस्वी भीमसेनानें दुःशास-नाला रणांत मारलें व क्रोधानें त्याच्या रक्ताचें प्राशन केलें !" ८. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ पांडव–कौरवांपैकीं कोण कोण वीर मृत्यु पावले व कोण कोण जीवंत आहेत, एतद्विषयक धृतराष्ट्राचा प्रश्न. २ कौरवपक्षांतील पतन पावलेल्या वीरांचें संजयाकडून कथन. ]

( १ ) **वैशंपायन**—महाराजा, संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र शोकाकुल मनानें संजयाला म्हणाला, " माझ्या अल्पायुषी पुत्राच्या दुर्नीतीनेंच कर्णाचा वध झाला ! त्यामुळें झालेला शोक माझ्या मर्मांवर आघात करीत आहे. म्हणून पांडव व कौरव यांपैकीं कोण कोण हत झाले व कोण कोण जीवंत आहेत, तें मला सांग, व माझा संशय दूर कर ! तेणेंकरून मी शोकसागराच्या परतीराला जाऊं शकेन ! "

( २ ) **संजय**—राजन्, प्रतापी व दुराधर्ष भीष्म दहा दिवसांत कोट्यवधि पांडववीरांना मारून शेवटीं आपण पडला ! तसेंच महाधनुर्धर द्रोणहि अनेक पांचाल रथ्यांचा युद्धांत संहार करून अंतीं पतन पावला ! भीष्म-द्रोणांच्या हातून वांचलेल्या पांडवसेनेचा अर्धभाग कर्णानें संहार केला, परंतु अंतीं तो निधन पावला ! हे महाराजा, बलवान् विविंशति राजपुत्रानें शेंकडो आनर्त-वीरांचा वध करून तो रणांत हत झाला ! तुझा शूरपुत्र विकर्ण अश्व व आयुधें क्षीण झालीं असतांहि शेवटपर्यंत शत्रूंच्या अभिमुख स्थित होता. त्याचा दुर्योधनानें द्रौपदीला दिलेले क्लेश लक्ष्यांत आणून भीमसेनानें आपल्या प्रतिज्ञे-प्रमाणें वध केला ! अवंतीराजपुत्र विंदानुविंद हेहि थोर पराक्रम गाजवून अंतीं यमसदनीं गेले ! सिंधुराष्ट्रादि दहा राज्यें ज्याच्या ताब्यांत असून जो तुझा आज्ञांकित होता, त्या जयद्रथाच्या अकरा अक्षौहिणी सैन्याला तीक्ष्ण बाणांनीं जिंकून अखेरीला त्या वीर्यवंताला अर्जुनानें यमलोकीं पाठविलें. अत्यंत वेगवान्, युद्धदुर्मद आणि पित्याचा आज्ञाधारक जो दुर्योधनपुत्र त्याला सौभद्र अभिमन्यूनें मारिलें. अतिशूर, बाहुशाली व रणोत्कट दौःशासनि यालाहि द्रौपदीपुत्रानें गांठून मृत्युलोकीं पाठविलें !

राजा धृतराष्ट्रा, किरातांचा व सागरतीरीं रहाणाऱ्यांचा अधिपति भगदत्त हा देवराजाचा प्रिय मित्र असून परम क्षात्रधर्मरत होता, त्यास धनंजयानें मोठा पराक्रम गाजवून परलोकीं पाठविलें. हे राजा, कौरवांचा दायाद भूरिश्रवा हा शस्त्रन्यास करून राहिला असतां सात्यकीकडून रणांत मारला

गेला ! क्षत्रियांमध्यें धुरंधर अंबष्ठांचा राजा श्रुतायु मोठ्या धैर्यानें रणांत संचार करीत असतां धनंजयाच्या हातीं निधन पावला ! हे राजा, शस्त्रास्त्रकुशल व रणांत अजिंक्य तुझ्या दुःशासन पुत्रास भीमसेनानें वधिलें ! हजारों गजसैन्यांचा अधिपति सुदक्षिण हाहि समरांत अर्जुनाकडून वध पावला. कोसलांच्या राजानें शत्रूकडील अनेक मोठमोठ्या वीरांस युद्धांत मारिलें व शेवटीं तो अभिमन्यूच्या हातीं मृत्युमुखीं पडला ! तुझा पुत्र चित्रसेन, यानें अनेक युक्तींनीं भीमसेनाशीं युद्ध केलें, परंतु अखेरीला त्याच्याच हातून मृत्यु पावला ! युद्धांत शत्रूंना भयभीत करून सोडणारा मद्रराजाचा शूर पुत्र खड्ग-चर्म धारण करून युद्ध करीत असतां अभिमन्यूच्या हस्तें पतन पावला ! समरांत कर्णाच्या बरोबरीच्या महाप्रतापी अस्त्रज्ञ वृषसेनानें केलेला अभिमन्यूचा वध आणि आपली प्रतिज्ञा लक्ष्यांत आणून कर्णाच्या समक्ष अर्जुनानें त्याला वधिलें !

पांडवांशीं सदोदित वैर करणाऱ्या श्रुतायु राजाला त्या वैराची आठवण देऊन अर्जुनानें मारिलें ! राजन्, मोठा पराक्रमी शल्यपुत्र रुक्मरथ हा सहदेवाचा मामेभाऊ असतांहि सहदेवानें त्याचें रणांत हनन केलें. वृद्ध भगीरथ राजा आणि केकयराजा बृहत्क्षत्र हे मोठे पराक्रमी असूनहि युद्धांत पतन पावले ! भगदत्ताचा पुत्र मोठा बुद्धिमान् व अत्यंत बलवान् असूनहि श्येनपक्ष्याप्रमाणें समरांत संचार करणाऱ्या नकुलाकडून निधन पावला ! तुझा पराक्रमी पितामह बाल्हीक याचा बाल्हीक योद्ध्यांसह भीमाकडून वध झाला ! जरासंधाचा बलवान् पुत्र मागधाधिपति जयत्सेन महात्म्या सौभद्राकडून मारला गेला ! हे राजा, तुझे पुत्र महारथ दुर्मुख व दुःसह यांचा भीमसेनानें गदेच्या प्रहारानें वध केला ! महारथ दुर्मर्षण, दुर्विषद आणि दुर्जय यांनीं मोठा पराक्रम केला, परंतु अंतीं तेहि यमलोकीं गेले ! युद्धदुर्मद दोघे बंधु कलिंग व वृषभ यांनीं थोर पराक्रम गाजविला आणि अखेरीला यमलोकाची वाट धरिली ! राजा, तुझा परम जयशाली सचिव वृषवर्मा हा भीमसेनाच्या पराक्रमाला बळी पडला ! दशसहस्र नागांचें बल धारण करणारा पौरव राजा ह्याचा सव्यसाची अर्जुनानें रणांत घात केला ! दोनहजार शूर वसाति व जयशाली शूरसेनांचा युद्धांत वध झाला ! कवचधारी शूर अभीषाह आणि रणोत्कट व रथिश्रेष्ठ शिबि हे कलिंगांसह मृत्युवश झाले ! हजारों श्रेणि व संशप्तकांचे संघ यांचा अर्जुनानें संहार केला ! महाराजा, तुझे श्याल वृषक व अचल हे राजे तुझ्याकरितां मोठा पराक्रम करून अर्जुनाहातीं हत झाले ! शाल्वदेशाचा राजा उग्रकर्मा हा नांवानें आणि

कर्मानें (पराक्रमानें) उग्र होता, परंतु त्याला भीमसेनानें गदेनें रणांत मारिलें ! हे महाराजा, आपल्या दुर्योधन मित्राकरितां ओघवान् व बृहंत यांनीं एकत्र होऊन मोठा पराक्रम केला, परंतु तेहि यमसदनाला गेले ! हे विशांपते, रथिश्रेष्ठ क्षेमधूर्ति यास भीमानें गदेनें मारून स्वर्गलोकाला पाठविलें ! बलवान् व महाधनुर्धर जलसंध यानें शत्रूंचा भयंकर संहार केला असूनहि अखेर सात्यकीच्या हातून रणांत मारला गेला ! ज्यानें आपल्या रथाला गर्दभ जोडून विचित्रता आणली होती, तो राक्षसांचा राजा अलंबुष घटोत्कचाच्या पराक्रमाला बळी पडला ! सूतपुत्र राधेय, त्याचे महारथ बंधु आणि सर्व केकय वीर यांचा अर्जुनानें निःपात उडविला ! हे राजन्, मालव, मद्रक, उग्रकर्मी द्राविड, यौधेय वगैरे सर्व वीरांना अर्जुनानें रणांत पाडलें ! पदातींचे अनेक संघ, लक्षावधि अश्व, कित्येक रथसमुदाय आणि उत्तमोत्तम गज यांचा रणांगणांत संहार झाला ! हे सर्व वीर, त्याप्रमाणें दुसरे अनेक राजे आपापल्या सैन्यांसह रणांत मारले गेले ! राजा, तूं मला विचारिलेंस, म्हणून तुला हें सर्व मीं सांगितलें आहे !

राजा, कौरव योद्ध्यांचा समरांत असा निःपात झाला ! महेंद्रानें वृत्रासुराचा वध केला, रामानें रावणाचा नाश केला, कृष्णानें नरकासुर व मुरु यांस यमलोकीं पाठविलें, भार्गवरामानें कार्तवीर्याला-सहस्रार्जुनालाथमारिलें, स्कंधानें महिषासुराला यमपुराची वाट दाखविली, रुद्रानें अंधकासुराचा घात केला, तसाच त्या जयशील अर्जुनानें कर्णाला अमात्यबांधवांसह मारिलें ! धार्तराष्ट्रांची सर्व जयाशा कर्णावर अवलंबून होती व तोच पांडवांशीं कौरवांचा कलह होण्याचें मूल कारण होता ! पांडवांचा द्वेष करणें कधींहि युक्त होणार नाहीं, म्हणून तुझ्या हितचिंतक बांधवांनीं सांगितलें असतां तें तूं ऐकिलें नाहींस ! त्यामुळें हें भयंकर संकट आज तुजवर आलें आहे ! राज्यलोभी पुत्रांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें तूं अहित गोष्टी केल्यास, त्यांचें हें फल तुला प्राप्त झालें आहे ! ८.५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ पांडवांकडील कोण कोण वीर पडले, त्यासंबंधीं संजयाकडून कथन. ]

( १ ) धृतराष्ट्र—माझे कोण कोण वीर युद्धांत पडले, तें सर्व तूं सांगितलेंस. आतां माझ्या वीरांनीं पांडवांपैकीं कोणाला मारलें, तें सांग पाहूं !

संजय—युद्धांत मोठे पराक्रमी, परम शक्तिमान् व अत्यंत बलवान् असे कुंतिराजे गांगेयानें आप्त व अमात्य यांसह मारिलें ! नारायण, बलभद्र व इतर पांडवांवर प्रेम करणारे शेंकडो शूर वीर यांचा भीष्मानें रणांत वध केला ! वीर्य आणि बल यांत अर्जुनासमान अशा सत्यजिताचा वध सत्यसंध द्रोणानें केला ! पांचालांचे सर्व धनुर्धर मोठे युद्धविशारद होते, तरी द्रोणाशीं युद्ध करून ते सर्व यमलोकीं गेले ! द्रुपद व विराट हे वृद्ध राजे आपल्या पुत्रांसह युद्धांत पराक्रम गाजवून मारले गेले ! बाल असूनहि समरांत अर्जुनाप्रमाणें, केशवाप्रमाणें किंवा बलरामाप्रमाणें अजिंक्य वीरानें शत्रूंचा संहार केला, तेव्हां द्रोण, द्रौणि, शल्य, कर्ण, कृप आणि कृतवर्मा या महारथांनीं त्याला वेढिलें, आणि 'आपण अर्जुनाला मारूं शकत नाहीं, तर त्याच्या पुत्राला तरी मारावें' असें योजून त्याला विरथ केलें आणि हे महाराजा, क्षात्रधर्माप्रमाणें वागणाऱ्या त्या अभिमन्यूचा वध दौःशासनीनें केला ! अंबष्ठाचा पुत्र श्रीमान् हा मोठा शत्रुविनाशक होता, त्यानें मोठ्या सैन्यानिशीं आपले मित्र पांडव यांच्याकरितां युद्धांत मोठा पराक्रम केला, परंतु अंतीं दुर्योधनपुत्र लक्ष्मण याच्या हस्तें पतन पावला ! महाधनुर्धर, अस्त्रज्ञ व युद्धदुर्मद बृहंत याला दुःशासनानें यमलोकीं पाठविलें ! मणिमान् आणि दंडधार हे दोन राजे दुर्जय असूनहि समरांत द्रोणाच्या हातून निधन पावले ! महारथ भोजराज अंशुमान् मोठ्या सैन्यासह द्रोणाशीं युद्ध करीत असतां मृत्यु पावला ! समुद्रतीरचा राजा चित्रसेन त्याला पुत्रासह समुद्रसेनानें यमसदनीं पाठविलें ! अनूपवासी नील आणि वीर्यवान् व्याघ्रदत्त यांना अश्वत्थामा आणि विकर्ण यांनीं वधिलें ! राजा, चित्रायुध व चित्रयोधी यांनीं थोर पराक्रम करून रणांत अनेक वीर मारिले, तरी अंतीं ते विकर्णाच्या हातीं पतन पावले ! भीमसेनाप्रमाणें पराक्रमी कैकेयराजा याला कैकेयवीरांनीं वेढा दिला व त्याच्याच बंधूनें त्याचा वध केला !

गदायुद्ध करणारा पर्वतदेशचा राजा प्रतापवान् जनमेजय ह्याला तुझ्या दुर्मुख पुत्रानें परलोकीं पाठविलें ! तेजस्वी ग्रहांप्रमाणें शोभणारे रोचमाननामक दोन नरव्याघ्रांवर द्रोणानें एकदम बाणवृष्टि करून त्यांला स्वर्गलोकीं पाठविलें ! हे विशांपते, दुसऱ्या अनेक राजांनींहि युद्धांत मोठें शौर्य दाखविलें व अखेरीला स्वर्गाला गेले ! पुरुजित् व कुंतिभोज ह्या अर्जुनाच्या दोन्ही मातुलांस द्रोणानें बाण मारून यमलोकीं पाठविलें ! अनेक काशिकांसह

युद्ध करीत असतां काशिराज अभिभू याला वसुदानपुत्रानें रणभूमीवर देह ठेवावयास लाविलें ! अमितौजा, युधामन्यु व उत्तमौजा यांनीं अनेक बाण टाकून शेंकडो वीरांस हत केलें; परंतु अंतीं आपल्याच वीरांकडून मारले गेले ! भारता, पांचाल्य मित्रवर्मा आणि क्षत्रधर्मा ह्या महाधनुर्धरांस द्रोणानें यमसदनीं धाडिलें ! शिखंडिपुत्र क्षत्रदेव हा योद्धयांचा अग्रणी असूनहि त्याला तुझा नातू लक्ष्मण यानें मारिलें ! सुचित्र आणि चित्रवर्मा हे पितापुत्र असून महावीर होते, त्यांचा द्रोणानें युद्धांत वध केला ! वार्धक्षेमी हा पर्वकालच्या वृद्धिंगत समुद्राप्रमाणें मोठा पराक्रमी होता. परंतु त्याच्या आयुधांचा क्षय होऊन तो रणांत पडला ! हे महाराजा, सेनाबिंदुपुत्र हा मोठा शस्त्रवेत्ता असून परम युद्धप्रवीण होता, त्याला कौरवेंद्र बाल्हीकानें मारिलें ! चेदींचा प्रमुख वीर धृष्टकेतु ह्यानें मोठा पराक्रम करून शेवटीं तो यमपुरीं गेला ! वीर सत्यधृति युद्धामध्यें शत्रूंचा संहार करून पांडवांकरितां युद्ध करीत असतां पतन पावला ! शिशुपालाचा पुत्र राजा सुकेतु ह्यानें बराच शत्रुसंहार केला, परंतु अखेरीला स्वर्गलोकीं गेला ! कुरुश्रेष्ठ सेनाबिंदुहि रणांत रिपुक्षय करीत असतां मृत्युवश झाला ! वीर सत्यधृति, वीर्यवान् मदिराश्व आणि पराक्रमशील सूर्यदत्त हे द्रोणाच्या बाणांनीं पतन पावले. हे महाराजा, पराक्रमी श्रेणिमान् हा मोठ्या शौर्यानें युद्ध करीत असतां यमसदनीं गेला ! परमास्त्रवेत्ता व अतिपराक्रमी मागध राजा युद्धांत द्रोणाच्या हस्तें निधन पावून रणभूमीवर पडला ! विराटपुत्र शंख आणि महारथ उत्तर हेहि मोठ्या शौर्यानें युद्ध करीत असतां परलोकीं गेले ! युद्धांत शत्रूंचा भयंकर संहार करणारा वसुदान द्रोणाच्या हस्तें मृत्यु पावला ! हे आणि दुसरेहि पांडवांचे महारथी मोठा पराक्रम करून युद्धांत पडले ! राजा, तूं विचारल्यावरून हें सकल वृत्त तुला सांगितलें आहे ! ८. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ माझे कोणकोणते वीर जीवंत आहेत, या धृतराष्ट्राच्या प्रश्नास संजयाचें उत्तर. २ धृतराष्ट्राची मूर्च्छा. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, माझ्या सैन्यांतील भीष्मद्रोणादिक सर्व प्रमुख वीर नाहींसे झाले असून माझें अवशिष्ट सैन्यहि नष्ट झाल्यासारखें आहे. त्या कुरुपुंगव महाधनुर्धारी भीष्म-द्रोणांचा वध झाल्याचें ऐकून माझें

जीवित मला तुच्छ वाटत आहे. ज्याच्या बाहूंचें सामर्थ्य दशसहस्र नागांच्या बलाइतकें होतें, तो समरांगणाला शोभविणारा राधेय हत झाल्याचें ऐकून मला तितका खेद होत नाहीं! कारण, मृत्यूवरहि जय मिळविणारा भीष्म आणि क्षात्र व ब्राह्मबलानें युक्त द्रोण हे अद्वितीय वीर होते! त्यांच्या पतनापुढें कर्णवधाचें मला तितकें दुःख होत नाहीं! माझ्या सैन्यांतील कोणकोण वीर पडले, हें तूं सांगितलेंस. आतां अवशिष्ट राहिले आहेत, त्यांची अवस्था काय आहे तें सांग! जे वीर हत झाल्याचें तूं मला सांगितलेंस, त्यांना सोडून जीवंत असलेले माझे वीर मृतप्रायच होत असें मला वाटतें!

संजय—ज्याला द्विजश्रेष्ठ द्रोणाचार्यांनें चित्र, शुभ्र, विहित आणि दिव्य अशीं चार प्रकारचीं आयुधें समर्पण केलीं, तो वीर अश्वत्थामा जीवंत आहे. तो महारथी आहे, तसाच कृतिमान्हि आहे. त्याचें हस्तलाघवहि अद्भुत आहे. त्याची मूठ मोठी दृढ असून हस्तांतील आयुध कधींहि ढळत नाहीं. तो वीर्यवान् व वेगवान् द्रोणपुत्र अश्वत्थामा तुझ्यासाठीं युद्ध करण्यास सज्ज आहे. तसाच आनर्तदेशांत राहणारा हृदीकाचा पुत्र, सात्वतांपैकीं श्रेष्ठ, अस्त्रविद्येंत निपुण, भोज देशचा राजा महारथी कृतवर्मा तुझ्याकरितां युद्धास सिद्ध आहे. त्याप्रमाणें युद्धांत सर्वदा दुष्प्रकंप्य आर्तायनपुत्र शल्य हा तुझा सेनाग्रणी आहे. ज्यानें आपली प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां आपले भाचे पांडव यांना सोडून दिलें व जो तुजकडे आला. ज्या शल्यानें अजातशत्रु युधिष्ठिरापुढें 'युद्धांत कर्णाचा सर्वदा तेजोभंग करीन,' अशी प्रतिज्ञा केली होती, हा इंद्राप्रमाणें वीर्यवान् असून युद्धांत अजिंक्य आहे. ह्याशिवाय आजानेय, सैंधव, पार्वतीय, नदीज, कांबोज व वनायुज इत्यादि लोकांस घेऊन गांधारराजहि तुझ्याकरितां युद्धाला सिद्ध आहे. हे राजा, महाबाहु शारद्वत गौतम हा भारक्षम मोठें धनुष्य घेऊन तुजसाठीं युद्धार्थ सज्ज आहे. हा नानाप्रकारच्या अद्भुत अस्त्रांची योजना करून युद्ध करीत असतो. हे कुरुप्रवीरा, महारथ केकयराजपुत्र उत्तम अश्व व पताका यांनीं भूषित रथांत बसून तुझ्याकरितां युद्धाला सिद्ध आहे. तसाच तुझा शूर पुत्र पुरुमित्र हा प्रज्वलित अग्नीसारख्या तेजस्वी रथांत बसून आकाशांत विराजमान होणाऱ्या सूर्याप्रमाणें रणभूमीवर शोभत असतो तो तुजसाठीं युद्धार्थ सिद्ध आहे.

हे राजा, सुवर्णालंकारांनीं विभूषित रथांत बसून दुर्योधन गजांच्या समुदायांत शोभणाऱ्या सिंहासारखा रणभूमीवर युद्ध करितांना दिसत आहे. सुवर्णालं-

कारविभूषित कवच धारण करून राजांमध्यें जेव्हां मीं त्या दुर्योधनाला पाहिलें, तेव्हां तो पुरुषश्रेष्ठ निर्धूम अग्नीप्रमाणें किंवा मेघसमुदायांतील प्रकाशमान सूर्याप्रमाणें विराजित दिसला. खड्ग-चर्म धारण करणारा सुषेण आणि सत्यसेन वीर हेहि तुझे सुत मोठ्या हर्षानें चित्रसेनासह युद्ध करण्यास सज्ज आहेत. हे भारता, विनयसंपन्न राजपुत्र उग्रायुध आणि शीघ्रभोजी ( त्वरित भोजन करणारा ) व रूपसंपन्न जरासंधि, अदृढ, चित्रायुध, श्रुतवर्मा, जय, शल, सत्यव्रत आणि दुःशल हे सर्व ससैन्य नरश्रेष्ठ युद्धास तयार आहेत. तसाच कैतव्यांचा शूर व मोठा मानी अधिपति हा नित्य रणांगणावर शत्रूंचा संहार करीत असतो. हा राजपुत्र आपल्या चतुरंगसैन्यासह तुझ्यासाठीं युद्ध करण्यास तयार आहे. वीर श्रुतायु, धृतायुध, चित्रांगद आणि चित्रसेन हे सर्व नरश्रेष्ठ मोठे योद्धे असून थोर अभिमानी आणि सत्यप्रतिज्ञ आहेत. हेहि तुजसाठीं युद्धास सिद्ध आहेत. कर्णाचा पुत्र सत्यसंध हाहि तुझ्यासाठींच युद्धांत नित्य सिद्ध आहे आणि कर्णाचे दुसरे दोन पुत्र अस्त्रकुशल व चपलहस्त असून हे नरेंद्रा, त्यांचें सैन्य मोठें आहे. तेहि तुजकरितां युद्धाला सज्ज आहेत. राजा, ह्या व दुसऱ्याहि मोठमोठ्या अमितप्रभावी योधवरांनीं युक्त व महेंद्रसमान जयाशा करणारा तुझा पुत्र दुर्योधन हा नागकुलामध्यें शोभणाऱ्या सिंहाप्रमाणें रणांगणावर शोभत आहे !

**धृतराष्ट्र**—संजया, कौरवांकडील कोण योद्धे जीवंत आहेत व कोण पतन पावले हें तूं मला यथार्थ सांगितलेंस. त्यावरून कौरवांना आतां जयाशा राहिली नाहीं, हें निश्चित आहे !

(२) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्र असें बोलत आहे, इतक्यांत आपले प्रमुख वीर मारले गेले, बहुतेक सैन्य विध्वस्त झालें व अत्यल्प अवशिष्ट आहे, हें ऐकून तो शोकाकुल झाला व त्याला मूर्च्छा आली ! आपलें चित्त भ्रमण पावत असल्याचें पाहून तो म्हणाला ‘ संजया, जरा थांब, तूं सांगितलेल्या अप्रिय वृत्तानें माझें मन व्याकुल झालें आहे व चित्तवृत्ति मोहित होऊन चक्षुरादि इंद्रियें स्वाधीन नाहींशीं झालीं आहेत. ’ असें बोलून राजा धृतराष्ट्र नष्ट-संज्ञ झाला ! ८. ७.

## अध्याय ८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा कर्णविषयक विलाप. ]

( १ ) जनमेजय—द्विजश्रेष्ठा, युद्धांत कर्णाचा व आपल्या पुत्रांचा वध झाल्याचें ऐकून धृतराष्ट्र मूर्च्छित झाला, तें समजलें. परंतु पुढें तो किंचित् देहभानावर आल्यावर काय बोलला, तें सर्व मला सांग !

वैशंपायन—कर्णवध झाल्याचें धृतराष्ट्रानें ऐकिलें, तेव्हां त्याला तें अश्रद्धेय वाटलें ! सर्व प्राण्यांना मूर्च्छित करणाऱ्या त्या भयंकर वृत्तांताच्या श्रवणानें जणुंकाय मेरुपर्वतच आपल्यावर कोसळून पडल्याचा त्याला भास झाला ! द्युतिमान् सूर्याचें आकाशांतून पृथ्वीवर पतन जसें असंभाव्य किंवा ओतप्रोत भरून राहिलेल्या समुद्राचें शोषण जसें अशक्य अथवा आपल्या पाप-पुण्यकर्मांचीं फलें टाळणें जसें अशक्य कोटींतील होय, तद्वतच कर्णाचा शत्रूकडून युद्धांत वध होणें ही गोष्ट धृतराष्ट्राला असंभवनीय वाटली. ‘ इतर प्राणीहि विनाश पावतात, मग तो कर्णाला कां नसावा,’ हा विचार मनांत येऊन त्याचें मन शोकाग्नीनें दग्ध होऊं लागलें ! त्याचीं गात्रें विगलित होऊन तो निश्वास टाकूं लागला ! अतिदीन होऊन ‘ हायहाय ’ करीत धृतराष्ट्रानें मोठा विलाप केला !

धृतराष्ट्र—संजया, अधिरथपुत्र कर्णाचा पराक्रम सिंह किंवा द्विरद यांसारखा होता ! तो वृषस्कंध असून त्याची दृष्टि व गतिहि वृषभाप्रमाणें होती ! दोन वृषभांचें युद्ध प्रवृत्त झालें असतां जसा त्यांपैकीं कोणीहि पड घेऊन मागें परतत नाहीं, तसाच वज्राप्रमाणें दृढशरीराचा हा तरुण वीर इंद्रासारख्या शत्रूपुढेंहि माघार घेत नसे ! संजया, ज्याच्या प्रत्यंचेचा शब्द किंवा शरवृष्टींचा नाद कानीं पडतांच रथ, अश्व, गज किंवा नर हे रणांगणांत कधींहि स्थिर रहात नसत, ज्या महावीराचा आश्रय करून शत्रूंना जिंकण्याच्या इच्छेनें दुर्योधनानें महारथ पांडुपुत्रांशीं द्वेष केला, तो असह्यविक्रमी रथिश्रेष्ठ कर्ण रणांगणीं अर्जुनाकडून कसा मारला गेला ? ज्याचा आपल्या बाहुबलावर इतका विश्वास होता कीं तो श्रीकृष्णाला, अर्जुनाला, यादवांना किंवा दुसऱ्या कोणालाहि जुमानीत नसे, माझ्या मंद, राज्यलोभी व चिंतातुर दुर्योधनाला जो सांगत असे कीं, ‘शार्ङ्गधारी कृष्ण किंवा गांडीवधर अर्जुन यांनाहि मी एकटा जिंकून त्यांच्या दिव्य रथांतून त्यांना खालीं आणीन,’ ज्यानें दुर्योधनाच्या राज्यविस्ताराकरितां

आपल्या तीक्ष्ण व कंकमुख बाणांनीं सर्व कांबोज, केकय, आवंत्य, गांधार, मद्रक आणि मात्स्यादि वीरांना जिंकून त्यांस आपले मांडलिक बनविलें, अशा दिव्यास्त्रवेत्त्या वैकर्तन कर्णाला तो सैन्याकडून रक्षित असतांहि वीर्यशाली पांडवांनीं मारावें, हें झालें तरी कसें ? देवांमध्यें जसा इंद्र श्रेष्ठ, तसाच मानवांमध्यें कर्ण होता. ह्या दोघांविरहित तिसरा कोणी श्रेष्ठ वीर मी ऐकिला नाहीं. अश्वांमध्यें जसा उच्चैःश्रवा, यक्षांमध्यें जसा कुबेर, देवांमध्यें महेंद्र, तसाच योद्ध्यांमध्यें कर्ण हा श्रेष्ठ होता. दुर्योधनाच्या राज्यवृद्धीकरितां ह्या कर्णाची मीं योजना केली आणि त्यानें शूर, समर्थ व वीर्यशाली राजांशीं युद्ध करून सर्व पृथ्वी जिंकिली ! मागधराजानें कर्णाशीं सख्य केलें, त्यामुळें कौरव व यादव खेरीज सर्व क्षत्रियांचा त्यानें युद्धांत संहार केला ! अशा कर्णाला युद्धांत अर्जुनानें मारलें, हें ऐकून भिन्न नौकेप्रमाणें मी शोकसागरांत बुडून गेलों आहें ! तो रथिश्रेष्ठ कर्ण युद्धांत हत झाल्याचें ऐकून नौकाहीन मनुष्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे ! अशा प्रकारच्या घोर दुःखांनीं माझें जीवित नष्ट होत नाहीं, त्याअर्थी हे संजया, माझें दुर्भेद्य हृदय वज्रापेक्षांहि कठोर आहे, असें मला वाटतें. सूता, आपले पुत्रादिक आप्त, मित्र यांचा अशा प्रकारें वध झालेला पाहून प्राणत्याग करणार नाहीं, असा माझ्याशिवाय दुसरा कोण पुरुष आहे ? म्हणून आतां विषप्राशनानें, अग्निप्रवेशनानें किंवा पर्वतशिखरावरून कडेलोटानें जीविताचा नाश करून घेणें, हें मला इष्ट वाटतें. संजया, हीं कष्टकारक दुःखें सहन करण्यास मी आतां समर्थ नाहीं ! ८. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ संजयकृत धृतराष्ट्राचें सांत्वन. २ धृतराष्ट्राचा शोक. ]

( १ ) संजय—हे पार्थिवा, तुझी लक्ष्मी, कुल, यश, तप आणि विद्या ह्यांचा विचार करून तुला मोठमोठे लोक नहुषपुत्र ययातीप्रमाणें समजतात. राजा, तुझें ज्ञान महर्षींप्रमाणें असल्यामुळें तूं धन्य आहेस. तूं मन स्थिर कर आणि दुःख करूं नकोस !

( २ ) धृतराष्ट्र—मी दैवालाच श्रेष्ठ समजतों. अनर्थकारक त्या पराक्रमाला धिक्कार असो ! शालवृक्षासारखा बलवान् कर्ण परंतु तोहि युद्धांत मारला गेला ! ज्या कर्णानें युधिष्ठिराच्या सैन्याला मारलें, पांचालांचे रथसमूहांचा भंग केला,

इंद्र जसा असुरांस चिंताग्रस्त करून सोडतो, त्याप्रमाणें ज्यानें पांडवांस सर्वदा चिंताग्रस्त करून ठेविलें होतें, तो आज वायूनें उत्पाटित वृक्षाप्रमाणें रणभूमीवर मरून पडला आहे, हें कसें? समुद्राच्या पाराप्रमाणें ह्या शोकसागराचा अंत मला लागत नाहीं! माझी चिंता वाढत आहे आणि मला मूर्च्छा येत आहे! कर्णाचें निधन आणि अर्जुनाचा विजय हें मला अश्रद्धेय वाटतें! संजया, त्या नरव्याघ्र कर्णाचा वध झाल्याचें ऐकून माझें हृदय भंग पावत नाहीं, त्याअर्थी तें वज्रसाराचेंच केलें असलें पाहिजे! पूर्वी दैवतांनीं मला दीर्घ आयुष्य दिलें आणि त्यामुळेंच कर्णाचा वध झाला असतांहि मी जीवंत आहें! माझ्या जीविताचा धिक्कार असो! माझे सुहृद मला सोडून गेले आहेत! संजया, काय माझी ही निंद्य अवस्था! सर्वांनीं माझ्याकरितां शोक करावा आणि त्यांत मूर्खासारखें मीं समाधान मानून घ्यावें! ज्या माझा पूर्वी सर्व लोकांनीं मोठा आदर केला, तोच मी आज सर्वांच्या अनादराला पात्र झालों आहें! आतां मी जीवंत तरी कसें रहावें? भीष्म-द्रोणांच्या वधानें आम्ही आधींच दुःखी झालों असतां त्यांत कर्णवधाची भर पडून कांहींच आशा उरली नाहीं! संजया, माझ्या पुत्रांना शोकसमुद्रांतून परतीराला नेणाऱ्या नौकेप्रमाणें असणारा कर्ण आज युद्धांत बाणवृष्टि करीत असतां पडला आहे! त्या पुरुषश्रेष्ठावांचून आतां माझ्या जीविताचा तरी उपयोग कोणता? कर्ण सायकानें विद्ध होऊन रथांतून खालीं पडला म्हणजे पर्वतशिखरच वज्राघातानें विदीर्ण होऊन पडल्याचें मला भासत आहे!

संजया, कर्ण रक्तसिंचित देहानें पृथ्वीतल शोभवीत रणांगणावर पडला आहे! कर्ण म्हणजे धार्तराष्ट्रांचें केवळ बल होता आणि पांडवांना भय काय तें त्यापासूनच होतें! असा तो सर्व धनुर्धारी वीरांना ध्वजीभूत कर्ण अर्जुनाच्या हातून पतन पावला! तो महाधनुर्धर वीर मित्रांना अभय देणारा होता. ज्याप्रमाणें देवेंद्रानें पर्वत विदीर्ण करून टाकावे, त्याप्रमाणें अर्जुनानें वध केलेला हा कर्ण युद्धांत पडला आहे! पंगूचें मार्गक्रमण, दरिद्र्याची मनोरथपूर्ति किंवा जलबिंदूंनीं तृषार्ताची तृषाशांति जशी अशक्य, तसेच दुर्योधनाचे हेतु सफल होणें आतां दुर्घट झालें आहे. मनुष्याची योजना कितीहि उत्तम असली तरी अंतीं विपरीत परिणाम घडून येतात, यावरून दैव किती बलवत्तर आणि काल कसा दुरतिक्रम आहे तें दिसून येतें. सूता, माझा पुत्र दुःशासन नष्टपराक्रम होऊन पळून जात असतां मारला गेला. त्याच्या हातून

युद्धांत कांहीं गर्ह्य आचरण झालें नाहीं ना ? इतर क्षुद्र क्षत्रियांप्रमाणें त्याचा वध झाला नाहीं ना ?

संजया, युधिष्ठिर दुर्योधनाला ' युद्ध कधींहि करूं नको ' असें नित्य सांगत असतांहि मूर्खाला जसें औषध रुचत नाहीं, त्याप्रमाणें ती गोष्ट त्याला आवडली नाहीं. शरतल्यावर पडून राहिलेल्या महात्म्या भीष्मानें अर्जुनापाशीं उदक मागितलें असतां त्यानें पृथ्वीतलाचा भेद करून जलधारा निर्माण केली, तेव्हां भीष्मानें दुर्योधनाला सांगितलें कीं, ' दुर्योधना, पांडवांशीं युद्ध करूं नकोस ! त्यांशीं मैत्री करून राहिल्यास त्यांतच तुझें कल्याण आहे. ह्या तुमच्या युद्धाचा शेवट माझ्या अंताबरोबरच होवो. पांडवांशीं बंधुभावानें वागून पृथ्वीचा उपभोग दोघेहि घ्या.' ह्या भीष्मवचनाचा अनादर करून आतां दुर्योधन शोक करीत बसला आहे. त्या दूरदर्शी भीष्माच्या वचनाप्रमाणें घडून आलें आहे. हाय हाय ! माझे अमात्य आणि पुत्रहि मला सोडून गेले. द्यूता-मुळें हें सर्व घडलें असून मी घोर संकटांत पडलों आहें आणि माझ्या सर्व पुरुषार्थांची समाप्ति झाली आहे ! तसाच मी ज्ञातिहीन व बंधुहीन झालों आहें ! आतां शत्रुवश झालों असतां माझी स्थिति काय होईल, तें सांगवत नाहीं !

**वैशंपायन**—अशारीतीनें दुःखित होऊन धृतराष्ट्रानें मोठा शोक केला ! आणि अत्यंत दीन होऊन त्यानें संजयाला पुनः विचारिलें—

**धृतराष्ट्र**—ज्यानें आपल्या कार्यासाठीं सर्व कांबोज, अंबष्ठ, केकय, गांधार आणि विदेह वीरांना जिंकिलें, तसेंच ज्यानें सर्व पृथ्वी जिंकून दुर्योधनाची राज्यवृद्धि केली, त्या कर्णाला पांडवांनीं जिंकिलें आणि मग त्या धनुर्धर वीराचा अर्जुनानें वध केला ! त्यावेळीं रणांत कोण कोण वीर होते, तें संजया, मला सांग. संजया, कर्णाला अर्जुनानें मारिलें, तेव्हां तो रणांत एकटाच नव्हता ना ? आमच्या प्रत्येक वीराचा शत्रूंनीं कसा वध केला, हें तूं पूर्वी मला सांगि-तलेंच आहेस ! सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ व रणांगणांत अजय्य भीष्माला शिखंडीनें बाण सोडून मारलें ! तसेंच शस्त्रन्यास करून व योगासक्त होऊन द्रोण रणांत बसला असतां द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें त्यावर अनेक बाण मारले आणि संजया, शेवटीं खड्ग उपसून त्यानें त्याचा वध केला ! भीष्म-द्रोण यांचा वध अन्यायानें व विशेषतः कपटानें केलेला आहे, असें मीं ऐकिलें आहे.

न्यायानें युद्ध करीत असतां प्रत्यक्ष इंद्राच्यानेंहि त्यांचा वध करवला नसता, हें मी तुला सत्य सांगत आहें. त्या देवेंद्रतुल्य व अस्त्रविशारद कर्णाला मृत्यूनें स्पर्श तरी कसा केला ? त्याला विद्युत्प्रभ, सुवर्णभूषण आणि शत्रुविनाशक दिव्यशक्ति कुंडलांच्या विनिमयानें इंद्रानें दिली. तसेंच त्याच्या सन्निध शत्रुविघातक सर्पमुख बाणहि नित्य सिद्ध असे !

संजया, कर्ण भीष्म-द्रोणादि महारथ्यांचाहि मान ठेवीत नसे ! जामदग्न्य परशुरामापासून त्यानें ब्राह्मअस्त्र संपादन केलें होतें. अभिमन्यूच्या शराघातांनीं भीष्म-द्रोण विह्वल होऊन मागें फिरले असतां कर्णानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या सौभद्राचें धनुष्य भग्न केलें ! दशसहस्र गजांचें ज्याला बळ, वज्राप्रमाणें जो वेगवान्, त्या भीमाला सहसा विरथ करून त्यानें त्याचा उपहास केला ! ज्या कर्णानें सन्नतपर्व बाणांनीं सहदेवाला जिंकून त्याला रथहीन केलें, परंतु अधर्माच्या भीतीनें त्याचा वध केला नाहीं, ज्यानें इंद्रदत्त शक्तीनें घटोत्कचाच्या सहस्रावधि कपटप्रयोगांचा प्रतिकार करून त्या राक्षसेंद्राचा वध केला, ज्याच्या भीतीनें धनंजयानें त्याच्याशीं द्वंद्वयुद्ध करण्याचें इतके दिवस टाळलें होतें, अशा प्रकारचा तो वीर कर्ण रणांत कसा बरें पडला ! ह्या संशप्तक वीरांशीं मला नित्य युद्धार्थ जावें लागतें, तरी त्यांचा प्रथम नाश करून मग कर्णाला वधावें, हें चांगलें असें मिष करून अर्जुनानें कर्णाशीं युद्ध करण्याचें टाळिलें ! असा परवीरांतक वीर कर्ण युद्धांत पार्थाहातीं कसा पडला बरें ? कर्णाचा रथ जर भग्न झाला नसता, धनुष्य छिन्न झालें नसतें किंवा त्याचीं अस्त्रें नष्ट झालीं नसतीं, तर त्याचा वध कसा झाला असता ? आपलें प्रचंड धनुष्य घेऊन रणभूमीवर कर्ण बाण आणि दिव्यास्त्रें यांची वृष्टि करूं लागला असतां त्या वीरशार्दूलाला जिंकण्यास कोण समर्थ होता ? त्याचें धनुष्य भंग पावलें, रथ पृथ्वीनें गिळिला आणि अस्त्रेंहि नष्ट झालीं ! त्यामुळेंच तूं सांगत आहेस, तसा कर्णाचा वध झाला, त्याशिवाय त्याच्या वधाला दुसरें कांहीं कारण दिसत नाहीं !

माझ्या हातून अर्जुनाचा वध होणार नाहीं, तोंपर्यंत मी पादक्षालन करणार नाहीं, असें ज्या महात्म्याचें घोर व्रत होतें आणि ज्याच्या भीतीनें युधिष्ठिरानें तेरा वर्षें सुखानें निद्राहि घेतली नाहीं, ज्याच्या पराक्रमाचा आश्रय करून माझ्या दुर्योधन पुत्रानें पांडवांच्या समक्ष द्रौपदीला सभेंत ओढून आणविली आणि कौरवांदेखत तिला ‘ दासभार्या ’ म्हटलें, तसेंच ‘ कृष्णे, हे तुझे

पति तुला शोभत नाहींत, ह्याकरितां आतां तूं अन्य पति वर!' असेहि कठोर उद्गार ज्यानें तिला ऐकविले, असा त्या वीर्यशाली कर्णाचा वध शत्रूच्या हातून कसा बरें व्हावा! 'सुयोधना, रणश्लाघी भीष्म किंवा युद्धदुर्मद द्रोण यांनीं जरी पक्षपातानें पांडवांना मारलें नाहीं, तरी मी निःसंशय एकटा त्या सर्वांचा वध करीन, चिंता करूं नकोस! अर्जुनाचें गांडीव धनुष्य किंवा त्याचे अक्षय्य तूणीर माझ्या बाणांपुढें काय करणार आहेत?' असे उद्गार काढणाऱ्या त्या वृषभ-स्कंधाचा अर्जुनानें कसा वध केला? जो कर्ण गांडीवापासून सुटलेल्या बाणांना जुमानीत नसे, ज्यानें द्रौपदीला 'कृष्णे, तूं आतां पतिहीन आहेस,' असे उद्गार काढून पांडवांकडे पाहिलें, आपल्या बळाच्या जोरावर ज्याच्या मनाला क्षणभरहि कृष्णाची किंवा पांडवांची भीति वाटली नाहीं, ज्याचा इंद्रासह देवांच्याहि हातून वध होणें अशक्य, त्या कर्णावर धांवून येणाऱ्या पांडवांची ती कथा काय होती!

संजया, अधिरथपुत्र कर्णानें नुसता प्रत्यंचेला स्पर्श केला, किंवा हातांत तलत्राणें घातलीं कीं त्याच्यापुढें उभें राहण्याची शक्ति कोणाहि पुरुषाला नसे. प्रसंगवशात् चंद्र, सूर्य आणि अग्नि यांचीं तेजेंहि नाहींशीं होतील, परंतु त्या पुरुषेंद्र कर्णाचा समरांत वध होणें ही गोष्ट अशक्य होय! त्याच्या व बंधु दुःशासनाच्या साहाय्यानें माझ्या मंद व दुर्बुद्धि पुत्रानें कृष्णाची वारंवार अवज्ञा केली! कर्ण व दुःशासन हे युद्धांत पडल्याचें पाहून त्याला आतां दुःख होत असेल! वैकर्तन कर्ण द्वैरथयुद्धांत अर्जुनाकडून हत झाल्याचें आणि पांडवांचा जय होत असल्याचें ऐकून दुर्योधन काय म्हणाला बरें? दुर्मर्षण व वृषसेन हे रणांत पतन पावले, कौरवसैन्य भंग पावून महारथ्यांकडून मारलें गेलें, राजे लोक पराङ्मुख होऊन पलायनपरायण झाले आणि रथी वीरांनींहि पळ काढला, हें पाहून तो दुराग्रही, अभिमानी, दुर्बुद्धि आणि अजितेंद्रिय दुर्योधन पश्चात्ताप पावला असेल, असें मला वाटतें. आपल्या सैन्याचा रणो-त्साह नष्ट झाल्याचें पाहून दुर्योधन काय बरें बोलला? त्यानें आपण होऊनच पांडवांशीं वैर केलें! सुहृद्गणांनीं वारंवार निवारण केलें, तरी तें व्यर्थ गेलें! आणि आतां रणांत मोठमोठे वीर निधन पावले, तेव्हां दुर्योधनाच्या मुखांतून कशा प्रकारचे उद्गार निघाले असतील बरें? आपला बंधु दुःशासन मरून रणांत पडला आहे आणि त्याच्या रक्ताचें प्राशन भीमसेन करीत असल्याचें पाहून दुर्योधनानें काय उद्गार काढले असतील? रणांत कर्ण अर्जुनाचा वध

करील, असें गांधारराज शकुनीसह दुर्योधन सभेंत बोलला होता, परंतु आज त्या कर्णाचाच अर्जुनानें वध केला आहे ! आतां दुर्योधन काय म्हणत असेल ?

संजया, पूर्वी द्यूत खेळून पांडवांचें सर्वस्व हरण केल्यावर ज्याला परम हर्ष वाटला होता, तो सौबल शकुनि युद्धांत कर्णाचा वध झाल्याचें ऐकून काय बोलला ? सात्वतांचा महारथ कृतवर्मा कर्णाचें निधन ऐकून काय म्हणाला बरें ? ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे धनुर्वेदप्राप्तीकरितां ज्याची अहर्निश सेवा करीत असतात, तो बुद्धिमान् व कीर्तिमान् अश्वत्थामा कर्णाचें युद्धांत पतन झाल्याचें श्रवण करून काय बोलला असेल ? धनुर्वेदाचा आचार्य शारद्वत कृपाचार्य यानें कर्णवध ऐकून कशा प्रकारचे उद्गार काढले असतील बरें ? तसेंच कर्णाचें सारथ्य करणारा मद्राधिपति शल्य काय म्हणाला ? आणि युद्धार्थ एकत्र जमलेले सर्व राजे वैकर्तनाचें तें वधवृत्त ऐकून काय बोलले असतील ?

संजया, नरश्रेष्ठ द्रोण निधन पावल्यावर सैन्याच्या वेगवेगळ्या भागांवर कोणकोण मुख्य वीर होते, तसेंच मद्रराज शल्याची कर्णाचे सारथ्यकर्मावर कशी योजना झाली, तें मला सांग. कर्ण युद्ध करीत असतां त्याचे उजवेकडील रथचक्राचें रक्षण कोणीं केलें, डावीकडील चक्राचें रक्षण कोण करीत होते, तसेंच त्याचे पृष्ठभागीं कोण होते, कोणत्या शूर पुरुषांनीं अखेरपर्यंत कर्णाचा त्याग केला नाहीं, कोणकोण क्षुद्रबुद्धि लोक त्याला सोडून पळून गेले आणि तुम्हीं सर्व एकजुटीनें युद्ध करीत असतां महारथ कर्ण कसा मृत्यु पावला बरें ? मेघांनीं जलवृष्टि करावी, त्याप्रमाणें पांडव बाणवृष्टि करीत त्याजवर चालून कसे आले आणि त्याजवळील तो दिव्य सर्पमुख बाण कसा व्यर्थ गेला, तें सर्व मला सांग ! संजया, मोठमोठे प्रमुख वीर नष्ट झाल्यानें माझें अवशिष्ट सैन्य मला निर्जीव दिसत आहे ! माझ्याकरितां प्राणत्याग करण्यास सिद्ध झालेले ते महाधनुर्धर वीर भीष्म-द्रोण जर युद्धांत पडले आहेत, तर आतां मला जगून तरी काय करावयाचें आहे ! ज्याच्या बाहूंच्या अंगीं दशसहस्र नागांचें बळ होतें, त्या कर्णाचा पांडवांनीं वध केला, ही गोष्ट मला असह्य झाली आहे ! संजया, द्रोणवधानंतर पांडव-कौरवांचा जो संग्राम झाला, तो मला कथन कर ! कर्णानें पांडवांशीं कोणत्या प्रकारें युद्ध केलें आणि शेवटीं तो शत्रुविनाशक कर्ण युद्धांत कसा पतन पावला, तें सर्व मला निवेदन कर ! ८. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १ द्रोणवधानंतर दुर्योधनानें पुढील कर्तव्याविषयीं कौरववीरांशीं केलेला विचार. २ कर्णाभिषेक. ]

( १ ) संजय—भारता धृतराष्ट्रा, महाधनुर्धर द्रोण पतन पावला असतां आणि महारथ द्रोणपुत्र अश्वत्थामा याचा संकल्प व्यर्थ झाला असतां कौरवांचें सैन्य सारखें पळत सुटलें ! अर्जुन आपल्या सैन्याचा व्यूह रचून बंधूंसह रणांगणावर उभा राहिला. भरतर्षभा, अर्जुन युद्धार्थ उभा आहे आणि आपली सेना पळून गेली आहे, हें पाहून दुर्योधनानें तिचें निवारण केलें आणि बराच काळ मोठ्या शौर्यानें पांडवांशीं युद्ध केलें. शत्रूंनींहि आपला विजय होत असल्याचें पाहून मोठ्या हर्षानें युद्ध चालविलें. इतक्यांत सायंकाळ झाला आणि दुर्योधनानें युद्ध थांबवून आपल्या सैन्यास मागें बोलाविलें. मग कौरव वीर आपल्या शिबिरांत गेले आणि पुढील कर्तव्याविषयीं आपसांत विचार करूं लागले. त्यावेळीं राजा दुर्योधनानें त्या महाधनुर्धर योद्धयांना उद्देशून सर्वांना प्रिय व प्रसंगाला अनुरूप असें भाषण केलें. तो म्हणाला, " बुद्धिमान वीरांनो, तुमचा जो कांहीं विचार होईल, तो मला सत्वर कळवा. निष्कारण विलंब लावूं नका. काय काय केलें पाहिजे व आधीं कोणती गोष्ट केली पाहिजे तें मला सांगा ! "

संजय—त्या युद्धेच्छु पुरुषश्रेष्ठांनीं दुर्योधनाचें भाषण श्रवण करून सिंहासनावरूनच स्ववीर्यनिदर्शक भुजास्फालनादि गोष्टींनीं आपला युद्ध करण्याचा संकल्प व्यक्त केला. युद्धांत प्राणहि अर्पण करण्याला आपले वीर सिद्ध आहेत, त्यामुळें दुर्योधनाचें मुख बालार्कांप्रमाणें तेजःपुंज दिसत आहे, हें पाहून समयज्ञ आचार्यपुत्र अश्वत्थामा बोलला, " स्वामिभक्ति, देशकालादिकांचें आनुकूल्य, बल आणि नीति हे अर्थसिद्धीचे उपाय विद्वानांनीं सांगितले आहेत. इतकें असूनहि त्यांत आणखी दैवाचें साहाय्यहि पाहिजे. आमच्यांतील देवतुल्य, परमविक्रमी आणि स्वामिभक्त महारथी युद्धांत पडले, एवढ्यावरून निराश होऊन आम्ही विजयाशा सोडूं नये ! स्वामिभक्ति इत्यादि गुणांनीं आपणाला प्रतिकूल दैवहि अनुकूल करून घेतां येईल. म्हणून प्रथमतः सर्वगुणगणांनीं युक्त पुरुषश्रेष्ठ सेनापतिपदावर आपण योजूं या ! असा शूर पुरुष म्हणजे अतिबलवान्, अस्त्रकुशल आणि युद्धदुर्मद कर्ण होय. त्याला आपण

सैनापत्याभिषेक करावा. तो यमाप्रमाणें असह्य असून युद्धांत शत्रूंना जिंकण्यास समर्थ आहे ! त्याच्या साहाय्यानें शत्रूंचा संहार आपणांस सहज करतां येईल !

राजा, आचार्यपुत्राचें हें भाषण ऐकून दुर्योधनाच्या मनांत कर्णाविषयीं मोठी आशा उत्पन्न झाली. ‘ भीष्म-द्रोणांचा वध झाला, तरी कर्ण हा पांडवांना जिंकील,’ अशा त्याच्या आशेला अश्वत्थाम्याच्या सत्य, हित आणि शुभावह भाषणानें पुष्टि मिळतांच त्याचें अस्वस्थ मन शांत झालें आणि आपल्या बाहुबलाविषयीं त्याला मोठा आदर वाटूं लागला. नंतर तो कर्णाला म्हणाला, “ कर्णा, तुझा पराक्रम केवढा आहे, तसेंच तुझें माझ्यावरील प्रेम कशा प्रकारचें आहे, हें सर्व मला विदित आहे. तरीहि तुझ्या हिताचें मला वाटतें, तें ऐकून घे आणि नंतर तुला आवडेल, तसें कर. कर्णा, तूं परमज्ञाता असून तुझ्यावर माझा विश्वास आहे. माझे सेनापति भीष्म-द्रोण हे अतिरथी युद्धांत पडले ! त्या दोघांपेक्षांहि तूं बलवत्तर असल्यामुळें माझें सेनापतिपद स्वीकार. ते दोघे वृद्ध असून अर्जुनाविषयीं पक्षपाती होते. हे राधेया, तुझ्या सांगण्यावरूनच मी त्यांना मान देत होतों. ‘ पांडुपुत्रांचा आपण पितामह आहें,’ ह्या विचारानेंच भीष्मानें दहा दिवसांत पांडवांचा रणांत वध केला नाहीं, तरीहि तूं शस्त्रन्यास केला असतां अर्जुनानें शिखंडीला पुढें करून रणांत भीष्माला पाडिलें. तो महाधनुर्धर शरासनीं पडल्यावर तुझ्या सांगण्यावरून मी द्रोणाची सेनापतिपदावर योजना केली. त्यानें पांडवांचे शिष्यत्वामुळें त्यांचें रक्षण केलें असें मला वाटतें. त्याचाहि धृष्टद्युम्नानें वध केला ! त्या पराक्रमी भीष्म-द्रोणांनीं तुझी स्तुति केली आहे, म्हणून तुझ्यासारखा दुसरा वीर मला कोठेंहि दिसत नाहीं. आम्हांला विजय मिळवून देणारा तूंच एकटा आहेस यांत संशय नाहीं. पूर्वी, मध्यें व नंतरहि तूंच आमचें कल्याण केलें आहेस. यासाठीं आमचें सैनापत्य तूंच स्वीकारावें हें योग्य आहे आणि त्यासंबंधीं अभिषेक तूंच आपणांला करून घे ! जसा बलवत्तर स्कंद देवतांचा सेनापति होता, तसा तूं या धार्तराष्ट्री सेनेचा बलिष्ठ सेनानी हो ! महेंद्रानें जसा दानवांचा संहार केला, तसाच तूं सर्व शत्रुगणांचा नाश करून टाक ! विष्णूला पाहून दानव जसे पळून जातात, तसेंच तुला समरांत पाहून पांचाल महारथी पळून जातील ! म्हणून हे पुरुषव्याघ्रा, तूं ह्या मोठ्या सैन्याचें नियमन कर ! तूं सेनापतिपदाचा स्वीकार केल्यावर हे मंदबुद्धि पांडव अमात्य, पांचाल आणि सृंजय यांसह तत्काल पळून जातील !

सूर्य उदय पावला असतां जसा अंधकाराचा नाश करितो, तसाच तूं आपल्या प्रतापानें सर्व शत्रूंचा निःपात करून टाक !

संजय—भारता, भीष्म-द्रोणांचा वध झाला, तरी एकटा कर्णच पांडवांना जिंकील, म्हणून तुझ्या पुत्राला जी आशा लागून राहिली होती, ती हृदयांत ठेवून तो कर्णाला म्हणाला, "हे सूतपुत्रा, तुझ्या समोर उभा राहून तुजशीं युद्ध करण्यास अर्जुन कधींतरी प्रवृत्त होईल, असें मला वाटत नाहीं !"

कर्ण—दुर्योधना, मी तुझ्याजवळ पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कृष्णासहित व पुत्रांसहित सर्व पांडवांस मी जिंकीन, यांत किमपि संशय नाहीं. महाराजा दुर्योधना, तूं स्वस्थ रहा आणि मी पांडवांना जिंकलेंच आहे, असें समज.

(२) संजय—कर्णाचें असें भाषण श्रवण करून देवांसहित देवेंद्राप्रमाणें सर्व राजांसह दुर्योधन कर्णाला अभिषेक करण्याला उठला. मग स्कंदाला जसा देवांनीं अभिषेक केला, तसाच दुर्योधनप्रभृति राजांनीं कर्णाला अभिषेक केला. त्यांनीं त्याला क्षौमवेष्टित औदुंबराच्या आसनावर बसविलें आणि तेथें तो अधिष्ठित झाला असतां मंगलप्रद नाना वस्तूंनीं कर्णावर विधिपूर्वक अभिषेक केला, तेव्हां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांनीं स्तुतिपूर्वक त्याचें गौरव केलें. नंतर ब्राह्मण आणि बंदिजन कर्णाला म्हणाले, "पुरुषश्रेष्ठा, तूं ह्या घोर समरांत आमचा विजय व्हावा म्हणून कृष्ण व सर्व पांडवांना अनुयायांसह जिंकून टाक ! राधेया, पांचालांसह तूं पांडवांचा वध कर ! तूं आमच्या विजयाकरितां पांडवांचा वध कर ! सूर्याचा उदय होतांच आपल्या किरणांनीं तो जसा अंधकाराचा नाश करितो, तसा तूं सर्व शत्रुवर्गांचा नाश कर ! सूर्याचे किरण पाहण्यास जसे उलूक समर्थ होत नाहींत, तद्वत् तुझे तीक्ष्ण बाण पाहण्यास कृष्णासहित पांडव उभे राहूं शकणार नाहींत !

राजा धृतराष्ट्रा, कर्णाला अभिषेक होतांच त्याचें तेज परम वृद्धिंगत झालें व तो सूर्याहूनहि अधिक तेजस्वी दिसूं लागला. त्याला सैनापत्याधिकार देऊन दुर्योधनाला आपण कृतकृत्य झाल्यासारखें वाटूं लागलें. मग सेनापति कर्णानें सर्व सेनाधिकार आपल्या हातीं घेतला. सूर्योदय होतांच त्यानें सर्व सैन्याला जेथल्यातेथें राहण्याची आज्ञा केली. राजा, नंतर तारकासुरयुद्धांत स्कंध जसा देवांनीं वेष्टित होऊन देदीप्यमान दिसत होता, तसा तुझ्या पुत्रांनीं परिवेष्टित कर्ण रणभूमीवर शोभूं लागला. ८. १०.

## अध्याय ११ वा.

[ १ व्यूहरचना. ]

(१) धृतराष्ट्र—वैकर्तन कर्णाची दुर्योधनानें सेनापतिपदावर स्थापना केली आणि गोड शब्दांनीं त्याचें बंधूप्रमाणें अभिवंदन केलें. नंतर सूर्योदय झाला असतां व्यूहरचना करण्याविषयीं आज्ञा दिल्यावर कर्णानें पुढें काय केलें, तें सांग !

संजय—धृतराष्ट्रा, कर्णाची संमति घेऊन तुझ्या पुत्रांनीं आनंदप्रद रणवाद्यें वाजविलीं व सैन्यरचना व्यवस्थित करण्याविषयीं आज्ञा दिली. रात्र बरीच राहिली होती, तरी एकाएकीं सर्वत्र 'सैन्यरचना करा' अशा आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. युद्धार्थ गज, अश्व, रथ यांची सिद्धता सुरू होऊन मोठा कोलाहल झाला. त्यांत सैनिकांना त्वरा करण्याविषयीं वीरांचा आक्रोश मिळून स्वर्गमंडळाला भिडून जाण्याइतका मोठा तुमुल ध्वनि झाला !

नंतर सूर्याप्रमाणें तेजस्वी रथांत बसून सेनापति कर्ण संग्रामभूमीवर आला. त्यानें सुवर्णपृष्ठ धनुष्य घेतलें होतें. त्याच्या रथाच्या पताका शुभ्र असून त्याचे अश्वहि श्वेतवर्णाचे होते. रथावर लहान लहान घंटा लावून तो सुशोभित केला होता. त्याचा ध्वज नागकच्छ चिह्न ( हत्तीच्या सांखळदंडाप्रमाणें ) मंडित होता. रथावर शंभर तूणीर (भाते), आणि शैतघ्नी इत्यादि शक्ति असून गदा, वरूथ, शूल, तोमर आणि अनेक प्रकारचीं धनुष्यें होतीं. रणांगणावर येतांच कर्णानें आपलें धनुष्य गरगर फिरवून शंख वाजविला. रणांत धनुर्धर कर्ण अंधकाराचा नाश करणाऱ्या सूर्याप्रमाणें भासला ! त्याला पाहून कौरवांना भीष्माच्या, द्रोणाच्या अथवा दुसऱ्या कोणाहि वीराच्या मृत्यूविषयीं कांहीं वाटलें नाहीं ! हे मारिषा, नंतर कर्णानें शंखध्वनि केला आणि त्वरा करण्याविषयीं आपल्या वीरांना सूचना करून तें कौरवांचें प्रचंड सैन्य एकत्र केलें !

नंतर त्या शत्रुतापन कर्णानें सैन्याचा मकराकार व्यूह रचिला आणि पांडवांना जिंकण्याच्या हेतूनें तो स्वतः त्या मकराच्या मुखाग्रभागीं उभा राहिला. त्याच्या नेत्रभागीं शूर शकुनि व महारथ उलूक उभे राहिले. मस्तकभागीं द्रोणपुत्र अश्वत्थामा उभा राहून मानेच्या ठिकाणीं कर्णाचा बंधुवर्ग स्थित झाला. मध्य-

---

१ अयःकंटकसंच्छन्ना शतघ्नी महती शिला. २ वरूथो रथगुप्तिर्वा तिरोधत्ते रथस्थितिम्.

भागीं आपल्या मोठ्या सैन्यानिशीं दुर्योधन उभा राहून डाव्या पायाच्या स्थानीं कृतवर्मा राहिला. उजव्या पायाच्या जागीं अमोघवीर्य गौतम उभा राहून त्याच्या सभोंवार त्रिगर्त आणि दाक्षिणात्य राहिले. मागच्या डाव्या पायाच्या स्थानीं मद्रदेशाधिपति शल्य उभा होता व सुषेण सहस्र रथ व तीनशें गज ह्यांसह पृष्ठाकडील अपसव्यभागीं स्थित होता. तसेच त्याच्या पुच्छाच्या जागीं वीर्यशाली बंधु चित्र व चित्रसेन राजे मोठ्या सैन्यासह उभे होते.

राजश्रेष्ठ धृतराष्ट्रा, कर्णानें अशा प्रकारची व्यूहरचना केल्याचें पाहून युधिष्ठिर अर्जुनाकडे वळून त्याला म्हणाला, “ अर्जुना, रणांगणांत ही धार्तराष्ट्री सेना कशी दिसत आहे पहा ! हिची रचना कर्णानें केली आहे. महारथी व वीर हिचें रक्षण करीत आहेत. ह्यांतील मोठमोठे वीर आधींच वध पावले असल्यामुळें हें महासैन्य मला तृणवत् भासत आहे. त्यांत शोभणारा पराक्रमी असा वीर म्हणजे महाधनुर्धर सूतपुत्र कर्ण हाच आहे. ह्या रथिश्रेष्ठ कर्णांपुढें युद्ध करण्यास देव, दानव, गंधर्व, किन्नर व महोरग यांसह चराचर तिन्ही लोक एकत्र होऊन आले, तरी त्यास जिंकणें अशक्य आहे. अर्जुना, त्या कर्णाचा आज तूं वध कर म्हणजे तुझा जय झालाच असें समज ! असें करशील तरच द्वादश वर्षें माझ्या हृदयांत सलत असलेलें शल्य तूं काढून टाकल्यासारखें होईल ! अर्जुना, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून तुला जशी व्यूहरचना करावयाची असेल, तशी कर ! ”

वडील बंधूचें भाषण ऐकून अर्जुनानें आपल्या सैन्याची अर्धचंद्राकार व्यूहरचना केली. त्याच्या डाव्या बाजूला भीम उभा राहिला व उजव्या बाजूला धृष्टद्युम्न स्थित झाला. मध्यभागीं धर्मराजासह अर्जुन उभा राहिला व धर्मराजाच्या पृष्ठभागीं नकुल-सहदेव स्थित झाले. अर्जुनाच्या रथाचीं चक्रें युधामन्यु व उत्तमौजा हे पांचाल्यवीर रक्षीत होते. त्यांचें रक्षण अर्जुनानेंच केलें असल्यामुळें युद्धांत त्यांनीं त्याला सोडलें नाहीं. बाकी राजे अंगांत कवचें घालून आपली शक्ति, उत्साह व प्रयत्न यांना अनुसरून योग्य ठिकाणीं राहिले. अशाप्रकारें पांडवांनींहि आपली व्यूहरचना केली.

धृतराष्ट्रा, दोन्ही सैन्यें ह्याप्रमाणें सिद्ध झाल्यावर तुझ्याकडील धनुर्धर युद्धाविषयीं आतुर झाले. सूतपुत्रानें तुझ्या सेनेचा व्यूह रचिलेला पाहून दुर्योधन आणि त्याचे बंधु यांना ‘ आतां पांडवांचा वध झाला, ’ असें वाटूं लागलें. तसेंच

पांडवांच्या सेनेंतहि युधिष्ठिराला 'कर्णासह सर्व कौरवांचा वध झाला' असें वाटलें! नंतर दोन्ही पक्षांकडून शंख, भेरी, पणवादि वाद्यें यांचा चोहोंकडून नाद होऊं लागला. उभय सैन्यांमध्यें मोठा रणघोष सुरू होऊन जयशाली पुरुषांचे सिंहनादहि होऊं लागले! अश्वांचें खिंकाळणें, गजांचा चीत्कार आणि रथनेमींचा उग्र आवाज होऊं लागला! त्यावेळीं व्यूहाच्या अग्रभागीं अंगांत कवच घालून राहिलेल्या कर्णाला पाहून द्रोणाच्या वधाची आठवण सुद्धां कोणाला झाली नाहीं. उभय दळांत पराक्रमी वीर परस्परांच्या वधाविषयीं उत्सुक होऊन राहिले होते. सज्ज होऊन राहिलेल्या या सैन्यांच्या अग्रभागीं अर्जुन व कर्ण हे दोघे मोठ्या दक्षतेनें स्थित होते. परस्परांना पाहून प्रक्षुब्ध चित्तानें ते सैन्यांत संचार करूं लागले. नंतर दोन्ही सैन्यें एकमेकांवर धांवून गेलीं आणि समरोत्सुक वीर आपापलीं स्थानें सोडून पुढें गेले! नंतर त्या चतुरंगसैन्यांत भयंकर युद्ध प्रवृत्त झालें आणि मोठी प्राणहानि झाली! ८. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ युद्धवर्णन. २ क्षेमधूर्तीचा वध. ]

(१) संजय—धृतराष्ट्रा, तीं सैन्यें एकमेकांवर धांवून गेलीं असतां अत्यंत युद्धोत्सुक दिसलीं. अश्व व गज मोठ्या हर्षानें नाचूं लागले. तीं सैन्यें देवासुरांच्या सेनांप्रमाणें शोभूं लागलीं. रथ, गज, अश्व आणि पदाति यांनीं वारंवार मोठ्या शौर्यानें एकमेकांवर एवढे प्रहार केले कीं, त्यामुळें ते वीर आपलीं पापें व शरीरें रणभूमीवर ठेवून गेले! मोठमोठ्या वीरांनीं शत्रुपक्षाकडील वीरांचीं मस्तकें तोडलीं आणि त्यायोगें पृथ्वी आच्छादून टाकली! त्यावेळीं वीरांनीं आपल्या अर्धचंद्राकार, भल्ल आणि क्षुरप्र बाणांनीं, तसेंच खड्ग, लोहदंड आणि परश्वध (कुऱ्हाडी) इत्यादि आयुधांनीं शत्रूंचीं मस्तकें छेदून टाकिलीं. दीर्घबाहु वीरांचे भुज त्यांच्याचसारख्या वीरांनीं तोडून टाकिले आणि ते भूमीवर पडून हस्तांतील आयुधें आणि बाहुभूषणें यांच्या योगें शोभूं लागले. ते त्यांचे रक्तवर्ण बाहु व अंगुलिका इतकीं चकाकत होतीं कीं गरुडानें मारून टाकिलेले उग्र पंचमुखी सर्पच पृथ्वीवर पडून राहिले आहेत, असें भासत होतें! पुण्यक्षयकालीं जसे स्वर्गस्थ पुरुष विमानांतून खालीं पृथ्वीवर

पडतात, त्याप्रमाणें गज, अश्व किंवा रथ यांवरून शत्रूंच्या आघातांनीं वीर भूमीवर पडूं लागले! दुसरेहि शेंकडो वीर बलवत्तर शत्रूंच्या हातून मोठमोठ्या गदा, परिघ किंवा मुसळें यांच्या योगानें रणांगणांत पतन पावले! त्या रणांत रथांनीं रथांचा, मदोन्मत्त गजांनीं मदोन्मत्त गजांचा आणि सादींनीं सादींचा संहार केला! दोहोंकडील चतुरंग सैन्यांचें तुमुल युद्ध होऊन पाणि, पाद आणि शस्त्रें यांच्या योगें भयंकर नाश होऊं लागला!

याप्रमाणें त्या उभय सैन्यांत शूरांकडून कंदन होत असतां भीमसेनाला पुढाकार देऊन पांडव कौरवांवर धांवून आले. त्यावेळीं धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदी-पुत्र, प्रभद्रक, सात्यकि इत्यादि वीर भीमाबरोबर होते. त्या वीरांचा उरःप्रदेश विशाल असून भुज दीर्घ होते. ते उंच असून त्यांचे नेत्र विशाल होते. त्यांचे दंत रक्तवर्ण असून ते मदोन्मत्त गजांप्रमाणें पराक्रमी होते. त्यांनीं अंगावर नाना रंगांचीं वस्त्रें धारण केलीं असून सुगंधी तैलें अंगाला लाविलीं होतीं. कटीला खड्ग बांधलें असून हातांत पाश होते. त्यांचें सामर्थ्य गजांचें निवारण करण्या-इतकें होतें. ते रूपानें यमासारखे भयंकर असून परस्परांस सोडून ते कधींहि जात नसत. त्यांच्यापाशीं भाते असून हातांत धनुष्यें होतीं. केश दीर्घ असून बोलणें प्रिय होतें. पांडवांकडील पत्ती, अश्वसादी आणि दुसरेहि वीर अशा प्रकारचे होते. नंतर पांडव चेदि, पांचाल, केकय आदिकरून वीरांसह आमच्या सैन्यावर धांवून आले. त्यावेळीं अनेक प्रकारचीं रणवाद्यें वाजूं लागलीं! त्या वाद्यघोषानें ते वीर मोठ्या हर्षानें नाचतहंसत होते!

अशा प्रबल सैन्यासह भीमसेन कौरवांवर धांवून आला. सैन्याच्या मध्य-भागीं भीम गजस्कंधीं आरूढ झाला असून मोठमोठे महात त्याचें संरक्षण करीत होते. त्या गजश्रेष्ठाचे सर्व संस्कार यथाशास्त्र केल्यामुळें त्याच्या शरीरा-वर अलौकिक तेज झळकत होतें. उदयगिरीच्या अग्रभागीं सूर्य जसा आपल्या दिव्य कांतीनें शोभत असतो, तसा तो भीमसेन त्या गजस्कंधावर आपल्या असामान्य तेजानें विराजमान झाला होता. त्यानें अंगांत पोलादी कवच घातलें असून तें उत्तम प्रकारच्या रत्नांनीं विभूषित केलें होतें. त्यामुळें शरत्कालांतील नक्षत्रयुक्त आकाशाप्रमाणें भीमसेनाचा देह शोभत होता. त्याच्या हातांत तोमर असून मस्तकावर किरीट होता. शरत्कालच्या मध्याह्नींच्या सूर्याप्रमाणें तो शत्रूंना आपल्या तेजानें पोळून टाकीत होता!

( २ ) अशारीतीनें गजस्कंधीं आरूढ होऊन भीम येत आहे, असें क्षेमधूर्तीनें दुरून पाहिलें आणि त्यास युद्धार्थ आह्वान केलें. क्षेमधूर्तिहि गजारूढ होऊन मोठ्या आवेशानें भीमावर धांवून गेला. पांडवांकडील वीरांनाहि तें पाहून मोठा हर्ष झाला व युद्धास प्रारंभ झाला !

प्रथमतः उभयांकडील उग्र गजांचें युद्ध सुरू झालें. ते उभय गज परस्परांशीं युद्ध करीत असतां त्यांजवरील वीर आपल्या तोमरांनीं परस्परांवर प्रहार करून मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले. कांहीं वेळानें त्या वीरांनीं एकमेकांपासून दूर होऊन व धनुष्यें हातांत घेऊन एकमेकांवर बाणवृष्टि केली. अशाप्रकारें बाणवृष्टि होत असतां उभय दळांतील योद्धयांना मोठा हर्ष झाला. मग ह्या दोघां वीरांनीं सिंहनाद केले आणि आपापले गज पुनः एकमेकांवर सोडले. ते गज आपल्या शुंडा वर करून युद्ध करूं लागले. त्या वीरांनीं परस्परांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं व ते पुनः एकमेकांवर धांवून गेले. त्यांनीं प्रावृट्कालांतील मेघांप्रमाणें शक्ति व तोमर यांची परस्परांवर वृष्टि केली. इतक्यांत क्षेमधूर्तीनें भीमाच्या उरःप्रदेशावर मोठ्या आवेशानें तोमराचा प्रहार केला आणि मोठी गर्जना करून पुनः आणखी सहा वेळां त्याच्यावर तोमर टाकले. हें पाहून भीमाला क्रोध आला आणि तो तीव्र किरणांनीं प्रदीप्त व मेघांनीं व्याप्त झालेल्या सूर्यासारखा दिसूं लागला. मग त्यानें आपल्या हातांतील सूर्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी पोलादी तोमर नीट नेम धरून त्यावर टाकिला ! तेव्हां त्या कुलूताधिपतीनें दहा बाण मारून त्या तोमराचा नाश केला आणि सात बाणांनीं पुनः भीमाला विद्ध केलें. मग भीमानें हातांत धनुष्य घेतलें आणि मेघाप्रमाणें गर्जना करून त्या क्षेमधूर्तीच्या गजावर बाण मारिले. त्या बाणांनीं तो गज भयभीत झाला आणि वाऱ्यानें उधळून लावलेल्या मेघाप्रमाणें पळत सुटला. मग भीमाचा गज त्याच्या मागें लागला. परंतु त्या प्रतापी क्षेमधूर्तीनें आपल्या गजाचें मोठ्या युक्तीनें निवारण केलें आणि उलट भीमाच्या हत्तीवर बाण टाकिले. त्यानें एका आनतपर्व बाणानें भीमसेनाचें चाप तोडून टाकिलें आणि त्याच्या गजाच्या मर्मस्थळीं बाणांचा प्रहार करून त्याला हत केलें ! हे भारता, तेव्हां तो भीमसेनाचा हत्ती निधन पावून भूमीवर पडला. तो गज खालीं पडण्यापूर्वीं भीम उडी मारून खालीं आला आणि क्षेमधूर्तीच्या पुढें उभा राहिला. भीमानें क्षेमधूर्तीच्या गजावर गदेचा असा प्रहार केला कीं, तो तत्काल मरून पडला ! आपला गज भीमाकडून मारला गेल्याचें पाहून तो कुलूताधिपति गजावरून

उडी मारून खालीं आला आणि भीमावर सशस्त्र धांवून गेला, तों भीमानें त्याच्यावर आपल्या गदेचा इतक्या जोरानें प्रहार केला कीं, तो तत्काल आपल्याच गजाच्या सन्निध सशस्त्र मरून पडला. अशाप्रकारें वज्रभग्न पर्वताप्रमाणें किंवा वज्रहत सिंहाप्रमाणें त्या कुलूताधिपतीची स्थिति पाहून तुझी सेना भयभीत झाली व सारखी पळत सुटली! ८. १२.

---

## अध्याय १३ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ विंदानुविंदांचा वध. ]

(१) **संजय**—राजन्, नंतर महाधनुर्धर कर्णानें सन्नतपर्व बाणांची योजना करून पांडवांच्या सैन्याचा संहार करण्यास आरंभ केला. त्याप्रमाणें महारथ पांडवहि कर्णाच्या समोर कौरवसैन्याचा नाश करूं लागले. कर्णानें सूर्यसमान तेजस्वी बाणांनीं पांडवांवर एकसारखी वृष्टि करून त्यांचा क्षय केला. कर्णाच्या नाराच बाणांनीं विद्ध झालेले पांडवांचे गज आक्रोश करूं लागले आणि धैर्यच्युत होऊन दाही दिशांना पळत सुटले! असा कर्णानें पांडवसेनेचा ऱ्हास केला असतां रणांत नकुल कर्णावर धांवून आला. दुष्कर कर्म करीत असणाऱ्या अश्वत्थाम्यावर भीम चालून आला आणि कैकेय देशाचे नृपति विंदानुविंद ह्यांचें निवारण सात्यकीनें केलें. चित्रसेन राजानें आपल्याशीं भिडणाऱ्या श्रुतकर्म्याबरोबर युद्ध आरंभिलें. चित्रराजावर प्रतिविंध्य चालून आला. दुर्योधनानें धर्मपुत्र युधिष्ठिरावर चाल केली आणि अर्जुन क्रुद्ध होऊन संशप्तकगणांवर धांवला. ह्याप्रमाणें भयंकर युद्ध प्रवृत्त झालें असतां मोठमोठ्या वीरांचा क्षय होऊं लागला. धृष्टद्युम्नाचें कृपाचार्यांशीं, शिखंडीचें कृतवर्म्याशीं, श्रुतकीर्तीचें शल्याशीं आणि माद्रीपुत्र सहदेवाचें तुझ्या दुःशासन पुत्राशीं युद्ध सुरू झालें!

(२) धृतराष्ट्रा, दोघांहि कैकेय राजांनीं तीक्ष्ण बाणवृष्टि करून सात्यकीला आच्छादून टाकिलें आणि हे भारता, सात्यकीनेंहि उलट कैकेय राजांना बाणसमूहांनीं झांकिलें. त्या दोघां विंदानुविंद बंधूंनीं सात्यकीच्या हृदयावर सारखे तीक्ष्ण बाण मारले. सात्यकीच्या बाणांनीं आधींच त्यांचीं कवचें भिन्न झालीं होतीं, तरी त्यांनीं रणांत बाणांनीं सात्यकीला विद्ध केलें. सात्यकीनें हंसत हंसतच चारी बाजूंनीं त्यांजवर शरवर्षाव करून त्यांचें निवारण केलें. नंतर विंदानुविंदांनीं पुनः सात्यकीचा रथ बाणांनीं झांकिला असतां त्या यशस्वान् शौरीनें

त्यांचीं धनुष्यें तोडून टाकलीं आणि तीक्ष्ण बाणप्रहार करून त्यांचा निग्रह केला. नंतर दुसरीं धनुष्यें घेऊन त्या सात्यकीवर सारखी बाणवृष्टि करीत ते वीर त्याच्या मागून शीघ्र निघाले. राजा, तेव्हां त्या बाणानें महारणांत एकच अंधकार होऊन राहिला आणि त्या महारथांनीं अन्योन्यांचीं धनुष्यें तोडून टाकलीं. नंतर त्या सात्यकीनें दुसरें धनुष्य हातांत घेतलें आणि तें सज्ज करून एका क्षुरप्र बाणानें अनुविंदाचें मस्तक तोडून टाकिलें ! तें शिर सकुंडल रणभूमीवर शंबरासुराच्या मस्तकाप्रमाणें शोभूं लागलें ! तें पाहून कैकेय वीरांना दुःख होऊन त्यांनीं मोठा शोक केला !

अनुविंदाचा वध झाल्याचें पाहून त्याच्या महारथ बंधूनें दुसरें धनुष्य सज्ज केलें आणि मोठी शरवृष्टि करून सात्यकीचें निवारण केलें. त्यानें साठ स्वर्णपुंख बाण सात्यकीवर टाकले आणि 'थांब, थांब,' म्हणून मोठ्यानें गर्जना केली. नंतर त्या कैकेय महारथानें सात्यकीच्या बाहूवर आणि वक्षावर सहस्रशः बाण मारिले ! त्यामुळें सात्यकीच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागून तो सपुष्प किंशुक वृक्षाप्रमाणें शोभूं लागला ! त्या बाणप्रहारांनीं विद्ध झालेल्या सात्यकीनें पंचवीस बाण विंदावर टाकले. तेव्हां त्या वीरांनीं परस्परांचीं धनुष्यें तोडून टाकलीं आणि अन्योन्यांचे सारथी व अश्व यांचाहि वध केला ! अशाप्रकारें विरथ झालेले शेंकडो वीर चंद्रांनीं विभूषित केलेलीं चर्में ( ढाली ) घेऊन व खड्ग घेऊन युद्धास प्रवृत्त झाले. त्यावेळीं पूर्वीं देवासुरांचे युद्धांत जसे इंद्र आणि जंभ शोभले तसे ते खड्गधारी विंद आणि सात्यकि शोभूं लागले ! त्या महायुद्धांत ते मंडलाकार फिरत व नंतर एकमेकांवर चालून येत. याप्रमाणें युद्धाला प्रारंभ झाला असतां सात्यकीनें कैकेयाचें चर्म तोडून टाकलें व त्याचे दोन तुकडे केले. विंदानेंहि सात्यकीची तशीच स्थिति केली. नंतर तो कैकेय राजा विंद मंडलाकार फिरून सात्यकीवर धांवून येत असतां सात्यकीनें तिर्यक् हस्तानें त्यावर खड्गाचा असा प्रहार केला कीं, त्यामुळें तो विंद आपल्या कवचासह द्विधा भिन्न होऊन वज्रहत पर्वताप्रमाणें भूमीवर पडला ! अशा रीतीनें त्या विंदाचा रथसत्तम सात्यकीनें वध केल्यावर तो युधामन्यूच्या रथावर आरूढ झाला. त्यानें दुसऱ्या रथाची विधिवत् सिद्धता केली आणि त्यांत बसून तो कैकेयांचा बाणवर्षाव करून संहार करूं लागला ! त्यामुळें ती कैकेयसेना भीतिग्रस्त झाली व शत्रूंना सोडून दाही दिशांना पळून गेली ! ८. १३.

## अध्याय १४ वा.

[ १ चित्रसेनराजाचा वध. २ चित्राचा वध. ]

( १ ) संजय—राजन्, नंतर श्रुतकर्म्यानें संतप्त होऊन चित्रसेन राजाला पन्नास बाण मारले ! तेव्हां त्या अभिसाराधिपति चित्रसेनानें नऊ नतपर्व बाण श्रुतकर्म्यावर टाकून पांच बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें ! तें पाहून श्रुतकर्मा संतप्त झाला आणि त्यानें चित्रसेनाच्या मर्मभागीं तीक्ष्ण बाण मारले ! त्या बाणांनीं विद्ध होऊन चित्रसेन मूर्च्छित झाला व त्याचें देहभानहि नष्ट झाल्या-सारखें झालें. इतक्यांत त्या विजयी श्रुतकीर्तीनें नव्वद बाणांनीं चित्रसेनाला आच्छादून टाकिलें. थोड्या वेळानें चित्रसेन देहभानावर आला. त्यानें एका भल्लानें श्रुतकर्म्याचें धनुष्य तोडून टाकिलें आणि त्याला सात बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां त्या श्रुतकर्म्यानें दुसरें वेगवत्तर सुवर्णभूषित धनुष्य घेतलें आणि मोठ्या वेगानें चित्र-सेनावर बाण मारून त्याला चित्ररूप केलें ! नंतर त्या शूर चित्रसेनानें श्रुतवर्म्याच्या उरःप्रदेशीं नाराच बाण मारून त्याला 'उभा रहा, उभा रहा,' असें मोठ्यानें सांगितलें. श्रुतवर्म्याच्या वक्षःस्थलांतून रुधिरस्राव होऊं लागला, त्यावेळीं पर्व-तांतून गैरिकेचा ( कावेचा ) स्राव होतो तसें त्याच्या शरीरांतून रक्त वाहूं लागलें ! त्या स्रावानें श्रुतकर्मा रक्तांग होऊन फुललेल्या किंशुक वृक्षाप्रमाणें शोभूं लागला ! हे राजा, श्रुतकर्म्यानें क्रुद्ध होऊन चित्रसेनाच्या धनुष्याचे दोन तुकडे केले आणि एका तीक्ष्ण भल्लानें त्याचें शिरस्त्राण व मस्तक हीं उड-विलीं ! चित्रसेनाचें तें दीप्तिमत् मस्तक पाहून स्वर्गांतून पृथ्वीतलावर यदृ-च्छेनें पडलेलें तें चंद्रबिंबच आहे कीं काय असें भासूं लागलें ! आपल्या राजाचा वध झाल्याचें पाहून ते चित्रसेनाचे सैनिक श्रुतकर्म्यावर मोठ्या आवे-शानें धांवून आले. नंतर श्रुतकर्मा संतप्त झाला आणि त्यानें चित्रसेनाच्या सैन्यावर बाणवृष्टि केली आणि अंतकालीं जसा यम सर्व भूतांचा क्षय करितो, तसा त्यानें त्या चित्रसेनाच्या सैन्याचा संहार केला ! तुझा धनुर्धर पौत्र श्रुतकर्मा याचा बाणप्रहार सुरू होतांच दावानलांत दग्ध झालेल्या गजांप्रमाणें ते सैनिक सर्व दिशांस पळत सुटले ! शत्रुजयाविषयीं निरुत्साह झालेले चित्रसेनाचे सैनिक पळून जात असतां श्रुतकर्म्यानें त्यांजवर बाणवृष्टि करून त्यांना 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें !

( २ ) हे धृतराष्ट्रा, नंतर प्रतिविंध्यानें चित्रावर पांच बाण मारिले, तीन

बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें आणि एका शरानें त्याचा ध्वज मोडून टाकिला! चित्रानेंहि प्रतिविंध्याच्या बाहूंवर आणि वक्षःस्थळावर नऊ तीक्ष्ण भल्ल मारिले! हे भारता, प्रतिविंध्यानें चित्राचें धनुष्य तोडिलें, तें पाहून चित्रानें अग्निशिखेप्रमाणें घोर शक्ति तुझ्या प्रतिविंध्य नातवावर सोडली! महोल्केप्रमाणें ती शक्ति आपल्यावर येत आहे, असें पाहून प्रतिविंध्यानें हंसत-हंसत तिचे दोन तुकडे केले! आपली शक्ति नष्ट झाल्यावर चित्रानें एक महागदा घेतली आणि ती सुवर्णमंडित गदा प्रतिविंध्यावर टाकली! त्या गदेनें प्रति-विंध्याचे अश्व व सारथि मृत झाले. त्याच्या रथाचाहि भंग होऊन तो भूमीवर कोसळून पडला. नंतर प्रतिविंध्यानें रथांतून खालीं उडी टाकिली आणि आपली स्वर्णभूषित शक्ति चित्रावर फेंकली! आपल्यावर शक्ति येत आहे, असें पाहून चित्रानें तिचा प्रतिकार केला आणि तीच शक्ति उलट प्रतिविंध्यावर टाकली. त्या महाप्रभ शक्तीनें प्रतिविंध्याला रणांत गांठून त्याचा उजवा बाहु छिन्न केला आणि ती महीतलावर येऊन पडली. ती शक्ति भूतलावर पडली असतां तितका भाग विद्युल्लतेनें सुशोभित झाल्यासारखा दिसूं लागला! नंतर प्रतिविंध्य क्रोधसंतप्त झाला आणि चित्राचा वध करण्याच्या हेतूनें एक स्वर्णभूषित तोमर घेऊन त्यानें त्यावर टाकला! चित्राच्या अंगावरील भूषणांचा भेद करून त्याच्या हृदयांत तो घुसला आणि महासर्प दंश करून जसा तत्काल बिळांत शिरतो, त्याप्रमाणें तो तोमर चित्राचे प्राण घेऊन भूमींत शिरला! चित्र राजा याप्रमाणें आपले परिघतुल्य बाहु पसरून भूमीवर पडला! चित्राचा वध झाल्याचें पाहून तुझे सैनिक प्रति-विंध्यावर चारी बाजूंनीं धांवून आले! आणि त्यांनीं त्यावर पुष्कळ बाण आणि घंटा लावलेल्या शतघ्नी टाकल्या आणि तेणेंकरून सूर्यास जसे अभ्रगण आच्छादून टाकतात, तसें त्यास झांकून टाकिलें! परंतु त्या महाबाहु प्रति-विंध्यानें बाणवृष्टि करून इंद्र जसा असुरसैन्याची वाताहत उडवून टाकितो, त्याप्रमाणें तुझ्या सर्व सैन्याला उधळून लाविलें! हे नृपा, त्या समयीं पांडवां-कडून मारले जाणारे तुझे सैनिक वायूनें उधळून लावलेल्या घनांप्रमाणें सर्वत्र पळून गेले! सैन्याचा भंग होऊन पळून जात असतां एकटा अश्वत्थामा मात्र भीमसेनावर धांवून आला. नंतर त्या दोघांमध्यें पूर्वीं जसें वृत्रासुर आणि इंद्र यांमध्यें युद्ध झालें, तसें घनघोर युद्ध झालें! ८. १४.

## अध्याय १५ वा.

[ १ अश्वत्थामा व भीमसेन ह्यांचें युद्ध. ]

( १ ) संजय—हे राजा, अश्वत्थाम्यानें भीमावर बाण टाकून त्याला विद्ध केलें आणि पुनः अतित्वरेनें त्याच्या मर्मावर तीक्ष्ण नव्वद बाण टाकून आपलें अस्त्रकौशल्य चांगलें दाखविलें ! तेव्हां भीम किरणाच्छादित सूर्याप्रमाणें रणांत शोभूं लागला ! भीमानेंहि अश्वत्थाम्यावर उलट सहस्रावधि बाणांची वृष्टि केली व मोठ्यानें सिंहनाद केला. अश्वत्थाम्यानें शराघातांनीं भीमाचें निवारण केलें आणि हंसतच एका नाराच बाणानें त्याला मस्तकावर विद्ध केलें ! राजा, अरण्यांत जसा मत्त गंडक ( गेंडा ) मस्तकावर शृंग धारण करितो, तसा भीम त्या ललाटस्थ बाणानें दिसूं लागला ! नंतर भीमानें तीन नाराच बाण अश्वत्थाम्याचे मस्तकावर मारिले. तेव्हां वर्षाकालीं जलौघांनीं शोभणाऱ्या त्रिशृंगी पर्वताप्रमाणें तो रक्तांग ब्राह्मण दिसला ! द्रौणीनें शंभर बाण भीमावर टाकले, परंतु वाऱ्याचा जसा पर्वतावर परिणाम होत नाहीं, तद्वत् भीमसेनाला त्यांचें कांहीं न वाटून तो किमपि कंपायमान झाला नाहीं. भीमानें शतावधि तीक्ष्ण शरांनीं अश्वत्थाम्यावर वृष्टि केली; परंतु जलप्रवाहानें जसा पर्वत ढळत नाहीं, तसा अश्वत्थामा त्या बाणवृष्टीनें किमपि भयभीत झाला नाहीं. याप्रमाणें ते दोघे बलाढ्य वीर परस्परांवर भयंकर शरवृष्टि करूं लागले ! त्यावेळीं लोकक्षयाकरितां प्रदीप्त झालेल्या दोन आदित्यांप्रमाणें ते आपल्या बाणांनीं परस्परांना दग्ध करूं लागले ! त्या महायुद्धांत आपलें प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या हेतूनें ते वीर परस्परांवर व्याघ्रां-प्रमाणें धांवून जात होते; तेव्हां धनुष्यें हीं त्यांचीं दुराधर्ष वक्त्रें आणि बाण ह्या त्यांच्या भयंकर दंष्ट्रा होत, असें भासत होतें. ते उभय वीर बाणसमूहानें आच्छादित होऊन मेघमंडळानें व्याप्त चंद्रसूर्यांप्रमाणें शोभत होते. हे अरिंदमा, अल्पावकाशानें दृष्टिगोचर होतांच अभ्रपटलांतून मुक्त झालेले बुध व मंगळ यांप्रमाणें ते भासले. इतक्यांत द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें भीमाला उजवी प्रदक्षिणा घातली व पर्वतावरील पर्जन्यवृष्टीप्रमाणें त्याजवर भयंकर बाणवर्षाव केला ! ती अश्वत्थाम्याची कृति म्हणजे शत्रूचें विजयचिन्हच होय, असें भीमाला वाटून तोहि अश्वत्थाम्याला उजवी घालून गेला. प्रजांच्या संहरणकालीं जसें ग्रहयुद्ध होत असतें, त्याप्रमाणें त्या उभय वीरांमध्यें भयंकर युद्ध जुंपलें ! हे भारता,

त्यांजकडून सुटलेल्या बाणांच्या प्रकाशानें सर्व दिशा व्याप्त करून तुझ्या सेनेला सर्व बाजूंनीं प्रदीप्त केलें. सर्व आकाश बाणसमूहांनीं आच्छादित झालें आणि प्रलयसमयीं अंतरिक्षांतून उल्कापात होऊन जशी स्थिति होते, तशी हे भारता, त्या बाणांपासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें केली ! दोन्ही सैन्यांत अग्नीनें उडविलेला हाहाकार पाहून तेथें जमलेले सिद्ध म्हणाले, " असें श्रेष्ठ प्रतीचें युद्ध आजपर्यंत कधीं झालेलें नाहीं ! आजवर झालेलीं युद्धें याच्या सोळाव्या कलेचीहि बरोबरी करणारीं नाहींत आणि अशाप्रकारचें युद्धहि कधीं होणार नाहीं ! हे ब्राह्मण-क्षत्रिय वीर किती युद्धनिष्णात आहेत म्हणून सांगावें ? काय ह्यांची ज्ञानसंपन्नता ? यांचा उग्र पराक्रम किती म्हणून वर्णन करावा ? ह्या भीमाची शक्ति आणि अश्वत्थाम्याचें अस्त्रनैपुण्य तरी किती म्हणून वर्णावें ? काय ह्यांचें वीर्य आणि चातुर्य ? हे दोघे सृष्टिसंहारकर्ते यमच परस्परांशीं युद्ध करीत आहेत ! हे वीर म्हणजे प्रत्यक्ष रुद्र, रवि किंवा यमच असले पाहिजेत ! " राजा धृतराष्ट्रा, सिद्धांचीं अशा प्रकारचीं भाषणें पुनः पुनः ऐकूं येऊं लागलीं. त्यासमयीं तेथें प्राप्त झालेल्या देवांनीं सिंहनाद केले. त्या दोघां वीरांचीं अद्भुत आणि अचिंत्य पराक्रमकृत्यें पाहून सिद्धचारणसमूह आश्चर्यचकित होऊन गेला. देव, सिद्ध आणि ऋषि यांनीं त्या योद्ध्यांची 'महाबाहो द्रौणे, तूं मोठा धन्य आहेस आणि भीमसेना, तूंहि तसाच धन्य आहेस !' अशी प्रशंसा केली !

इकडे त्या दोघां वीरांचें युद्ध चालूच होतें. त्यांनीं परस्परांवर डोळे वटारिले आणि एकमेकांना शक्य ती पीडाहि दिली ! त्यांचे डोळे क्रोधानें आरक्त झाले होते व ते परस्परांवर दांत-ओंठ खात होते ! त्या उभयांनीं परस्परांस बाणांनीं आच्छादून टाकिलें आणि एकमेकांचे ध्वज, सारथि आणि अश्व विद्ध केले ! त्या वीरांच्या त्या वज्रसार बाणांनीं उभयहि रणाग्रभागीं मूर्च्छित होऊन पडले ! अश्वत्थाम्याच्या सारथ्यानें अश्वत्थामा अचेतन पडल्याचें पाहून त्याला दूर नेलें ! तसेंच तो पांडववीर भीमसेन वरचेवर मूर्च्छित होत आहे, असें पाहून त्याच्या सारथ्यानें त्यालाहि रणांतून दूर नेलें ! १८. १५.

## अध्याय १६ वा.

[ १ अर्जुन-संशप्तकयुद्ध. २ अश्वत्थामार्जुनयुद्ध. ३ पुनः अर्जुनाचें संशप्तकांशीं युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अर्जुनाचें संशप्तकांशीं आणि दुसऱ्या राजांचें पांडवांशीं जें युद्ध झालें, त्याचें वर्णन कर ! तसेंच अश्वत्थाम्याचें अर्जुनाशीं जें युद्ध झालें त्याचेंहि वृत्त मला निवेदन कर !

संजय—राजा, शत्रूंशीं झालेल्या संग्रामाचें मी यथातथ्य वर्णन करितों, ऐक. समुद्राप्रमाणें विस्तीर्ण संशप्तकांच्या सैन्यांत अर्जुनानें प्रवेश केला, तेव्हां त्या शत्रुमर्दन वीरानें महावाताप्रमाणें त्या सैन्यसागराला क्षुब्ध केलें ! तीक्ष्ण भल्ल बाण टाकून त्यानें शत्रूंचीं मस्तकें उडविलीं ! राजा, सुंदर नेत्र, भुंवया आणि दंत यांनीं सुशोभित तीं चंद्रबिंबासमान मुखकमलें नालबंधापासून वियुक्त होऊन भूतलावर पडलेलीं दिसूं लागलीं ! त्या युद्धांत अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं शत्रूंचे पीळदार व दीर्घ बाहु तोडून टाकिले ! ते बाहु चंदनागरूच्या उटीनें वासित झाले असून पंचमुखी सर्पाप्रमाणें शोभत होते. त्याप्रमाणें त्यानें शत्रूंचे सूत, ध्वज आणि चाप इत्यादिकांचा भल्ल बाणांनीं भंग केला. तसेंच पुष्कळ रथ, गज, अश्व, अश्वसादी आणि गजसादी यांवरहि सहस्रावधि बाण टाकून त्यांना यमसदनीं पाठविलें ! अर्जुनानें केलेला संहार पाहून संशप्तक वीर क्षुब्ध झाले आणि वृषभांप्रमाणें गर्जना करीत अर्जुनावर धांवून आले ! नंतर त्यांनीं आपणावर प्रहार करणाऱ्या त्या अर्जुनावर सारखी बाणवृष्टि केली ! तें अर्जुन-संशप्तकांचें युद्ध अंगावर रोमांच उभे करणारें झालें ! त्रैलोक्यविजयाच्या इच्छेनें दैत्यांशीं झालेल्या इंद्रयुद्धासमान तें युद्ध होतें. अर्जुनानें अस्त्रांनीं अस्त्रांचें निवारण केलें आणि पुष्कळ बाणांनीं विद्ध करून शत्रूंचा प्राण घेतला ! त्यानें शत्रूंचे धूर्दंड, चक्रें, आंस इत्यादिकांचा नाश केला ! अर्जुनाचा तो पराक्रम पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. शत्रु भयग्रस्त होऊन गेले. त्यावेळीं अर्जुनानें संपादन केलेला विजय सहस्रावधि महारथ्यांच्या बरोबरीचा होता. तो पाहून सिद्ध, देवर्षि आणि चारण ह्यांनीं त्याची स्तुति केली. देवदुंदुभि वाजूं लागले आणि कृष्णार्जुनांच्या मस्तकावर पुष्पवृष्टि झाली ! तेव्हां आकाशवाणी झाली कीं, " चंद्र, अग्नि, वायु आणि सूर्य यांची कांति, दीप्ति, बल व द्युति नित्य धारण करणारे वीर म्हणजे हे कृष्णार्जुनच होत ! एक रथांत

बसलेले हे वीर ब्रह्मा व ईशान यांप्रमाणें अजय्य आहेत! सर्व प्राण्यांत श्रेष्ठ असे हे नरनारायण आहेत!" हे भारता, ती आकाशवाणी ऐकून अश्वत्थामा मोठ्या दक्षतेनें रणांत कृष्णार्जुनांवर धांवून गेला! अर्जुन शत्रूंवर प्राणहारक बाणवृष्टि करीत आहे, असें पाहून अश्वत्थाम्यानें आपला शरयुक्त हात वर करून अर्जुनाला हंसत म्हटलें, "अर्जुना, मी पूज्य अतिथि तुजकडे आलों आहें! तुला वाटल्यास मला युद्धातिथ्य अर्पण कर!"

( २ ) अशाप्रकारें युद्धाची इच्छा करून द्रौणीनें युद्धार्थ अर्जुनाला आह्वान केलें. त्यामुळें अर्जुनाला मोठी धन्यता वाटली आणि तो कृष्णाला म्हणाला, "संशप्तक मला वध्य आहेत आणि द्रोणपुत्र युद्धार्थ आह्वान करीत आहे. तरी अशावेळीं मीं काय करावें, तें मला सांग! तुला मानत असेल, तर आधीं अतिथिसत्कार करीन व मग संशप्तकांचा वध करीन!" हें ऐकून कृष्णानें अर्जुनाला द्रोणपुत्राजवळ नेलें. कारण अश्वत्थाम्यानें वीराप्रमाणें अर्जुनाला युद्धार्थ केलेलें आह्वान स्वीकारून यज्ञाकरितां वायु जसा इंद्रास घेऊन जातो, तसा अर्जुनाला कृष्ण अश्वत्थाम्याकडे घेऊन गेला!

नंतर कृष्ण अश्वत्थाम्याला बोलला, "अश्वत्थामन्, स्थिर चित्तानें तूं बाण सोड, व तुजवर येतील ते सहन कर! यजमानाच्या ऋणांतून मुक्त होण्याला अनुचरांना योग्य काल हाच आहे. विप्रांच्या विवादाचा निर्णय सूक्ष्म असल्यामुळें थोडक्यांत होतो; परंतु क्षत्रियांचा वाद युद्धांतील जयापजयावर अवलंबून असतो, यासाठीं तूं मूर्खपणानें अर्जुनापासून ज्या दिव्य सत्काराची अपेक्षा करीत आहेस, तो मिळविण्यासाठीं तूं त्याच्याशीं मोठ्या दक्षतेनें युद्ध कर!"

अश्वत्थाम्यानें कृष्णाचें हें भाषण ऐकून त्यावर 'ठीक आहे,' असें उत्तर दिलें आणि त्यानें कृष्णावर साठ व अर्जुनावर तीन बाण मारले. तेव्हां अर्जुनानें संतप्त होऊन तीन बाणांनीं त्याचें धनुष्य छेदिलें! अश्वत्थाम्यानें नंतर दुसरें दृढतर धनुष्य घेतलें आणि तें सज्ज करून त्यानें कृष्णार्जुनांवर बाणवृष्टि सुरू केली. त्यानें कृष्णावर तीनशें व अर्जुनावर एकसहस्र बाण सोडले! नंतर आपलें आसन स्थिर करून त्यानें अर्जुनावर कोट्यवधि बाण टाकले! हे मारिषा, त्यावेळीं आपल्या तूणीरांतून, धनुष्यापासून, प्रत्यंचेपासून, बाहूपासून आणि हस्तादिकांपासून त्यानें कृष्णार्जुनांवर सारखे बाण टाकून त्यांस विद्ध केलें आणि महामेघाप्रमाणें मोठ्यानें गर्जना केली! ती ऐकून अर्जुन कृष्णाला बोलला,

"माधवा, या गुरुपुत्राचें माझ्याविषयीं किती दुष्टत्व आहे पहा! यानें आमच्यावर बाण टाकिले आणि तेवढ्यावरूनच आम्ही मृत झालों, असा खोटा समज यानें करून घेतला आहे. परंतु त्याचा हा समज मी आपल्या अंगच्या बलसामर्थ्यानें नाहींसा करितों!" असें बोलून अर्जुनानें शरवृष्टि करून अश्वत्थाम्याच्या प्रत्येक बाणाचे तीन तीन तुकडे केले आणि त्या योगानें सूर्य नीहाराचा नाश करितो, त्याप्रमाणें त्याच्या बाणांचें निवारण केलें!

( ३ ) धृतराष्ट्रा, अर्जुनानें पुनः संशप्तकांचे अश्व, सारथि, रथ, गज, पदाति आणि ध्वज यांवर बाण टाकले! त्यावेळीं कोणत्याहि रूपानें तेथें असणाऱ्या प्रत्येकाला आपण अर्जुनाच्या बाणांनीं व्याप्त झालों असल्याचें दिसलें. अर्जुनाच्या गांडीवापासून मुक्त झालेले बाण अगदीं जवळच्या किंवा कोसभर लांब असलेल्या वीराचा किंवा गजाचा सहज नाश करण्याइतके समर्थ होते. परशूंनीं तोडलेले मोठमोठे वृक्ष जसे वनांत कोसळून पडतात, त्याप्रमाणें मत्त गजांच्या शुंडा रणांत पडूं लागल्या! नंतर सादींसह ते पर्वतप्राय गजहि पडूं लागले! त्यासमयीं इंद्रवज्रानें चूर्ण केलेले पर्वतच खालीं पडत असल्याचा भास झाला. नंतर अर्जुनानें वेगवत्तर अश्व जोडलेल्या शत्रूंच्या रथांचें चूर्ण केलें आणि त्यांतील युद्धदुर्मद वीरांचा नाश केला! त्या युद्धांत धनंजयानें शत्रूकडील अश्वसादी व पत्ती यांचा संहार केला! अशारीतीनें त्या अर्जुनरूपी प्रलयकालच्या सूर्यानें संशप्तकमहार्णवांतील अशोष्य जलाचें आपल्या शरकिरणांनीं शोषण केलें!

राजा, नंतर अर्जुनानें तो द्रौणि महाशैल आपल्या वज्रसदृश बाणांनीं पुनः विदीर्ण करून टाकिला! तेव्हां अश्वत्थामा संतप्त होऊन त्यानें आपले बाण अर्जुनावर, त्याच्या रथावर आणि अश्वांवर सोडले! त्या बाणांचें पार्थानें तत्काल नाराच बाणांनीं निवारण केलें! मग अश्वत्थाम्यानें अर्जुनावर आपल्या शस्त्रांचा प्रहार सुरू केला! तेव्हां अर्जुनानें अपांक्तांना सोडून दाता जसा पांक्तेय याचकांचा स्वीकार करतो, त्याप्रमाणें आपल्याकडे आलेल्या सत्पात्र अतिथीच्या स्वागतार्थ संशप्तकांना सोडून दिलें! ८. १६.

---

*

## अध्याय १७ वा.

[ १ पुनः अश्वत्थामार्जुनयुद्ध. २ पुनः संशप्तकयुद्ध. ३ अश्वत्थाम्याशीं युद्ध व त्याचा पराजय. ]

(१) **संजय**—नंतर शुक्र व अंगिरस यांसमान बलशाली अश्वत्थामार्जुनांचें युद्ध जुंपलें. आपल्या दीप्त शरकिरणांनीं त्यांनीं परस्परांस इतकें संतप्त केलें कीं विमार्गस्थ ग्रहासारखा त्यांपासून सर्व लोकांस त्रास होऊं लागला. अर्जुनानें अश्वत्थाम्याच्या भ्रुकुटींमध्यें एक नाराच बाण इतक्या आवेशानें मारला कीं, तो ऊर्ध्वगति रवीप्रमाणें दिसूं लागला! अश्वत्थाम्यानेंहि शेंकडों बाण कृष्णार्जुनांवर टाकिले! तेव्हां रश्मिजालानें व्याप्त झालेल्या प्रलयकालीन सूर्यांप्रमाणें ते दोघे वीर दिसूं लागले! नंतर अर्जुनानें अश्वत्थाम्यावर सर्व बाजूंनीं अस्त्रांचा वर्षाव केला आणि वज्र, अग्नि किंवा यमदंड यांसदृश प्राणहारक बाणांनीं त्यावर वृष्टि चालविली! त्यावर त्या रौद्ररूपी अश्वत्थाम्यानें कृष्णार्जुनांच्या मर्मस्थळीं आपले तीक्ष्ण बाण इतक्या वेगानें मारिले कीं, प्रत्यक्ष मृत्यूलाहि त्यांच्या योगानें व्यथा झाली असती! अर्जुनानें द्रौणीच्या बाणांचें निवारण केलें आणि त्याच्या अश्वांवर, सारथ्यावर आणि ध्वजावर दुप्पट सुपुंख बाण टाकून तो पुनः संशप्तकांच्या सैन्याकडे वळला!

( २ ) अर्जुनानें संशप्तकांशीं युद्ध सुरू करून त्यांचीं धनुष्यें, बाण, तूणीर, धनुर्ज्या, बाहु, हस्तगत शस्त्रें, अश्व, रथांतील पुष्पें आणि भूषणें, तसेंच त्यांचीं प्रिय कवचें आणि मस्तकें या सर्वांवर बाण मारून त्यांचा विध्वंस केला! जे संशप्तक वीर अर्जुनावर चालून आले, त्यांचे शस्त्रास्त्रांनीं सज्ज रथांवर, अश्वांवर आणि गजांवर अर्जुनानें असा बाणवर्षाव केला कीं, त्यानें रथादिकांचा नाश होऊन आंत बसलेल्या वीरांसह ते बाण रणभूमीवर येऊन पडले! भल्ल आणि अर्धचंद्राकार बाणांनीं छेदलेल्या नरमस्तकांनीं भूमितल व्याप्त होऊन गेलें! तीं मस्तकें कमल, सूर्य किंवा चंद्र यांप्रमाणें तेजःपुंज दिसत असून किरीट, माला आणि अलंकार यांनीं शोभायमान झालेलीं दिसत होतीं. तीं तोडलेलीं मस्तकें पाहून कलिंग, वंग, अंग व निषाद देशांतील योद्धे दैत्यांचा गर्वभंग करणाऱ्या अर्जुनाच्या वधाच्या इच्छेनें त्यावर धांवून आले! ते वीर गजासुरासारख्या बलसंपन्न गजांवर आरूढ झाले होते! अर्जुनानें त्या गजांच्या शुंडा छेदून टाकिल्या आणि वर आरूढ झालेल्या वीरांचीं कवचें व चर्में (ढाली) भग्न केलीं, ध्वजाचा

आणि पताकांचा विध्वंस केला आणि शेवटीं त्यांचे प्राणहि घेतले! अशारीतीनें ते वीर वज्रहत गिरिशृंगांप्रमाणें खालीं पडले!

( ३ ) अशा रीतीनें अर्जुनानें संशप्तकांचा नाश केल्यावर प्रातःकालच्या नव-सूर्याप्रमाणें शोभणारे बाण त्यानें अश्वत्थाम्यावर सोडले ! नंतर उदयास येणाऱ्या सूर्याला ज्याप्रमाणें वायूनें महाभ्रजालानें आच्छादून टाकावें, त्याप्रमाणें त्यानें आपलें शरजाल टाकून अश्वत्थाम्याला त्याखालीं झांकिलें. द्रोणपुत्रानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्याचें निवारण केलें. त्यानें कृष्णार्जुनांस बाणाच्छादित करून मोठ्यानें गर्जना केली! ती गर्जना ग्रीष्मकालाच्या अंतीं आकाशांत चंद्र-सूर्यांना व्यापून टाकणाऱ्या मेघांच्या गर्जनेसारखी होत होती! नंतर अर्जुनानें शत्रूंनीं केलेल्या बाणांधकाराचा नाश करून त्या अश्वत्थाम्याला व त्याबरोबर तेथें असलेल्या तुझ्या इतर वीरांवर सुपुंख बाण मारले! त्यावेळीं अर्जुन भात्यांतून बाण केव्हां काढीत असे, धनुष्याला केव्हां जोडीत असे व शत्रूवर केव्हां सोडीत असे हें कोणालाहि कळत नसे. परंतु रथ, नाग, अश्व, पदाति यांच्या देहांत बाण शिरून ते मरून पडत असल्यानें मात्र दृग्गोचर होत असे! तेव्हां अश्वत्थाम्यानें त्वरा करून उत्तम प्रकारचे दहा नाराच बाण धनुष्याला जोडले आणि ते एका बाणाप्रमाणें कृष्णार्जुनांवर सोडले. त्यांपैकीं पांच बाणांनीं अर्जुन विद्ध झाला आणि इतर पांचांनीं कृष्णहि विद्ध झाला! याप्रमाणें ते सर्व नरश्रेष्ठ कृष्णार्जुन बाणविद्ध झाले व त्यांच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला! तेव्हां धनुर्वेदविशारद अश्वत्थाम्याकडून कृष्णार्जुन पराभूत होऊन हत झाले असें सर्वांस वाटलें!

नंतर कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "तुझ्या हातून हा प्रमाद कसा होत आहे तें मला समजत नाहीं! आधीं ह्या वीराचा वध कर! व्याधीवर वेळींच उपाय न केल्यास ती कष्टावर होते, हें लक्ष्यांत ठेव."

---

समानार्थक उतारा—कदा नेणों ओढी, शरघिंतुनि काढी शर कदा, ।
कदा धन्वीं जोडी, वरिवरिहि सोडी तरि कदा; ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं, ।
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी. ॥

—र. पंडितकृत नलोपाख्यान.

अर्जुनानें कृष्णाचें बोलणें मान्य केलें आणि मोठ्या सावधपणें द्रोणपुत्रावर त्यानें बाण सोडले ! त्या बाणांनीं चंदनाची उटी दिलेले त्याचे बाहु, वक्षःस्थल, शिर आणि त्याच्या मांड्या विद्ध झाल्या. त्या बाणांनीं त्याच्या अश्वांचे रश्मि छेदिले आणि त्यांनाहि विद्ध केलें. त्यावेळीं त्या अश्वांनीं अश्वत्थाम्याला दूर पळवून नेलें ! अश्वांनीं वायुवेगानें अश्वत्थाम्याला असें दूर नेलें असतां पार्थशरांनीं विद्ध झालेल्या त्या वीरानें विचारपूर्वक ' पार्थाशीं पुनः आपण कधींहि युद्ध करणार नाहीं ' असें आपल्या मनाशीं ठरविलें ! त्या अंगिरसकुलश्रेष्ठाला असें कळून आलें कीं, कृष्णार्जुन असतील तिकडेच सर्वदा जय असावयाचा ! असा मनाशीं निश्चय करून अश्वत्थाम्यानें आपले घोडे आंवरिले आणि रथ, अश्व व नर यांची एकच गर्दी होऊन राहिलेल्या कर्णसैन्यांत प्रवेश केला. त्या विरोधी वीराला अश्वांनीं दूर पळवून नेलें, हें जणुंकाय मंत्रौषधींनीं शरीरांतून व्याधि काढून टाकल्यासारखें भासलें ! नंतर कृष्णार्जुन पुनः संशप्तकांवर धांवून गेले ! त्यावेळीं रथावरील पताका वायूनें फडकत असून रथचक्रांचा ध्वनि जलौघाच्या निनादाप्रमाणें होत होता ! ८. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ मगधापति दंडधाराचा वध. २ दंडाचा वध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, इतक्यांत पांडवसेनेच्या उत्तरेकडील बाजूला रथ, गज, अश्व आणि पत्ति यांचा दंडधार राजा वध करीत असल्यामुळें मोठा कोलाहल उत्पन्न झाला. तें पाहून कृष्णानें आपला रथ मागें फिरविला आणि गरुडाप्रमाणें वेगवत्तर आपल्या अश्वांना हांकीत अर्जुनाला तो बोलला, "अर्जुना, हा मगधाधिपति आपल्या पराक्रमी दंतीच्या बलावर मोठा सामर्थ्यवान् होऊन राहिला आहे ! विद्या आणि सामर्थ्य यांमध्यें तो भगदत्तासमान आहे. म्हणून तूं आधीं त्याचा वध कर आणि मग संशप्तकांस मारून टाक !" हें बोलत असतांच कृष्णानें आपला रथ दंडधाराच्या अगदीं समीप आणून ठेवला !

मगधाधिपति दंडधार हा गजयुद्धांत मोठा निष्णात होता. आदित्यादि ग्रहांमध्यें केतूप्रमाणें तो असह्यपराक्रमी होता. हा धूमकेतु जसा सर्व पृथ्वीला तापदायक होत असतो, त्याप्रमाणें सर्व पांडवसेनेला नित्य पीडा देत असे ! गजासुराप्रमाणें अमितविक्रमी दंडधार महामेघाप्रमाणें गर्जणाऱ्या व शत्रूंचा नाश कर-

णाऱ्या आपल्या गजावर आरूढ होऊन बाणांनीं रथ, अश्व, गज आणि पदाति यांच्या सहस्रावधि समुदायांचा संहार करीत असे ! तो दंडधाराचा गजहि शत्रू-कडील रथ, अश्व आणि सारथि यांना आपल्या पायांखालीं चिरडून टाकीत असे ! पोलादी कवचें व सुंदर अलंकार धारण करणाऱ्या वीरांचा अश्व व पदाति यांसह वध करून नंतर तो दंडधार त्यांना आपल्या त्या बलिष्ठ व मदोन्मत्त दंतीकडून देवनळाप्रमाणें तुडवून टाकीत असे !

नंतर ज्यामध्यें प्रत्यंचेचे व रथनेमींचे मोठे निस्वन होत आहेत; मृदंग, भेरी, व शंख यांचे निनाद घुमत आहेत, त्याचप्रमाणें हजारों रथ, अश्व आणि गज यांचा कलकलाट सुरू आहे, अशा त्या सैन्यांत दंडधाराच्या गजाकडे अर्जुनानें आपला रथ फिरविला. तेव्हां दंडधारानें अर्जुनावर बारा, कृष्णावर सोळा आणि प्रत्येक अश्वावर तीन तीन बाण टाकून त्यानें हंसतहंसत मोठी गर्जना केली ! अर्जुनानें एक भल्ल बाण टाकून मौर्वी-बाणसहित त्याचें धनुष्य छेदिलें आणि त्याच्या अलंकृत ध्वजाचाहि भंग केला ! नंतर त्यानें दंडधाराच्या गजेंद्राचे हस्ति-पक आणि पादरक्षक यांचाहि वध केला ! तें पाहून मगधाधिपति फारच संतप्त झाला आणि त्यानें आपला घातुक मदोन्मत्त दंती वायुवेगानें अर्जुनावर सोडला ! कृष्णार्जुनांचा क्षोभ करण्याकरितां त्यांवरहि त्यानें तोमर टाकिले. तेव्हां अर्जुनानें शुंडेसमान दंडधाराचे बाहु आणि पूर्णचंद्राप्रमाणें शोभणारें त्याचें मुखकमल ह्यांवर तीन तीक्ष्ण बाण टाकून तीं एकदम तोडून टाकिलीं ! नंतर त्यानें शेंकडों बाण त्याच्या दंतीवर टाकले ! तेव्हां सुवर्णकवच धारण करणारा तो गजेंद्र अर्जुनाच्या कांचनालंकृत बाणांनीं विद्ध झाला ! तेव्हां रात्रीं दावान-लानें प्रज्वलित झालेल्या लतावृक्षांनीं शोभणाऱ्या पर्वताप्रमाणें तो शोभूं लागला ! बाणांच्या वेदनांनीं विव्हल होऊन तो द्विरद मेघगर्जनेप्रमाणें मोठमो-ठ्यानें आक्रोश करूं लागला आणि चालतांना मूर्च्छा येऊन पडूं लागला ! शेवटीं अत्यंत व्याकुल होऊन वज्रहत गिरीप्रमाणें तो आपल्या हस्तिपकासह मृत होऊन भूमीवर पडला !

( २ ) रणांगणावर दंडधाराचा वध झाल्यावर त्याचा बंधु दंड हा कृष्णार्जु-नांच्या वधाची इच्छा धरून त्यांजवर चालून आला ! दंडाचा हत्ती हिमाप्रमाणें शुभ्र वर्णाचा असून त्यानें सुवर्णाच्या माला धारण केल्या होत्या ! त्याचें शरीर हिमाद्रीच्या शिखराप्रमाणें शोभत होतें ! नंतर दंडानें सूर्यकरांप्रमाणें तीन तीक्ष्ण तोमर कृष्णावर व पांच अर्जुनावर मारले आणि मोठ्यानें गर्जना केली !

अर्जुनानें क्षुरप्र बाणांनीं त्याचे बाहु छेदून टाकिले! ते बाहु चंदनलिप्त असून त्यांवर अंगदें शोभत होतीं व हातांत तोमर धारण केलेले होते! ते भुज दंतीवरून खालीं पडले असतां गिरिशिखरावरून दोन सुंदर सर्प खालीं पडल्याचा भास झाला! नंतर अर्जुनानें एका अर्धचंद्र बाणानें दंडाचें मस्तक तोडून टाकतांच तें धाडकन् जमिनीवर पडलें! तेव्हां रक्तानें माखलेलें त्याचें शरीर अस्ताचलावरून पश्चिमदिग्भागावर पतन पावणाऱ्या सूर्याप्रमाणें दिसूं लागलें! नंतर अर्जुनानें सूर्यकरांप्रमाणें दीप्तिमंत बाण घेऊन त्या शुभ्र मेघसदृश दंडाच्या गजावर टाकले! त्या योगानें वज्रहत हिमाद्रिशिखराप्रमाणें तो नागेंद्र चीत्कार करीत भूमीवर पडला! तेव्हां त्या दोघां बंधूंसमान जे बलवत्तर वीर त्या सैन्यांत होते ते अर्जुनावर धांवून आले. त्यांचीहि गति दंडधार व त्याचा बंधु दंड यांप्रमाणेंच होऊन ते व त्यांचे द्विरद पतन पावले! अशा रीतीनें शत्रूचे प्रचंड सैन्याचा नाश झाला! त्या सैन्यांत शत्रूंचा वध करूं इच्छिणारे गज, अश्व, सारथि आणि पदाति एकमेकांवर तुटून पडले आणि परस्परांना मारीत असतांना मृत्युमुखीं पडले!

राजा, नंतर अर्जुनाच्या सैनिकांनीं त्याला वेष्टून म्हटलें, "अर्जुना, सर्व लोक ज्याला मृत्यूसमान भीत होते, त्या रिपूचा आज तूं नाश केला आहेस, हें आमचें मोठें सुदैवच होय. शत्रूंपासून पीडित झालेल्या आम्हां लोकांचें रक्षण आज तुझ्या हातून झालें नसतें, तर हे अरिसूदना, आपणांला होणारा आनंद त्यांस झाला असता!" हें सुहृदांचें भाषण ऐकून अर्जुनाच्या मनाला मोठा आनंद झाला व त्यानें त्यांचा अनुरूप सत्कार करून तो पुनः संशप्तकांच्या नाशाकरितां निघून गेला! ८. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ कृष्णाचें अर्जुनाला प्रोत्साहनपर भाषण. ]

(१) संजय—धृतराष्ट्रा, अर्जुन पुनः संशप्तकांकडे वळल्यावर मंगळ वक्र व अतिवक्र गतींत असतां जसा मोठा नाश करितो, त्याप्रमाणें त्यानें संशप्तकांवर बाण टाकून त्यांचा भयंकर संहार केला! हे राजन्, पार्थाच्या बाणांनीं हत झालेले नर, अश्व, रथ आणि गज यांपैकीं कित्येक पळाले, कित्येक विह्वल होऊन पडले, कित्येकांचा नाश झाला, कित्येक पतन पावले व कित्येक दुःखग्रस्त झाले! त्या समरांत अर्जुनाशीं जे योद्धे युद्ध करीत होते, त्यांजवर त्यानें भल्ल, क्षुर, अर्धचंद्र,

वत्सदंत या बाणांनीं प्रहार करून त्यांचे अश्व, अश्वसादी, सारथि, ध्वज, चाप, बाण, हस्त, हस्तांतील शस्त्रें, बाहु आणि मस्तकें तोडून टाकलीं ! ज्याप्रमाणें एखाद्या पुष्पवती धेनूनिमित्त एका वृषभावर दुसरे पुष्कळ वृषभ येऊन पड-तात, त्याप्रमाणें शतावधि व सहस्रावधि वीर अर्जुनावर तुटून पडले ! तें त्यांचें युद्ध अंगावर रोमांच उभे करणारें असें झालें ! त्रैलोक्यविजयाच्या इच्छेनें दैत्यांचें असें इंद्राशीं युद्ध झालें, तसेंच तें युद्ध झालें ! त्या युद्धांत उग्रसेनपुत्रानें सर्पा-प्रमाणें तीन बाण अर्जुनावर टाकले, परंतु अर्जुनानें त्याचें शिर तत्काल धडा-पासून वेगळें केलें ! तेव्हां ते संशप्तक संतप्त होऊन वायुप्रेरित मेघ जशी वर्षा-कालांत हिमालय पर्वतावर वृष्टि करितात, त्याप्रमाणें त्यांनीं त्या अर्जुनावर चारी बाजूंनीं अनेक प्रकारच्या शस्त्रांनीं वृष्टि केली !

राजा धृतराष्ट्रा, अर्जुनानें आपल्यावर आलेल्या अस्त्रांचें अस्त्रांनींच निवारण केलें व आपल्यावर चालून आलेल्या वीरांवर बाणवृष्टि करून त्या सर्वांना विद्ध केलें ! त्यानें शत्रुरथांचे त्रिवेणुसंघात तोडून टाकले, अश्व मारले, सारथ्यांचा वध केला, हातांतील तूणीरांचा भंग केला, रथचक्रें आणि ध्वज यांचा विध्वंस केला, रथबंधनें व रथांचे आंस छेदून टाकिले, रथांचे तळ तोडले आणि सर्व युद्धसामुग्रीचा नाश केला ! अर्जुनानें समरांत रथा-दिकांचा जो नाश केला, तो पाहून अग्नीनें, वायूनें किंवा जलानें धनी लोकांच्या गृहांची जी स्थिति होते, तशी अवस्था तेथें दृष्टीस पडली ! त्यावेळीं अर्जुनानें वज्रसमान किंवा विद्युल्लतेसमान तीक्ष्ण बाण टाकून गजांचीं मर्मस्थळें फोडून टाकलीं ! त्यामुळें ते गज कोसळून खालीं जमिनीवर पडले ! त्याच्या बाणांनीं पीडित अनेक अश्व सादींसह खालीं पडले ! त्यांनीं जिभा बाहेर काढल्या होत्या, ते रक्तानें माखले होते व व्याकुल होऊन त्यांनीं डोळे पांढरे केले होते ! अर्जुनानें नाराच बाण टाकून जेव्हां नर, अश्व आणि गज यांच्या-वर प्रहार सुरू केला, तेव्हां हे मारिषा, ते बाणविद्ध होऊन इकडेतिकडे भटकूं लागले आणि भयग्रस्त होऊन अडखळून पडूं लागले ! त्या युद्धांत वज्र, अशनि किंवा विष यांसारखे अनेक प्राणघातक बाण मारून इंद्रानें जसा दान-वांचा संहार केला, त्याप्रमाणें अर्जुनानें शत्रुसैन्याचा केला. मोलवान् कवचें आणि अलंकार धारण केलेले, अनेक प्रकारचीं वस्त्रें परिधान केलेले, आणि नाना-प्रकारचीं आयुधें घेतलेले वीर अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध होऊन रथध्वजांसह खालीं पडले ! अशाप्रकारें पार्थाहातीं रणांगणांत पतन पावलेले पुण्य-

कर्मी, कुलवान् आणि कीर्तिमान् वीर आपल्या सत्कर्मांच्या योगानें स्वर्गलोकाला गेले !

( २ ) हे राजन्, नंतर तुझ्या पक्षाकडील नानादेशाधिपति क्रोधाला चढून त्या रथिश्रेष्ठ अर्जुनावर धांवून आले ! त्यांच्या चतुरंग सैन्यांतील योद्ध्यांनीं अर्जुनाच्या वधाच्या इच्छेनें त्यावर अनेक प्रकारच्या आयुधांचे प्रहार केले. त्या योधरूप महामेघांनीं जी बाणरूप जलवृष्टि केली, तिचा तीक्ष्ण शरांनीं त्या अर्जुनमारुतानें तत्काल संहार केला ! तेव्हां अश्व, पत्ति, गज आणि रथ यांनीं युक्त आणि शस्त्रौघानें ओतप्रोत भरलेला सेनासमुद्र तरून जाण्याच्या इच्छेनें शत्रूंवर बाणवृष्टि करणाऱ्या अर्जुनाला श्रीकृष्ण बोलला, " अनघा पार्था, तूं कसली क्रीडा करीत बसला आहेस ? ह्या संशप्तकांना आधीं मारून टाक आणि नंतर कर्णवधाची त्वरा कर ! " त्यावर अर्जुनानें 'ठीक आहे,' असें उत्तर देऊन अवशिष्ट राहिलेल्या संशप्तकांवर बाणवृष्टि करून दैत्यांचा संहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें त्यांचा नाश केला ! तो भात्यांतून केव्हां बाण काढीत असे आणि धनुष्यावर केव्हां जोडीत असे इत्यादि प्रकार लक्ष्यपूर्वक अवलोकन करणाऱ्यांना सुद्धां समजत नसे ! हे भारता, तें पाहून कृष्णसुद्धां आश्चर्यचकित होऊन गेला. ज्याप्रमाणें हंसांनीं सरोवरांत प्रवेश करावा, त्याप्रमाणें अर्जुनाचे सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी बाण शत्रुसैन्यांत प्रवेश करीत आणि शत्रूंचा संहार करून मग रणभूमीवर येऊन पडत ! हा सर्व जनक्षय चाललेला पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला बोलला—

कृष्ण—हे पार्था, भारतीय वीरांच्या व पृथ्वीवरील राजांच्या महाभयंकर क्षयाचें मूळ कारण म्हणजे हा दुर्योधनच होय. हे भारता, धनुर्धरांचीं रणांगणावर पडलेलीं सुवर्णपृष्ठ धनुष्यें, अलंकार आणि तूणीर पहा ! तसेच हे सन्नतपर्व बाण आणि सर्पांसारखे प्राणहरण करणारे नाराच बाण व हेमालंकृत चित्रविचित्र तोमरें सर्वत्र पसरलीं आहेत, तीं पहा ! हीं सुवर्णभूषित चर्में ( ढाली ), हे स्वर्णमंडित प्रास, ह्या कनकसंस्कृत शक्ति, जांबूनदाचे पट्टयांनीं बद्ध झालेल्या ह्या गदा, ह्या स्वर्णमय ऋष्टि, हे सुवर्णखचित पट्टिश, हे सुवर्णभूषित दांड्यांचे परश्वध, हे परिघ, हे भिंदिपाल ( गोफणी ), ह्या भुशुंडी इत्यादि आयुधें घेऊन जयाच्या इच्छेनें युद्ध करणारे हे वीर मृत झाले असूनहि जीवंत दिसत आहेत. गदांच्या प्रहारानें ज्यांचीं गात्रें चूर्ण झालीं आहेत, मुसलांनीं ज्यांचीं मस्तकें भिन्न झालीं आहेत आणि गज, अश्व किंवा रथ यांखालीं तुडविले गेलेले हे

सहस्रशः वीर पहा! मनुष्यें, गज, अश्व यांचीं शरीरें शर, शक्ति, ऋष्टि, तोमर इत्यादि आयुधांनीं छिन्न होऊन त्यांतून रक्तप्रवाह चालू आहेत! आणि अशा-प्रकारच्या प्रेतांनीं हें रणांगण कसें आच्छादून गेलें आहे पहा! लहानलहान सुवर्णाच्या घंटानीं सुशोभित हे भग्न झालेले रथ पहा! रक्तानें माखलेले हे अश्व पहा! रथांचे तळभाग कसे भग्न झाले आहेत ते येथें पहा! हे तूणीर, पताका आणि हे विविध ध्वज पहा! योद्ध्यांचे सर्वत्र पडलेले शुभ्रवर्ण महा-शंख पहा! हे जिह्वा बाहेर काढून पर्वतांसमान पडलेले गज पहा! ह्या चित्र-विचित्र वैजयंती पहा! हे मृत गजयोद्धे पहा! हीं फाटून गेलेलीं गजांवरील आसनें पहा! ह्या पतन पावलेल्या गजांवरील चूर्ण झालेल्या घंटा पहा! वैडूर्य-मण्यांनीं ज्यांचे दंड भूषित केले आहेत असे हे पडलेले अंकुश पहा! अश्व-सादींच्या हस्तांतील ध्वजांचे अग्रभागीं लावलेलीं जरींचीं वस्त्रें पहा! राजे-लोकांचे चूडामणि, विचित्र माला, कांचनाचीं छत्रें, चामरें आणि व्यजनें सर्वत्र पडून राहिलेलीं पहा! ही मही सुंदर कुंडलांनीं विराजित आणि चंद्राप्रमाणें किंवा नक्षत्रांप्रमाणें शोभायमान वीरमस्तकांनीं आच्छादित झालेली पहा! रणांगणा-वर पडलेलीं राजांचीं शिरकमलें पहा! जणुंकाय तारागणांनीं आणि चंद्रप्रभेनें विराजित आकाशांतील दीप्तिमंत नक्षत्रमालाच आहे असें वाटत आहे. अर्जुना, हें सर्व कर्म रणांगणावर तूं केलें असून तें तुला योग्यच आहे! एवढा पराक्रम देवराज इंद्राच्या हातून घडल्यास त्याचीहि स्वर्गांत अशीच कीर्ति होईल!

असें बोलून अर्जुनाला युद्धभूमि दाखवीत कृष्ण चालला असतां दुर्यो-धनाच्या सैन्यांत मोठा कोलाहल ऐकूं आला. शंख, दुंदुभि, भेरी आणि पणव यांचा ध्वनि होऊं लागला; तसेंच रथ, अश्व, गज आणि शस्त्रें यांचाहि दारुण खणखणाट सुरू झाला. नंतर कृष्णानें वायुवेगानें अर्जुनाचा रथ सैन्यांत नेला, तों पांड्यानें तुझ्या सैन्यांत मोठा धुमाकूळ उडविल्याचें पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें! त्या अस्त्रविशारदानें रणांत नानाविध बाणांच्या योगानें आयुष्याच्या अंतीं यमाप्रमाणें शत्रूंकडील प्रमुख वीरांचा वध केला! त्यानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं गज, अश्व आणि मनुष्यें यांचीं शरीरें बाणांनीं विद्ध करून त्यांचा वध केला! शत्रूंकडील वीरांनीं पांड्यावर अस्त्रें, शस्त्रें आणि बाण सोडले! त्या सर्वांचें त्यानें निवारण केलें आणि शक्रानें जसा असुरांचा वध केला, त्याप्रमाणें पांड्यानें सर्व शत्रूंना मारून टाकलें! ८. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ पांड्यराजवृत्तविषयक धृतराष्ट्राचा प्रश्न व संजयाचें उत्तर. २ पांड्याचा वध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, ह्या लोकविश्रुत वीराचें वृत्त तूं मला पूर्वींच सांगितलें आहेस. परंतु संग्रामांत त्यानें केलेल्या पराक्रमाचें वर्णन तूं केलें नाहींस; यास्तव आज तूं त्या वीराच्या विक्रमांचें सविस्तर निवेदन कर ! तसेंच त्याचें चातुर्य, प्रभाव, वीर्य, आकारमान आणि दर्प यांचेंहि कथन कर !

संजय—भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कर्ण हे सर्व वीर धनुर्विद्याविशारद असल्याचें तुला माहीत आहेच. ह्या सर्व महारथांना आपल्या वीर्यानें हा तुच्छ मानीत असे. कोणीहि राजा आपल्या बरोबरीचा आहे, असें त्याला वाटत नसे. इतकेंच नव्हे, तर भीष्म-द्रोणांशींहि आपली तुलना कोणीं केल्याचें त्यास रुचत नसे. आपल्या अंगीं श्रीकृष्ण आणि अर्जुन यांहून न्यूनता असल्याचें त्याला मान्य नव्हतें. असा तो नृपश्रेष्ठ शस्त्रधारी पांड्य अंतकाप्रमाणें कर्णाच्या सैन्यावर धांवून आला. तेव्हां कर्णसैन्यांतील रथ, अश्व व प्रमुख पदातिवीर भयभीत होऊन कुलालचक्राप्रमाणें इतस्ततः भ्रमण करूं लागले ! वायु ज्याप्रमाणें मेघसमुदायाला उडवितो, त्याप्रमाणें पांड्यानें बाण मारून कर्णाच्या सेनेंतील अश्व, सारथि, ध्वज, रथ, आयुधें आणि गज यांचा संहार केला ! वज्रानें पर्वताचा नाश करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें गज, गजसादी, अश्वसादी, पादरक्षक, शक्ति, प्रास इत्यादिकांचा विध्वंस केला ! तसेंच त्यानें पुलिंद, खस, बाल्हीक, निषाद, आंध्रक, कुंतल, दाक्षिणात्य आणि भोज या युद्धदुर्मद वीरांवर बाणांची वृष्टि करून त्यांचीं कवचें आणि शस्त्रें यांचा भंग केला आणि त्यांचे प्राण घेतले ! अशारीतीनें रणांगणावर तो पांड्य कर्णाच्या चतुरंगसैन्याचा संहार करीत आहे, असें पाहून द्रोणपुत्र अश्वत्थामा त्यावर मोठ्या आवेशानें धांवून गेला !

राजन्, नंतर त्या धनुर्धरश्रेष्ठ अश्वत्थाम्यानें स्मितपूर्वक पांड्याला म्हटलें, " हे कमलनयन राजा, विद्वान् लोकांमध्यें तूं मान्यता मिळविली आहेस; तुझी कीर्ति, बल आणि पौरुष यांच्या योगें इंद्राप्रमाणें पसरली आहे ! हातांत धनुष्य घेऊन तूं प्रत्यंचा ओढून बाणवृष्टि करूं लागलास, म्हणजे जलवृष्टि करणाऱ्या महामेघाप्रमाणें तूं भासतोस ! तुझ्याशीं युद्ध करणारा मद्व्यति-

रिक्त दुसरा कोणी वीर मला आढळून येत नाहीं! तूं एकटा अनेक रथ, गज, अश्व आणि पत्ति यांचा संहार करून टाकतोस! तुझा पराक्रम पाहून वनांत निर्भयतेनें संचार करून मृगसंघांचा वध करणाऱ्या भीमपराक्रमी सिंहालाच आपण पाहत आहों असें वाटतें! राजा, तूं आपल्या रथाच्या महाघोषानें सर्व पृथ्वी आणि आकाश हीं इतकीं दणदणावून सोडलीं आहेस कीं वर्षाकालाच्या अंतीं मेघच गर्जना करीत आहेत कीं काय असें भासतें! म्हणून तूं आपल्या तूणीरांतून भयंकर बाण काढ आणि मजवर टाक! माझ्या एकट्याशींच तूं युद्ध करावें! त्र्यंबक आणि अंधकासुराचें जसें युद्ध झालें तसें आमचें युद्ध होऊं दे!

अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून त्या मलयध्वज पांड्य राजानें त्याचें म्हणणें मान्य केलें आणि 'आतां तूं मजवर बाण टाक' असें अश्वत्थाम्यानें सांगून त्यावर बाण टाकतांच त्यानेंहि बाण टाकला व द्रौणीला विद्ध केलें! नंतर अश्वत्थाम्यानें अग्निजालांप्रमाणें अत्युग्र आणि मर्मभेदी बाण हंसतहंसतच त्या पांड्यराजावर टाकले! तसेंच त्यानें तीक्ष्णाग्रांचे मर्मभेदी नाराच बाण दहाव्या (क्रुष्टानामक) गतीनें पांड्यनृपतीवर सोडले! त्या सर्व बाणांचा पांड्यानें नऊ निशित बाणांनीं प्रतिकार केला! चार बाण टाकून त्यानें अश्वत्थाम्याच्या अश्वांचा वध केला आणि त्याची धनुर्ज्या तोडून टाकली. तेव्हां त्या युद्धनाशन द्रोणपुत्रानें दुसरें दिव्य धनुष्य सज्ज करून घेतलें आणि उत्तम प्रकारचे अश्व रथास जोडून युद्धाची सिद्धता केली!

धृतराष्ट्रा, अशा रीतीनें त्या ब्राह्मणानें सहस्रावधि बाण सोडून त्यांच्या योगानें दशदिशा व आकाश हीं व्याप्त करून सोडलीं. त्या महात्म्याकडून बाणवृष्टि होत असतांहि आणि ते बाण कधीं क्षय न पावणारे आहेत, असें जाणूनहि त्या वीरोत्तमानें त्यांचा संहार केला आणि अश्वत्थाम्याच्या दोन रथचक्रसंरक्षकांचा निशित बाणांनीं वध केला! तेव्हां अश्वत्थाम्यानें आपल्या शत्रूचें युद्धनैपुण्य पाहून आणि धनुष्य मंडलाकार फिरवून बाण टाकण्यास प्रारंभ केला! त्यानें पर्जन्यासारखी बाणवृष्टि करून त्या पांड्य राजाला आच्छादून टाकिलें! अशारीतीनें अश्वत्थाम्यानें

---

१ बाणांच्या गति दहा आहेत त्या—'उन्मुख्याभिमुखी तिर्यङ्मंदा गोमूत्रिका ध्रुवा। स्खलिता यमकाक्रांता क्रुष्टेतीषुगतीर्विदुः'॥ दहावी गति क्रुष्टा असून तिच्या योगानें शत्रूचें मस्तक तोडून त्यासह त्याला दूर फेंकून देतां येतें.

अर्ध्या प्रहरांत आठ शकट वाहून आणतील इतके बाण त्या मलयध्वजावर टाकले ! अश्वत्थामा त्यासमयीं इतका क्रोधसंतप्त झाला होता कीं, तो अंतकाचाहि अंतक आहे, असें भासूं लागलें ! ज्यांनीं ज्यांनीं त्याजकडे दृष्टि टाकली, ते सर्व विसंज्ञ होऊन पडले ! द्रौणीच्या त्या दुःसह वृष्टीचा पांड्यानें वायव्यास्त्र योजून संहार केला ! आणि मोठ्यानें गर्जना करण्यास आरंभ केला. तेव्हां अश्वत्थाम्यानें चंदनागरूनें सुवासित पांड्याचा ध्वज भग्न केला, त्याच्या रथाचे चारहि अश्व मारून त्याच्या सारथ्याचाहि वध केला, अर्धचंद्र बाणानें त्याचें धनुष्य छेदिलें आणि त्याच्या रथाचे तिळांएवढे तुकडे केले ! त्यानें आपल्या अस्त्रांनीं त्याच्या अस्त्रांचें निवारण केलें आणि त्याच्या सर्व आयुधांचा नाश केला ! पांड्यराजाचाहि त्यानें वध केला असता, परंतु आणखी युद्ध करण्याच्या इच्छेनें त्यानें तसें केलें नाहीं !

(२) इकडे कर्ण पांड्याच्या गजसेनेवर चालून आला आणि तें विस्तृत सैन्य त्यानें पळवून लावलें ! त्यानें रथ्यांचे रथ भग्न करून त्यांना विरथ केलें आणि आपल्या सन्नतपर्व बाणांनीं त्यांचे गज व अश्व यांना आच्छादून टाकिलें.

महाधनुर्धर द्रौणीनें रथिश्रेष्ठ पांड्य राजाला विरथ करून युद्धेच्छेनें त्याचा वध केला नव्हता ! परंतु कोणी गजसादी युद्धांत पतन पावून त्याचा गज अश्वत्थाम्याच्या शरांनीं पीडित होऊन गर्जना करीत पांड्यावर चालून आला. परंतु पांड्य गजयुद्धांत निष्णात असल्यामुळें गिरिशिखरावर चढणाऱ्या सिंहाप्रमाणें तो तत्काल त्यावर आरूढ झाला आणि अंकुशप्रहारांनीं त्यानें त्याला हतवीर्य करून सोडिलें ! नंतर सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी तोमर घेऊन तो पांड्यानें अश्वत्थाम्यावर टाकला आणि हा तूं 'हत झालास, पहा तुझा वध केला' अशी तो मोठ्यानें गर्जना करूं लागला ! त्यानें अश्वत्थाम्याच्या हिरेजडित व वस्त्रपुष्पादिकांनीं सुशोभित किरीटावर दुसरा तोमर फेंकला ! तेव्हां तो चंद्रसूर्यांप्रमाणें तेजस्वी किरीट वज्रहत गिरिशृंगाप्रमाणें खालीं पडून त्याचें चूर्ण झालें ! हें पाहून अश्वत्थामा क्षुब्ध झाला आणि पादप्रहार केलेल्या सर्पाप्रमाणें तो क्रोधानें चवताळून गेला ! त्यानें कालदंडासमान चौदा बाण घेऊन त्या पांड्यराजाच्या गजपादांवर चार आणि त्याच्या शुंडेवर एक असे पांच बाण मारले ! दुसरे तीन बाण त्यानें शत्रूचे बाहु आणि मस्तक यांवर टाकले आणि शेष सहा बाण पांड्यराजासन्निध असलेल्या सहा महारथांवर फेंकले ! ह्याप्रमाणें अश्वत्थाम्यानें बाणप्रहार केला असतां पांड्याचे दीर्घ, सुवृत्त आणि स्वर्णालंकारभूषित बाहु तुटून भूमीवर

पडले ! आणि गरुडहत सर्पाप्रमाणें ते वळवळूं लागले ! कुंडलांनीं भूषित, आरक्त नेत्र आणि सुंदर नासिका यांनीं विराजित आणि पूर्णेंदूशीं तुल्य त्याचें मुख विशाखांच्या मध्यें शोभणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभूं लागलें ! पांड्यराजा आणि त्याचा गज यांजवर अश्वत्थाम्यानें तीन आणि पांच बाण टाकले होते. त्यांचे अनुक्रमें चार आणि सहा भाग झाले. त्या दहा भागांनीं जणुंकाय अश्वत्थाम्यानें आपल्या दशदेवतांस दशाहुति अर्पण केल्यासारखें त्यावेळीं लोकांस वाटलें ! त्या पांड्यानें अश्व, कुंजर आणि मनुष्यें यांचा संहार करून राक्षसांना उत्तम भोजन दिलें होतें. नंतर स्मशानाग्नि प्रेतबळी मिळाल्यावर सलिलानें जसा शांत होतो, तसा तो द्रौणीच्या बाणांनीं शांत झाला !

ह्याप्रमाणें त्या पांड्य राजाचा वध झाल्यावर गुरुसुत अश्वत्थाम्यासन्निध दुर्योधन आला आणि बलीला जिंकून इंद्रानें जसें विष्णूचें आदरपूर्वक अभिनंदन केलें, त्याप्रमाणें मोठ्या आनंदानें त्या द्रोणपुत्राचें त्यानें गौरव केलें ! ८. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ संकुलयुद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—पांड्याचा वध झाल्यावर आणि एकट्या कर्णानें सर्व सैन्य पळवून लावल्यावर पुढें अर्जुनानें काय केलें ? अर्जुन शस्त्रास्त्रविद्येमध्यें निष्णात असून बलवान् आणि समयज्ञ आहे. ‘ कोणाशीं युद्धप्रसंग असो, तूं त्यांत सर्वदा अजय्य राहशील, ’ असा शंकरानें त्याला वर दिला आहे. म्हणून त्या धनंजयाची मला मोठी भीति वाटत असते. म्हणून त्यानें रणभूमीवर काय काय केलें, तें सर्व मला सांग !

( २ ) संजय—हे राजन्, पांड्याचा वध झाल्यावर कृष्णानें अर्जुनाला हिताची गोष्ट सांगितली. तो म्हणाला, “ अर्जुना, आज राजा युधिष्ठिर आणि दुसरेहि पांडव कोठें दिसत नाहींत. ते पळून गेले असावे, असें मला वाटतें. ते आले असते तर शत्रूच्या मोठ्या सैन्याचा पांडवांनीं भंग केला असता ! अश्वत्थाम्याच्या संकल्पाप्रमाणें कर्णानें सृंजयांचा नाश केला आहे ! तसेंच अश्व, रथ आणि गज यांचाहि त्यानें मोठा संहार केला आहे ! ” अशाप्रकारें कृष्णानें रणांत झालेली सर्व हकीकत अर्जुनाला सांगितली. ती सर्व ऐकून आणि युधिष्ठिराची भीति लक्ष्यांत आणून तो कृष्णाला म्हणाला, ‘ हृषीकेशा, तूं आतां

त्वरित रथ हांक पाहूं !' नंतर कृष्णानें तो विजयी रथ शत्रूवर चालविला आणि तेथें पुनः भयंकर युद्ध प्रवृत्त झालें ! पांडवांकडे भीमसेनादि वीर, तर आम्हां कौरवांकडे कर्णादि वीर प्रमुखत्वें होते. हे राजसत्तमा, यमराष्ट्राची वृद्धि करणाऱ्या त्या दारुण संग्रामांत परस्परांच्या वधाच्या इच्छेनें धनुष्यें, बाण, परिघ इत्यादि नानाविध आयुधें त्या वीरांनीं परस्परांवर टाकलीं ! त्यावेळीं धनुष्यें, प्रत्यंचा, चीत्कार करणारे गज आणि पदाति यांचा आवाज एवढा मोठा होऊं लागला कीं त्यायोगानें दिशा, उपदिशा, अंतरिक्ष हीं सर्व व्यापून गेलीं ! गर्जना करणाऱ्या शूरांचा कोलाहल ऐकून सैनिकांना अत्यंत भीति वाटूं लागली.

अशाप्रकारें समरांत गर्जना चालू असतां पांडवांकडील प्रमुख पराक्रमशाली वीरांनीं कर्णाला वेढिलें ! नंतर कर्णानें शरवर्षावानें त्यांचा असा संहार चालविला कीं, जणुंकाय सारसादि पक्ष्यांनीं व्याप्त सरोवरांत प्रवेश करून गज त्याचा नाश करीत आहे कीं काय असें भासलें. शत्रूंच्या मध्यभागीं अवस्थित होऊन राधेयानें आपलें उत्कृष्ट धनुष्य सज्ज केलें आणि पांडववीरांचीं मस्तकें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तोडून टाकिलीं ! तेथें वीरांचीं कवचें व चर्में भिन्न होऊन भूमीवर पडूं लागलीं ! कर्णाचे बाण अत्यंत उग्र असल्यामुळें एक बाण मारल्यावर दुसऱ्या बाणाची आवश्यकताच लागत नसे ! सिंह जसा मृगगणांना मारून टाकतो, त्याप्रमाणें कर्णानें मोठ्या वेगानें पांडव, सृंजय किंवा पांचाल यांपैकीं आपल्या बाणांच्या तडाक्यांत जे कोणी येतील, त्यांचा वध केला ! नंतर पांचालराज, द्रौपदेय, नकुल-सहदेव आणि युयुधान हे सर्व मिळून कर्णावर धांवून गेले !

हे मारिषा, त्या घोर युद्धांत पांडव, पांचाल आणि कौरव हे जीवावर उदार होऊन परस्परांना मारूं लागले ! त्या वीरांनीं अंगांत कवचें घातलीं असून त्यांच्या मस्तकांवर शिरस्त्राणें होतीं. जणुं कालदंडच अशा गदा, मुसळें, परिघ इत्यादि आयुधें घेऊन मोठ्या गर्जना करीत आणि परस्परांना आह्वान करीत ते युद्ध करूं लागले ! त्या युद्धांत कित्येकांचा वध झाला, कित्येक बाणविह्वल होऊन पडले, कित्येकांच्या गात्रांतून रक्त वाहूं लागलें व हातांतून आयुधें पडूं लागलीं ! कित्येकांचीं मस्तकें फुटून गेलीं, कित्येक नेत्रविहीन झाले ! रुधिरानें कित्येकांचीं मुखें डाळिंबाप्रमाणें लाल झालीं ! कित्येक शस्त्रपातांनीं व्याकुळ होऊन केवळ जीव धरून राहिले होते ! त्या वीरांनीं परस्परांवर खड्ग, परश्वध, पट्टिश, शक्ति, तीक्ष्ण प्रास आणि तोमर इत्यादिकांचे भयंकर प्रहार केले !

एकमेकांच्या हस्तें पतन पावलेल्या वीरांच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागून जणुंकाय रक्तचंदनाचा सडाच घातला आहे कीं काय असें भासूं लागलें ! रथावर रथ आदळून भग्न झाले, गजांनीं गजांना मारिलें, मनुष्यांनीं मनुष्यांचा वध केला आणि अश्वांनीं अश्वांचा संहार केला ! तसेंच त्या वीरांनीं क्षुर, भल्ल व अर्धचंद्र बाणांनीं छेदिलेले ध्वज, मस्तकें, छत्रें, गजशुंडा आणि मनुष्यांचे भुज भूमीवर पडले होते ! त्याप्रमाणें मनुष्यें, गज, अश्व आणि रथ यांचाहि परस्परां-कडून मोठा संहार झाला ! अश्वसादींकडून वध पावलेले शूर योद्धे व शुंडाहीन कुंजर हे पर्वताचा कडा जसा तुटून पडावा तसे पडले ! पत्तींनीं अनेक गज, अश्वसादी आणि रथ यांचा संहार केला ! उलट अश्वसादींनीं हत केलेले पदाति युद्धभूमीवर मृत होऊन पडले होते ! राजा, रणभूमीवर मृत होऊन पडलेल्या वीरांचीं मुखें आणि गात्रें म्लान होऊन गेलेल्या कमलांप्रमाणें दिसूं लागलीं ! गज, अश्व आणि पदाति यांचीं तीं कांतिमान् सुंदर रूपें मलिन वस्त्रांप्रमाणें पहाणाऱ्याच्या चित्ताला उद्विग्न करीत असत ! ८. २१.

---

## अध्याय २२ वा.

### [ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा, तुझ्या पुत्राच्या आज्ञेवरून प्रमुख प्रमुख हस्तिपक धृष्टद्युम्नाचा वध करण्याच्या हेतूनें आपापले गज घेऊन त्यावर धांवून गेले. तेव्हां प्राच्य व दाक्षिणात्य, तसेंच अंग-वंग-पुंड्रादि देशीय मोठमोठे गजयोद्धे यांनीं पांचालसेनेवर शर, तोमर व नाराच यांची पर्जन्याप्रमाणें वृष्टि केली. नंतर धृष्टद्युम्नानें त्या वीरांचा नाश करण्याकरितां त्यांच्या पर्वतप्राय गजांवर नाराच बाण टाकून त्यांस आच्छादिलें. कोणावर दहा, कोणावर सहा, तर कोणावर आठ बाण मारून त्यांना विद्ध केलें. तरीहि सूर्यास जसें मेघांनीं आच्छादून टाकावें, त्याप्रमाणें ते गज धृष्टद्युम्नाला वेष्टून राहिले ! तें पाहून पांडव व पांचाल तीक्ष्ण शस्त्रें घेऊन त्या गजांवर धांवून गेले ! आणि त्यांवर शस्त्रास्त्रांचा मारा करूं लागले. इतक्यांत नकुल, सहदेव, द्रौपदेय, प्रभद्रक, सात्यकि, शिखंडी आणि चेकितान यांनीं मेघवृष्टीप्रमाणें चारी बाजूंनीं त्या कौरवसैन्या-वर वृष्टि केली ! तेव्हां धृष्टद्युम्नाला वेढून राहिलेले ते गज चवताळून गेले आणि

त्यांनीं आपल्या शुंडांनीं मनुष्यें, रथ व कुंजर यांना ओढून पायांखालीं तुडविलें! त्यांनीं कित्येकांना आपल्या दंताग्रांनीं भोंसकलें, तर कित्येकांना वर उचलून फेंकून दिलें !

राजा, सात्यकीनें अंगाचा गज प्रमुख भागीं पाहून त्यावर उग्र वेगानें नाराच बाण टाकला आणि त्याचीं मर्म स्थळें विद्ध करून त्याला खालीं पाडलें ! तो बाण अंगराजावरहि बसला असता, परंतु त्यानें तो चुकविला. गजावरून उतरत असतां सात्यकीनें त्याच्या वक्षःस्थळावर बाण टाकिल्यामुळें तो अंगराज विद्ध होऊन भूमीवर पडला ! इतक्यांत पुंड्राजा चाल करून येत होता. त्याचा गज म्हणजे चालता पर्वतच होय असें भासत होतें. सहदेवानें मोठ्या प्रयत्नानें त्या गजावर तीन बाण टाकले आणि त्यावरील ध्वज, हस्तिपक आणि कवच यांचा संहार करून त्या गजाचाहि वध केला. नंतर सहदेव अंगावर चालून गेला. त्या सहदेवाला नकुलानें थांबविलें आणि यमदंडासमान तीन बाण अंगाधिपतीवर व शंभर बाण त्याच्या गजावर मारले ! अंगाधिपतीनें सूर्यकिरणांसमान आठशें तोमर नकुलावर टाकले. त्यांचे त्यानें प्रत्येकीं तीन तुकडे करून त्यांचा संहार केला ! नंतर त्या नकुलानें अर्धचंद्र बाणानें त्या म्लेच्छ अंगाधिपतीचें मस्तक उडविलें आणि मग तो व त्याचा गज हे दोघेहि रणांगणावर मृत होऊन पडले ! अशारीतीनें तो तरुण गजविद्याविशारद अंगाधिप हत झाला असतां ते अंग क्रुद्ध होऊन गजावर बसून नकुलावर चालून आले. त्या गजांवर पताका फडकत होत्या, त्यांचे शुंडादंड सुशोभित केले होते आणि त्यांच्या अंगांवर भरजरी झालरी घातल्या होत्या. प्रदीप्त पर्वताप्रमाणें ते शोभायमान झाले होते. त्यांना धांवून आलेले पाहून मेकल, उत्कल, कालिंग, निषध आणि ताम्रलिप्तक ह्या वीरांनीं त्या नकुलाचा वध करण्याच्या इच्छेनें त्यावर शस्तोमरांची वृष्टि केली. त्यांनीं दिवाकराला जसे मेघ झांकून टाकितात, त्याप्रमाणें त्या नकुलाला आच्छादिलें. त्याच्या साहाय्याकरितां पांडव, पांचाल आणि सोमक हे त्वरित त्याकडे आले. मग रथी आणि गजयोद्धे यांमध्यें युद्ध जुंपलें. रथ्यांनीं सहस्रशः तोमर आणि बाण त्या कुंजरांवर सोडले आणि त्यांचीं गंडस्थळें, विविध मर्मस्थळें आणि भूषणें भग्न करून टाकिलीं. त्यांपैकीं आठ महागजांवर सहदेवानें चौसष्ट अतिप्रखर बाण टाकले, त्यांमुळें ते सादींसह रणभूमीवर पडले ! आपलें उत्कृष्ट धनुष्य सज्ज करून नंतर त्या कुलनंदन नकुलानें दुसऱ्या पुष्कळ गजांवर बाण टाकिले व त्यांचा वध केला ! मग पांचाल, शैनेय,

द्रौपदेय, प्रभद्रक आणि शिखंडी यांनीं शत्रूकडील महागजांवर शरवृष्टि करून त्यांनाहि मारलें !

हे धृतराष्ट्रा, अशारीतीनें पांडवांकडील प्रमुख वीरांनीं तुझ्या पक्षाकडील मोठमोठ्या गजांचा संहार केला. नदीचा तीरभाग भिन्न झाला असतां उदक जसें वाट फुटेल तिकडे सर्वत्र जात असतें, त्याप्रमाणें तुझ्या सैन्याची स्थिति होऊन तें सर्वत्र पळत सुटलें ! ती कौरवसेना पळत असल्याचें पाहून पांडव-सैन्यानें तिचा भंग केला व नंतर तें सैन्य कर्णावर धांवून गेलें. ८. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ सहदेव-दुःशासनयुद्ध. २ दुःशासनाचा पराजय. ]

( १ ) **संजय**—हे महाराजा, क्रोधसंतप्त सहदेव आपल्या बाणवृष्टीनें तुझ्या सैन्याला जाळून टाकीत असतां दुःशासन त्या आपल्या बंधूवर धांवून गेला. त्यांमध्यें युद्ध सुरू झाल्याचें पाहून महारथ्यांनीं सिंहनाद केले व ते ध्वज फडकावूं लागले. हे भारता, तेव्हां तुझ्या पुत्रानें धनुष्य सज्ज केलें व त्या बलवान् सहदेवाच्या छातीवर तीन बाण मारले ! नंतर सहदेवानें तुझ्या पुत्रावर नाराच बाण टाकून त्याला विद्ध केलें आणि नंतर त्याजवर सत्तर व त्याच्या सारथ्यावर तीन बाण फेंकले. त्या महारणांत दुःशासनानें सहदेवाचें धनुष्य तोडून टाकिलें आणि त्याच्या बाहूंवर आणि वक्षःस्थलावर त्र्याहात्तर बाण मारले ! नंतर क्रुद्ध होऊन सहदेवानें आपलें खड्ग उपसलें आणि तें तत्काल तुझ्या पुत्राच्या रथावर टाकलें ! त्या खड्गानें दुःशासनाचे बाण, धनुर्ज्या आणि चाप हीं तोडून टाकलीं आणि मग आकाशांतून पडणाऱ्या सर्पाप्रमाणें तो खड्ग खालीं पडला. नंतर त्या प्रतापी सहदेवानें दुसरें धनुष्य घेतलें आणि एक अंतकर बाण त्या दुःशासनावर सोडला ! तो बाण आपल्यावर येत आहे, असें पाहून दुःशासनानें एक तीक्ष्ण धारेचें खड्ग टाकून त्या बाणाचे दोन तुकडे केले. तो खड्ग सहदेवावर सोडून त्या वीर्यवंतानें दुसरें धनुष्य व बाण हीं घेतलीं. दुःशासनानें हंसतच तीक्ष्ण बाणांनीं त्या खड्गाचें निवारण केलें ! हे भारता, मग तुझ्या पुत्रानें चौसष्ट बाण सहदेवाच्या रथावर मारले. राजन्, वेगानें आपणावर येणाऱ्या त्या बाणांचा प्रत्येकीं पांच बाण मारून सहदेवानें प्रतिकार केला ! तुझ्या पुत्रावरहि सहदेवानें पुष्कळ बाण टाकले ! परंतु त्या बाणांचा प्रत्येकीं तीन बाण सोडून तुझ्या पुत्रानें संहार

केला ! आणि नंतर वसुंधरेचा भेद करून जाईल, एवढी मोठी गर्जना त्यानें केली ! हे राजा, नंतर दुःशासनानें सहदेवाला रणांगणावर बाणांनीं विद्ध करून त्याच्या सारथ्यावरहि त्यानें नऊ बाण टाकले ! तें पाहून सहदेव चवताळून गेला आणि मृत्युसमान एक भयंकर बाण धनुष्याला जोडून त्यानें तो दुःशासनावर सोडला !

( २ ) राजन्, तो बाण दुःशासनाच्या कवचाचें विदारण करून त्याच्या शरीरांत घुसला आणि नंतर सर्प जसा वारूळांत शिरतो त्याप्रमाणें पृथ्वींत शिरला ! तेव्हां तुझ्या त्या महारथ पुत्राला मूर्च्छा आली. ती तुझ्या पुत्राची मूर्च्छावस्था पाहून सारथि भिऊन गेला आणि त्यानें ती बाणवृष्टि होत असतांहि तुझ्या पुत्राला दूर पळविलें ! अशाप्रकारें सहदेवाच्या हातून तुझ्या पुत्राचा पराजय झाला ! मग दुर्योधनाच्या सैन्याकडे सहदेव वळला व त्याच्या सैन्याला सहदेवानें अगदीं जर्जर करून सोडलें ! क्रोधाविष्ट मनुष्य जसा पिपीलिकासमुदायांचा संहार करितो, त्याप्रमाणें त्यानें दुर्योधनाच्या सैन्याचा संहार उडविला ! ८. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ कर्ण-नकुलयुद्ध. २ नकुलाचा पराभव. ]

( १ ) संजय—राजन्, पांडुपुत्र नकुल रणोत्सुक होऊन आपल्या सैन्याला जर्जर करीत आहे, असें पाहून वैकर्तन कर्णानें क्रोधाविष्ट होऊन त्याचा प्रतिकार केला. तेव्हां नकुल हंसतहंसतच त्याला म्हणाला, " कर्णा, सुदैवानें चिरकालानंतर माझी तुजशीं भेट होत आहे. युद्धार्थ तुझ्यापुढें मी उभा आहें पहा ! पाप्या, सर्व अनर्थांचें, कलहाचें आणि वैराचें कारण तूंच आहेस ! तुझ्या अपराधामुळेंच कौरवयुद्धाला प्रारंभ होऊन आज दोन्ही पक्षांचा हा मोठा संहार चालला आहे ! म्हणून आज रणभूमीवर तुझा वध करून मी कृतकृत्य होतों ! "

राजा धृतराष्ट्रा, नकुलाचें भाषण ऐकून सूतपुत्र कर्ण त्याला म्हणाला, " नकुला, राजपुत्राला आणि त्यांतहि एकाद्या धनुर्धराला शोभेल, असेंच तुझें भाषण आहे ! हे वीरा, तूं मजवर प्रहार कर ! तुझा पराक्रम पाहूंया ! शूर पुरुष आधीं कोणतेंहि कृत्य करितो आणि मग प्रौढी मिरवीत असतो ! बाळा, वीर न बोलतां समर-

भूमीवर यथाशक्ति युद्ध करितात ! माझ्याशीं युद्ध करून तूं पराक्रम दाखीव ! मी तुझा सर्व दर्प जिरवितों !"

असें बोलून कर्णानें नकुलावर बाणवृष्टि करण्यास आरंभ केला. त्यानें नकुलावर ब्याहत्तर बाण टाकले. नकुलानेंहि अतिभयंकर सर्पविषाप्रमाणें ऐशीं प्रखर बाण कर्णावर मारले ! तें पाहून धनुर्धर कर्णानें नकुलाचें धनुष्य तोडून टाकलें आणि तीस स्वर्णपुंख बाणांनीं त्याला विद्ध केलें. नकुलाचा कवचभेद करून ते बाण त्याच्या शरीरांत शिरले आणि सर्प भूमिभेदन करून जसें उदक प्राशन करितात, त्याप्रमाणें त्या बाणानें नकुलाच्या रक्ताचें प्राशन केलें ! तेव्हां दुसरें हेमपृष्ठ धनुष्य घेऊन नकुलानें कर्णावर सत्तर व त्याच्या सारथ्यावर तीन बाण टाकले ! त्या परवीरांतक नकुलानें एका क्षुरप्र बाणानें कर्णाचें धनुष्य छेदिलें आणि त्या छिन्नचाप कर्णावर तीनशें बाण मारले आणि अशा रीतीनें त्या जगत्प्रसिद्ध महारथ कर्णाला नकुलानें हंसतहंसतच विद्ध केलें ! कर्णाची पांडुपुत्रानें केलेली ती दशा पाहून सर्वरथी आणि स्वर्गस्थ देवता यांनाहि मोठें आश्चर्य वाटलें !

नंतर कर्णानें दुसरें बलवत्तर धनुष्य घेऊन नकुलाला सर्व बाजूंनीं बाणवृष्टीनें आच्छादित केलें. नकुलानें ते बाण आपल्या बाणांनीं तोडून टाकिले. अंतरिक्षांत तें बाणजाल पसरून काजव्यांनीं सर्व आकाश व्याप्त झाल्यासारखें भासूं लागलें. आणि शलभांनीं आकाश व्याप्त झालें असतां जसा अंधार पडतो, तसा सर्वत्र अंधकार पडला ! सुवर्णभूषित ते बाण वरचेवर उडूं लागले, तेव्हां आकाशांत क्रौंचपक्ष्यांची रांग लागल्यासारखें दिसूं लागलें. बाणजालानें आकाश व्याप्त होऊन सूर्य अदृश्य झाला असतां अंतरिक्षांतून कांहींएक खालीं पडेनासें झालें ! त्या उभय वीरांच्या बाणसंघांनीं मार्ग निरुद्ध झाला असतां ते कर्ण आणि नकुल प्रलयकालीं उदित झालेल्या सूर्यांप्रमाणें दिसूं लागले ! हे राजेंद्रा, कर्णाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं सोमक अत्यंत विह्वल होऊन मरून पृथ्वीवर पडूं लागले ! नकुलाच्या बाणांनींहि तुझ्या सेनेची तशीच दुर्दशा झाली. तुझे सैनिक वायूनें उडवून दिलेल्या मेघांप्रमाणें भग्न होऊन गेले आणि ते त्या दोन्ही सैन्यांचा दिव्य बाणांनीं संहार होत असतां प्राणरक्षणाकरितां म्हणून युद्ध पहातच उभे राहिले ! आपल्या बाणांनीं सर्व वीरांस पळवून लाविल्यावर त्या महात्म्या कर्णनकुलांनीं परस्परांवर बाण टाकण्यास प्रारंभ केला ! त्यांनीं सैन्याग्रभागीं शरवृष्टि

करून आपला दिव्यास्त्रप्रभाव दाखविला ! परस्परांच्या वधाची इच्छा करून त्यांनीं अन्योन्यांना बाणवृष्टि करून झांकिलें. त्यावेळीं कर्ण-नकुल अन्योन्यांच्या शरांनीं व्याप्त होऊन मेघाच्छादित सूर्यचंद्रांप्रमाणें कोणालाहि दिसत नव्हते !

( २ ) धृतराष्ट्रा, नंतर कर्णानें संतापातिरेकानें क्षुब्ध होऊन चारी बाजूंनीं नकुलावर शरवृष्टि करण्यास आरंभ केला. मेघव्याप्त सूर्याला जशी मेघांकडून कांहीं पीडा होत नाहीं, त्याप्रमाणें नकुलाला त्या बाणवृष्टीनें कांहींहि व्यथा झाली नाहीं ! मग त्या कर्णानें विस्मित होऊन शेंकडो आणि हजारों बाण त्या नकुलावर फेंकले आणि मेघसमुदायाप्रमाणें सर्व आकाश व्याप्त करून टाकलें. त्या सूतपुत्र कर्णानें नकुलाचें धनुष्य छेदिलें आणि हंसतच त्याच्या सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडलें. त्यानंतर कर्णानें चार बाणांनीं त्याच्या रथाचे चार अश्व मारून टाकले आणि हे मारिषा, अनेक बाणांची सारखी वृष्टि करून त्याच्या दिव्य रथाचे, पताकांचे, चक्ररक्षकांचे, गदेचे, खड्गाचे, शतचंद्र कवचाचे आणि सर्व उपकरणांचे तिलशः तुकडे केले ! तेव्हां नकुल अश्वहीन, रथहीन आणि कवचहीन झाला असतांहि त्यानें परिघ घेतला व युद्धाकरितां रणभूमीवर उभा राहिला. हे राजन्, परिघ घेऊन उभा असलेल्या नकुलाला पाहून कर्णानें भारक्षम बाणांची त्याजवर वृष्टि केली. ह्यावेळीं नकुल धनुष्यहीन असल्याचें जाणून कर्णानें त्याला फारशी पीडा होऊं न देतां आपले सन्नतपर्व बाण त्याजवर टाकले ! हे राजा, अस्त्रकुशल व बलिष्ठ कर्ण समरांगणावर नकुलास मारण्यास सिद्ध झाला असतां तो व्याकुल होऊन रणांगण सोडून पळून जाऊं लागला. परंतु कर्णानें त्याला गांठून आपल्या हस्तांतील सज्ज धनुष्य त्याच्या कंठावर मारलें ! त्यावेळीं अंतरिक्षांत खळें पडलेला चंद्र किंवा इंद्रधनुष्यानें वेष्टित मेघ जसा दिसतो, तसा तो नकुल दिसूं लागला. मग कर्णानें नकुलाला म्हटलें, " तूं व्यर्थ वल्गना केलीस ! माझ्या हातून अनेक वेळां मरत असतां तूं त्याच वल्गना पुन्हां आज मजपुढें करीत आहेस. हे पांडवा, कौरव बलवान् आहेत ! त्यांच्याशीं तूं कधींहि युद्ध करूं नकोस; आपल्या बरोबरीचे जे असतील त्यांबरोबर तूं युद्ध कर ! लज्जित होऊं नकोस ! गृहीं जा किंवा जेथें ते कृष्णार्जुन असतील तेथें जा !"

धृतराष्ट्रा, असें बोलून कर्णानें नकुलाला सोडून दिलें. नकुल वधाला योग्य असतांहि त्या धर्मवित् कर्णानें त्याचा वध केला नाहीं ! शिवाय त्याला कुंतीचे

वचनाचीहि आठवण होती, त्यामुळें त्यानें त्याला सोडून दिलें. नंतर लज्जित होऊन तो नकुल धर्मराजाकडे जाऊन त्याच्या रथांत बसला आणि कुंभस्थ सर्पाप्रमाणें दुःखसंतप्त होऊन सुस्कारे टाकूं लागला !

सहदेवाचा पराजय केल्यावर कर्ण पांचालांवर धांवून गेला. त्यावेळीं त्याचा रथ अनेक पताकांनीं सुशोभित केला असून चंद्राप्रमाणें शुभ्र अश्व त्याच्या रथाला जोडले होते. हे विशांपते, मग कर्ण आपल्यावर चालून येत आहे हें समजतांच पांडवांच्या सैन्यांत एकच कोलाहल माजून राहिला. सूतनंदन कर्ण मध्यान्हींच्या वेळीं पांडवांच्या सैन्यांत चक्राकार फिरून सारखा संहार करीत सुटला ! हे मारिषा, त्या युद्धांत कित्येकांचीं रथचक्रें भिन्न झालीं आणि त्यांवरील ध्वजपताका छिन्न होऊन गेल्या ! कित्येकांचे सारथि हत झाले, कित्येकांचे अश्व मारले गेले, तर कित्येक रथांचे अक्ष तुटून पडले ! महावनांत प्रचंड दावाग्नींत कुंजर दग्ध होऊन जसे सर्वत्र पळत सुटतात, तसे ते पांचालांचे गज कर्णाच्या बाणाग्नीनें विव्हल होऊन जिकडे वाट फुटेल तिकडे धांवूं लागले ! त्या युद्धांत कित्येक गजांचीं गंडस्थळें फुटून जाऊन त्यांतून रक्तस्राव होऊं लागला, कित्येकांच्या शुंडा तुटल्या, कित्येकांचीं गात्रें छिन्न झालीं, आणि कित्येकांचीं पुच्छें तुटून पडलीं ! असे ते गज कर्णाच्या बाणांनीं मारले जात असतां छिन्न अभ्रांप्रमाणें विस्कळित होऊन रणांत पडले ! दुसरे कित्येक कुंजर नाराच बाण, तोमर इत्यादींनीं पीडित होऊन शलभ जसे अग्नीवर धांवून जातात, त्याप्रमाणें भयभीत होऊन कर्णावरच धांवून गेले ! कित्येक महाद्विप छिन्न होऊन त्यांच्या शरीरांतून रक्तप्रवाह वाहूं लागला असतां जलस्राव करणाऱ्या पर्वतांप्रमाणें ते भासले !

राजा, युद्धांत कित्येक अश्वांचीं छातीवरील आवरणें, कित्येकांचीं पुच्छें, कित्येकांचीं अंगावरचीं सोन्यारुप्याचीं भूषणें इत्यादि नष्ट होऊन आणि त्याबरोबरच शूर व युद्धांत शोभणारे सादी हत होऊन ते सर्वत्र पळूं लागले ! अश्वसादींच्या हस्तांतील प्रास, खड्ग आणि ऋष्टि हीं नाहींशीं होऊन केवळ कवचें आणि शिरस्त्राणें मात्र धारण केलेलीं दिसत होतीं. हे भारता, त्यांचे हस्तादि अवयव छिन्न होऊन ते कांपत होते, कित्येक हत होऊन पडले होते तर कित्येक मारले जात होते ! वेगवान् अश्व ज्यांना जुंपले आहेत, असे हेमभूषित रथ त्यांवरील रथी मारले गेल्यामुळें इतस्ततः धांवत जात असतांना

दिसत होते ! कित्येकांचे अक्ष आणि कूबर तुटून गेले होते, तर कित्येकांचीं चक्रें मोडून पडलीं होतीं ! कित्येकांच्या ध्वजपताका छिन्न झाल्या असून ईषादंड भग्न झाले होते !

राजा धृतराष्ट्रा, त्या भयंकर संग्रामांत कर्णाच्या बाणवृष्टीनें कित्येक वीर हत झाले, कित्येक इतस्ततः पळूं लागले ! कित्येक वीर निःशस्त्र होऊन गेले, तर कित्येक सशस्त्र रणभूमीवर पतन पावले ! ज्यांच्या शरीरांवर तारकाजालें काढलीं आहेत, जे अंगांवरील शरांनीं शोभत आहेत आणि ज्यांवरील पताका फडकत आहेत, असे गज चोहोंकडे पळत सुटले ! कर्णचापापासून मुक्त बाणांनीं छिन्न होऊन पडलेले वीरांचे बाहु, ऊरु आणि मस्तकें इत्यादि अवयव इतस्ततः पडलेले दिसत होते ! त्यावेळीं रणांगणावर योद्ध्यांचा संहार सारखा सुरू होता ! पतंग अग्नींत पडून जसे भस्म होऊन जातात, त्याप्रमाणें सृंजयांचा कर्णाकडून वध होत असतांहि ते कर्णावरच धांवून जात व मरून पडत ! सर्वत्र बाणवृष्टीनें पांडवांना दग्ध करून सोडणारा कर्ण म्हणजे साक्षात् युगांतींचा अग्निच होय असें वाटूं लागलें ! नंतर ते पांचालवीर युद्धपराङ्मुख होऊन पळून जाऊं लागले ! त्यांना गांठून कर्णानें त्यांवर बाणवृष्टि करून त्यांचीं कवचें आणि ध्वज छिन्न करून टाकलीं !

अशारीतीनें पांडवसेनेला अत्यंत बलवान् व तेजस्वी कर्ण जर्जर करीत असतां सूर्य मध्याह्नावर आला ! ८. २४.

---

## अध्याय २५ वा.

[१ युयुत्सूचा पराजय. २ श्रुतकर्मा व शतानीक यांचें युद्ध. ३ सुतसोम-सौबलयुद्ध.]

(१) संजय—हे राजन्, तुझ्या प्रचंड सैन्याला युयुत्सु पळवीत असतां उलूक त्यावर धांवून आला आणि त्यानें ‘ थांब, थांब ’ म्हणून युयुत्सूला युद्धार्थ आव्हान केलें ! तेव्हां युयुत्सूनें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या बलवान् उलूकावर वज्रसदृश प्रहार केले, तेव्हां उलूकानें क्रुद्ध होऊन तुझ्या पुत्राचें धनुष्य क्षुरप्र बाणानें तोडून टाकलें ! युयुत्सूनें त्या वेगवत्तर छिन्न धनुष्याचा त्याग केला आणि क्रोधानें दुसरें बलवत्तर धनुष्य घेतलें व उलूक आणि त्याचा सारथि यांवर बाणवृष्टि चालविली. तेव्हां उलूकानें युयुत्सूवर सुवर्णमंडित वीस बाणांचा मारा करून त्याचा सुवर्णाचा ध्वज भग्न केला ! तो कांचनध्वज आप-

ल्यापुढें पडलेला पाहून युयुत्सूनें उलूकाच्या वक्षःस्थळीं पांच बाण मारले! हे भरतसत्तमा, मग उलूकानें एका भल्लानें युयुत्सूच्या सारथ्याचें मस्तक उडविलें! तें आकाशांतून पडणाऱ्या उल्केप्रमाणें जमिनीवर येऊन पडलें! नंतर त्याचे चारहि अश्व उलूकानें बाण टाकून मारले आणि नंतर युयुत्सूवर पुनः पांच बाण मारले! त्या बाणांनीं युयुत्सु विद्ध होऊन गेला आणि दुसऱ्या रथावर जाऊन बसला. अशा प्रकारें युयुत्सूचा पराजय करून उलूक पांचाल आणि सृंजय यांजवर धांवून गेला आणि तो त्यांजवर आपले तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागला!

( २ ) हे महाराजा, तुझा पुत्र श्रुतकर्मा ह्यानें शतानीकावर चालून जाऊन निमिषार्धांत त्याच्या रथाचे अश्व आणि सारथि यांस मारून टाकलें! तेव्हां शतानीकानें त्या अश्वहीन रथांतूनच गदा फेंकली, तीमुळें अश्व आणि सारथि यांसह श्रुतकर्म्याच्या रथाचें भस्म होऊन गेलें! नंतर ती गदा जणुंकाय पृथ्वीतल विदारीत खालीं गेली! मग कुरुकुलकीर्तिवर्धक ते दोघे वीर परस्परांवर क्रोधदृष्टि टाकीत युद्धपरावृत्त झाले! हे राजा, तुझा पुत्र भयभीत होऊन विविंशूच्या रथावर चढला आणि शतानीक प्रतिविंध्याच्या रथावर आरूढ झाला!

( ३ ) इतक्यांत सुतसोमावर सौबल शकुनीनें आपले निशित बाण टाकले! परंतु पर्जन्यवृष्टीनें जसा पर्वत यत्किंचित्हि कांपत नाहीं, त्याप्रमाणें सुतसोम त्या बाणवर्षावानें किंचित्हि कंपायमान झाला नाहीं! नंतर सुतसोमानें शकुनि हा आपल्या पित्याचा मोठा वैरी आहे, ही गोष्ट लक्ष्यांत आणून हे भारता, सहस्रावधि बाणांनीं त्याला आच्छादिलें! शकुनीनें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं सुतसोमाच्या बाणांचा तत्काल प्रतिकार केला. अस्त्रज्ञ व जयाभिलाषी शकुनीनें क्रोधसंतप्त होऊन तीन तीक्ष्ण बाणांनीं सुतसोमाला विंधिलें आणि त्याचे अश्व, ध्वज आणि सारथि यांवर सारखे बाण मारून त्यांचे तिळतुल्य तुकडे केले! तें पाहून प्रेक्षक जन आक्रोश करूं लागले!

धृतराष्ट्रा, तेव्हां तो अश्वहीन, रथहीन आणि ध्वजहीन सुतसोम रथांतून उतरला आणि जमिनीवर उभें राहून त्या धनुर्धरानें तुझ्या श्यालाचा रथ स्वर्णपुंख तीक्ष्ण बाणांनीं आच्छादून टाकिला! शलभसमूहांप्रमाणें आपल्यावर पडणारे ते बाण पाहून शकुनीच्या चित्ताला किमपिहि भीति वाटली नाहीं. त्या महायशस्वी शकुनीनें सुतसोमावर उलट शरवृष्टि करून त्याच्या सर्व बाणांचें निरसन केलें! दोघां वीरांचें युद्धनैपुण्य पाहून तेथील योद्धे आणि अंतरिक्षांतील

सिद्ध यांना मोठा आनंद झाला आणि विशेषतः पादचारी सुतसोमानें शकुनीशीं युद्ध करीत असतां जो अद्भुत व अश्रद्धेय पराक्रम दाखविला त्याबद्दल त्यांनीं त्याची वाहवा केली !

नंतर शकुनीनें सन्नतपर्व भल्ल बाणांनीं सुतसोमाचें धनुष्य तोडून टाकलें आणि त्याचे तूणीरांचाहि नाश करून टाकला ! मग सुतसोम धनुष्यहीन होऊन खड्गानें युद्ध करूं लागला ! त्यानें वैदूर्याप्रमाणें शोभणारा आपला खड्ग उगारून मोठ्यानें गर्जना केली. हस्तिदंताच्या मुठीचा आणि आकाशाप्रमाणें कांतिमान् तो खड्ग प्रत्यक्ष कालदंडासमान शकुनीला वाटला ! हे महाराजा, त्या बलवान् वीर सुतसोमानें भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध इत्यादि प्रकारचीं चौदा मंडळें अनेक वेळां करून दाखविलीं ! नंतर सौबलानें सुतसोमावर पुनः बाणवृष्टि केली; परंतु त्या बाणांचा प्रतिकार सुतसोमानें आपल्या खड्गानें केला !

धृतराष्ट्रा, नंतर सौबल शकुनि अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें सर्पविषाप्रमाणें अत्यंत उग्र शर सुतसोमावर टाकले. परंतु त्या गरुडतुल्य पराक्रमी सुतसोमानें त्या बाणांचा संहार केला ! सुतसोम आपला खड्ग मंडलाकार फिरवीत असतां शकुनीनें त्या खड्गावर सुतीक्ष्ण क्षुरप्र बाणांचा प्रहार करून तो तोडून टाकला ! तो महान् खड्ग छिन्न होऊन जमिनीवर पडला. मुठीकडील अर्धा भाग मात्र सुतसोमाच्या हातांत राहिला. आपला खड्ग भंग पावला, ही गोष्ट लक्ष्यांत येऊन सुतसोमानें मोठ्या वेगानें तो अर्धा खड्ग शकुनीवर फेंकला ! त्यानें सौबलाचें धनुष्य आणि त्याची प्रत्यंचा हीं तोडून टाकलीं आणि मग तो भूमी-वर पडला !

राजा, नंतर सुतसोम हा श्रुतकीर्तीच्या रथावर आरूढ झाला आणि सौबल दुसरें बळकट धनुष्य घेऊन पांडवसैन्यावर चालून जाऊन त्याचा संहार करूं लागला ! राजेंद्रा, तेव्हां पांडवांच्या सैन्यांत मोठा कोलाहल उत्पन्न झाला. निर्भय रीतीनें समरांगणावर सौबल संचार करीत असतां त्यापुढें तें बलवंत, सशस्त्र आणि गर्विष्ठ पांडवसैन्य पळत सुटलें ! आणि देवराजानें जसा दैत्यसैन्याचा संहार केला, तसा त्या सौबलानें पांडवसैन्याचा निःपात करून टाकला ! ८. २५.

## अध्याय २६ वा.

[ १ धृष्टद्युम्नाचा पराजय. २ शिखंडीचा पराभव. ]

( १ ) संजय—राजन्, अरण्यांत सिंह दृष्टीला पडतांच शरभ जसा सिंहाचा प्रतिकार करतो, तसा धृष्टद्युम्नाचा प्रतिकार त्या युद्धांत कृपाचार्यानें केला. त्या बलवान् गौतमानें-कृपाचार्यानें-धृष्टद्युम्नाचा असा निरोध केला कीं त्याला आपल्या जाग्यावरून एक पाऊलहि जातां येईना. गौतमाचा रथ धृष्टद्युम्नाच्या रथाजवळ पाहतांच सर्व प्राण्यांस भीति उत्पन्न झाली आणि आतां धृष्टद्युम्नाचा नाश होणार असा त्यांचा समज झाला. त्यावेळीं रथी आणि सादी विमनस्क होऊन म्हणाले, " द्रोणाच्या वधामुळेंच हा नरश्रेष्ठ कृपाचार्य एवढा क्षुब्ध झाला आहे. हा शारद्वत महातेजस्वी असून दिव्यास्त्रवेत्ता आणि मोठा उदार अंतःकरणाचा आहे. आतां ह्या गौतमापासून धृष्टद्युम्नाचें रक्षण कसें होणार? ह्या मोठ्या संकटांतून ही पांडवांची महासेना कशी निभावणार ? ह्या सर्व एकत्र जमलेल्या वीरांचा हा ब्राह्मण संहार करणार नाहींना ? अंतकासारखें याचें जें हें रूप दिसत आहे, त्यावरून हा गौतम भारद्वाजासारखा पराक्रम गाजविणार, यांत शंका नाहीं ! हा कृपाचार्य युद्धांत सर्वदा विजयी होणारा असून त्याची चपळाई मोठी आहे. हा अस्त्रवान् असून मोठा वीर्यसंपन्न आहे. तसाच हा अत्यंत क्रोधी आहे. आज पार्षत-धृष्टद्युम्न-अगदीं युद्धविमुख झालेला दिसत आहे ! "

राजा, अशाप्रकारचीं भाषणें तुझ्या सैनिकांचीं इतरांशीं होत असत. कृपाचार्यानें संतापानें धृष्टद्युम्नाच्या मर्मस्थळीं इतके बाणांचे प्रहार केले कीं तो त्यामुळें मूर्च्छित होऊन पडला, व आतां पुढें काय करावें हेंहि त्याला सुचेनासें झालें. इतक्यांत त्याचा सारथि त्याला बोलला, " हे पार्षता, तुझें क्षेम आहे ना ? युद्ध करीत असतां अशा प्रकारचें व्यसन तुजवर पूर्वीं कधीं आलेलें मीं पाहिलें नाहीं ! मर्मभेदी ब्राह्मणानें टाकलेले बाण तुझ्या मर्मस्थळीं पडले नाहींत, ही सुदैवाची गोष्ट आहे ! समुद्र पुढें आला असतां नदी आपला वेग जसा फिरवून घेते, त्याप्रमाणें आतां मी तुझा रथ मागें फिरवितों ! ज्यानें तुझा सर्व पराक्रम कुंठित करून ठेवला आहे तो ब्राह्मण रणांगणांत पडेल असें दिसत नाहीं ! "

हे राजा, तेव्हां धृष्टद्युम्न दीनपणें बोलला, " बाबा, माझें चित्त भ्रांत झालें आहे, सर्व अंगें घर्मानें व्याप्त झालीं आहेत, कंप सुटून शरीर पुलकित झालें आहे, यास्तव या ब्राह्मणाला टाकून जेथें अर्जुन असेल, तेथें त्वरित माझा रथ

घेऊन चल ! अर्जुन-भीमसेनांवांचून मला दुसरा कोणी सोडवील असें दिसत नाहीं." नंतर त्या सारथ्यानें वेगानें अश्व हांकले आणि जेथें तुझ्या सैन्याशीं महाधनुर्धर भीमसेन युद्ध करीत होता, तेथें घेऊन आला. धृष्टद्युम्न पळून जात आहे, असें पाहतांच गौतमानें शेंकडो बाण टाकीत व वरचेवर शंखनाद करीत त्याचा पाठलाग केला. अशाप्रकारें महेंद्रानें जसें नमुचीला जर्जर केलें, त्याचप्रमाणें कृपाचार्यानें धृष्टद्युम्नाला त्रस्त करून सोडलें !

( २ ) धृतराष्ट्रा, नंतर भीष्माचा दुरासद मृत्यु जो शिखंडी त्याला कृतवर्म्यानें गांठून हंसतहंसतच अडविलें. तेव्हां शिखंडीनें हृदीकाच्या त्या महारथ्यावर तीक्ष्ण बाण मारून त्याला विद्ध केलें ! कृतवर्म्यानें चवताळून साठ बाण त्यावर फेंकले आणि एका बाणानें त्याचें धनुष्य तोडलें ! नंतर द्रुपदाचा पुत्र शिखंडी यानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तो 'थांब, थांब' म्हणत कृतवर्म्यावर धांवून गेला आणि त्यावर आपले नव्वद सुवर्णपुंख तेजस्वी व प्रखर बाण टाकले ! ते सर्व बाण कृतवर्म्याच्या कवचापासूनच मागें परतले व भूमीवर पडले ! राजन्, शिखंडीनें एका तीक्ष्ण क्षुरप्र बाणानें त्याचें धनुष्य छेदून टाकलें ! तेव्हां त्या भग्नशृंग वृषभाप्रमाणें दिसणाऱ्या चापहीन कृतवर्म्याच्या बाहूंवर आणि छातीवर शिखंडीनें ऐशीं बाण मारून त्याला विद्ध केलें. त्या बाणविद्ध कृतवर्म्याच्या शरीरांतून कुंभमुखांतून बाहेर पडणाऱ्या जलाप्रमाणें रक्तस्राव होऊं लागला ! त्याचें सर्व शरीर गैरिक पर्वताप्रमाणें आरक्त झालें. इतक्यांत त्या प्रतापशील कृतवर्म्यानें क्रुद्ध होऊन दुसरें चाप घेतलें आणि शिखंडीच्या स्कंधावर बाणवृष्टि चालविली. तेव्हां तो शिखंडी शाखाप्रशाखांनीं जसा एखादा वृक्ष शोभतो, तसा शोभूं लागला ! त्या दोघां वीरांनीं परस्परांवर बाणवृष्टि करून एकमेकांस रक्ताचें स्नान घातलें ! त्यावेळीं दोन मदोन्मत्त वृषभ एकमेकांचा वध करण्याच्या इच्छेनें परस्परांवर आपल्या शृंगांचा प्रहार करीत आहेत असें भासलें !

राजा, नंतर ते उभय वीर मंडलाकार फिरून एकमेकांवर बाण मारूं लागले ! कृतवर्म्यानें सत्तर तीक्ष्ण बाण त्या शिखंडीवर मारून त्याला विद्ध केलें आणि एक भयंकर प्राणांतक बाण त्याजवर सोडला ! भोजाधिपति कृतवर्म्याच्या त्या बाणानें शिखंडीला तत्काल मूर्च्छा आली आणि ध्वजयष्टीचा आश्रय करून तो राहिला ! संतापानें वरचेवर निश्वास टाकणाऱ्या व पीडित झालेल्या त्या

रथिश्रेष्ठ शिखंडीला त्याच्या सारथ्यानें रणांगणापासून दूर नेलें! ह्याप्रमाणें कृतवर्म्यानें शिखंडीचा पराभव केल्यावर पांडवसैन्य सर्व बाजूंनीं पीडित होऊन पळत सुटलें! ८. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ संशप्तकांचा पराजय. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, वायु आणि कापूस हीं दोन एकत्र झालीं असतां वारा जसा कापूस उधळून लावितो, त्याप्रमाणें अर्जुनाची आणि तुझ्या सैन्याची गांठ पडतांच तुझें सैन्य त्यानें तत्काल उडवून लाविलें! राजा, त्रिगर्त, शिबि, कौरव, शाल्व, संशप्तक, नारायणसैन्य, तसेंच सत्यसेन, चंद्रदेव, मित्रदेव, सुतंजय, सौश्रुति, चित्रसेन, मित्रवर्मा आणि बंधूंसहवर्तमान महेष्वास आणि नानाशस्त्रज्ञ पुत्रांसह त्रिगर्तराज हे सर्व अर्जुनावर चाल करून आले आणि त्यांनीं त्याजवर बाणवृष्टि केली. त्या समयीं सागरावर जलौघच पडत असल्याचें वाटलें! राजा, ते सर्व शतसहस्र वीर अर्जुनावर धांवून आले, तरी गरुडाला पाहून सर्पांची जशी अवस्था होते, तशी त्यांची स्थिति झाली! रणांत वध होत असतांहि जे युद्धविमुख झाले नाहींत, ते अग्नीवर चालून येणाऱ्या शलभांप्रमाणें मृत्युमुखीं पडले!

त्या युद्धांत सत्यसेनानें अर्जुनावर तीन, मित्रदेवानें त्रेसष्ट, चंद्रसेनानें सात, मित्रवर्म्यानें ऱ्याहत्तर, सौश्रुतीनें सात, शत्रुंजयानें वीस, आणि सुशर्म्यानें नऊ बाण मारले! त्या सर्वांवर अर्जुनानें शरवृष्टि करून त्यांना विद्ध केलें! अर्जुनानें सौश्रुतीवर सात, सत्यसेनावर तीन, शत्रुंजयावर वीस, चंद्रदेवावर आठ, मित्रदेवावर शंभर, श्रुतसेनावर तीन, मित्रवर्म्यावर नऊ व सुशर्म्यावर आठ बाण सोडले! त्यानें तीक्ष्ण बाणांनीं शत्रुंजय राजाचा वध केला, सौश्रुतीचें शीर्ष तोडून धडापासून वेगळें केलें आणि चंद्रदेवावर शरवृष्टि करून त्याला त्वरित यमलोकीं पाठविलें! जे महारथ त्याच्याशीं युद्ध करीत होते, त्या प्रत्येकावर पांच पांच बाण मारून त्यांचें त्यानें निवारण केलें! सत्यसेनानें संतप्त होऊन कृष्णावर तोमर फेंकला आणि सिंहनाद केला! तो सुवर्णमय पोलादी तोमर कृष्णाचा डावा बाहु भेदून पृथ्वींत शिरला! विशांपते, विद्ध झालेल्या कृष्णाच्या हस्तांतून प्रतोद आणि रश्मि गळून पडले! तेव्हां श्रीकृष्णाची ती अवस्था पाहून

अर्जुनाला त्वेष चढला आणि तो त्याला म्हणाला, " महाबाहो, माझा रथ सत्यसेनाजवळ घेऊन चल ! त्याजवर बाणवृष्टि करून त्याला यमसदनीं पाठवितों ! तेव्हां कृष्णानें दुसरा प्रतोद आणि दुसरे हयरश्मी घेतले आणि तो रथ सत्यसेनाजवळ आणिला ! सत्यसेनावर अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून त्याचें मस्तक कुंडलांसकट रणांगणावर तोडून टाकलें ! हे मारिषा, नंतर त्यानें मित्रवर्म्यावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करून त्याच्या सारथ्यावर एक तीक्ष्ण वत्सदंत बाण टाकला ! त्या बलवान् अर्जुनानें संशप्तकांचे समुदायांवर शेंकडो बाण टाकले आणि लक्षावधि संशप्तकांचा संहार केला ! राजन् , मग रजतपुंख क्षुरप्र बाणानें अर्जुनानें मित्रसेनाचें मस्तक तोडलें आणि क्रोधाविष्ट होऊन सुशर्म्याच्या जत्रुदेशीं बाणप्रहार केला ! नंतर सर्व संशप्तकांनीं मिळून अर्जुनाला वेढा दिला. तेव्हां दाही दिशा आपल्या गर्जनांनीं निनादित करून संशप्तकांनीं वेढलें असतां त्या शक्रतुल्य प्रतापी पांडववीर धनंजयानें ऐंद्रास्त्राची योजना केली ! त्यामुळें हजारों बाण प्रकट होऊन ते त्या संशप्तकांवर पडूं लागले. त्याकाळीं संशप्तकांचे ध्वज आणि धनुष्यें छिन्न होऊन पडूं लागलीं आणि रथ, पताका, तूणीर व जोखडेंहि भग्न झालीं !

धृतराष्ट्रा, अक्ष, चक्रें, रज्जु, कूबर, इत्यादि रथसाहित्य आणि प्रास, ऋष्टि, गदा, तोमर इत्यादि आयुधें व कंठसूत्रें, अंगद आणि केयूर इत्यादि भूषणें यांचा संहार होऊं लागला ! जिकडेतिकडे एकच रणकल्लोळ माजला ! त्यावेळीं कुंडलयुक्त असलेलीं आणि सुंदर नयनांनीं शोभणारीं अशीं शिरें आकाशांत उदित झालेल्या तारकांप्रमाणें समरभूमीवर सर्वत्र दिसूं लागलीं ! उत्तम प्रकारच्या माला आणि अमूल्य वस्त्रें परिधान केलेलीं आणि अंगाला चंदनाची उटी लावून सुवासिक झालेलीं धडें रणभूमीवर सर्वत्र पडलेलीं होतीं ! तेव्हां ती रणभूमि गंधर्वनगराप्रमाणें भयंकर दिसत होती ! पर्वत कोसळून त्याचा भूमिभाग जसा अगम्यरूप होतो, त्याप्रमाणें राजपुत्र आणि इतर क्षत्रिय वीर, त्यांचीं चतुरंगसैन्यें, हीं सर्वत्र मृत होऊन पडलीं असतां ती भूमि दुर्गम झाली ! त्यासमयीं अर्जुन आपल्या भल्लांनीं शत्रूंचे चतुरंगसैन्याचा संहार करीत असतां त्याच्या रथाला कोठेंहि मार्ग मिळेनासा झाला ! सर्वत्र मोडून पडलेल्या रथचक्रांनीं मार्ग निरुद्ध झाला होता ! शिवाय रक्तकर्दमांत तीं रथचक्रें रुतून गेल्यामुळें तो रथ वाहून नेण्यास त्या अश्वांस अत्यंत प्रयास पडूं लागले !

राजा, ह्याप्रमाणें त्या पांडुपुत्र अर्जुनानें त्या सैन्याचा संहार चालविला असतां तें सर्व सैन्य युद्धपराङ्मुख होऊन तेथून पळालें ! अर्जुनानें त्या संशप्तकांस जिंकलें आणि मग तो विधूम अग्नीप्रमाणें तेजस्वी दिसूं लागला ! ८. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, युधिष्ठिर कौरवसैन्यावर बाणवृष्टि करीत असतां दुर्योधन त्यावर चालून गेला, आणि त्याशीं युद्ध करूं लागला. तुझा पुत्र महारथ दुर्योधन हा सहसा आपल्यावर चालून येत असल्याचें पाहून धर्मानें त्यावर बाणवृष्टि करून त्याला 'थांब, थांब' म्हणून मोठ्यानें सांगितलें. त्यामुळें दुर्योधन क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें युधिष्ठिरावर नऊ आणि त्याच्या सारथ्यावर एक, असे दहा बाण सोडले ! त्यावेळीं धर्मानें दुर्योधनावर तेरा स्वर्णपुंख बाण टाकले. चार बाणांनीं त्यानें दुर्योधनाचे चार अश्व मारले, पांचव्यानें त्याच्या सारथ्याचें शीर्ष उडविलें, सहाव्यानें त्याचा ध्वज छिन्न केला, सातव्यानें त्याचें धनुष्य भंगिलें आणि आठव्यानें त्याचें खड्ग जमिनीवर पाडिलें ! इतकें करूनहि आणखी त्यावर पांच बाण मारून त्यानें दुर्योधनाची स्थिति अत्यंत भयजनक करून सोडली. नंतर दुर्योधनानें त्या अश्वहीन रथांतून खालीं उडी मारली आणि तो जमिनीवर उभा राहिला ! तें पाहून कर्ण, द्रौणि, कृपाचार्य वगैरे वीर त्याच्या साहाय्यार्थ धांवून आले ! सर्व पांडुपुत्रहि धर्मराजाच्या संरक्षणार्थ त्याच्या सभोंवतीं उभे राहिले ! अशा रीतीनें कौरव-पांडवांमध्यें अतिभयंकर युद्ध प्रवृत्त झालें आणि रणवाद्यें वाजूं लागलीं ! असा तेथें एकच रणकल्लोळ माजून राहिला !

धृतराष्ट्रा, मनुष्यें मनुष्यांवर धांवून गेलीं, पदाति पदातींवर तुटून पडले, गज गजांशीं भिडले, रथी रथ्यांशीं युद्ध करूं लागले आणि अश्वसादी अश्वसाद्यांवर चालून गेले ! त्या संग्रामांत अनेक आश्चर्यावह युद्धप्रसंग घडून आले. परस्परांच्या वधाची इच्छा करून ते वीर एकमेकांवर प्रहार करीत होते ! थोडा वेळ तें युद्ध पद्धतशीर व प्रेक्षणीय झालें ! सर्व वीर समोरासमोर उभे राहून युद्ध करीत, पृष्ठाकडून कोणींहि कोणावर प्रहार करीत नसत ! योद्ध्यांनीं नानाविध शस्त्रास्त्रांचा उपयोग केल्यामुळें आणि युद्धनियम पाळल्यामुळें तें युद्ध

कौतुकास्पद झालें ! त्यांत वीरांनीं आपलें हस्तलाघव आणि युद्धनैपुण्य उत्तम दाखविलें ! नंतर युद्धनियम सुटून तें अमर्याद उन्मत्तपणें होऊं लागलें ! रथी गजांवर चालून गेले, गज अश्वांवर तुटून पडले आणि अश्वसादी मोठमोठ्या अश्वांना वेढून राहिले ! गज पळून जात असतां सादींनीं पृष्ठभागांकडून त्यांजवर प्रहार केले ! अनेक अश्वांना मदोत्कट गजांनीं पळवून लाविलें, तर कित्येकांना आपल्या दंतांनीं भोंसकलें आणि कित्येकांचा त्यांनीं क्रूरपणें संहार केला ! त्यांनीं क्षुब्ध होऊन कित्येक अश्वांचा सादींसह वध केला ! पदातींनीं गजांवर चालून जाऊन त्यांस दाही दिशांना पळवून लाविलें ! त्या महायुद्धांत पळून जाणाऱ्या पदातींवर गजयोद्धयांनीं चाल केली, त्यांचीं रणांगणावर सर्वत्र पडून राहिलेलीं आभरणें गजांकडून घेवविलीं आणि त्यांस गजदंतांनीं विद्ध करविलें ! आपल्यावर धांवून आलेल्या गजयोद्धयांना पदातींनीं घेरलें आणि त्यांनीं मोठ्या आवेशानें त्यांचा वध केला ! त्या युद्धांत कित्येक सैनिकांस गजयोद्धयांनीं गजांच्या शुंडांनीं आकाशांत भिरकाविलें व ते पृथ्वीवर पडतांच दुसऱ्या गजांकडून त्यांना विद्ध करविलें ! कित्येक सैनिकांस गजांनीं दंतविद्ध करून मारलें !

कित्येक सैनिक आपलें पथक सोडून दुसऱ्या पथकास मिळण्याच्या इच्छेनें जात असतां गजांच्या तावडींत सांपडून त्यांच्या पायांखालीं चूर्ण होऊन गेले ! दुसऱ्या कित्येकांना गजांनीं शुंडांत धरून पंख्यांसारखें फिरविलें आणि समरभूमीवर आपटून मारलें ! गजांवर चाल करून जातांना कित्येक सैनिक त्यांच्याकडून विद्ध होऊन रणांगणांत पडले ! तेव्हां जवळ असलेल्या पराक्रमी रथींनीं आणि अश्वसादींनीं त्यांवर धांवून जाऊन त्यांच्या गंडस्थलांवर प्रास, कुंभांवर तोमर आणि दंतांवर शक्ति मारून त्यांना जर्जर केलें ! सादींनीं हत केलेले कित्येक गज भूमीवर पडले व अश्वसादींच्या प्रहारांनीं हत झालेले कित्येक पदाती जमिनीवर पडलेले दिसत होते. कित्येक गज कवचधारी रथ्यांवर चालून गेले आणि त्यांना रथांतून बाहेर काढून त्यांनीं वेगानें मारलें ! कित्येक गज रथ्यांनीं सोडलेल्या नाराच बाणांनीं व्यथित होऊन वज्रहत गिरिशिखरांप्रमाणें भूमीवर पडले ! वीरांनीं वीरांस गांठून त्यांना मुष्टिप्रहार करून मारलें ! परस्परांनीं परस्परांचे केश धरून ओढले आणि त्यांना भूमीवर आपटून मारलें ! दुसऱ्या कित्येकांनीं हात लांब करून शत्रूंना बाहेर ओढून काढलें आणि मारलें. कित्येकांनीं शत्रूंच्या छातीवर पाय देऊन ते धडपड करीत असतां त्यांचीं मस्तकें

उडविलीं ! कित्येकांनीं भयंकर मुष्टियुद्ध आरंभिलें, कित्येकांनीं शत्रूंच्या उरः-प्रदेशीं शस्त्रें भोंसकलीं, तर कित्येकांनीं बाहुयुद्ध सुरू केलें ! तो संग्राम एवढा भयंकर झाला कीं कोण कोणावर प्रहार करीत आहे, हेंहि समजेनासें झालें ! नानाप्रकारच्या शस्त्रांनीं प्राणनाश होऊं लागला ! लक्षावधि कबंधें रणभूमीवर दिसूं लागलीं आणि त्यांचीं रक्तसिंचित कवचें आणि शस्त्रें रंगविलेल्या वस्त्रां-प्रमाणें शोभूं लागलीं !

राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें तें घनघोर युद्ध चालू असतां गंगेच्या ओघा-प्रमाणें त्याचा गंभीर शब्द होऊन सर्व भूमंडळ दुमदुमून गेलें. बाणपीडित वीरांना आपले कोण आणि परकीय कोण हें कळेनासें झालें ! युद्ध करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें समजून जयाभिलाषानें राजे युद्ध करीत होते. संग्रा-मांत वीर परकीयांबरोबर स्वकीयांनाहि मारूं लागले ! अनेक रथ भग्न झाले, अनेक कुंजर पडले, अश्व आणि नर यांच्या कबंधांनीं ती रणभूमि क्षणांत अग-म्यरूप होऊन गेली ! हे राजा, अल्पावकाशांत तेथें रक्तनदी वाहूं लागली ! त्या युद्धांत कर्णानें पांचालांचा आणि अर्जुनानें त्रिगर्तांचा वध केला, तसेंच भीमानें कौरवांचा संहार करून गजसैन्याचा निःपात केला ! याप्रमाणें जय-प्राप्तीच्या इच्छेनें कौरव-पांडवसेना परस्परांशीं युद्ध करीत असतां अपराह्णकाळ झाला आणि दोन्ही पक्षांमध्यें भयंकर प्राणनाश झाला ! ८. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ युधिष्ठिर–दुर्योधनयुद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अतितीव्र आणि दुःसह दुःखप्रसंग आणि त्या बरो-बरच माझ्या पुत्रांचा क्षय कसा झाला, याचें जें तूं यथार्थ वर्णन केलेंस, त्यावरून आतां कोणी कौरव राहिले नाहींत, त्या सर्वांचा क्षय झाला, अशी माझी दृढ समजूत झाली आहे. त्या युद्धांत दुर्योधन विरथ झाला असतां राजा युधिष्ठिरानें पुढें काय केलें आणि अपराह्णकाळीं त्या उभयतांमध्यें रोमहर्षण युद्ध कसें झालें त्याचें विस्तारपूर्वक वर्णन करून मला सांग ! संजया, वर्णन करण्यांत तूं अत्यंत कुशल आहेस, म्हणून सांगतों.

संजय—विशांपते, दोन्ही सैन्यें एकमेकांवर चालून गेलीं आणि युद्ध प्रवृत्त झालें असतां अनेक वीर परस्परांच्या हस्तें पतन पावले. इतक्यांत दुर्योधन

दुसऱ्या रथावर चढला आणि सविष सर्पाप्रमाणें मोठ्या क्रोधानें धर्माकडे नजर टाकून आपल्या सारथ्याला बोलला, 'सारथे, जेथें कवच धारण करून युधिष्ठिर राजा छत्राखालीं शोभत आहे, त्या ठिकाणीं मला त्वरित घेऊन चल; चल आधीं!' धृतराष्ट्रा, सारथ्याला अशी आज्ञा होतांच त्यानें तो रथ रणांत युधिष्ठिराच्या संमुख चालविला. दुर्योधनाला पाहतांच मदोन्मत्त गजाप्रमाणें क्रुद्ध होऊन धर्मराजानेंहि आपल्या सारथ्यास 'दुर्योधनाकडे आपला रथ चालव' म्हणून आज्ञा केली. नंतर ते दोघे रथिश्रेष्ठ वीरबंधु एकमेकांवर चालून गेले आणि त्या युद्धदुर्मद वीरांनीं क्षुब्ध होऊन परस्परांवर बाणवृष्टि केली. हे मारिषा, तेव्हां दुर्योधनानें एका तीक्ष्ण भल्लानें युधिष्ठिराचें धनुष्य छेदून टाकलें! युधिष्ठिराला तें सहन न होऊन त्यानें क्रोधानें नेत्र आरक्त केले, हस्तांतील धनुष्य फेंकून दिलें आणि दुसरें धनुष्य घेऊन रणाग्रभागीं उभा राहिला! त्यानें दुर्योधनाचें धनुष्य व चाप हीं छेदून टाकिलीं! दुर्योधनानेंहि दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या दोघांनीं परस्परांवर सारखा शरवर्षाव सुरू केला!

सिंहांसारखे ते दोघे वीर परस्परांना जिंकण्याच्या इच्छेनें एकमेकांवर धांवून गेले. वृषभांप्रमाणें डुरकण्या फोडीत ते एकमेकांवर प्रहार करूं लागले! परस्परांचें व्यंग शोधीत ते दोघेहि महारथी युद्ध करूं लागले! आणि एकमेकांचे देह विद्ध करून ते पुष्पित किंशुकवृक्षांप्रमाणें शोभूं लागले! हे राजा, नंतर त्यांनीं मोठ्यानें सिंहनाद केला, टाळ्या वाजविल्या आणि धनुष्यांचे टणत्कार काढले! त्यांनीं मोठ्यानें शंखनादहि केले. नंतर त्या क्रोधसंतप्त युधिष्ठिरानें वज्रसदृश वेगवान् तीन बाण तुझ्या पुत्राच्या वक्षःस्थलावर मारले. तुझ्या पुत्रानेंहि उलट पांच तीक्ष्ण स्वर्णपुंख बाण धर्मराजावर सोडले व त्याला विद्ध केलें. हे भारता, दुर्योधनानें आणखीहि आपली भयंकर शक्ति युधिष्ठिरावर सोडली! ती अग्नीप्रमाणें देदीप्यमान सर्वविनाशक शक्ति मोठ्या वेगानें आपल्यावर येत असल्याचें पाहून धर्मराजानें तीन तीक्ष्ण बाणांनीं तिचा छेद केला आणि पांच बाण दुर्योधनावर टाकले! मग ती स्वर्णदंड शक्ति मोठी गर्जना करीत महोल्केप्रमाणें भूमीवर पतन पावली!

राजेंद्रा, आपली शक्ति धर्मराजानें विच्छिन्न केल्याचें पाहून दुर्योधनानें नऊ निशित बाण युधिष्ठिरावर टाकले आणि त्याला अतिविद्ध केलें. मग त्या शत्रुतापन युधिष्ठिरानें दुर्योधनाला उद्देशून एक बाण टाकला! त्यानें तत्काल दुर्यो-

धनाला मूर्च्छित केलें आणि नंतर तो बाण जमीन विदीर्ण करून आंत शिरला ! तेव्हां दुर्योधन चवताळला आणि आपली गदा घेऊन कलहाचें मूळच नाहींसें करण्याच्या उद्देशानें धर्मावर धांवून गेला ! गदा घेऊन दुर्योधन, दंड-धारी अंतकाप्रमाणें आपल्यावर चालून येत आहे, असें पाहून युधिष्ठिरानें आपली उल्केप्रमाणें प्रचंड शक्ति त्याजवर सोडली ! राजा, तुझा पुत्र रथांत बसला असतां त्या शक्तीनें त्याचे कवचाचा भंग केला आणि त्याचें वक्षःस्थलहि भग्न केलें. त्यामुळें तो अत्यंत व्याकुळ होऊन मूर्च्छित झाला व खालीं पडला ! दुर्योधनाला त्या स्थितींत पाहून भीमाला आपल्या प्रतिज्ञेची आठवण झाली आणि तो धर्माला म्हणाला, 'राजा, तूं ह्याला मारूं नको ! हा तुझा भाग नाहीं !' तें ऐकून युधिष्ठिरानें त्याला सोडून दिलें ! इतक्यांत व्यसनार्णवांत मग्न झालेल्या दुर्योधनाच्या रक्षणार्थ कृतवर्मा आला. तेव्हां भीमानें आपली स्वर्णविभूषित गदा घेतली आणि मोठ्या वेगानें तो कृतवर्म्यावर धांवून गेला !

अशारीतीनें अपराह्णकालीं जयाशेनें युद्ध करणाऱ्या तुझ्या पुत्रांचें पांड-वांशीं मोठें युद्ध झालें. त्यांत तुझ्याच सेनेचा भयंकर संहार झाला ! ८. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ युद्धवर्णन. २ प्रथमदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) **संजया**—हे राजन्, तुझे युद्धदुर्मद वीर कर्णाला पुढाकार देऊन पुनः देवदानवांप्रमाणें युद्ध करूं लागले ! त्यांत गज, नर, अश्व, पदाति, शंख आणि नाना प्रकारचीं शस्त्रें यांच्या निनादानें योद्धयांस त्वेष चढला आणि त्यांनीं मोठ्या क्रोधानें आपल्या शत्रूंवर चालून जाऊन त्यांवर शस्त्रप्रहार केले ! त्यांनीं क्रोधानें शत्रूंवर कुऱ्हाडी, खड्ग, पट्टिश आणि वेगवेगळ्या प्रकारचे बाण यांचा उपयोग करून त्या चतुरंगसैन्याचा मोठा नाश केला ! कमल किंवा चंद्र-सूर्यांप्रमाणें सुशोभित, सुंदर दंत, नेत्र आणि नासिका यांनीं विराजित आणि अमूल्य भ्रुकुटिकुंडलांनीं विभूषित अनेक मुखकमलें त्या रणांगणीं शोभूं लागलीं ! त्या संग्रामांत परिघ, मुसलें, शक्ति, तोमर, नखर, इत्यादिकांच्या प्रहारांनीं हत झालेले गज, अश्व आणि नर ह्यांच्या शरीरांतून रक्तप्रवाह वाहूं लागला ! तसेंच हत किंवा विद्ध झालेल्या चतुरंगसैन्यांतील वीरांची विह्वल

स्थिति अवलोकन करून त्या ठिकाणीं जणुंकाय प्रलयकालच्या पितृतुल्य यमाचेंच राष्ट्र प्रस्थापित झालें आहे, असें सर्वांना वाटलें !

राजा धृतराष्ट्रा, तुझ्या सैन्यांतील प्रमुख वीर तुझ्या देवसदृश पुत्रांसह अमित सैन्य बरोबर घेऊन शिनिपुत्र सात्यकीवर धांवून गेले. तेव्हां मोठमोठे योद्धे, अश्व, गज आणि रथ यांनीं भरून गेलेलें तें सैन्य देवासुरांच्या सैन्याप्रमाणें दिसूं लागलें आणि त्याचा समुद्रासारखा गंभीर नाद होऊं लागला ! नंतर अमितविक्रमी विष्णुतुल्य कर्णानें सूर्यकिरणांसमान प्रखर बाणांनीं सात्यकीला विद्ध करून टाकलें ! सात्यकीनेंहि भुजंगविषाप्रमाणें तीक्ष्ण बाणांनीं त्या कर्णाला, त्याच्या सारथ्याला, अश्वांला आणि रथाला आच्छादून टाकलें ! तेव्हां तुझ्या सैन्यांतील वीर चतुरंगसैन्य घेऊन कर्णाच्या साहाय्यार्थ धांवून आले ! तेव्हां सागरासारख्या त्या प्रचंड सैन्यावर द्रुपदपुत्रादि पांडवांचे प्रमुख वीर चालून गेले आणि त्यांनीं कौरवांचे चतुरंगसैन्याचा मोठा संहार केला !

राजा धृतराष्ट्रा, नंतर पुरुषश्रेष्ठ कृष्णार्जुनांनीं आपलें आह्निक संपविलें, यथाविधि शंकराची आराधना केली आणि शत्रुवधाचा निश्चय करून ते तुझ्या सैन्यावर चालून आले ! तेव्हां मेघाप्रमाणें गर्जना करणारा, पवनानें ध्वजपताका फडकविणारा आणि शुभ्र अश्व जोडलेला अर्जुनाचा रथ जवळ आल्याचें पाहून हा प्रत्यक्ष अंतकच आपल्यावर चालून येत आहे, असें तुझ्या सैनिकांना वाटलें ! अर्जुनानें गांडीव धनुष्याच्या निनादांत शत्रूंवर बाणवृष्टि केली आणि आकाश, दिशा आणि उपदिशा त्यानें बाणांनीं भरून काढल्या ! वायु जसा अभ्रांचा निरास करितो, तसा बाणवर्षावानें अर्जुनानें विमानांसारख्या रथांचा सारथि, आयुधें आणि ध्वज यांसह संहार केला ! गज, हस्तिपक, ध्वज आणि पताका यांचा त्यानें क्षय केला आणि सादी, अश्व आणि पदाति यांचाहि बाणांनीं नाश केला ! अंतकाप्रमाणें क्रुद्ध अशा त्या अनिवार्य अर्जुनाला पाहून दुर्योधन सरलगामी बाण टाकीत त्याजवर चालून गेला ! अर्जुनानें सात बाणांनीं दुर्योधनाचें चाप, सारथि, चार अश्व आणि केतु यांचा क्षय करून एका बाणानें त्याचें छत्र तोडिलें आणि नववा प्राणांत करणारा बाण त्यानें त्यावर टाकला ! परंतु अश्वत्थाम्यानें त्या बाणाचे सात तुकडे केले. नंतर अर्जुनानें द्रौणीच्या धनुष्याचा भंग करून त्याच्या रथाच्या अश्वांचा वध केला ! कृपाचार्यांचें धनुष्य, त्याचा ध्वज आणि अश्व यांचा त्यानें संहार केला आणि दुःशासनाचेंहि धनुष्य तोडून तो राधेयाकडे निघून गेला !

नंतर कर्ण सात्यकीला सोडून अर्जुनावर धांवून गेला ! त्यानें अर्जुनावर तीन व कृष्णावर वीस असे पुनःपुनः बाण टाकले ! क्रोधाविष्ट शतक्रतुसमान कर्णानें कृष्णार्जुनांवर सारखी बाणवृष्टि केली, तरी ते त्यामुळें यत्किंचितहि म्लान झाले नाहींत ! इतक्यांत सात्यकि येऊन त्यानें प्रथमतः नव्वाण्णव तीक्ष्ण बाण आणि नंतर आणखी शंभर उग्र बाण कर्णावर टाकले ! पांडवांच्या सर्व वीरांनीं कर्णावर बाणवर्षाव करून ते त्याला पीडा देऊं लागले ! पांडवांकडील युधामन्यु, शिखंडी, द्रौपदेय, प्रभद्रक, उत्तमौजा, युयुत्सु, नकुल-सहदेव, धृष्टद्युम्न, चेकितान आणि युधिष्ठिर, तसेंच चेदी, कारूष, मत्स्य आणि केकय देशचीं सैन्येंहि आपल्या चतुरंगसैन्यासह कर्णावर धांवून आलीं आणि कर्ण-वधेच्छेनें त्या सर्वांनीं कर्णाला वेढून कठोर शब्दांचा व नानाविध शस्त्रांचा त्याच्यावर मारा केला ! कर्णानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या शरवृष्टीचा प्रति-कार केला आणि वारा जसा वृक्षाला उडवून टाकतो, त्याप्रमाणें त्यानें त्या शत्रु-सैन्याचा संहार केला !

( २ ) हे राजा, त्यावेळीं कर्ण चवताळून जाऊन रथी, हस्तिपक, गज, अश्व, सादी आणि पत्तिसमूह यांचा मोठ्या आवेशानें संहार करीत असल्याचें दिसून आलें ! कर्णास्त्रतेजामुळें पांडवांच्या सैन्याचीं आयुधें, वाहनें, देह आणि प्राण हीं नष्ट होऊन गेलीं आणि शेष सैन्य युद्धपराङ्मुख झालें ! हें होत आहे, तों अर्जुनानें आपल्या अस्त्रानें कर्णास्त्राचा प्रतिकार केला आणि त्यानें हंसतहंसत बाणवृष्टीनें दिशा, आकाश आणि पृथ्वी शरवृष्टीनें आच्छादून टाकलीं ! ती बाणवृष्टि पाहून जणुं मुसळांची किंवा परिघांचीच वृष्टि आपल्यावर होत असल्याचें सर्वांना वाटलें ! त्या बाणांतून कित्येकांचा शतघ्नीप्रमाणें, तर कित्येकांचा उग्र वज्राप्रमाणें शत्रूंचा संहार करण्यांत उपयोग झाला ! अर्जुनाच्या बाणांनीं कौरवांचें चतु-रंग सैन्य मूर्च्छित झालें आणि डोळे मिटून त्यानें मोठ्यानें आक्रोश केला ! मर-णाशिवाय आतां गत्यंतर नाहीं, अशा निश्चयानें त्या सैन्यानें युद्ध केलें ! शेवटीं पार्थाच्या बाणांनीं आर्त होऊन त्या सैन्यानें भयभीत होऊन पळ काढला !

धृतराष्ट्रा, अशाप्रकारें जयाच्या आशेनें शत्रूंशीं तुझें सैन्य युद्धासक्त झालें असतां सूर्य अस्ताचलावर गेला. अंधकारानें आणि विशेषतः धूळीनें सर्व दिशा व्यापून गेल्यामुळें युद्धांत बरें झालें किंवा वाईट झालें, हें कांहींच समजलें नाहीं. परंतु हे भारता, तुझे वीर रात्रियुद्धाला कंटाळून आपापल्या योद्धयांसह

रणांगणांतून पळून गेले ! दिनक्षयकालीं कौरव पळून गेले असतां विजयी पांडव मोठ्या आनंदानें आपापल्या शिबिरांत गेले. त्यावेळीं वेगवेगळीं वाद्यें वाजूं लागलीं आणि सिंहनाद होऊं लागले. शत्रूंचा सर्वांनीं उपहास केला आणि कृष्णार्जुनांना धन्यवाद दिले !

हे राजा, याप्रमाणें प्रथमदिनयुद्धसमाप्ति होऊन त्या सर्व राजांनीं पांडवांना आशीर्वाद दिले. ते राजे आणि पांडव यांनीं ती रात्र मोठ्या आनंदानें घालविली. इकडे राक्षस, पिशाच्च व श्वापदें यांचे कळप समरभूमीवर प्राप्त झाले, आणि ती रणभूमि रुद्राचें क्रीडास्थानच आहे, असें भासूं लागलें ! ८. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ धृतराष्ट्राचा युद्धविषयक प्रश्न व त्याला संजयाचें उत्तर. २ कर्ण-दुर्योधनसंवाद. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, या युद्धांत अर्जुनानें आमच्या वीरांचा आपल्या इच्छेनुसार वध केला, हें उघड होत आहे. समरांत हा चालून आला असतां याच्या हातून साक्षात् यमाचीहि सुटका होणार नाहीं ! पार्थानें एकट्यानें सुभद्रेचें हरण केलें, त्यानें एकट्यानें अग्नीची तृप्तता केली आणि त्यानें एकट्यानेंच सर्व पृथ्वी जिंकून निखिल राजमंडळीला आपले मांडलिक केलें ! दिव्यधनुष्यधारी त्या अर्जुनानेंच निवातकवचांचा नाश केला ! किरातरूपानें पुढें स्थित झालेल्या शंकराशीं त्यानेंच युद्ध केलें ! घोषयात्राप्रसंगीं त्यानेंच दुर्योधनादिकांचें रक्षण केलें, त्यानेंच एकट्यानें शंकराला तुष्ट केलें, त्यानेंच आपल्या उग्र तेजानें सर्व भूपालांना जिंकिलें ! त्या महावीराशीं युद्ध करणारे ते निंद्य नसून स्तुत्यच आहेत ! म्हणून त्या कौरवांनीं तसेंच दुर्योधनानें पुढें काय केलें तें सर्व मला कथन कर !

संजय—धृतराष्ट्रा, युद्धांत कौरवांकडील पुष्कळ वीर पडले, अनेक विद्ध झाले, कित्येकांचा पुरा मोड झाला, कितीएकांचीं कवचें, आयुधें आणि वाहनें नष्ट झालीं ! तेव्हां कौरववीर आपल्या शिबिरांतच राहून वरचेवर विचार करूं लागले ! ते कौरव त्यावेळीं भग्नदंष्ट्र आणि पादाक्रांत सर्पासारखे दिसत होते. क्रुद्ध सर्पाप्रमाणें निश्वास टाकीत आणि हात चोळीत आणि तुझ्या पुत्राकडे नजर टाकीत सर्वांस उद्देशून कर्ण बोलला, " अहो, हा अर्जुन सर्वदा दक्ष, दृढ-

द्योगी, धैर्यशील आणि समयसूचक आहे. शिवाय श्रीकृष्णाची त्याला कालानुसार मसलत मिळत असल्यामुळें आम्ही आज त्याजकडून पराभूत झालों आहों! आज त्यानें एकाएकीं आमच्यावर बाणवृष्टि केली आहे! हे राजा, उद्यां मी त्याचे सर्व विचार हाणून पाडतों पहा!"

राजा, याप्रमाणें कर्णाचें भाषण झाल्यावर दुर्योधनानें 'ठीक आहे' असें म्हणून त्यानें सर्वांस विश्रांति घेण्यास अनुज्ञा दिली. नंतर सर्व राजे आपापल्या शिबिराला गेले. रात्रभर सुखानें निद्रा घेऊन सकाळीं हृष्ट मनानें ते युद्धाला पुनः प्रवृत्त झाले. रणांगणांत येतात, तों धर्मराजानें रचलेला दुर्जय सैन्यव्यूह त्यांच्या दृष्टीस पडला. त्याची रचना बृहस्पति व शुक्राचार्य या दोघांनाहि संमत अशी होती. त्या व्यूहाचा भेद करण्यास वृषभतुल्य स्कंधधारी, युद्धांत पुरंदरसमान पराक्रमी आणि मरुद्गणांप्रमाणें बलवान्, कार्तवीर्याप्रमाणें वीर्यवान् असा वीर म्हटला म्हणजे एक कर्णच होय, असें त्या दुर्योधनास वाटलें आणि सर्व सैनिकांचेंहि मन कर्णाच्याच बाजूला वळलें. ज्याप्रमाणें प्राणसंकटकालीं आपलें रक्षण बंधुच करतो, त्याप्रमाणें हा कर्ण आपलें रक्षण करील असें सर्वांस वाटलें!

धृतराष्ट्र—सूता, नंतर दुर्योधनानें काय केलें? तुम्हां सर्वांच्या मनांत वैकर्तन कर्णाविषयीं आदरबुद्धि वसत असून त्याच्यावर तुम्हां सर्वांचें मन जडलें आहे! शीतार्त मनुष्य ज्याप्रमाणें सूर्यकिरणांची इच्छा करितो, त्याप्रमाणें तुम्ही कर्णाच्या भेटीची इच्छा केली असेल! रात्र संपून प्रातःकालीं पुनः युद्धारंभ झाला असतां कर्णानें कशाप्रकारें युद्ध केलें? सर्व पांडवहि त्यावेळीं कर्णाबरोबर कसे लढले? सृंजयांसह सर्व पांडवांचा नाश करण्यास एकटा कर्णच समर्थ आहे! त्याचें बाहुवीर्य इंद्र किंवा विष्णु यांच्या बाहुबलाइतकें आहे! त्याचीं अस्त्रें अत्यंत घोर असून त्याच्याच पराक्रमावर अवलंबून हा दुर्योधन मत्तासारखा स्वस्थ बसून राहिला आहे! युद्धांत अर्जुनानें दुर्योधनाला विह्वल केलें तें पाहून आणि इतर पांडवांचा पराक्रम लक्ष्यांत आणूनहि मंदबुद्धि दुर्योधन सृंजयांसह सर्व पांडवांना जिंकण्याची इच्छा अजून करीत आहे! कर्णासारख्या महापराक्रमी योद्ध्याचे हातून पांडव जिंकले जाऊं नयेत, ही किती दुःखाची गोष्ट आहे म्हणून सांगूं! येथें दैवच बलवत्तर आहे, असें म्हटलें पाहिजे! आजवर दुर्योधनाचीं शतशः दुष्कृत्यें मीं सोशिलीं आहेत, त्यांचें शल्य माझ्या हृद-

यांतून जात नाहीं ! त्या द्यूताचाच हा परिणाम असला पाहिजे. द्यूतप्रसंगीं सौबल शकुनि हा मोठा नीतिमान् आहे, असें कर्णाला वाटत होतें, नाहीं बरें ? राजा दुर्योधन हा सर्वदा कर्णाच्या मतानें वागणारा असून माझ्या पुत्राचा ह्या प्रत्येक युद्धांत सारखा पराजय होत आहे, असें मी ऐकितों. पांडवांचें समरांत निवारण करण्यास समर्थ असा कोणीहि पुरुष कौरवांकडे नाहीं ! माझ्या सेनेचा त्यांनीं कसा संहार चालविला आहे पहा !

संजय—राजा, पूर्वी घडलेल्या द्यूतादि गोष्टी तूं सांगत आहेस, त्या सर्व नीतीला अनुसरून कितपत होत्या, याचा तूंच विचार कर ! अरे, जो एकदां होऊन गेलेल्या गोष्टीचा मागाहून विचार करीत बसतो, त्याचा त्या चिंतेनेंच कार्यनाश होत असतो ! प्राप्ताप्राप्त गोष्टीचा ह्यापूर्वीं तूं विचार न केल्यामुळें राज्यलाभादि गोष्टी सिद्धीस जाणें आतां अशक्यच झालें आहे ! पांडवांशीं तूं युद्ध करूं नकोस, असें तुला अनेक प्रकारें सांगितलें असतां, हे विशांपते, तूं मूर्खपणानें त्याचा विचार केला नाहींस ! पांडवांसंबंधानें तुझ्या हातून अनेक पापकर्में घडलीं आहेत, ह्यास्तव पांडवांचा सांप्रत जो संहार होत आहे, त्याला कारण तूंच आहेस ! हे भरतर्षभा, गेल्या गोष्टींचा विचार करण्यांत आतां अर्थ तो काय ? तूं व्यर्थ शोक करूं नकोस ! पुढें युद्धांत तुझ्या सैन्याचा नाश झाला तो सांगतों, नीट श्रवण कर !

(२) प्रभातीं कर्ण दुर्योधनाकडे गेला आणि त्याला म्हणाला, "राजा, आज मी त्या यशस्वी अर्जुनाशीं युद्ध करून त्याचा वध करीन, किंवा तो माझा तरी वध करील ! हे भारता, अनेक कार्यांमुळें माझें व त्याचें युद्ध आजवर झालें नव्हतें ! हे राजेंद्रा, आज मी इतकेंच सांगतों कीं, रणांत अर्जुनाचा वध केल्याशिवाय मी मागें फिरणार नाहीं ! आपल्या सैन्यांतील मोठमोठे वीर पडले असतां, आणि मी इंद्रशक्तिहीन रणांत उभा राहिलों असतां तो पार्थ मजवर खात्रीनें चालून येईल. म्हणून हे राजा, मला जें श्रेयस्कर वाटत आहे, तें तुला मी सांगतों, ऐक. माझ्या व अर्जुनाच्या दिव्य आयुधांच्या सामर्थ्याविषयीं विचार केला असतां शत्रुविनाशन, बाणमोचन, युद्धलाघव आणि अस्त्रविद्याकौशल्य या गुणांत अर्जुन माझ्याशीं कधींहि बरोबरी करूं शकणार नाहीं. शारीरबल, मानसबल, अस्त्रकौशल्य या गुणांतहि अर्जुन माझ्याशीं तुल्यबळ होणार नाहीं; तसेंच सर्व आयुधांमध्यें श्रेष्ठ असें विजय नांवाचें धनुष्य मजजवळ सिद्ध आहे.

हें पूर्वी इंद्राचें प्रिय करण्याच्या हेतूनें विश्वकर्म्यानें निर्माण केलें होतें व ह्याच्या योगानें इंद्रानें अनेक दैत्यगणांना जिंकलें होतें. ह्या धनुष्याच्या टणत्कारानें राक्षसगण दाही दिशांना पळून जात असत. असें हें सर्वसंमत व उत्तम धनुष्य इंद्रानें परशुरामाला व परशुरामानें मला दिलें आहे. तें घेऊन इंद्रानें सर्व दैत्यांस जसें जिंकिलें, त्याप्रमाणें मी अर्जुनाशीं युद्ध करून त्याला जिंकीन. भार्गवरामानें मला दिलेल्या त्या धनुष्याची थोरवी अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापेक्षां अधिक आहे. या धनुष्याचे योगानें परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. ह्या धनुष्याचीं दिव्य कर्में भार्गवानें मला सांगितलीं आहेत. म्हणून त्यानें दिलेलें तें धनुष्य घेऊन मी अर्जुनाशीं युद्ध करीन. हे दुर्योधना, अशा रीतीनें त्याचा समरांत वध करून मी तुला आणि तुझ्या बांधवांना आनंदित करीन. हे दुर्योधना, अर्जुनाला मारल्यावर सर्व पृथ्वी निर्वीर होऊन द्वीपें, वनें व पर्वत यांसह ती सर्व सागरान्त पृथ्वी तुला वश होईल व तूं तिचा पुत्रपौत्रांसह उपभोग घेशील. यांत अशक्य असें मला कांहींच दिसत नाहीं आणि विशेषतः तुझें प्रिय करण्याची माझी इच्छा असल्यामुळें तत्सिद्ध्यर्थ जें जें अवश्य वाटेल तें मी करीन आणि धर्माच्या ठिकाणीं सर्वदा अनुरक्त अशा जितचित्त मनुष्याला जशी सिद्धि प्राप्त होत असते, त्याप्रमाणें मला माझ्या कार्यांत सिद्धि मिळेल ! वृक्ष जसा अग्नीशीं युद्ध करण्यास कधींहि तयार नसतो, त्याप्रमाणें अर्जुन माझ्याशीं युद्ध करण्यास कधींहि समर्थ होणार नाहीं ! आतां कोणत्या गुणांत मी अर्जुनापेक्षां कमी आहें, हेंहि तुला सांगणें मला अवश्य वाटत आहे. तें आतां ऐक !

अर्जुनाची प्रत्यंचा आणि त्याचे तूणीर हीं अत्यंत दिव्य आहेत. त्याचा सारथि गोविंद आहे, तसा सारथि मला नाहीं. अर्जुनाचें गांडीवधनुष्य दिव्य आणि अजिंक्य आहे, तसेंच माझें विजयाख्य धनुष्यहि आहे. दोघांच्याहि धनुष्यांपुरता विचार केला असतां मीच अर्जुनापेक्षां श्रेष्ठ ठरतों. आतां रणांत कोणत्या बाबतींत मी हीन आहें, तें सांगतों, ऐकून घे. सर्व लोकांना पूज्य दाशार्ह—श्रीकृष्ण—हा त्याचा सारथि आहे. त्याचप्रमाणें त्याचा अग्निदत्त दिव्यरथ कांचनभूषित असून तो दुर्भेद्य आहे. त्याचे अश्वहि मनोवेगानें चालणारे आहेत. त्याचा ध्वज दिव्य असून त्यावर द्युतिमान् वानर अधिष्ठित झाला आहे. तो अत्यंत विस्मयकारक आहे. कृष्ण हा विश्वाचा स्रष्टा असून अर्जुनाच्या रथाचें नित्य रक्षण करीत असतो. ह्या गुणांत मी अर्जुनापेक्षां हीन असूनहि त्याच्याशीं युद्ध

करूं इच्छितों. हा रणभूषण शल्य सारथ्याचे कामीं कृष्णासारखाच प्रवीण आहे. तो जर माझें सारथ्य करील, तर तुझा निःसंशय विजय होईल. म्हणून जेणें-करून शल्य हा माझा सारथि होईल, नाराच आणि गार्ध्रपत्र बाणांनीं भरलेले शकट आणि उत्तमोत्तम अश्व जोडलेले रथ माझ्या मागून येतील, असें त्वां करावें. परवीरांतक कृष्ण हा अश्वविद्येंत निष्णात आहे, तसा महारथ शल्य हाहि हयज्ञानांत प्रवीण आहे. बाहुवीर्यांतहि शल्याची बरोबरी करणारा कोणी आढ-ळणार नाहीं, तसाच अस्त्रविद्येंत माझी बरोबरी करणारा कोणी धनुर्धर नाहीं. म्हणून शल्य हा सारथि मिळून दुसऱ्या गोष्टींचीहि प्राप्ति होईल, तर अर्जु-नाला मी रणांत खात्रीनें जिंकीन. अशी प्राप्ति झाल्यावर इंद्रासह देवहि माझ्या समोर उभे राहूं शकणार नाहींत. हे परंतपा, एवढी तूं माझी इच्छा परिपूर्ण केल्यावर मी संग्रामांत कायकाय करूं शकेन, हें सर्व तुला कळून येईल. सर्व सुरासुरहि युद्धांत माझ्यावर चालून आल्यास त्यांचेंहि मजपुढें कांहीं चालणार नाहीं, मग मनुष्ययोनींत जन्मास आलेल्या पांडवांची कथा ती काय ? माझ्या इच्छेनुसार सर्व झाल्यास मी पांडवांस जिंकलेंच असें समज !

संजय—राजा धृतराष्ट्रा, त्या समरभूषण कर्णानें असें भाषण केलें, त्यामुळें दुर्योधन संतुष्ट झाला आणि मोठ्या आदरानें तो कर्णाला म्हणाला—

दुर्योधन—तुला जें योग्य वाटत आहे, त्याप्रमाणें मी सर्व करितों. बाण-भाते ठेवलेले, तसेच उत्तम अश्व जोडलेले अनेक रथ तुझ्यामागून येतील. नाराच आणि गार्ध्रपत्र बाण भरलेले शकटहि तुझ्यामागून येतील आणि आम्हीहि सर्व भूपाल तुझ्या साहाय्याकरितां म्हणून तुझ्या पाठीमागून येऊं !

याप्रमाणें त्या प्रतापवान् कर्णाला तुझ्या पुत्रानें सांगून तो स्वतः मद्रराज शल्याकडे गेला आणि त्याशीं बोलूं लागला !

---

## अध्याय ३२ वा.

[ १ कर्णसारथ्याबद्दल दुर्योधनकृत शल्ययाचना. २ सूतपुत्राचें सारथ्य करणें अनुचित समजून कर्ण त्याचा धिक्कार करितो. ३ दुर्योधन मधुर भाषणानें त्याचें सांत्वन करितो. ४ शल्याकडून कर्णसारथ्यस्वीकार. ]

( १ ) संजय—महाराज धृतराष्ट्रा, नंतर तुझा पुत्र दुर्योधन हा मोठ्या विनयानें शल्याकडे गेला आणि आदरपूर्वक त्याला म्हणाला, " हे महाभागा,

तूं सत्यव्रत आहेस आणि शत्रुतापवर्धकहि तसाच आहेस ! हे मद्रेश्वरा, तूं परसैन्याला भयंकर असून मोठा रणशूर आहेस. हे वक्तृत्व विशारदा, मोठमोठ्या राजांतून कर्णाच्या साहाय्याकरितां मीं तुझीच योजना केली आहे, हें तूं ऐकलेंहि असेल. तुझा पराक्रम अप्रतिम आहे आणि तूं शत्रुपक्षाचा क्षय करणारा आहेस. हे मद्रेशा, म्हणून तुला हात जोडून विनयपूर्वक मी याचना करितों कीं पार्थाच्या नाशाकरितां आणि आमच्या कल्याणाकरितां तूं कर्णसारथ्य स्वीकारावें. तूं सारथ्य पत्करल्यास कर्ण माझ्या शत्रूंना जिंकील. शल्या, समरांगणांत अर्जुनाला जसा श्रीकृष्ण, तसा कर्णाला तुझ्यावांचून दुसरा कोणी योग्य सारथि मला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें ब्रह्मदेवानें शंकराचें सारथ्य पत्करिलें त्याप्रमाणें कर्णाचें तूं स्वीकारून त्याचें सर्वप्रकारें रक्षण कर. सर्व आपत्तींमध्यें श्रीकृष्ण जसा अर्जुनाचें रक्षण करीत आहे, त्याचप्रमाणें हे मद्रेश्वरा, तूंहि आज कर्णाचें संरक्षण कर. आपल्या सैन्याचे नऊ भाग करून त्यांवर भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, वीर्यवान् भोज, सौबल शकुनि, द्रौणि आणि मी अशा नऊ वीरांची योजना केली होती. त्यांपैकीं भीष्म आणि द्रोण हे समरांत पतन पावल्यामुळें आज त्यांचे भाग राहिले नाहींत. त्या वीरांनीं आपल्या भागांकडून शत्रूंचा बराच संहार करविला, परंतु अखेरीला त्या माझ्या वृद्ध महाधनुर्धरांचा शत्रूंच्या कपटानेंच वध झाला. हे अनघा, त्या दोघांनीं मोठा पराक्रम करून ते स्वर्गाला गेले आहेत ! दुसऱ्याहि अनेक वीरांनीं आपल्या शक्तीप्रमाणें येथें पराक्रम गाजविला आणि अंतीं शत्रूंच्या हातीं निधन पावून स्वर्गपुरीं प्रयाण केलें ! हे नराधिपा, माझ्या सैन्यापेक्षां पांडवांचें सैन्य फार थोडें असूनहि त्यानें आमच्या सैन्याच्या पराजय करावा, ह्याला करावें तरी काय ? कौंतेय मोठे बलवान् असून सत्यविक्रमी आहेत. त्यांच्यापासून माझ्या शेष सैन्याचा संहार होणार नाहीं, अशी कांहीं योजना केली पाहिजे. कौरवसैन्यांतील सर्व प्रमुख योद्धयांचा संहार पांडवांनीं केला असून एक महाबाहु कर्ण व एक स्वर्गलोकमहारथ तूं असे दोनच माझे हितेच्छु वीर शेष राहिले आहेत. हे शल्या, आज रणांत शत्रूंशीं युद्ध करण्यास कर्ण सज्ज झाला आहे आणि आपण शत्रूंवर जय मिळवूं अशी त्याला मोठी आशाहि वाटत आहे. परंतु त्याला योग्य असा सारथि सर्व पृथ्वीतलावर दिसत नाहीं. म्हणून अर्जुनाला जसा कृष्ण, तसा तूं कर्णाचा सारथि हो ! कृष्ण अर्जुनाचें सर्व प्रकारें रक्षण करीत असल्यामुळें अर्जुनाचे हातून मोठमोठे पराक्रम होऊं लागले आहेत. मोठे पराक्रम करून पूर्वी कधीं अर्जुनानें असा शत्रुसंहार केला नाहीं. सांप्रत

कृष्णाच्या संगतीमुळेंच त्याच्या हातून हा पराक्रम होत आहे. कृष्णाच्या समागमानेंच पार्थ हा कौरवांच्या महाचमूचा प्रत्येक दिवशीं संहार करीत आहे व त्यामुळें ती सेना विदीर्ण होऊन समरांगणावरून पळत सुटली आहे. हे महाद्युते, सांप्रत कर्णाच्या व तुझ्या सैन्याचा कांहीं भाग अवशिष्ट आहे. तरी तुम्ही दोघे एक होऊन शत्रूंवर चला आणि त्यांच्या सैन्याचा एकदम संहार करा. अरुणाच्या मदतीनें सूर्य जसा अंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणें तूं कर्णाच्या मदतीनें महारणांत त्या अर्जुनाचा वध कर! प्रातःकालच्या सूर्याप्रमाणें शोभणाऱ्या तुम्हां शल्य-कर्णांस पाहून पांडवांचे महारथ तत्काल पळून जातील. सूर्य व अरुण यांना पाहतांच अंधकार जसा लोपून जातो, त्याप्रमाणें रणांत उभे असलेल्या तुम्हांला पाहतांच पांचाल व सृंजय यांसह सर्व पांडव पळून जातील! आज रथ्यांमध्यें कर्ण हा जसा श्रेष्ठ गणला जात आहे, तसा सर्व सारथ्यांमध्यें तूंच श्रेष्ठ गणला आहेस. असा तुम्हांसारखा अपूर्व संयोग आजपर्यंत कधीं घडून आला नाहीं व पुढेंहि कधीं घडेल असें दिसत नाहीं. श्रीकृष्ण जसा अर्जुनाचा सर्व अवस्थांमध्यें संभाळ करितो, त्याप्रमाणें तूंहि रणभूमीवर सर्वदा कर्णाचें संरक्षण करावें. कर्णास तूं सारथि मिळाल्यानें त्यावर चालून येण्यास इंद्रादि देवताहि समर्थ होणार नाहींत, मग तेथें पांडवांची ती गोष्ट कशाला पाहिजे? ह्या माझ्या भाषणावर तूं अविश्वास ठेवूं नकोस!"

( २ ) शल्य—हे गांधारे, माझ्या पराक्रमाविषयीं शंकित होऊन तूं माझा अपमान करीत आहेस. असें नसतें, तर 'सारथ्य कर,' असें तूं कधींहि म्हटलें नसतेंस. माझ्यापेक्षां तूं कर्णाला अधिक समजून तूं त्याची प्रशंसा करीत आहेस; परंतु मी त्या कर्णाला माझ्याशीं तुल्य वीर समजत नाहीं. राजा, तुला ज्या वीराला मीं जिंकावें, अशी इच्छा आहे, त्याचें नांव प्रथम मला सांग. मी त्याला रणांत जिंकीन आणि मग आल्या मार्गानें परत जाईन. किंवा हे कुरुनंदना, तुला पसंत असल्यास मी एकटाच शत्रूंशीं युद्ध करीन. मग युद्धांत त्यांचें जाळून भस्म करतांना माझें सामर्थ्य तुझ्या नजरेस चांगलेंच दिसून येईल. हे कौरव्या, योग्य अभिमान धरूनच माझ्यासारखे पुरुष एखाद्या कार्यास प्रवृत्त होत असतात. याविषयीं शंका घेऊं नकोस. युद्धप्रावीण्यासंबंधीं तूं माझा अपमान करूं नये. हे माझे वज्रसमान पुष्ट बाहू पहा! त्याचप्रमाणें हें माझें अद्भुत धनुष्य आणि सर्पासारखे बाण पहा पाहूं! माझा हा वायुवेगानें चालणारा उत्कृष्ट रथ पहा! ह्याला उत्तम प्रकारचे अश्व जोडले असून हा सर्वदा

युद्धाकरितां सज्ज आहे ! ही माझी हेमपट्टविभूषित गदाहि अवलोकन कर ! मी सर्व पृथ्वी विदारून टाकीन आणि पर्वतहि सर्वत्र फेंकून देईन आणि माझ्या तेजानें सर्व समुद्र शुष्क करून टाकीन. हे राजा, अशा रीतीनें शत्रूंचा निग्रह करण्याचे कामीं समर्थ अशा मला नीच कुळांत उत्पन्न झालेल्या अधिरथपुत्र कर्णाचें सारथ्य करण्याला सांगत आहेस, याला म्हणावें तरी काय ? असलें नीच कर्म करण्यास तूं मला भाग पाडूं नये. माझ्यासारख्या थोर कुळांत जन्मलेल्या पुरुषानें पापी मनुष्याची सेवा करण्यास प्रवृत्त व्हावें, हें केव्हांहि अयोग्यच होय.

राजा, केवळ प्रेमानें मी तुला वश झालों आहें आणि मला जर पापी मनुष्याची सेवा करायाला लावशील, तर त्याचें तुला महत्पाप लागेल. ब्रह्मदेवानें आपल्या मुखापासून ब्राह्मणांना उत्पन्न केलें आणि क्षत्रियांस बाहूं-पासून निर्माण केलें; वैश्यांची उत्पत्ति त्याच्या मांड्यांपासून झाली आणि त्याच्या पायांपासून शूद्र जन्मले, असें श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे. ह्या वर्णां-पासून प्रतिलोमज आणि अनुलोमज हे वर्णविशेष झाले. इतर वर्णांचें संरक्षण, संपत्तिवर्धन आणि दानधर्म हे क्षत्रियांचे आचार सांगितले असून, याजन, अध्यापन व विशुद्ध प्रतिग्रह हीं ब्राह्मणांचीं कर्तव्यें म्हणून प्रसिद्ध आहेत. कृषिविद्या, पशुसंरक्षण आणि दानधर्म हे वैश्यांचे धर्म असून तीनहि वर्णांची परिचर्या करणें हें शूद्राचें कर्तव्य होय. यावरून सूताचें कर्तव्य म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय यांची सेवा करणें हें होय. सूतानें क्षत्रियाला कसलीहि आज्ञा करूं नये. मी मूर्धाभिषिक्त राजर्षि असून मोठा कुलवान् आहें, तसाच मी महारथ असून बंदीजनांनीं माझें दास्य व स्तवन करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. मज-सारख्या शत्रुसंहारक राजपुरुषाला सूतपुत्राचें सारथ्य स्वीकारणें ही गोष्ट अत्यंत अनुचित वाटत आहे. अशा करण्यानें माझा अपमान होणार आहे. म्हणून हे गांधारे, ह्यापुढें युद्ध करण्याची माझी इच्छा नाहीं. मी स्वगृहाला जातों, तर मला अनुमोदन दे !

( १ ) संजय—महाराज, समरभूषण शल्य असें भाषण करून तत्काल उठला व राजसमूहांतून जाऊं लागला. तेव्हां तुझ्या पुत्रानें मोठ्या प्रेमानें व बहु-मानानें त्याला थांबविलें व सर्वसाधक सामाचा स्वीकार करून मधुर भाषण कर-ण्यास सुरवात केली. दुर्योधन म्हणाला, “ मद्रराज शल्या, तूं म्हणतोस, तें सर्व

आहे. परंतु असें तुला सांगण्यांत माझा अभिप्राय काय आहे, तें लक्षांत आण. तुझ्यापेक्षां कर्ण अधिक पराक्रमी आहे, असें मी म्हणत नाहीं किंवा तुझ्याविषयीं मला कोणतीहि शंका नाहीं. मद्रेश्वर असत्य बोलण्यास कधींहि सिद्ध होणार नाहीं. तुझ्या कुलांतील थोर पुरुष आजपर्यंत ऋत ( सत्य ) भाषण करीत आले आहेत, आणि म्हणूनच तुला 'आर्तायनि' हें नांव प्राप्त झालें आहे, असें मला वाटतें. हे मद्रेश्वरा, तूं शत्रूंच्या हृदयांत शल्याप्रमाणें पीडा देणारा आहेस, म्हणून तुला शल्य ह्या नांवानें पृथ्वीतलावर सर्व लोक ओळखतात. हे सत्यशीला धर्मज्ञा, तूं जें जें म्हणालास त्याला अनुसरूनच मी तुझी प्रार्थना करीत आहें, तर माझ्या म्हणण्याला मान्य हो. तुझ्यापेक्षां राधेय कर्ण हा वीर्यवान् नाहीं व मीहि नाहीं. या युद्धांत तूं कर्णाचें सारथ्य करावें, अशी माझी इच्छा आहे. कर्ण हा आपल्या गुणांनीं धनंजयापेक्षां श्रेष्ठ आहे, असें मला वाटतें. तूंहि कृष्णापेक्षां श्रेष्ठ आहेस, अशी सर्व लोकांची समजूत आहे. कर्ण हा अस्त्रविद्येंत पार्थापेक्षां अधिक निष्णात आहे, तसा तूं अश्वविद्येंत व बलांत वासुदेवापेक्षां विशेष निपुण आहेस. कृष्ण हा अश्वविद्याकुशल आहे, ही गोष्ट खरी आहे, परंतु तुझें त्या विद्येंतील सामर्थ्य कृष्णाच्या द्विगुणित आहे !

( ४ ) शल्य—गांधारे दुर्योधना, सर्व सैन्यादेखत तूं मला कृष्णापेक्षां श्रेष्ठ म्हटलेंस, त्याअर्थीं मी तुजवर संतुष्ट झालों आहें. मी त्या यशस्वी कर्णाचें सारथ्य करण्यास तयार आहें. माझी एक मात्र प्रतिज्ञा त्यानें पाळली पाहिजे. ती एवढीच कीं मला जें योग्य वाटेल, तें मी बोलून दाखवीन, त्यावेळीं त्यानें तें निमूटपणें सोसून घेतलें पाहिजे.

संजय—भारता, तें भाषण श्रवण करून दुर्योधनानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि कर्णानेंहि तसें वागण्याचें मान्य करून शल्याचे भाषणास आपली अनुमति दिली. ८. ३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १ त्रिपुराख्यान. ]

( १ ) दुर्योधन—मद्रेशा, मी तुला कांहीं सांगतों, तें श्रवण कर. पूर्वी एके वेळीं मी पित्याच्या सन्निध बसलों असतां देवासुरयुद्ध चालू झालें असतां जें कांहीं घडलें, तें मार्कंडेय ऋषीच्या मुखानें ऐकिलें, तें तुला सविस्तर निवेदन

करितों. राजर्षिसत्तमा, तें तूं नीट लक्ष देऊन ऐक. त्याविषयीं कोणत्याहि प्रकारची शंका घेत बसूं नकोस. पूर्वी देव आणि असुर ह्यांमध्यें परस्परांना जिंकण्याच्या इच्छेनें अद्वितीय युद्ध झालें. त्या युद्धांत असुरांचा प्रमुख तारकासुर ह्याचा वध झाल्याशिवाय आपल्या हृदयांतील रोग नाहींसा होणार नाहीं, असें देवांना वाटून त्यांनीं मोठ्या निष्ठुरतेनें असुरांशीं युद्ध केलें आणि त्यांत देवांचा जय झाला, असें आमच्या ऐकण्यांत आहे. दैत्यांचा पराजय झाला असतां तारकासुराचे तीन पुत्र ताराक्ष, कमलाक्ष आणि विद्युन्माली ह्यांनीं उग्र तपश्चर्या केली आणि तपोनियम कडक पाळून आपलीं शरीरें अगदीं कृश करून घेतलीं. त्यावेळीं बाह्येंद्रियजय, चित्ताची एकाग्रता आणि समाधि यांयोगें ब्रह्मदेवाला त्यांनीं संतुष्ट केलें आणि 'आम्हांला कोणत्याहि प्राण्यापासून कधींहि मृत्यु नसावा' असा वर मागितला. तेव्हां लोकप्रभु ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, 'असुरहो, जगांत सर्वामरत्व कोणालाहि नसल्यामुळें तुमचें मागणें अनुचित आहे, म्हणून तुम्ही येथून चला आणि तुमच्या मनाला वाटेल अशा दुसऱ्या कांहीं वराची योजना करून या.' नंतर त्या सर्व असुरांनीं एकविचारानें दुसरा वर मागितला. ते ब्रह्मदेवाला विनयपूर्वक म्हणाले, "हे पितामहा, आम्ही तीन नगरांचा आश्रय करून राहूं. तुझ्या कृपाप्रसादानें सर्व भूमंडलावर आम्हांला फिरतां यावें. अशीं एक हजार वर्षें गेल्यावर आमची परस्परांची गांठ पडून त्रिपुरेंहि एकत्र व्हावीं. नंतर त्या एकरूप झालेल्या तिन्ही पुरांना एका बाणानें जो देववर भिन्न करील, त्याच्या हातून आमचा मृत्यु व्हावा!"

राजा, ब्रह्मदेवानें 'ठीक आहे, तुमच्या इच्छेप्रमाणें सर्व होईल,' असें सांगितलें आणि तो स्वर्गाला निघून गेला. त्या असुरपुत्रांना वरप्राप्ति होऊन मोठा आनंद झाला. त्यांनीं परस्परांशीं विचार केला आणि मयासुराला बोलावून तीं तीन पुरें निर्माण करण्याचे कामीं त्याची योजना केली. तो मयासुर म्हणजे प्रत्यक्ष विश्वकर्मा, तो सर्व देवदानवांना वंदनीय होता. मग त्या बुद्धिमान् मयासुरानें आपल्या तपाच्या बळावर तीन पुरें निर्माण केलीं. एक पुर सुवर्णाचें, एक रजताचें व एक कृष्णलोहाचें अशीं तीं तीन पुरें होतीं. सुवर्णपुर स्वर्गांत, रजतपुर आकाशांत आणि लोहपुर पृथ्वीवर अशी त्या त्रिपुरांची रचना केली होती. प्रत्येक पुराला यथेष्ट संचार करितां यावा, म्हणून त्यांपैकीं प्रत्येक पुर जणुंकाय चक्रावर बसविलें होतें. मद्रराजा शल्या, प्रत्येक पुराची लांबी शंभर योजनें असून रुंदीहि

तितकीच होती. त्यांत गृहें, भवनें, प्राकार आणि तट, तसेंच चारी बाजूंनीं लागलेले मोठमोठे भव्य वाडे, विस्तृत मार्ग, विविध प्रकारचे प्रासाद आणि अनेक वेशी यांनीं मोठी रम्य शोभा आली होती. त्या पुरांचे राजे वेगवेगळे होते. सुवर्णपुराचा राजा तारकाक्ष होता, रजतपुराचा कमलाक्ष आणि लोह-पुराचा विद्युन्माली राजा होता. ते तिघेहि दैत्यराज आपल्या अस्त्रांच्या तेजानें तिन्ही लोकांचें आक्रमण करून 'प्रजापति तो कोण' असे उद्गार काढूं लागले! त्या प्रमुख दानवांना सर्व ठिकाणचे देवांनीं पूर्वीं पराजित केलेले कोट्यवधि मांसाहारी व मदोन्मत्त असुर मिळाले! आणि महाऐश्वर्याची इच्छा धरून ते त्रिपुरांत येऊन राहिले. ह्याप्रमाणें त्या नगरांत चारी बाजूंनीं जमलेल्या राक्षसांची व्यवस्था मयासुर ठेवीत असे. मयासुराच्या आश्रयानें ते दानव निर्भयपणें वागत असत. त्रिपुरवासी कोणीहि असुर जी जी इच्छा धारण करी, ती ती मयासुर आपल्या मायेच्या योगानें पुरवीत असे.

राजा, ताराक्षाला हरि नांवाचा एक बलिष्ठ पुत्र होता. आपल्या तपानें त्यानें पितामह ब्रह्मदेवाला तृप्त केलें आणि 'आपल्या पुरांत एक अशी वापी निर्माण कर कीं ज्यांत टाकलेल्या कोणाहि शस्त्रहत दैत्याला पुनः पूर्ववत् स्वरूप प्राप्त व्हावें' असा वर त्यानें मागितला. त्या ताराक्षपुत्राच्या इच्छेप्रमाणें ब्रह्मदेवाकडून वर मिळ-तांच त्यानें आपल्या पुरींत मृतसंजीवनी वापी तयार केली. तिच्यांत जो कोणी टाकला जात असे, तो आपल्या मृत्युकाळीं जो वेष व जें रूप धारण करीत असे, तो त्या वेषानें किंवा रूपानें प्रकट होऊन युद्ध करीत असे. त्या वापींतून अशा रीतीनें निर्माण झालेले दैत्य सर्व लोकांना नित्य पीडा देऊं लागले. त्यांच्या तपः-सिद्धीनें देव अधिकाधिक भयभीत होऊं लागले. युद्धांत असुरांचा क्षय कधींहि होईनासा झाला. त्यामुळें त्यांची विवेकबुद्धि नष्ट होऊन व लोभमोहांनीं ग्रस्त होऊन निर्लज्जांसारखे ते वागूं लागले. त्यांनीं देवांना गणांसह पळवून लाविलें. ब्रह्मदेवाच्या वरप्राप्तीनें गर्विष्ठ होऊन ते मनाला मानेल, तें करूं लागले. देवांना प्रिय वाटणारीं उद्यानें, ऋषिजनांचीं पुण्यकारक आश्रमस्थानें आणि पृथ्वीवरील रम्य प्रदेश त्यांनीं उध्वस्त करून टाकिले ! नीतिमर्यादा सोडून त्यांनीं दुराच-रण आरंभिलें. तेव्हां लोकांना पीडा होऊं लागल्यामुळें इंद्र देवांसह त्यांच्यावर चालून गेला आणि चारी बाजूंनीं वज्रप्रहार करून त्यानें त्रिपुरांचा भंग करण्याचा प्रयत्न केला. परंतु ब्रह्मदेवाच्या वरानें अभेद्य झालेल्या त्या पुरांचा भंग त्याला करतां येईना. तेव्हां इंद्रानें भीतीनें युद्ध सोडून दिलें व सर्व देवगणांसह तो

ब्रह्मदेवाजवळ गेला. त्या सर्व देवांनीं ब्रह्मदेवाला साष्टांग नमस्कार घातले आणि असुरांनीं केलेले अत्याचार त्यांनीं त्याला सांगितले. नंतर देवांनीं त्याला त्रिपुरांच्या नाशाचा उपाय विचारला.

नंतर ब्रह्मदेव त्या देवांना म्हणाला, " देवहो, तुम्हांला जो दुःख देतो, तो माझा अपराधी आहे. हे असुर दुरात्मे असून सुरद्वेषी आहेत. ते तुम्हांला नित्य पीडा देत असल्यामुळें माझेहि ते वैरी झाले आहेत. सर्व भूतांविषयीं माझ्या मनांत सर्वदा समबुद्धि आहे. तथापि अधार्मिक कृत्यें करणारांचा वध करावा असें माझें व्रत आहे. त्या दुर्गांचा भंग एकाच बाणानें करावयाचा आहे. अन्य उपायांनीं त्यांचा भंग शक्य नाहीं. आणि एका बाणानें त्या पुरांचा भंग करण्यास शंकरावांचून दुसरा कोणीहि देव समर्थ होणार नाहीं. तरी देवहो, तुम्ही त्या स्थाणु, सर्वसमर्थ, जयशाली, क्लेशांची गणना न करितां श्रम करणाऱ्या त्या युद्धधुरंधर शंकराची प्रार्थना करा म्हणजे तो त्या दैत्यांचा निःसंशय वध करील !"

मद्रेशा शल्या, अशाप्रकारें त्याचें भाषण ऐकून तपोनिष्ठेनें शाश्वत ब्रह्मचिंतन करणारे ते शक्रादि देव, ब्रह्मदेव आणि ऋषिजन यांसह शंकराला शरण गेले आणि संकटकालीं अभय देणाऱ्या, सर्वांच्या अंतर्भागीं वास करणाऱ्या व सर्व विश्वाला व्यापून राहणाऱ्या त्या महात्म्या शंकराची त्यांनीं उग्र ( शत्रुविनाशक ) सूक्तांनीं स्तुति केली. ज्यानें तपोविशेषांनीं सर्ववृत्तिनिरोध केला आहे, ज्याचें आत्मानात्मविचारज्ञान पूर्ण आहे, ज्यानें आपलें मन ताब्यांत ठेवलें आहे, अशा त्या तेजोराशि उमापतीला जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां नानारूपांनीं प्रकट होणारा हा एकच परमात्मा आहे अशी त्यांची समजूत झाली आणि आपल्या मनांत चिंतिलेलें भगवत्स्वरूप त्या महात्म्याच्या ठिकाणीं अवलोकन करून ते सर्व विस्मयचकित होऊन गेले. नंतर तो जगत्पति शंकर सर्वभूतमय आहे अशा भावनेनें देव आणि ऋषि यांनीं साष्टांग प्रणिपात केला. तेव्हां शंकरानें आशीर्वादपर भाषणानें त्यांचें आतिथ्य केलें आणि त्यांना उठवून स्मितपूर्वक म्हटलें, " देवहो, बोला, बोला. " शंकराची आज्ञा होतांच त्यांचें मन शांत झालें. नंतर ते भगवान् शंकराची स्तुति करूं लागले.

ते म्हणाले, " हे प्रभो, तुला नमस्कार असो. तूं देवाधिदेव आहेस. तूं धनुष्य व वनमाला धारण करितोस. दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा तूं नाश केला

आहेस. सर्व प्रजापति तुझी स्तुति करीत आहेत. आजपर्यंत अनेकांनीं तुझी स्तुति केली असून सध्यांहि करीत आहेत. तूं स्तुतीला सर्वदा पात्र आहेस. तूं लोहितवर्ण आहेस. तूं सर्वदा उग्र दिसत असतोस. तुझा कंठ नीलवर्ण आहे. तूं शूलधारी आहेस. तूं अस्खलनशील आहेस. तुझे नेत्र मृगनयनांप्रमाणें आहेत. तूं श्रेष्ठ आयुधांनीं युद्ध करीत असतोस. तूं पवित्र आणि शुद्ध आहेस. तूं क्षय करणारा असून तसाच हिंस्रहि आहेस. तुझें निवारण कोणीहि करूं शकणार नाहीं. तूं जगाचा संहारक आहेस. तूं साक्षात् ब्रह्म असून ब्रह्मनिष्ठ आहेस. तूं सर्व सत्ताधारी असून अप्रमेय आहेस. तूं सर्व विश्वाचा नियंता आहेस. चर्म हें तुझें वसन आहे. तूं सर्वदा तपोधन असून व्रताचरणहि करीत असतोस. तूं मृगचर्मधारी असून कार्तिकेय हा तुझा पुत्र आहे. तुझे नयन तीन आहेत. तूं उत्तम आयुधें धारण करणारा आहेस. शरणागतांचीं दुःखें हरण करणारा तुझ्यासारखा कोणीं पाहिला नाहीं. ब्रह्मद्वेषी लोकांचा नाश करणारा तूंच आहेस. वनस्पतींचें रक्षण तूं करितोस. नरांचा पालनकर्ता तूंच आहेस. तूं इंद्रियांचा, तसाच यज्ञांचाहि स्वामी आहेस. तूं अमितविक्रमी आहेस. अशा तुला आमचा नमस्कार असो. मन, वाणी आणि कर्म हीं तुला आम्हीं अर्पण केलीं आहेत. तुला आम्ही शरण आलों आहों. तरी आमच्या मनःकामना परिपूर्ण कर!

मद्रेश्वरा, याप्रमाणें देवांनीं केलेली स्तुति ऐकून शंकर प्रसन्न झाला आणि त्यानें त्या देवब्राह्मणांचें स्वागतपूर्वक अभिनंदन केलें. नंतर तो बोलला, 'देवहो, तुमचा त्रास लवकरच नष्ट होईल. मी तुमच्याकरितां काय करावें, तें बोला.' ८. ३२.

---

## अध्याय ३४ वा.

[ १ त्रिपुरवधार्थ ब्रह्मदेवकृत शंकरप्रार्थना. २ दैत्यसंहाराचे कामीं रथ व धनुष्यबाण सिद्ध करण्याची शंकराची देवांस आज्ञा. ३ रथसिद्धि. ४ त्रिपुरवध. ]

(१) **दुर्योधन**—हे शल्या, अशाप्रकारें त्या महात्म्या शंकराकडून पितर, देव आणि ऋषिसंघ यांना अभय मिळालें असतां ब्रह्मदेवानें शंकराचा उत्तम सत्कार केला आणि लोकहितकर असें भाषण केलें.

**ब्रह्मदेव**—हे देवेशा, तुझ्या कृपाप्रसादानेंच मीं हें प्राजापत्यपद चालवीत आहें. ह्या पदावर असतांनाच मी दानवांना मोठा वर दिला आहे. परंतु हे

भूतभव्येशा, सर्व मर्यादातिक्रम करून वागणाऱ्या ह्या दैत्यांचा संहार करण्याला तुझ्यावांचून दुसरा कोणी समर्थ होईल, असें वाटत नाहीं. म्हणून ह्या शरणागत देवांवर कृपा करून ह्या दानवांचा संहार कर ! हे मानदा, तुझ्या कृपेमुळेंच सर्व जगाला सुखप्राप्ति झाली आहे. हे लोकेशा, ह्या सर्वांचा रक्षणकर्ता तूंच आहेस. म्हणून आम्ही सर्व तुला शरण आलों आहों.

स्थाणु—देवहो, तुमच्या सर्व शत्रूंचा वध करावा, अशी माझी फार इच्छा आहे. परंतु त्या सुरद्वेष्ट्या दानवांचा संहार माझ्या एकट्याच्यानें होईल असें वाटत नाहीं. कारण ते मोठे बलवान् आहेत. म्हणून तुम्ही सर्व एकमत होऊन माझ्या अर्ध्या वीर्याचें साहाय्य घ्या आणि शत्रूंशीं युद्ध करून त्यांचा संहार करा. अहो, तुम्हां सर्वांचें ऐक्य झाल्यावर तुमचें सामर्थ्य विलक्षण वाढेल. कारण संहति ही मोठी बलिष्ठ शक्ति आहे.

देव—हे भगवन् शंकरा, आमच्या अंगीं जितकें बल व तेज आहे, त्याच्या दुप्पट तीं त्या दैत्यांच्या अंगीं आहेत, असें आम्हांला वाटतें. कारण समरांत त्यांच्या अंगचीं बलतेजें आमच्या दृष्टोत्पत्तीस अनेक वेळां आलीं आहेत.

भगवन्—तुमचे अपराधी ते दैत्यदानव सर्वप्रकारें वध्यच आहेत, म्हणून माझें अर्धें तेज व बल यांच्या योगानें तुम्ही त्यांचा संहार करा !

देव—महेश्वरा, तुझें अर्ध तेज व बल धारण करण्याची शक्ति आम्हांमध्यें नाहीं. म्हणून तूंच आमच्या सर्वांच्या बलार्धानें त्या शत्रूंचा नाश करून टाक!

श्रीभगवान्—देवांनो, माझें बल धारण करण्याची शक्ति तुम्हांमध्यें नसेल, तर तुमच्या अर्ध तेजःसामर्थ्यानें मींच आपलें बल वृद्धिंगत करून शत्रूंचा वध करीन !

मद्रेशा शल्या, शंकराचें तें भाषण ऐकून देवादिकांनीं 'ठीक आहे' असें म्हटलें, आणि शंकरानें त्या प्रत्येक देवाच्या अर्धतेजानें आपलें बल वृद्धिंगत करून घेतलें. नंतर तो देव—शंकर—सर्वांपेक्षां बलवत्तर झाला. तेव्हांपासून त्याला महादेव हें नांव प्राप्त झालें.

( २ ) महादेव—देवहो, मी धनुष्यबाण घेऊन रथांत बसेन आणि युद्ध करून तुमच्या शत्रूंचा वध करीन. म्हणून तुम्ही मजकरितां धनुष्यबाण तयार करून ठेवा, म्हणजे मी यांचा आजच वध करून त्यांना पृथ्वीतलावर पाडतों.

देव—देवेश्वरा, ह्या त्रैलोक्यांत ठिकठिकाणीं ज्या ज्या मूर्ति आहेत, त्या सर्वांचें तेज एकत्रित करून त्याचा एक अत्यंत बलवान् रथ आम्ही मयासुराकडून तयार करवितों.

नंतर त्या देवश्रेष्ठांनीं एक रथ[1] तयार केला. मन हें त्या रथाची आधारभू व सरस्वती ही प्रचाराचा मार्ग झाली. नानाविध वर्ण हे त्या रथावरील वायुप्रेरित पताका झाल्या व आकाशांत चकाकणारी विद्युत् व इंद्रधनु ह्यांच्या योगानें तो रथ अत्यंत शोभायमान दिसूं लागला. वषट्कार हा त्या रथावरील प्रतोद झाला व गायत्री ही शीर्षबंधन झाली. पूर्वी शंकराचे यज्ञांत संवत्सर म्हणून जो काल निश्चित झाला होता, तो धनुष्य झाला. विष्णु, सोम व अग्नि हे त्या रथावरील शंकराचे बाण झाले आणि सावित्री ही प्रत्यंचा झाली. कालचक्र हें दुर्भेद्य कवच झालें. ऋत्विजांच्या मध्यभागीं प्रदीप्त असलेले पावक जणुंकाय आपल्या तेजानें तेथें अत्यंत शोभायमान दिसूं लागले. अशाप्रकारें शत्रूंच्या नाशाकरितां सिद्ध झालेला तो रथ पाहून देव अगदीं आश्चर्यचकित होऊन गेले. त्रैलोक्यांतील सर्व तेजें एकत्र झालेलीं पाहून देवांना त्याचें मोठें कौतुक वाटलें. नंतर त्यांनीं तो रथ सज्ज असल्याचें शंकराला कळविलें. राजन् शल्या, अशाप्रकारें तो रथ देवांनीं सिद्ध केल्यावर शंकरानें आपलीं मोठमोठीं आयुधें त्यांत ठेवलीं. आकाश हें ध्वजयष्टि करून त्याच्या अग्रभागीं नंदिकेश्वराला ठेविलें. ब्रह्मदंड, कालदंड, रुद्रदंड आणि ज्वर हे त्या रथावर चढून चारी बाजूंचें रक्षण करूं लागले. त्या रथाचीं चक्रें अथर्वण व अंगिरस यांनीं रक्षण केलीं. ऋग्वेद, सामवेद आणि पुराणें हीं रथाचे पुरस्सर ( पुढें चालणारे ) होते व इतिहास व यजुर्वेद हे पृष्ठबाजूचे संरक्षक होते. दिव्य वाणी व दिव्य विद्या ह्या परिपार्श्वक (बाजूला उभ्या राहणाऱ्या) झाल्या. वषट्कार, ओंकार आणि स्तोत्रें वगैरें हीं रथाच्या अग्रभागीं राहिल्यामुळें रथाला अपूर्व शोभा आली होती. कालरुद्रानें षड्ऋतूंच्या योगें अद्भुत भासणारें संवत्सररूप धनुष्य घेऊन स्वतःची छाया हीच त्या धनुष्याला अक्षय ज्या लावली. अशाप्रकारें काल हा भगवान् रुद्र, संवत्सर हें त्याचें धनुष्य आणि कालरात्रि ही त्या धनुष्याची अक्षय ज्या झाली. विष्णु, अग्नि आणि सोम हे त्या धनुष्याचे बाण झाले. हें सर्व जगत् विष्णु,

---

१ हें शंकराच्या रथाचें वर्णन खंड ७, अध्याय २०२ मध्यें आलें असल्यामुळें येथें त्याचा बराच संक्षेप केला आहे.

सोम आणि अग्नि यांचेंच एक रूप आहे. विष्णु हा त्या अमिततेजस्वी शंकराचा आत्मा होय. ह्यामुळें रुद्राच्या धनुष्याचा टणत्कार होतांच त्या असुरांस तो किमपिहि सहन झाला नाहीं. शिवाय त्या विष्णु, सोम व अग्नि एतद्रूप बाणावर भृगु व अंगिरस सूक्तनिर्मित शंकराचा असह्य क्रोध दृग्गोचर होत होता. त्या नीललोहित, धूम्रवर्ण, अजिनचर्मधारी व अभयंकर शंकराच्या ठिकाणीं सहस्रावधि आदित्यांची कांति चकाकत असून जणुंकाय तो तेजोज्वालांनीं व्याप्त झाला आहे असें भासत होतें. तो मोठमोठ्या प्रबळ वीरांचा जेता असून ब्रह्मद्वेष्ट्यांचा विध्वंसक व धर्मशीलांचा त्राता आणि अधर्मी लोकांचा संहारक होता. त्याच्या सभोंवतीं अत्यंत पराक्रमी, भीमबल, भीमरूप, मनोवेगानें जाणारे, असे गण होते. हे गण म्हणजे त्याच्या मनाच्या वृत्तीच होत. हें सर्व स्थावरजंगमात्मक विश्व त्याचाच आश्रय करून राहिलें आहे आणि त्यामुळें अपूर्व शोभा आली होती. त्या रथाला पाहून शंकरानें अंगांत कवच धारण केलें व हातांत धनुष्यबाण घेतले. नंतर सोम-विष्णवग्निसंभव दिव्य बाण चढविण्यास तो सिद्ध होऊन राहिला आहे, हें पाहतांच देवांनीं वायूकडून त्यावर सुगंधवृष्टि करविली. महादेव त्या दिव्य रथावर आरूढ होतांच सर्व देव भयभीत झाले, आणि पृथ्वी देखील जणुंकाय कांपत आहे असें वाटूं लागलें. त्या दिव्यरथारूढ होणाऱ्या शंकराची मोठमोठे ऋषि, गंधर्व, देवसंघ आणि अप्सरागण, तसेच अनेक ब्रह्मर्षि आणि बंदिजन यांनीं स्तुति करण्यास आरंभ केला आणि नृत्यकुशल अप्सरा नाचूं लागल्या.

( ३ ) इतकी सिद्धता झाल्यावर खड्ग, बाण आणि धनुष्य धारण करणाऱ्या शंकरानें स्मितपूर्वक देवांना विचारलें ' देवहो, आतां माझें सारथ्य कोण करणार ?' त्यावर 'आम्हांपैकीं तुला जो कोणी पसंत वाटेल, तो तुझें सारथ्य करण्यास तयार आहे,' असें देव म्हणाले. शंकर पुनः बोलला कीं ' माझ्यापेक्षां बलश्रेष्ठ असा कोणी तुम्हांला योग्य वाटेल तो तुम्ही सत्वर निवडा. विनाकारण उशीर होत आहे '.

हें ऐकून ते देव ब्रह्मदेवाजवळ गेले आणि गोड भाषणानें त्याला प्रसन्न करून म्हणाले, " ब्रह्मदेवा, दैत्य-दानवांच्या प्रतिकारार्थ तूं जें जें कांहीं सांगितलेंस तें तें सर्व आम्हीं केलें आहे. शंकराला आम्हीं सुप्रसन्न करून घेतलें आणि त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व आयुधांनीं संपन्न असा रथहि सिद्ध करून ठेवला आहे. रथ

चालविण्यास योग्य असा सारथि मात्र आम्हांला मिळत नाहीं. म्हणून हे देव-सत्तमा, कोणी तरी सारथि आम्हांला मिळवून दे. प्रभो, तूं आम्हांला पूर्वी सांगितलेंच आहेस कीं, 'तुमचें जें जें हित असेल, तें तें मी करीन.' तर सांप्रत तूं आपलें बोलणें सत्य करून दाखीव !' तो उत्तम रथ सर्व देवांनीं आपापल्या अंशांनीं तयार केला आहे. शत्रूंना अनिवार्य त्या रथावर प्रतिस्पर्ध्यांची दाणादाण उडवून देणारा पिनाकपाणी शंकर हा योद्धा आहे. हे पितामहा, अशाप्रकारें दिव्य रथ, उत्कृष्ट अश्व, अप्रतिम योद्धा, सशस्त्र कवचें आणि तें अद्भुत धनुष्य ह्यांचा विचार केला असतां तुझ्यावांचून अन्य कोणी योग्य सारथि आम्हांला दिसून येत नाहीं. सर्व गुणांनीं युक्त तूंच आहेस. सर्व देवांपेक्षां तुझें सामर्थ्य अधिक आहे, म्हणून आतां रथारूढ हो आणि त्या हयोत्तमांचें नियमन कर ! असें केल्यानें देव विजयी होतील व देवद्वेष्ट्या असुरांचा नाश होईल !" असें बोलून देवांनीं पितामहाला साष्टांग नमस्कार घातला, त्याला प्रसन्न केलें आणि त्याकडून शंकराचें सारथ्य करविलें, असें आम्ही ऐकितों.

पितामह—देवहो, तुम्ही जें कांहीं बोललां, त्यांत असत्य कांहींच नाहीं. हा शंकर युद्ध करीत असेल, तोंपर्यंत मी त्याचें सारथ्य करीन !

राजा शल्या, शंकराचें सारथ्य करण्याविषयीं देवांनीं विनविलेला तो जगदुत्पत्तिकर्ता पितामह आरूढ होण्याकरितां रथाजवळ गेला असतां वायुवेगानें चालणाऱ्या त्या रथाश्वांनीं आपल्या माना भूमीपर्यंत वांकवून त्याचें स्वागत केलें. नंतर आपल्या तेजानें प्रदीप्त झालेला तो ब्रह्मदेव रथावर आरूढ झाला आणि अश्वरज्जु व प्रतोद हातांत घेऊन त्यानें त्या अनिलसमान वेगवान् अश्वांस उठवून शंकराला म्हटलें, 'तूं आतां रथारूढ हो !' तेव्हां तो स्थाणु विष्णुसोमाग्निसंभव बाण हातांत घेऊन रथावर चढला आणि धनुष्याच्या टणत्कारानें शत्रूंचीं हृदयें विदीर्ण करूं लागला. शंकर रथारूढ होतांच मोठमोठे ऋषि, गंधर्व, देवसंघ आणि अप्सरांचे गण ह्यांनीं त्याची स्तुति करण्यास आरंभ केला. तेव्हां आपल्या तेजानें तिन्ही लोकांना प्रदीप्त करणारा व खड्ग, बाण आणि धनुष्य धारण करणारा तो शंकर रथांत अधिष्ठित होऊन इंद्रादि देवांस म्हणाला, 'ह्या शंकराच्या हातून असुरांचा वध होणार नाहीं, अशी चिंता करूं नका. ह्या माझ्या बाणानें ते असुर मेलेच म्हणून समजा !' तेव्हां देवांनीं 'खरोखर ते असुर मेलेच' असें मानलें आणि मग भगवंताचें बोलणें कधींहि अन्यथा होणार

नाहीं, अशा विश्वासानें त्यांना मोठा संतोष झाला. नंतर तो शंकर सर्व देवगणां-सह निघाला असतां त्याचे जवळील पार्षद आनंदानें त्याची स्तुति करूं लागले, कित्येक नाचूं लागले, तर कित्येक परस्परांवर धांवून जाऊन ओरडूं लागले! भाग्यवान्, गुणवान् व तपस्वान् देव व इतर पुरुष महादेवाच्या जयाची इच्छा करूं लागले. अशा रीतीनें सर्वांना अभय देणारा तो देवेश शंकर युद्धार्थ बाहेर निघालेला पाहून सर्व जगत् व देवहि संतुष्ट झाले. त्यासमयीं तेथें राहि-लेल्या ऋषिजनांनीं त्याची अनेक प्रकारें स्तुति करून त्याला प्रोत्साहित केलें, आणि हजारों गंधर्वांनीं वाद्यघोष करून त्याचा मोठा जयजयकार केला!

( ४ ) भगवान् ब्रह्मदेव महादेवाचें सारथ्य स्वीकारून रथारूढ झाला आणि तो असुरांवर रथ नेत असतां रुद्र 'धन्य, धन्य' म्हणून हंसत बोलला कीं, 'प्रजापते, दैत्य असतील, तिकडे रथ घेऊन चल. वाटेनें रथ मोठ्या दक्ष-तेनें चालव आणि आज रणांत मी शत्रुसंहार करीत असतां माझें बाहुवीर्य पहा!' राजा शल्या, नंतर मनोवेगानें व वायुवेगानें धांवणाऱ्या त्या अश्वांना दैत्यदानवांनीं रक्षित त्रिपुरांकडे चालविलें असतां ते अश्व जणुंकाय आकाशाचें प्राशनच करीत आहेत कीं काय असें वाटलें. अशा वेगानें ते देवांच्या जयाकरितां त्रिपुरावर धांवून आले. त्रिपुराभिमुख तो रथ येतांच नंदिकेश्वरानें एवढ्या मोठ्यानें गर्जना केली कीं, तिच्या योगानें दशदिशा दुमदुमून गेल्या. त्या नादानें सुरशत्रु तारकाचे वंशज मरून जमिनीवर पडले! दुसरे कित्येक दानव युद्धाभिमुख होऊन तेथें आले. तेव्हां शूलधारी स्थाणु हा इतका संतप्त झाला कीं, त्याला पाहून सर्व भूतें आणि त्रैलोक्यहि भिऊन जाऊन कांपूं लागलें. शंकरानें धनुष्याला बाण जोडतांच भयंकर चिन्हें होऊं लागलीं! बाणस्थित अग्नि, सोम आणि विष्णु, तसेच शंकर आणि ब्रह्मदेव या पांचांनीं त्या दैत्यांना पाहतांच ते अत्यंत क्षुब्ध झाले आणि शंकराच्या धनुष्याच्या आस्फालनानें तो रथ एकाएकीं आकाशांतून खालीं आला! तेव्हां शंकराच्या बाणाग्रीं असलेल्या नारायणानें तेथून निघून वृषरूप धारण केलें आणि तो रथ वर उचलला! इतक्यांत रथ खालीं येत असतां व शत्रु आरोळ्या मारीत असतां शंकरानेंहि मोठ्यानें गर्जना केली. त्यानें आपला एक पाय अश्वांच्या पाठीवर व एक पाय नंदिकेश्वराच्या मस्तकावर ठेवून त्या दानवपुराचें निरीक्षण केलें. निरीक्षण करीत असतां शंकरानें अश्वांचे स्तन कापून काढून नंदीचे खूर द्विधा केले. त्या वेळेपासून अश्वांचे स्तन नाहींसे होऊन वृषभांचे खुरांना गेळीं

झालीं ! नंतर शंकरानें आपले धनुष्यावर दोरी चढवून तें सज्ज केलें आणि बाण लावून त्याला पाशुपतास्त्राची जोड दिली आणि त्रिपुराचें चिंतन करीत तो राहिला.

अशा रीतीनें शंकर त्रिपुराचें चिंतन करीत बसला असतां तीं पुरें कालवशात् एकत्र झालीं. तें पाहून देवांना अत्यंत हर्ष झाला आणि देव, सिद्ध आणि महर्षि यांनीं शंकराच्या जयजयकारांत त्याची मोठी स्तुति केली ! हें चाललें आहे इतक्यांत असुरांचें हनन करणाऱ्या, त्या उग्रशरीरी व अनिर्वचनीय महादेवाच्या अग्रभागीं तें त्रिपुर दिसूं लागलें, तों त्या लोकेश्वरानें आपल्या दिव्य धनुष्याची दोरी ओढून त्रैलोक्यबलसार असा तो बाण त्रिपुरांवर टाकला ! त्याबरोबर मोठा आर्तस्वर होऊन तीं एकत्र झालेलीं तीनहि पुरें एकदम कोसळून जमिनीवर पडलीं. तीं पुरें व त्यांतील सर्व दैत्यासुरांना त्या शंकरानें जाळून पश्चिमसमुद्रांत फेंकून दिलें. अशारीतीनें त्रैलोक्याच्या हिताकरितां त्या महेश्वरानें—शंकरानें—त्रिपुराला दग्ध केलें आणि त्याबरोबर सर्व दानवांचाहि संहार केला. त्यावेळीं शंकराच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला क्रोधाग्नि इतका भयंकर होता कीं त्यानें तीनहि लोक भस्म करून टाकले असते, परंतु शंकरानें आपणच आपल्या कोपाचें शमन केलें. याप्रमाणें त्रिपुराचा व त्याबरोबर त्यांतील दैत्यदानवांचा नाश झाला असतां देव, लोक आणि ऋषि हे स्वस्थ झाले आणि त्यांनीं त्या अमितविक्रमी शंकराची उत्तम प्रकारें स्तुति केली. तेव्हां शंकरानें त्यांना आपापल्या ठिकाणीं जाण्यास अनुज्ञा दिली आणि त्याप्रमाणें ते सर्व देवादिक स्वस्थानीं निघून गेले.

राजा शल्या, अशाप्रकारें भगवान् महेश्वर यानें सर्व लोकांचें कल्याण केलें. तसेंच त्या लोकस्रष्ट्या पितामहानें शंकराचें सारथ्य केलें, तसें तूं त्या महात्म्या राधेयाचें सारथ्य स्वीकार ! तूं कृष्णापेक्षां, कर्णापेक्षां आणि विशेषेंकरून अर्जुनापेक्षांहि पराक्रमांत श्रेष्ठ आहेस, यांत शंका नाहीं. युद्धांत कर्ण हा रुद्राप्रमाणें आहे, तसा तूंहि राजनीतीमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें आहेस. म्हणून त्या दोघांनीं जसा असुरांचा संहार केला तसा कर्णासह तूं माझ्या शत्रूंचा नाश कर ! जेणेंकरून हा कर्ण आज युद्धांत कृष्णाचा निःपात करून त्या श्वेताश्व अर्जुनाचा वध करील, असें लवकर कर. हे मद्रेशा, कर्णाचें सारथ्य स्वीकारल्यास आज तुझ्या ठिकाणीं आमच्या राज्याशा, जीविताशा व विजयाशा पूर्ण होतील ! आमच्या, कर्णाच्या, राज्याच्या, व विजयाच्या सर्व आशा आज तुजवर अवलंबून

आहेत. म्हणून शल्या, कर्णाचें सारथ्य स्वीकारण्यास तूं सिद्ध हो ! मी तुला आणखी दुसरा एक इतिहास सांगतों. हा माझ्या पित्याला एका धर्मवेत्त्या ब्राह्मणानें सांगितला आहे. हा कार्यकारणरूप इतिहास तूं श्रवण कर आणि मग तुला जें इष्ट वाटेल, तें तूं कर. उगाच शंका घेत बसूं नकोस !

मद्रेशा, जमदग्नि नांवाचा एक विख्यात व यशस्वान् पुरुष भार्गवकुळांत होऊन गेला. त्याचा पुत्र पराक्रमादि गुणांनीं प्रख्यात जो परशुराम तो होय. अस्त्रप्राप्त्यर्थ त्यानें शंकराला आपल्या अंगच्या भक्ति, प्रशम इत्यादि गुणांनीं प्रसन्न करून घेतलें. परशुरामाचें हृद्गत शंकराला कळून आलें व तो परशुरामासमोर प्रकट होऊन त्याला बोलला—

महेश्वर—रामा, मी तुजवर संतुष्ट झालों आहें. तुझें कल्याण होवो ! तुझी इच्छा काय आहे, हें मी जाणतों. तूं आपली शुद्धि प्रथमतः करून घे. म्हणजे तुझ्या इच्छा परिपूर्ण होतील. जेव्हां तूं पवित्र होशील, तेव्हां तुला मी तीं अस्त्रें देईन. हे भार्गवा, अपात्र व असमर्थ पुरुषाला अस्त्रांची प्राप्ति झाल्यास तीं त्याला जाळून टाकतात.

हें देवाधिदेव शंकराचें भाषण ऐकून परशुरामानें त्यास साष्टांग प्रणिपात केला आणि विनयपूर्वक म्हटलें ' भगवन्, जेव्हां मी अस्त्रधारणास पात्र आहें, अशी आपली खात्री होईल, तेव्हांच मजवर कृपा करून आपण अस्त्रें द्यावीं ! '

दुर्योधन—नंतर त्या परशुरामानें तप, दम, नियम, पूजाअर्चा आणि होमहवन इत्यादिकांच्या योगानें बहुत वर्षें शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न केलें. तेव्हां शंकरानें पार्वतीसन्निध परशुरामाच्या अनेक गुणांचें वर्णन केलें आणि म्हटलें, ' हा दृढव्रत राम अनेक वर्षें माझी भक्ति करीत आहे.' असें म्हणून शंकरानें संतोषपूर्वक त्याच्या अनेक गुणांचें वर्णन केलें. तसेंच देवता आणि पितर यांच्यापुढेंहि त्याचे गुण अनेकवार वाखाणले. इकडे दैत्य अत्यंत बलवान् झाले. त्यांनीं दर्प-मोहादिकांनीं उन्मत्त होऊन देवांना त्रासवून सोडलें. तेव्हां देव एकत्र होऊन त्यांवर चालून गेले आणि त्यांनीं शत्रुवधाचे अनेक यत्न केले, परंतु ते अयशस्वी झाले. मग देव उमापति शंकराजवळ गेले आणि त्यांनीं आपल्या भक्तीनें त्याला प्रसन्न करून घेतलें आणि त्याची प्रार्थना केली कीं, ' देवा, या आमच्या शत्रुगणांचा वध कर. ' शंकरानें शत्रूंचा संहार करण्याचें वचन देवांना दिलें आणि भार्गवरामाला बोलावून त्याला म्हटलें, " परशुरामा,

देवांचे शत्रु दैत्य हे एकत्र होऊन त्यांना पीडा देत आहेत, तरी तूं जाऊन त्यांचा वध कर. असें केल्यानें लोककल्याण होऊन मलाहि मोठा आनंद वाटेल." शंकराचें भाषण ऐकून परशुराम त्या वरदायी देवाला म्हणाला—

परशुराम—देवा, मी अकृतास्त्र असल्यामुळें शत्रूचा वध करण्याइतकें सामर्थ्य माझ्या अंगांत कोठें आहे? दानव हे मोठे अस्त्रकुशल असून युद्धदुर्मदहि तसेच आहेत!

महेश्वर—परशुरामा, तूं माझ्या आज्ञेनें राक्षसांवर चालून जा! तुझ्या हातून सर्व शत्रूंचा वध होईल. हा शत्रूंवर जय मिळविल्यावर तुला सर्व गुण आपोआप प्राप्त होतील.

शंकराचें भाषण ऐकून परशुरामानें ती आज्ञा शिरसा मान्य केली आणि स्वस्त्ययनादि विधि करून तो दानवांवर चालून गेला. तो त्या महागर्विष्ठ व बलवान् दानवांला म्हणाला, "युद्धमदोत्कट दानवहो, तुम्हां महासुरांना जिंकण्याकरितां देवाधिदेव शंकरानें मला पाठविलें आहे, तरी युद्धाला सिद्ध व्हा. परशुरामाचें तें भाषण ऐकून दानव त्याच्याशीं युद्ध करण्यास प्रवृत्त झाले. त्या युद्धांत भार्गवनंदन परशुरामानें दैत्यांवर वज्रसदृश प्रहार करून त्यांचा संहार केला! दानवांच्या शस्त्रप्रहारांनींहि परशुरामाच्या शरीरावर व्रण पडले होते, त्यांवरून शंकरानें हात फिरविला असतां ते सर्व नाहींसे झाले. परशुरामाच्या पराक्रमानें शंकर संतुष्ट झाला आणि त्याला म्हणाला, "हे भृगुनंदना, शस्त्रप्रहारांनीं तुझ्या शरीरावर जे हे व्रण दिसत आहेत, त्यांवरून तुझ्या अंगांतील अमानुष सामर्थ्य उघड दिसून येत आहे! म्हणून तुला जीं इष्ट अस्त्रें असतील, तीं सर्व मजपासून ग्रहण कर!"

दुर्योधन—नंतर परशुरामाला जे जे वर पाहिजे होते, ते आणि समस्त अस्त्रें शंकरापासून प्राप्त झालीं. त्यांचा स्वीकार करून शंकराला रामानें साष्टांग नमस्कार घातला आणि त्याची अनुज्ञा मिळवून तो महातपस्वी तेथून गेला. ही पूर्वीं घडलेली गोष्ट त्या ऋषीनें मला सांगितली. परशुरामानेंहि शंकरापासून प्राप्त झालेली धनुर्विद्या त्या महात्म्या कर्णाला परम प्रेमानें दिली. शल्या, कर्णाच्या अंगीं जर कांहीं वैगुण्य असतें, तर परशुरामानें तीं अस्त्रें त्याला कधींहि दिलीं नसतीं. तसेंच हा कर्ण सूतकुलांत जन्म पावला आहे, हेंहि मला

विश्वसनीय वाटत नाहीं. हा देवांशानें क्षत्रियकुलांत जन्मला असून कुलज्ञान याच्या पराक्रमावरून व्हावें, म्हणून याला टाकलें असावें, असें मला वाटतें. हा कर्ण सारथिकुलांत खरोखर जन्मला नाहीं. असा सकुंडल, सकवची, दीर्घबाहु, महारथी व सूर्यसदृश पराक्रमी पुत्र सूतकुलांत जन्माला येणें तरी शक्य आहे काय ? हरिणी व्याघ्राला कधीं तरी प्रसवते काय ? गजशुंडेप्रमाणें ह्याचे पुष्ट बाहु आणि विशाल व शत्रूंशीं युद्धसमर्थ वक्षःस्थलावरून हा कर्ण प्राकृत मनुष्य नव्हे ! हे राजेंद्रा, हा महात्मा कर्ण परशुरामशिष्य असून मोठा पराक्रमी आहे. ८. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ कर्णाचे सारथ्याचा शल्यकृत स्वीकार. ]

( १ ) दुर्योधन—राजा शल्या, याप्रमाणें सर्वलोकपितामह भगवान् ब्रह्मदेवानें शंकराचें सारथ्य पत्करिलें. सारथि हा सर्वदा रथ्यापेक्षां पराक्रमी असावा. म्हणून हे पुरुषव्याघ्रा, तूं कर्णसारथि होऊन रणांत कर्णाश्वांचें नियमन कर ! ज्याप्रमाणें पूर्वी देवांनीं शंकराहून श्रेष्ठ पितामहाकडून त्याचें सारथ्य करविलें, त्याचप्रमाणें कर्णाहून बलिष्ठ अशा तुझी कर्णसारथ्याचे ठिकाणीं आम्हीं योजना केली आहे, तरी तूं कर्णसारथ्याचा शीघ्र स्वीकार कर !

शल्य—नरश्रेष्ठा दुर्योधन राजा, मींहि नरसिंह कृष्णार्जुनांचें तें अमानुष व दिव्य आख्यान ऐकिलें आहे. पितामह ब्रह्मदेवानें शंकराचें सारथ्य पत्करिलें, आणि शंकरानें एका बाणानें त्रिपुरांचा नाश करून सर्व असुरांचा संहार केला, ही कथा मला, तशीच कृष्णालाहि विदित आहे. मागें घडलेल्या व पुढें होणाऱ्या गोष्टींचें ज्ञान श्रीकृष्णाला बरोबर आहे. ‘ ब्रह्मदेवानें शंकराचें सारथ्य केलें, तसें मींहि अर्जुनाचें करावें, ’ या विचारानेंच त्यानें अर्जुनसारथ्य स्वीकारलें. यदाकदाचित् कर्णानें युद्धांत अर्जुनाला मारलें, तर क्रोधायमान होऊन हा शंख-चक्र-गदाधारी वार्ष्णेय स्वतः रणांत उभा राहील आणि तुझ्या सैन्याचें भस्म करून टाकील. मग तुझ्या सैन्यापैकीं कोणीहि राजा त्यापुढें उभा राहूं शकणार नाहीं !

संजय—याप्रमाणें मद्रराज शल्याचें भाषण ऐकूनहि तुझ्या पुत्रास त्याचें कांहींच वाटलें नाहीं. तो म्हणाला, “ महाबाहो शल्या, तूं कर्णाची योग्यता कमी समजूं

नकोस ! कर्ण हा सर्व शस्त्रधान्यांमध्यें श्रेष्ठ असून सर्वशास्त्रपारंगत आहे. ज्याच्या धनुष्याचा भयंकर टणत्कार ऐकून पांडवांचें सर्व सैन्य भयभीत होऊन दाही दिशांना पळून जात असे ! घटोत्कच रात्रीच्या वेळीं शतावधि माया उत्पन्न करून त्या मायेच्या मार्गे लपून राहिला असतां कर्णानें त्याचा वध केला. अर्जुन हा कर्णाला भिऊन इतके दिवस रणांगणांत कौरवसैन्यासमोर उभें राहण्याला धजत नसे ! भीमसेनालाहि आपल्या धनुष्याच्या अग्रानें टोंचून ज्यानें 'मूढा, खादाडा,' म्हणून चेष्टेनें म्हटलें ! माद्रीसुत नकुल-सहदेव यांनाहि ज्यानें रणांत जिंकिलें, परंतु कांहीं विशिष्ट कारणामुळें वध केला नाहीं ! वृष्णिकुलप्रवीर सात्वतवीर सात्यकि यालाहि जिंकून ज्यानें विरथ केलें, त्याचप्रमाणें धृष्टद्युम्नादि मोठमोठे सृंजय वीर यांची रणांगणांत हंसत हंसतच कितीतरी वेळां दाणादाण उडवून दिली आहे ! अशा महारथ वीराला पांडव रणांत जिंकतील, हें होईल तरी कसें ? कर्ण रणांत क्रुद्ध झाला असतां वज्रधारी इंद्राचा सुद्धां वध करण्याचें त्याचें सामर्थ्य आहे. तूं तर सर्वास्त्रवेत्ता असून सर्व विद्यांमध्यें प्रवीण आहेस. बाहुवीर्यांत तुझ्या बरोबरीचा वीर सर्व पृथ्वींतहि कोणी मिळणार नाहीं. तूं आपल्या दुःसह पराक्रमानें शत्रूंच्या हृदयांत शल्याप्रमाणें पीडा करितोस, म्हणून तुला शल्य म्हणत असतात. तुझें बाहुबल सहन करील, असा एकहि सात्वत वीर नाहीं. हे अरिसूदना, तुझ्यापेक्षां कृष्ण अधिक बलवान् आहे, असें म्हणावें तरी कसें ? अर्जुनाचा रणांगणावर वध झाला असतां कृष्ण पांडुसैन्याचा पुढाकार घेऊन कौरवसैन्यावर चालून येईल; त्याचप्रमाणें कर्णाचा समरांत वध झाल्यास तूंहि पांडवसैन्यावर चालून जाशील ! कृष्ण जर पांडवसैन्याचा पुढाकार घेऊन कौरवसैन्याचें निवारण करील, तर तुझ्या हातून पांडवांच्या सैन्याचा प्रतिकार होणार नाहीं काय ? राजा शल्या, मी तुझ्याकरितां माझ्या बंधूंप्रमाणें, इतर वीरांप्रमाणें आणि भूपांप्रमाणें रणभूमीवर देह ठेवण्यास तयार आहें !"

शल्य—मानदा गांधारे, ह्या सैन्याच्या समक्ष तूं मला कृष्णापेक्षां श्रेष्ठ म्हटलेंस, त्यावरून मी तुजवर प्रसन्न झालों आहें आणि रणांगणावर कर्ण सन्निध असतां मला जें योग्य वाटेल, तें मी बोललों असतां त्यानें सहन करावें, एवढें त्याला मान्य असल्यास त्याचें सारथ्य करण्यास हा मी सिद्ध आहें.

संजय—धृतराष्ट्रा, शल्याचें भाषण श्रवण करून दुर्योधनानें कर्णासह 'ठीक आहे' असें उत्तर दिलें. आणि शल्यानें कर्णसारथ्य आपण स्वीकारलें, असें

आश्वासन दिलें. तेव्हां दुर्योधनाला मोठा आनंद होऊन त्यानें कर्णाला आलिंगन दिलें आणि बंदीजनांनीं स्तुति करण्यास आरंभ केला. तेव्हां दुर्योधन कर्णाला पुनः म्हणाला, ' कर्णा, महेंद्रानें ज्याप्रमाणें दानवांचा वध केला, त्याचप्रमाणें तूं आज पांडवांचा संहार कर ! ' शल्यानें आपलें सारथ्य स्वीकारल्याचें कबूल केल्यामुळें कर्णालाहि आनंद झाला आणि तो दुर्योधनाला बोलला, 'मद्रराज शल्यानें माझें सारथ्य पत्करिलें, तथापि तो जसा आनंदित दिसावा, तसा दिसत नाहीं. म्हणून तूं पुनः एकदां गोड शब्दांनीं त्याची समजूत कर ! नंतर तो महाप्राज्ञ व सर्वास्त्रकुशल दुर्योधन कर्णाला गंभीर वाणीनें बोलला, " शल्या, आज कर्ण अर्जुनाशीं युद्ध करूं इच्छीत आहे. तर तूं त्याचें सारथ्य स्वीकार ! इतर सर्वांचा वध करून नंतर अर्जुनाचाहि करावा, अशी त्याची इच्छा आहे, म्हणून पुनःपुनः याचना करून तुला सांगतों कीं तूं कर्णाचें सारथ्य कर ! ज्याप्रमाणें कृष्ण अर्जुनाचें सारथ्य करून सर्वप्रकारें त्याचें पालन करतो, त्याप्रमाणें शल्या, तूंहि आज कर्णाचें सर्व रीतींनीं पालन कर ! " नंतर शल्यानें दुर्योधनाला आलिंगन दिलें आणि मोठ्या आनंदानें म्हटलें—

शल्य—प्रियदर्शना गांधारे, जर तुझें म्हणणें असें असेल, तर तुला जें कांहीं प्रिय असेल, तें सर्व करण्यास मी सिद्ध आहें. हे भरतश्रेष्ठा, एवढेंच माझें म्हणणें आहे कीं, कल्याणबुद्धीनें मी जें कांहीं याला सांगेन, मग तें याला प्रिय वाटो अथवा अप्रिय वाटो, त्याची तुम्हीं दोघांनीं मला क्षमा करावी !

कर्ण—मद्रपते, शंकराच्या हितासाठीं ब्रह्मदेव जसा नित्य उद्युक्त होता, किंवा अर्जुनाचे कल्याणाकरितां केशवाचे जसे सर्वदा प्रयत्न चालू असतात, त्याचप्रमाणें तूं आमच्या हिताविषयीं सर्वदा तत्पर रहा !

शल्य—आत्मनिंदा किंवा आत्मस्तुति, तसेंच परनिंदा किंवा परस्तव ह्या चार गोष्टी आर्यांला वर्ज्य आहेत. परंतु केवळ तुझा मजवर विश्वास बसावा, म्हणून माझी थोडीशी स्तुति करून तुला ऐकवीत आहें ती ऐकून घे ! मातलीप्रमाणें शक्राचेंहि सारथ्य करण्यास मी योग्य आहें ! सर्वदा अवधान ठेवणें, योग्य रीतीनें अश्वांना प्रेरणा करणें, पुढें येणारें संकट ओळखणें, तें येऊं न देण्याविषयीं जपणें आणि आलें असतां त्याचा प्रतिकार करणें इत्यादि गोष्टी मला उत्तम रीतीनें अवगत आहेत. म्हणून तुझें अर्जुनाशीं युद्ध चालू असतां मी तुझे अश्व उत्तम प्रकारें चालवीन. कर्णा, तूं काळजी करूं नकोस ! ८. ३५.

## अध्याय ३६ वा.

[ १ दुर्योधनकृत शल्यप्रशंसा. २ कर्ण व शल्य रथारूढ होऊन युद्धार्थ निघतात. ३ कर्णशल्यसंवाद. ]

**( १ ) दुर्योधन—कर्णा, हा मद्रराज शल्य तुझें सारथ्य करण्यास सिद्ध आहे. हा इंद्रसारथि मातलीप्रमाणें सारथ्यकर्मात निष्णात असून कृष्णापेक्षांहि रथ चालविण्यांत हुशार आहे. मातलि ज्याप्रमाणें इंद्राश्वांचें नियमन करितो, त्याप्रमाणें हा शल्य तुझ्या अश्वांचें आज नियंत्रण करील. तुझ्यासारखा योद्धा रथस्थ असतां आणि कर्णासारखा सारथि प्राप्त झाला असतां तुमचा रथ पांडवांचा पराभव करील, यांत संशय नाहीं !**

**( २ ) संजय—धृतराष्ट्रा, नंतर प्रातःकाल झाल्यावर दुर्योधनानें फिरून त्या मद्रराज शल्याला रणभूमीवर म्हटलें, " मद्रेशा, ह्या कर्णरथाच्या दिव्य अश्वांचें तूं रणांत संयमन कर. तूं राधेयाचें रक्षण करीत असल्यावर कर्ण हा अर्जुनाला सहज जिंकून टाकील ! "**

**शल्यानें ' बरें आहे ' असें म्हटलें व तो रथावर चढला. शल्य कर्णासमीप येतांच त्यानें मोठ्या आनंदानें ' सूता, माझ्याकरितां त्वरित रथ घेऊन ये ' असें म्हटलें. नंतर शल्यानें विजयशाली व गंधर्वनगराप्रमाणें दिव्य रथ यथाविधि सिद्ध करून आणला आणि कर्णाला बोलला, ' कर्णा, विजयी हो.' असें म्हणून त्यानें रथ आणल्याचें कर्णाला निवेदन केलें. तो रथ पाहून कर्णानें त्या रथाची यथाविधि पूजा केली. त्यापूर्वीच ब्रह्मविद् पुरोहितानें त्यावर मंत्रादिकांनीं संस्कार केला होता. त्या रथाला कर्णानें प्रदक्षिणा घातली आणि सूर्याची प्रार्थना केली. नंतर कर्ण जवळ असलेल्या शल्याला म्हणाला, " शल्या, तूं रथावर चढ !' तेव्हां कर्णाच्या त्या प्रचंड व दुर्धर्ष रथावर शल्य आरूढ झाला. त्यावेळीं पर्वतावर चढणाऱ्या सिंहाप्रमाणें तो दिसत होता. आपल्या दिव्य रथांत अधिष्ठित झालेल्या शल्याला पाहतांच कर्णहि त्या रथावर आरूढ झाला. त्यावेळीं सूर्य जसा विद्युद्वान् मेघसमुदायावर आरूढ होतो तसा कर्ण दिसला. ते दोघे एका रथांत अधिष्ठित झाले असतां अंतरिक्षांत मेघसमूहावर अग्नि व सूर्य अधिष्ठित झाल्याचा भास होऊं लागला ! तेव्हां त्या रथारूढ झालेल्या द्युतिमान् वीरांची स्तुति बंदीजनांनीं केली. तेव्हां यज्ञांत जणुंकाय सदस्य व ऋत्विक् हे इंद्राग्नीची स्तुतिच करीत आहेत कीं काय असें वाटलें.**

(१) महारथ कर्ण अशाप्रकारें रथावर अधिष्ठित होतांच आपल्या धनुष्याच्या प्रत्यंचेचे टणत्कार काढूं लागला. तेव्हां तो खलें पडलेल्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला! त्याच्या हस्तांतील बाण हे रविकिरणच होत असें वाटूं लागलें व तो मंदरपर्वतावर आरूढ झालेला सूर्यच आहे असें भासलें! नंतर त्या रथाधिष्ठित महाबाहु व अमिततेजस्वी कर्णाला दुर्योधन म्हणाला, "कर्णा, जें दुष्कर कर्म भीष्म-द्रोणादिकांच्या हातून घडावें अशी माझी व सर्व वीरांची इच्छा होती, तें त्यांच्या हातून घडलें नाहीं. तें कर्म आज हे अधिरथे, तूं कर! म्हणजे तूं वज्रपाणि इंद्राप्रमाणें शोभशील! कर्णा, तूं आज धर्मराजाला धर किंवा धनंजयाला, भीमसेनाला, माद्रीसुत नकुल—सहदेव यांना मार! तुझा जय होवो! तुझें कल्याण होवो! हे पुरुषश्रेष्ठा, तूं आतां जा! तूं सर्व पांडवसैन्याचें जाळून भस्म कर!" तेव्हां हजारों तूर्यें व अयुतावधि भेरी वाजूं लागल्या व त्यामुळें अंतरिक्षांत मेघगर्जनाच होत आहे कीं काय असा भास होऊं लागला! दुर्योधनाचें भाषण मान्य करून तो रथसत्तम कर्ण युद्धविशारद शल्याला म्हणाला, "महाबाहो, रथ शीघ्र चालव! मी आज अर्जुन, भीम, नकुल-सहदेव आणि राजा युधिष्ठिर यांचा वध करणार आहें! हे शल्या, आज मी शेंकडों हजारों अत्यंत तीक्ष्ण कंकपत्र बाण टाकीत असतां माझें बाहुवीर्य धनंजय पाहो! आज पांडवांचा नाश होऊन दुर्योधनाला निःसंशय जय मिळणार आहे!"

शल्य—सूतपुत्रा, तूं पांडवांचा असा अपमान करीत आहेस, हें ठीक नाहीं. ते सर्वास्त्रवेत्ते, तसेच मोठे धनुर्धर आहेत. ते महाभाग बलवान्हि असून युद्धांत कधींहि माघार घेणारे नाहींत. ते अजय्य असून सत्यविक्रमी आहेत. ते साक्षात् इंद्रालाहि भयभीत करतील, एवढा त्यांचा पराक्रम आहे. युद्धांत जेव्हां तूं अर्जुनाच्या गांडीवाचा वज्राप्रमाणें भयंकर निर्घोष ऐकशील, तेव्हां तुझ्या तोंडून अशाप्रकारचे उद्गार निघणार नाहींत! कर्णा, रणांगणावर भीमानें तुझें गजसैन्य दंतभग्न करून मारून टाकलेलें पाहिल्यावर तूं असें कधींहि बोलणार नाहींस! धर्मराज आणि नकुल-सहदेव आपल्या तीक्ष्ण बाणांनीं अभ्रच्छायेप्रमाणें अंतरिक्ष जेव्हां व्याप्त करून टाकतील, तेव्हां हे कर्णा, हें तुझें बोलणें आपोआपच बंद पडेल!

संजय—मद्रराज शल्याचें हें भाषण कर्णाला किमपिहि आवडलें नाहीं. त्यानें त्या वेगवान् शल्याला म्हटलें, 'शल्या, रथ शीघ्र चालव!' ८. ३६.

## अध्याय ३७ वा.

[ १ कर्णाच्या प्रयाणसमयीं झालेलीं दुश्चिन्हें. २ कर्णाची आत्मप्रौढी. ३ शल्यकृत कर्णनिषेध. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, धनुर्धर कर्ण युद्धार्थ सज्ज झाला आहे, असें पाहून सर्व कौरवयोद्धे आनंदित होऊन आरोळया मारूं लागले. दुंदुभींचे निर्घोष आणि भेरींचे नाद सर्वत्र ऐकूं येऊं लागले ! बाणांचे शब्द आणि अश्वादिकांची गर्जना होऊं लागली. समरांगणांत मृत्यु आला तरी हरकत नाहीं, माघार म्हणून घ्यावयाची नाहीं, अशा निर्धारानें सर्व वीर कर्णासह निघाले असतां अनेक प्रकारचे उत्पात होऊं लागले ! हे राजा, पृथ्वी कांपूं लागली व त्यामुळें मोठा भयंकर आवाज उत्पन्न झाला. सूर्यादि सप्त महाग्रह एकमेकांवर चालून जात आहेत असें वाटलें ! उल्कापात होण्यास प्रारंभ झाला आणि सर्व दिशा जळून जाऊं लागल्या ! मेघदर्शनावांचून विजा पडूं लागल्या ! भयंकर वारे सुटूं लागले आणि पशुपक्ष्यांचे संघ डावीकडून जाऊं लागले. या चिह्नांवरून पुढें मोठें भय कोसळणार असें वाटूं लागलें ! कर्णाच्या रथाचे अश्व जमिनीवर पडले ! आकाशांतून भयंकर हाडांची वृष्टि होऊं लागली ! शस्त्रें पेटूं लागलीं आणि ध्वजहि कंपित झाले ! अश्वादि वाहनांच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले ! हे व अशाच प्रकारचे बरेच उत्पात होऊं लागले ! त्यावरून कौरवांचा विनाश लवकरच होणार अशीं दारुण चिह्नें दृष्टीला पडूं लागलीं. परंतु कौरव दैवमोहित झाल्यामुळें त्यांना त्यांचें कांहींच वाटलें नाहीं. सूतपुत्र कर्णाच्या प्रयाणकालीं राजेलोकांनीं त्याला ‘ विजयी हो ’ असे शुभाशीर्वाद दिले आणि कौरवांना पांडवांचा रणांत पराजय झाला असें वाटूं लागलें !

तेव्हां त्या रथाधिष्ठित झालेल्या परवीरांतक कर्णाचें तेज सूर्याग्नीप्रमाणें तेजस्वी दिसूं लागलें आणि आपण भीष्म-द्रोणांपेक्षां वीर्यवान् आहों असा गर्व त्याला झाला. अर्जुनाच्या पराक्रमकृत्यांचा विचार करीत असतां त्याचा क्रोध अनावर झाला ! मान आणि दर्प यांच्या क्षोभानें तो दीर्घ निश्वास टाकूं लागला आणि तो शल्याला म्हणाला, “ शल्या, मी रणांत सायुध रथाधिष्ठित असतां प्रत्यक्ष इंद्रहि मजवर क्रोधसंतप्त होऊन आला, तरीहि त्याला मी भिणार नाहीं ! भीष्मप्रमुख महायोद्धे रणभूमीवर पतन पावले हें पाहून माझें मन अगदीं घट्ट झालें आहे ! जे महेंद्र-विष्णुसमान पराक्रमी असून सर्वांना पूज्य होते, मोठमोठ्या

गज-हय-रथांचा संहार करण्याचें सामर्थ्य ज्यांच्या अंगीं होतें, जे जणुंकाय अवध्यच होते, अशांचा पांडवांकडून वध झाला, याबद्दल मला भीति वाटावी; परंतु ती आज वाटत नाहीं! युद्धांत मोठमोठे बलवान् राजे, त्यांचे सारथि, गज, रथ यांचा शत्रुहस्तें रणांत संहार होत असतां तो ब्राह्मणश्रेष्ठ आचार्य द्रोणगुरु सर्व पांडवांस मारल्याशिवाय कसा राहिला? कौरवहो, महायुद्धांत द्रोणवधाचा विचार केला असतां मी तुम्हांला सांगतों तें लक्ष्यपूर्वक ऐका. त्या मृत्युसमान उग्ररूप अर्जुनाला रणांगणांत उभा राहिलेला पाहतांच त्याच्याशीं युद्ध करण्यास समर्थ होईल, असा मजवांचून दुसरा कोणीहि नाहीं! द्रोण युद्धशिक्षण, बल, धैर्य, महास्त्रविद्या, राजनीति इत्यादि गुणांनीं युक्त असतांहि त्या महात्म्याला निधन प्राप्त झालें. त्याच्या निधनानंतर सर्व वीर मरणोन्मुख होऊन गेल्यासारखें मला वाटत आहे! ह्या लोकीं कर्म आणि दैव यांचा विचार केला असतां कोणतीहि वस्तु शाश्वत आहे, असें मला वाटत नाहीं! प्रत्यक्ष द्रोणाची अशी अवस्था समरांत झाल्याची आम्ही पाहतों, मग सूर्योदय होईपर्यंत तरी आपण सुरक्षित राहूं असें कोण म्हणूं शकेल? अस्त्रें, बल, पराक्रम, वेगवेगळ्या क्रिया, राजनीति किंवा आयुधें यांपैकीं कोणतीहि गोष्ट मनुष्यास सुख देण्यास कारण होत नसते. द्रोणाचा शत्रुहस्तें झालेला वधच पहा! त्याचें तेज अग्नि किंवा आदित्य यांप्रमाणें होतें. त्याचा पराक्रम विष्णु किंवा इंद्र यांसमान होता. राजनीतींत तो शुक्राचार्य किंवा बृहस्पति यांसारखा होता. परंतु यांपैकीं एकहि गोष्ट त्याचें संरक्षण करण्यास समर्थ झाली नाहीं!

(२) राजा शल्या, धृतराष्ट्रपुत्रांचे सर्व प्रयत्न निष्फळ होऊन कौरवांचा पराजय झाला आहे व त्यामुळें सर्वत्र स्त्रिया व कुमार यांचा सारखा आक्रोश चालला आहे, अशावेळीं पराक्रम करून दाखवील असा वीर म्हणजे मीच होय! यास्तव शल्या, माझा रथ शत्रुसैन्यावर त्वरित घेऊन चल! म्हणजे सत्यसंध राजा युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल-सहदेव, वासुदेव, सात्यकि आणि सृंजय यांची रणांत गांठ पडेल! शल्या, माझ्याशिवाय यांशीं युद्ध करण्याला कोण समर्थ आहे? म्हणून हे मद्रपते, जेथें पांडव, पांचाल आणि सृंजय असतील, तेथें त्वरित रथ घेऊन चल! मी आज त्यांचा वध तरी करीन किंवा मी स्वतः यमपुरीचा मार्ग स्वीकारीन! हे शल्या, त्या शूरांच्या मध्यें जाऊन युद्ध केल्याशिवाय मी राहणार नाहीं, हें पक्कें समज. संग्रामांतून पळून जाणें म्हणजे मित्रद्रोह करणें होय. ती गोष्ट मला सर्वथा असह्य आहे. म्हणून या युद्धांत

प्राण देऊन मी द्रोणाला अनुसरेन. हेंच मला योग्य दिसतें! मनुष्य प्राज्ञ असो, वा मूढ असो, त्याला आयुष्याच्या अन्तीं मृत्यूच्या तडाक्यांतून सुटणें शक्य नाहीं. म्हणून मी आज पांडवांवर चालून जाईन! दैवाचा प्रतिकार करणें कोणालाहि शक्य नाहीं. राजा दुर्योधन हा माझा सततचा कल्याणकर्ता आहे. म्हणून त्याच्या अर्थसिद्ध्यर्थ मी माझे सर्व प्रिय भोग, इतकेंच नव्हे, तर माझें दुस्त्यज जीवितहि अर्पण करण्यास सिद्ध आहें! हा माझा रथ व्याघ्रचर्मपरिवृत आहे. ह्याच्या आंसाचा आवाज मुळींच होत नसतो. ह्यांतील आसनें सोन्याचीं आहेत व त्रिवेणुक रुप्याचें आहे. ह्याला उत्तम अश्व जोडलेले आहेत. असा हा सर्वोत्कृष्ट रथ मला परशुरामानें दिला आहे. तशींच त्या रथावरील माझीं अद्भुत धनुष्यें, ध्वज, गदा, उग्र बाण, खड्ग, तेजस्वी आयुधें, उग्र ध्वनि करणारे शंख पहा! ज्याला पताकांनीं उत्तम शोभा आली आहे, वज्रपाताप्रमाणें ज्याचा नाद होत असतो, ज्याला शुभ्र अश्व जोडले आहेत व जो दिव्य भात्यांनीं विराजमान झाला आहे, अशा रथांत बसून मी आज अर्जुनाशीं युद्ध करीन व त्याचा वध करीन! त्याचें रक्षण करण्यास सर्वहर मृत्यु जरी मोठ्या दक्षतेनें आला, तरी मी समरांत त्या पांडुपुत्राचा वध करीन! किंवा स्वतः भीष्माप्रमाणें यमसदनाला जाईन! यम, वरुण, कुबेर, इंद्र हे जरी आपापल्या गणांसह या महायुद्धांत त्या पांडवाचें—अर्जुनाचें—रक्षण करण्यास आले, तरी त्या सर्वांसह मी अर्जुनाला जिंकीन यांत संशय नाहीं!

(२) संजय—याप्रमाणें रणोत्साहानें आत्मप्रौढी मिरविणाऱ्या कर्णाचें भाषण ऐकून मद्रराज शल्य मोठ्यानें हंसला आणि अपमानपूर्वक त्याचा निषेध करून बोलला—

शल्य—कर्णा, थांब, थांब! असें निरर्गल भाषण करूं नकोस! तो नरवर धनंजय कोठें आणि तूं पुरुषाधम कर्ण कोठें? उपेंद्रानें रक्षण केलेल्या द्वारकेहून कृष्णाची कनिष्ठ भगिनी सुभद्रा हिचें बलात्कारानें अर्जुनानें हरण केलें, हा काय सामान्य पराक्रम? मृगवधावरून कलह उत्पन्न होऊन युद्ध प्रवृत्त झालें असतां सुरपतीप्रमाणें पराक्रमी अर्जुनावांचून देवाधिदेव शंकराशीं युद्ध करण्यास दुसरा कोण सिद्ध झाला असता? तसेंच असुर, सुर, महोरग, नर, गरुड, पिशाच्च, यक्ष आणि राक्षस या सर्वांवर सारखी बाणवृष्टि करून अर्जुनानें त्यांचा पराभव केला आणि अग्नीला त्याचें अभिलषित हविर्भाग (खांडववन)

देऊन संतुष्ट केलें ! धृतराष्ट्रसुताला शत्रूंनीं हरण करून नेलें असतां सूर्यसदृश उत्तम बाणांची शत्रूंवर वृष्टि करून अर्जुनानें त्यांचा वध केला आणि त्यास सोडून पुनः कौरवांच्या स्वाधीन केलें, ही गोष्ट तुला आठवते काय ? तसेंच गंधर्वांशीं युद्ध सुरू झालें असतां तूं प्रथमच पळून गेलास आणि मग चित्ररथादि गंधर्वांनीं कौरवांना बद्ध करून नेलें असतां पांडवांनीं गंधर्वांशीं युद्ध करून त्यांना मुक्त केलें, ही गोष्ट तरी तुझ्या स्मरणांत आहे काय ? उत्तरगोग्रहणसमयीं भीष्म, द्रोण, अश्वत्थामा यांसह मोठें सैन्य घेऊन तुम्ही पांडवांवर चालून आलां असतां त्या पुरुषश्रेष्ठ अर्जुनानें तुम्हांला जिंकिलें, तेव्हां तूं अर्जुनाला कां जिंकिलें नाहींस ? कर्णा, आज पुनः सुरू झालेलें हें महायुद्ध तुझ्या निधनाकरितांच आहे, असें मला वाटतें ! रिपुभयानें जर रणांगणांतून तूं पळून गेला नाहींस, तर हे सूतपुत्रा, आज तुझा वध झालाच, असें समज !

संजय—याप्रमाणें मद्राधिपति शल्य अर्जुनाच्या पराक्रमाचें वर्णन करीत असतां कर्णाला अतिशय संताप आला आणि तो क्रोधानें शल्याला बोलला—

कर्ण—शल्या, पुरे कर ! माझें व त्याचें युद्ध सुरू झालें आहे. या युद्धांत त्यानें मला जिंकल्यास तुझें बोलणें योग्य होईल.

संजय—'होय, तसेंच होईल,' एवढेंच शल्य बोलला. या त्याच्या बोलण्यावर कर्णानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. मग 'शल्या, चल पुढें' असें युद्धावेशानें कर्ण बोलला आणि कर्णानें शुभ्राश्व जोडलेला रथ चालू केला. नंतर सूर्य जसा अंधकाराचा संहार करीत जातो, तसा तो रथ शत्रुसैन्याचा नाश करीत पुढें चालला. तो व्याघ्रचर्मपरिवृत आणि श्वेताश्वयुक्त रथ विलोकून कर्णाला अत्यानंद झाला आणि पांडवसेनेवर दृष्टि फेंकून तो धनंजय कोठें आहे, याचा शोध घेऊं लागला. ८. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ कर्णाची आत्मप्रशंसा. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, कर्ण याप्रमाणें युद्धार्थ निघाला असतां, तुझ्या सैन्याला मोठा आनंद झाला. तो रणांगणावर प्रत्येक पांडववीराला विचारूं लागला कीं 'अर्जुन कोठें आहे ?' तो असेंहि बोलला कीं 'मला जो

त्या महात्म्या श्वेतवाहनाला दाखवील, त्याला मी तो इच्छा करील इतकें धन देईन! तेवढ्यानें त्याचा संतोष होत नसेल तर त्याला शकट भरून रत्नें देईन! अथवा शंभर गाई व तितकींच कांस्याचीं दोहनपात्रें देईन. अर्जुनाला दाखवून देणाऱ्याला मी शंभर उत्तमोत्तम गांव आणि कृष्णकेशांचीं खेचरें लावलेला शुभ्र रथ अर्पण करीन, अथवा सहा सुवर्णगज आणि रत्नालंकृत गीतवाद्यप्रवीण शंभर सुंदर स्त्रिया अर्पण करीन. अर्जुनाचा शोध लावून देणाऱ्याला शंभर गज, शंभर गांव, शंभर सुवर्ण रथ आणि दशसहस्र गुणी, विनयी, सुशिक्षित आणि बलवान् अश्व देईन! एवढ्यानेंहि तृप्ति होत नसल्यास सुवर्णशृंगांच्या चारशें सवत्स धेनु अर्पण करण्यास मी सिद्ध आहें, अथवा सुवर्णालंकारभूषित पांचशें शुभ्र अश्व आणि उत्तम रीतीनें सुशिक्षित केलेले असे अठरा दुसरे अश्व मी देईन! अहो, अर्जुनाला दाखवा, म्हणजे मी तुम्हांला कांबोज देशाचे अश्व जोडलेला शुभ्र सुवर्णरथ अर्पीन! अथवा जे सुवर्णमालांनीं विभूषित आहेत, ज्यांचा जन्म समुद्राच्या पश्चिम तीरावर झाला आहे व उत्तम हस्तिपकांकडून ज्यांचें शिक्षण झालें आहे, असे सहाशें गज मी देईन! अथवा विशेषसंपत्तियुक्त, वनें व जल यांनीं परिपूर्ण, भीतिरहित, सर्वसमृद्ध, राजेलोकांनीं उपभोग्य असे चौदा गांव अर्पण करीन! इतक्यानेंहि समाधान होत नसल्यास ज्यांच्या गळ्यांत सुवर्णाचे हार शोभत आहेत, अशा मागध देशांतील शंभर यौवनसंपन्न सुंदर तरुणी दासी म्हणून आणून देईन! बोला, अर्जुन कोठें आहे तें? जें जें तुम्ही मागाल, तें तें देण्यास मी सिद्ध आहें! पुत्र, स्त्री, विहार इत्यादि मजजवळ जें कांहीं आहे, तें सर्व तुम्ही मागितल्यास तें देण्याची माझी सिद्धता आहे! कृष्णार्जुनांना दाखवा मात्र, कीं त्यांना मारून त्यांचें सर्व वित्त मी तुम्हांला अर्पण करीन!

धृतराष्ट्रा, अशाप्रकारचें भाषण कर्णानें रणांगणावर केल्यावर त्यानें आपला समुद्रोत्पन्न दिव्य शंख वाजविला. तें भाषण ऐकून दुर्योधनादिकांना परम आनंद झाला. कौरवसैन्यांत दुंदुभि-मृदंग वाद्यें वाजूं लागलीं! आणि सिंहनाद व गजांचे चीत्कार शब्दहि होऊं लागले! कौरवयोद्धे आनंदानें आरोळ्या मारूं लागले! अशा कोलाहलांत कर्ण शत्रुसैन्यावर धांवून जात असतां शल्यानें मोठ्यानें हंसून त्याचा धिक्कार केला आणि त्याला बोलला. ८. ३८.

## अध्याय ३९ वा.

[ १ शल्यकृत कर्णनिर्भर्त्सना. ]

( १ ) शल्य—सूतपुत्रा कर्णा, सुवर्णाचे सहा गज तूं कोणाला देण्याची जरूरी नाहीं ! आज तुला अर्जुन खरोखरच भेटेल ! कुबेराप्रमाणें संपत्ति वांटून टाकण्यास आज तूं सिद्ध झाला आहेस, हा तुझा केवढा मूर्खपणा ? अपात्राच्या ठिकाणीं दान केलें असतां जे दोष लागतात, ते मोहामुळें तुला कळत नाहींत ! जें हें धन तूं अशा रीतीनें व्यर्थ उडवूं पहात आहेस, त्याच्या योगानें तुला अनेक यज्ञ करतां येण्यासारखे आहेत. यज्ञ करून तरी त्या धनाचा व्यय कर ! मोहामुळें कृष्णार्जुनांच्या वधाची तूं इच्छा करीत आहेस, ती अगदीं व्यर्थ आहे ! कोल्ह्यानें युद्धांत कधीं सिंहास मारल्याचें आम्हीं ऐकिलें नाहीं ! ज्याअर्थी आज तूं अप्रार्थित वस्तूची इच्छा करीत आहेस, त्याअर्थी तुला कोणी मित्र नाहींत, असें मला वाटतें. अग्नींत तूं पडत असतां जे तुझें निवारण करतील, तेच तुझे खरोखर मित्र होत. कार्याकार्य तुला कांहींच समजेनासें झालें आहे, यावरून तुझा मृत्युसमय निःसंशय जवळ येत चालला आहे ! जगण्याची इच्छा करणारा कोणता मनुष्य असलें अनर्थकारी व अश्राव्य भाषण करील ? तुझी इच्छा गळयांत धोंडा बांधून घेऊन बाहुबलानें समुद्र तरून जाणें किंवा पर्वतशिखरावरून खालीं उडी टाकणें, ह्याप्रमाणें अशक्य आहे. जर तुला कल्याणाची इच्छा असेल, तर सैन्य एकत्र करून आधीं व्यूहरचना कर आणि मग धनंजयाशीं युद्धार्थ उभा रहा ! दुर्योधनाचें हित व्हावें, ह्याच हेतूनें मी सांगत आहें. त्याचा नाश व्हावा, अशी माझी किमपि इच्छा नाहीं ! तुला जगावयाचें असेल, तर या माझ्या भाषणावर विश्वास ठेव !

कर्ण—माझ्या स्वतःच्या बाहुबलावर विश्वास ठेवूनच मी रणांत अर्जुनाला गांठण्याची इच्छा करीत आहें. तूं बोलण्यांत मित्रासारखा असून करणीनें शत्रूसारखा आहेस ! तूं मला भिववीत आहेस, तरी ह्या माझ्या निश्चयापासून मला कोणीहि—मग तो प्रत्यक्ष वज्रधारी इंद्र असला तरी ढळविण्यास समर्थ होणार नाहीं. मग तेथें मर्त्य मानवाची ती कथा काय ?

संजय—अशाप्रकारचें कर्णाचें भाषण ऐकून त्याला अधिक क्रोध आणण्याकरितां शल्य पुनः म्हणाला, " कर्णा, अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापासून सुटलेले तीक्ष्ण कंकपत्र बाण तुला आच्छादून टाकतील, तेव्हांच तुला पश्चात्ताप होईल !

जेव्हां सव्यसाची अर्जुन दिव्य धनुष्य घेऊन आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तुझें व तुझ्या सैन्याचें मर्दन करील, तेव्हां युद्धाला प्रवृत्त झाल्याबद्दल तुला वाईट वाटेल ! आईच्या मांडीवर निजलेलें बाळ अज्ञानानें चंद्राचें अपहरण करूं इच्छितें, त्याप्रमाणें रथाधिष्ठित झालेल्या अर्जुनाला आज तूं जिंकूं पाहत आहेस ! आज ज्याअर्थी अशा रीतीनें अर्जुनाशीं युद्ध करूं तूं इच्छित आहेस, त्याअर्थी अतितीक्ष्ण त्रिशूलावर तूं आपलीं गात्रें घांशीत आहेस, असें मला वाटतें. एखाद्या मूर्ख क्षुद्र हरिणानें मोठ्या धिप्पाड केसरीला युद्धाला बोलवावें, त्याप्रमाणें ही तुझी कृति मला दिसत आहे ! कर्णा, तूं ह्या राजपुत्राला युद्धार्थ आह्वान करूं नकोस ! महावीर्य केसरीला मांसाशनानें तृप्त झालेल्या जंबुकानें जसें युद्धार्थ बोलवावें, त्याप्रमाणें कर्णा, ही तुझी कृति आहे. असें केल्यानें तूं मात्र नाश पावशील ! नांगराच्या फाळाप्रमाणें तीक्ष्ण दांतांच्या मदस्रावी गजाबरोबर झगडूं पाहाणारा तूं ससा आहेस ! कर्णा, तूं अर्जुनाला युद्धार्थ आह्वान करणें म्हणजे बिळांतील विषारी कृष्णसर्पाला काठीनें मारण्याला उद्युक्त होण्यासारखें आहे ! सिंहाची खोड काढून ज्याप्रमाणें कोल्ह्यानें ओरड करावी, त्याप्रमाणें तूं त्या नृसिंहाची-अर्जुनाची-खोड काढून व्यर्थ ओरड चालविली आहेस ! कर्णा, वेगवान् पक्षिराज गरुडाला ज्याप्रमाणें एखाद्या सर्पानें आपल्याच पतनाकरितां बोलवावें, त्याप्रमाणें तूं धनंजयाला आज बोलावीत आहेस ! कर्णा, मत्स्यादि जलचर प्राण्यांनीं सर्वत्र व्याप्त होऊन राहिलेल्या व चंद्रोदयकालीं भरती येऊन वाढत जाणाऱ्या महासमुद्राला बाहुबलानें तूं तरून जाऊं पहात आहेस ! कर्णा, बेडकानें ज्याप्रमाणें महाघोर मेघासमोर ओरडत सुटावें, त्याप्रमाणें लोकेच्छा परिपूर्ण करणाऱ्या त्या अर्जुनरूपी मेघासमोर व्यर्थ वल्गना करीत आहेस ! आपल्या गृहांत राहून श्वानानें जसें वनांतील व्याघ्रांवर भुंकत राहावें, त्याप्रमाणें कर्णा, तूं त्या नरव्याघ्र धनंजयावर भुंकत राहिला आहेस ! वनांत शशकांनीं परिवेष्टित जंबुक सिंह नजरेला पडला नाहीं, तोंपर्यंत आपणाला जसा सिंहच समजतो, त्याप्रमाणें हे राधेया, त्या शत्रुदमन नरव्याघ्र धनंजयाची भेट झाली नाहीं, तोंपर्यंत तूंहि आपणाला खुशाल सिंह मानून घे ! पण एकाच रथावर चंद्र-सूर्याप्रमाणें अधिष्ठित झालेले ते कृष्णार्जुन दृष्टीस पडतांच तुझा सर्व भ्रम नाहींसा होऊन जाईल ! महायुद्धांत गांडीवाचा ध्वनि जोंपर्यंत तुझ्या कानीं आला नाहीं, तोंपर्यंतच तुला वाटेल तें बोलतां येईल ! परंतु दाही दिशांना व्याप्त करून सोडणारा रथांचा व चापांचा निनाद होऊं लागला म्हणजे गर्जना करणाऱ्या शार्दू-

त्याच्या भीतीनें पळून जाणाऱ्या जंबुकाप्रमाणें तुझी स्थिति होईल. हे कर्णा, तूं नित्य शृगालासारखा व धनंजय सिंहासारखा आहे! हे मूर्खा, तूं सर्वदा वीरांचा द्वेष करणारा आहेस, म्हणून तूं कोल्ह्यासारखा दिसतोस! कर्णा, ज्याप्रमाणें मूषक व मार्जार, श्वान व व्याघ्र, शृगाल व सिंह, शशक व गज, असत्य व सत्य आणि विष व अमृत यांमध्यें बलाबलाचा विचार केला असतां जसें महदंतर दिसून येतें, त्याप्रमाणें तूं आणि अर्जुन आपल्या बऱ्यावाईट कर्मांनीं प्रसिद्ध झालां आहां!" ८. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ कर्णाचें शल्यास उत्तर. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या अमितपराक्रमी शल्यानें कर्णाची निर्भर्त्सना केली असतां कर्णाला शल्याचा फार संताप आला आणि त्याच्या वाणींतील कठोरता हेंच त्याचें शल्य नांव पडण्याचें कारण होय, असें ठरवून तो शल्याला बोलला—

कर्ण—गुणवानांचे गुण गुणी लोकच समजतात. इतरांस ते समजणें शक्य नाहीं. हे शल्या, तूं तर निर्गुण, त्यामुळें गुणागुणांचें ज्ञान तुला कोठून होणार? त्या महात्म्या अर्जुनाचीं महास्त्रें, क्रोध, वीर्य, धनुष्य, बाण आणि विक्रम हीं सर्व मला विदित आहेत. त्याप्रमाणें राजश्रेष्ठ कृष्णाचेंहि माहात्म्य मला जितकें ज्ञात आहे, तितकें हे शल्या, तुला नाहीं! गांडीवधारी अर्जुनाला मी युद्धार्थ आह्वान करीत आहें, तें देखील त्याचे व आपल्या वीर्याचा विचार करूनच करीत आहें. शल्या, भात्यांत ठेवलेला हा सपुंख बाण मजजवळ आहे पहा! ह्याला रक्तभोजनाची फार आवड आहे! ह्याला चांगली धार देऊन चंदनचूर्णांत ठेवलें आहे! कित्येक वर्षें मी याची पूजा करीत आहें. हा सूर्यरूप असून ह्याचें विष अत्यंत उग्र आहे. हा मनुष्यें, अश्व आणि गज यांचे संघांचे संघ मारीत असतो. हा घोररूप असून कवचें व अस्थि विदीर्ण करण्याचें सामर्थ्य ह्याच्या अंगीं आहे! मी क्रोधसंपन्न झालों असतां ह्याच्या योगानें मेरुपर्वतहि भंग पावेल! हा बाण कृष्णार्जुनांशिवाय दुसऱ्या कोणावरहि मी टाकणार नाहीं, हें ध्यानांत ठेव! ह्या बाणानें मी वासुदेव-धनंजयांशीं युद्ध करीन! सर्व वृष्णिवीरांची कीर्ति कृष्णाच्या ठिकाणीं आहे आणि सर्व पांडवांचा विजय अर्जुनाच्या

ठिकाणीं प्रतिष्ठित आहे. त्या दोघांची रणांगणांत गांठ पडल्यावर मग माघार कोण बरें घेईल ? एका रथांत अधिष्ठित झालेल्या कृष्णार्जुनांची मजशीं गांठ पडेल, व त्यांचा मजशीं युद्धप्रसंग घडेल, तर माझ्या जन्माचें सार्थक्य झालें, असें मी समजेन ! हे आते-मामेभाऊ असून समरांत सदा अजिंक्य आहेत. परंतु आज मी त्यांस माझ्या बाणानें मारतों पहा ! अर्जुनाचें कपिध्वज गांडीव व कृष्णाचें गरुडध्वज चक्र हीं भित्र्यांना भिववितील, मला तर तीं पाहून हर्ष होतो !

शल्या, तूं अत्यंत दुष्ट प्रकृति मूढ असून युद्धविद्येंतहि निपुण नाहींस ! त्यामुळें भीतीनें गांगरून जाऊन तूं असें अबद्ध भाषण करीत आहेस. तूं कृष्णार्जुनांची एवढी स्तुति करीत आहेस, त्याला कांहींतरी कारण असेल. आज मी कृष्णार्जुनाचा वध केल्यावर तुझाहि बंधूंसह वध करणार आहें ! हे क्षत्रियकुलकलंका, पापदेशजा, दुष्टा, मित्र म्हणवून शत्रूप्रमाणें तूं त्या कृष्णार्जुनांची भीति मला घालीत आहेस ! आज मी त्यांना मारीन किंवा ते तरी मला मारतील ! माझ्या बळाविषयीं मला पूर्ण विश्वास आहे. त्यामुळें कृष्णार्जुनांची भीति मला किमपिहि वाटत नाहीं ! आज सहस्रावधि कृष्ण किंवा शतावधि अर्जुन धांवून आले, तरी मी त्यांचा वध करीन ! हे नीचवंशजा शल्या, स्त्रिया, बाल, वृद्ध किंवा मौजेनें एकत्र झालेले लोक मद्रदेशीय लोकांविषयीं ज्या गोष्टी सांगतात त्या तूं मजपासून ऐक ! पूर्वीं ह्या गोष्टी ब्राह्मणांनीं राजांपुढेंहि सांगितल्या आहेत ! त्या ऐकून घे, नाहींतर उत्तर दे !

मद्रदेशांतील लोक हे मोठे मित्रद्रोही असतात. तूं मद्रदेशीय असल्यामुळेंच आमच्यांशीं द्रोह करीत असतोस ! ते असत्यवादी असून मोठे कुटिल असतात ! मद्रदेशीय मनुष्याचें दौरात्म्य जन्मपर्यंत त्याला सोडून जात नसतें, असें आम्हीं ऐकिलें आहे. मद्रदेशांतील पिता, माता, पुत्र, सासू, सासरा, कन्या, जांवई, बंधु, दुसरेहि आप्त, पाहुणे, दासदासी परस्परांत मिसळून वागतात ! ते सर्वदा अभद्र गायनांत दंग असून परस्परांशीं सर्वदा स्वेच्छेनुरूप वागत असतात. अशा देशांत धर्मवासना तरी कशी असावी ? मद्रदेशांतील लोक गर्विष्ठ असून अशुभ कृत्यांविषयीं त्यांची फार प्रसिद्धि आहे. मद्रकांशीं कोणी मैत्री करूं नये किंवा त्यांच्यांशीं वैरहि करूं नये. मद्रदेशांत मैत्री म्हणून नाहींच ! मद्रदेश हा सर्व दुष्कृत्यांचें निवासस्थानच होय. मद्रदेशच्या सहवासानें गांधा-

रदेशांतील शौचाचारहि नष्ट होत चालले आहेत. यज्ञांत राजा हाच जर याजक होऊन बसेल, तर हविर्भाग व्यर्थ जातो! शूद्राचें काम करणारा ब्राह्मण जसा अपयश संपादन करतो, व ब्रह्मद्वेष्टे जसे तिरस्कारार्ह होतात, त्याप्रमाणेंच मद्रकांशीं मैत्री करणाऱ्या लोकांची स्थिति होत असते!

हे वृश्चिका शल्या, मी तुझ्या विषाची प्रतिक्रिया केल्यामुळें तुला भिण्याचें मला आतां कारणच नाहीं. आथर्वणमंत्रानें मीं त्याची शांति केली आहे. विंचू चावून त्याच्या विषानें मनुष्य व्याकुळ झाला असतां सुज्ञ लोक त्यावर औषधोपचार करीत असतात हें आम्ही पाहतों. म्हणून हे शल्या, मी सांगतों, तें निमूटपणें ऐकून घे!

मद्रदेशांत वैवाहिक बंधनांनीं स्त्रीपुरुषांचे संबंध निश्चित केले नाहींत. त्यामुळें अशा स्त्रियांच्या उदरीं जन्म पावलेल्या पुरुषांस धर्म सांगण्याचा अधिकार कसा येतो! मद्रदेशांतील किंवा सिंधुसौवीर देशांतील लोक पापी असल्यामुळें धर्मांचा विचार करण्यास ते सर्वथा असमर्थ होत! क्षत्रियांचा मुख्य धर्म म्हणजे युद्धभूमीवर मृत्यु पावणें व तेणेंकरून सज्जनांच्या स्तुतीस पात्र होणें हा होय. मी माझा देह रणांगणावर ठेवणार आहें! युद्धांत निधनानें स्वर्ग संपादणें हा माझा मूळचा संकल्प आहे आणि ह्याच हेतूनें मी त्या धीमान् दुर्योधनाचा प्रियमित्र झालों आहें! त्याच्याकरितां माझे प्राण आणि माझी सर्व संपत्ति आहे. हे पापदेशजा, तूं पांडवांचा हेर आहेस, हें उघड दिसून येत आहे! म्हणूनच तूं सर्व कार्यांत आमच्यांशीं शत्रूप्रमाणें वागत आहेस! नास्तिकांकडून धर्मज्ञ मनुष्य भ्रष्ट होणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें शेंकडो लोकांनीं कितीहि यत्न केला, तरी मी युद्धविमुख होणार नाहीं! कर्णा, घर्मार्त झालेल्या हरिणाप्रमाणें तूं आज हवा तितका गळा कोरडा करून ओरड; परंतु क्षत्रवृत्तीनें वागणाऱ्या मला कोणीहि भिववूं शकणार नाहीं! जे क्षत्रिय युद्धांत माघार न घेतां रणभूमीवर देह ठेवतात, त्यांना कोणती गति प्राप्त होते, याविषयीं माझा गुरु परशुराम यानें मला जें सांगितलें आहे, तें माझ्या ध्यानांत आहे. धार्तराष्ट्रांचें रक्षण करणें आणि शत्रूंचा संहार करणें या कार्यीं मी उद्युक्त झाल्यामुळें पुरु-

---

१ हा चवथा वेद असून यांत शत्रुसंहारक व संकटनिवारक बऱ्याच प्रार्थना आहेत. २ येथें स्त्रियांविषयीं केलेलें वर्णन अत्यंत अनुदारपणाचें व एकतर्फी दिसत असल्यामुळें ते श्लोक गाळले आहेत.

रथ्याच्या उत्तम गुणांचें अनुकरण मी करीत आहें, असें समज ! या माझ्या निश्चयापासून माझें मन परावृत्त करील असा कोणी मनुष्य त्रिभुवनांत मिळेल असें वाटत नाहीं ! शल्या, हें लक्षांत घे आणि निमूटपणें बैस ! त्रास पावून व्यर्थ बडबड करूं नकोस ! हे मद्रकाधमा, तुला मारून हिंसक प्राण्यांची भर मी करूं इच्छीत नाहीं. मित्रकार्य लक्ष्यांत आणून, दुर्योधन-धृतराष्ट्रांस वाईट वाटेल ह्या गोष्टीचा विचार करून आणि जनापवादाला भिऊन मी तुझा वध करीत नाहीं ! पण मद्रेश्वरा, अशा प्रकारचें भाषण फिरून करशील, तर या वज्रतुल्य गदेनें तुझें मस्तक उडवीन हें लक्ष्यांत ठेव ! हे पापदेशजा, आज कृष्णार्जुनांनीं कर्णाला मारल्याचें किंवा कर्णानें कृष्णार्जुनांचा वध केल्याचें लोक पाहतील किंवा ऐकतील ! इतकें बोलून शल्याला ' सत्वर रथ चालव ' असें कर्णानें सांगितलें ! ८. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

[ १ हंसकाकीयोपाख्यान. २ शल्यकृत कर्णधिक्कार. ]

( १ ) संजय—हे राजन्, अधिरथ कर्णाचें भाषण श्रवण करून शल्यानें कर्णाला उत्तर दिलें व एक कथा सांगितली. तो म्हणाला, " यज्ञयाग करणाऱ्या, संग्रामांतून माघार न घेणाऱ्या, मूर्धाभिषिक्त राजकुलामध्यें माझा जन्म झाला आहे. मी स्वतः अत्यंत धर्मपरायण आहें. हे वृषा, मद्यानें मत्त झालेल्या मनुष्याप्रमाणें तूं वाटेल तसें भकत सुटला आहेस; म्हणून तुला सुहृद्भावानें दोन गोष्टी सांगून शुद्धीवर आणावें, अशी माझी इच्छा आहे. तुला आतां एक कावळ्याची गोष्ट सांगतों, ती ऐक आणि मग हे दुर्मते, कुलपांसना, तुझ्या मनाला वाटेल तें कर ! हे कर्णा, तुझ्याविषयीं यत्किंचितूहि पापबुद्धि माझ्या मनांत नाहीं, कीं तूं निरपराधी माझा वध करण्याला प्रवृत्त व्हावें ! मी जर तुझा सारथि आहें आणि राजा दुर्योधनाचें कल्याण करण्याची माझी इच्छा आहे, तर तुझें हिताहित कशांत आहे, हें तुला सांगणें मला अवश्य वाटत आहे. कोणता भाग सखल आहे, कोणता उंच आहे, रथ्याचें बलाबल कशांत आहे, अश्व व रथी यांना नित्य श्रम व खेद कशापासून होतो, तसेंच आयुधांचें ज्ञान, जयापजयसूचक मृगपक्ष्यांचे स्वर, अश्वांना सोसण्याइतका भार आहे किंवा कसें, व्रण बरे करण्याचे उपाय, अस्त्र-

प्रयोगांचें ज्ञान, युद्धकौशल्य, अनुकूल व प्रतिकूल ग्रहादिकांचें ज्ञान हें सर्व तुझा मी सारथि ह्या नात्यानें मला असणें अवश्य आहे. मी तुला आतां एक दृष्टांत देऊन गोष्ट सांगतों, ती ऐक !

कर्णा, समुद्राच्या परतीरावर एक वैश्य राहत असे ! त्याजवळ धन-धान्याची विपुल संपत्ति होती. तो यज्ञयागादिकांचा कर्ता असून मोठा दाता, क्षमाशील, आपलीं वर्णाश्रमादि कृत्यें नित्य करणारा आणि शुचिव्रत असा होता. त्याला पुष्कळ पुत्र असून त्यांवर त्याचें फार प्रेम होतें. तशीच त्याची सर्व प्राण्यांवर अत्यंत प्रीति होती. त्याचा राजाहि तसाच धार्मिक होता, त्यामुळें तो निर्भयपणें त्या राज्यांत राहात असे. त्या अनेक बालकुमारांचें उष्टें खाऊन एक कावळा वाढला होता. ते वैश्यपुत्र दररोज मांस, भात, दहीं, दूध, पायस, मध आणि घृत वगैरे आपलें उच्छिष्ट त्याला घालीत असत. त्यामुळें पुष्ट होऊन आपल्या बरोबरच्या आणि आपल्याहून वरिष्ठ पक्ष्यांचीहि मोठ्या गर्वानें तो मानहानि करीत असे.

पुढें कोणे एके वेळीं त्या समुद्राच्या तीरीं कांहीं हंस उडत आले. त्यांची चाल गरुडाप्रमाणें असून त्यांचें वसतिस्थान मानससरोवरांत होतें. त्यांचे चेहरे प्रसन्न दिसत होते. त्या हंसांला पाहून वैश्यकुमारांनीं कावळ्याला म्हटलें, ‘ हे विहंगमा, सर्व पक्ष्यांत तूंच आम्हांला श्रेष्ठ दिसतोस !’ त्या मूर्ख वैश्य-कुमारांच्या भाषणानें तो कावळा फसला जाऊन मूर्खपणानें आणि गर्वानें तें त्यांचें म्हणणें त्यानें खरें मानलें. नंतर तो त्या हंसांकडे गेला आणि ‘ तुमच्यांत श्रेष्ठ कोण ’ म्हणून विचारूं लागला. नंतर त्यांपैकीं त्याला जो श्रेष्ठ वाटला, त्याला तो कावळा म्हणाला, ‘ चल आपण आतां उडूं या.’ त्या कावळ्याचें भाषण तेथें जमलेल्या सर्व हंसांनीं ऐकलें आणि मोठ्यानें हंसून त्यांनीं त्याचा उपहास केला. त्या बडबड करणाऱ्या कावळ्याला मग ते हंस म्हणाले—

हंस—आम्ही मानससरोवरवासी हंस असून आम्ही ह्या पृथ्वीवर फिरत असतों. आमच्याइतके दूर उडणारे दुसरे पक्षी कोणी नाहींत आणि म्हणूनच पक्ष्यांत आम्हांला मोठा मान आहे. दुर्मते, तूं कावळा असून त्या दूरवर उड-णाऱ्या मानसवासी बलिष्ठ हंसाला ‘ चल आपण उड्डाण करूं या ’ म्हणून बोलावीत आहेस हें कसें ? त्यावर तो उन्मत्त कावळा उपहासपूर्वक त्यांना बोलला—

काक—हंसहो, मला एकशें एक प्रकारचीं उड्डाणें अवगत आहेत. प्रत्येक उड्डाण शंभर योजनांचें असून त्यांत वैचित्र्य व भिन्नताहि आहे. उड्डीनें, अवडीन, प्रडीन, डीन, निडीन, संडीन, तिर्यग्डीन वगैरे उड्डाणें मी तुम्हांला दाखवीन, तेव्हां माझा पराक्रम तुम्हांला चांगलाच दिसून येईल. ह्यांतून कोणत्या तरी एका उड्डाणानें मी आज आकाशांत उडणार आहें. तरी कोणत्या उड्डाणानें मी उडावें तें सांगा ! त्याप्रमाणें तुम्हीहि कोणत्या उड्डाणानें उडणार तेंहि सांगा ! हंसहो, इतक्या प्रकारच्या गतींनीं तुम्हांला मजबरोबर निराश्रय आकाशांत उडावयाचें आहे ! हें त्या कावळ्याचें भाषण ऐकून त्यांपैकीं एक हंस हंसून बोलला—

हंस—काका, तूं एकशें एक उड्डाणें करून दाखविशील, हें खरें आहे ! सर्व पक्ष्यांना अवगत असें एकच उड्डाण आम्ही करीत असतों ! त्याशिवाय दुसरें कोणतेंहि उड्डाण आम्हांला माहीत नाहीं. काका, तुला जें पसंत असेल, तें उड्डाण तूं कर !

कर्णा, तें भाषण ऐकून तेथें जमलेले कावळे मोठ्यानें उपहासपूर्वक हंसले आणि म्हणाले, 'एकच उड्डाण जाणणारा हा हंस शंभर उड्डाणगति जाणणाऱ्यांशीं कशी बरोबरी करूं शकणार ? हा काक एकाच उड्डाणानें या हंसाला सहज जिंकून टाकील ! कारण हा कावळा बलिष्ठ असून शीघ्रगामी आहे !'

कर्णा, नंतर ते दोघे हंस-वायस मोठ्या स्पर्धेनें आकाशांत उड्डाण करण्यास सिद्ध झाले. हंस एकाच गतीनें जाऊं लागला व कावळा शंभर गती दाखवीत उड्डाण करूं लागला ! कावळ्याच्या त्या गतींनीं तेथें जमलेले कावळे परम आनंदित झाले व कावकाव करून त्यांनीं आपला हर्ष व्यक्त केला. कावळ्याच्या त्या गती पाहून इतर हंसांनीं हास्य करून त्याचा उपहास केला ! कावळा पुढें जाऊं लागला, तों ते कावळे आपला जय होणार ह्या आशेनें वृक्षाग्रांवर, जमिनीवर व इकडेतिकडे ओरडूं व नाचूं लागले ! तो हंस मंदगतीनें आकाशांत सारखा चालला होता, त्यामुळें तो कांहीं वेळ कावळ्याच्या मागें राहिला ! तें पाहून कावळ्यांनीं त्या हंसाचा धिक्कार केला आणि म्हटलें, 'अहो, अंतरि-

---

१ उड्डीनमूर्ध्वगमनमवडीनमधोगतिः । प्रडीनं सर्वतो यानं डीनं गमनमात्रकम् ॥ निडीनं शतकैर्यानं संडीनं ललितं गतम् । तिर्यग्डीनं गतं प्राहुस्तिरःप्रचरणं बुधाः ॥ तान्याशाभेदभिन्नानि चत्वारि प्रतिजानते । तानि तिर्यग्डीनानि ॥

क्षांत उडणाऱ्या ह्या हंसाला कावळयानें मागें टाकिलें पहा!' तें कावळयांचें भाषण ऐकून हंस वेगानें पश्चिम दिशेकडे वळला आणि मकरांचें आलय अशा सागराकडे वेगानें आला. कावळाहि त्या बाजूनें जाऊं लागला. तिकडे वळतांच विश्रांति घेण्यास जवळपास वृक्ष किंवा द्वीप नाहीं, असें पाहून तो घाबरला. समुद्र म्हणजे अनेक जलचरांचें वसतिस्थान, त्यांत अनेक शक्तिमान् प्राणी रहात असल्यामुळें तो आकाशापेक्षांहि भयंकर; अशा त्या गंभीर व अगाध समुद्राचें कांहीं वेळ आक्रमण करून त्या हंसानें कावळयाकडे पाहिलें, तों कावळा अगदीं थकून जाऊन आपल्याकडे येत आहे असें त्यानें पाहिलें. तो आतां पाण्यांत पडून मरणार, असें पाहून त्या हंसानें त्याला म्हटलें, "आतां-पर्यंत तूं अनेक प्रकारचीं उड्डाणें आम्हांला सांगितलींस, परंतु तूं सांप्रत जें उड्डाण करीत आहेस, त्याचें नांव सांगितलें नाहींस! तूं पंखांनीं आणि तोंडानें जलाला स्पर्श करीत आहेस, तर ह्या उड्डाणाचें नांव काय तें आम्हीं सांग पाहूं!

शल्य—दुष्टा कर्णा, हंसाचे ते शब्द श्रवण करून कावळा त्याला बोलला, 'आम्हां कावळयांची ती शक्ति किती? कावकाव करीत आम्ही फिरत असतों! मी तुला शरण आलों आहें, मला समुद्राच्या तीरावर नेऊन पोंचव! कर्णा, असें तो बोलत आहे, तोंच तो पाण्यांत पडला व आतां मरणार, इतक्यांत हंस त्याला बोलला, "काका, आपणाला एकशें एक उड्डाणें माहीत असल्याचें सांगून तूं मोठी बढाई मारीत होतास! शिवाय माझ्यापेक्षां तूं बलवान्हि आहेस. असें असतां तूं श्रमून समुद्रांत पडतोस हें कसें?" तेव्हां तो कावळा दुःखी होऊन हंसाला म्हणाला—

काक—हंसा, मी सर्वदा उच्छिष्टभक्षणानें गर्विष्ठ होऊन गरुडाप्रमाणें स्वतःला समजून इतर कावळे व पक्षी यांचा उपहास करूं लागलों. आज तुला मी शरण आलों आहें. तर द्वीपाच्या तीरावर मला घेऊन चल! जर मी सुखरूपपणें स्वदेशाला गेलों, तर मी कोणाचाहि अपमान करणार नाहीं! कसें-हि करून या संकटांतून माझें रक्षण कर!

असें दीनपणें भाषण करणाऱ्या त्या कावळयाला मोठी त्वरा करून त्यानें आपल्या पावलांनीं वर उचलिलें आणि आपल्या पाठीवर हळूच ठेवून जेथून ते स्पर्धेनें उडण्यास सिद्ध झाले होते, त्या ठिकाणीं आणून पोंचविलें आणि त्याचें

गोड शब्दांनीं समाधान करून इष्ट देशाला तो मोठ्या वेगानें निघून गेला ! याप्रमाणें त्या उच्छिष्टभक्षक कावळ्याचा गर्व त्या हंसानें नाहींसा केला. तेव्हांपासून त्याचा बल व वीर्य यासंबंधीं गर्व नाहींसा होऊन तो शांत झाला.

( २ ) कर्णा, तूंहि त्या वैश्यकुलांतील कावळ्याप्रमाणें धार्तराष्ट्राच्या उच्छिष्टावर पुष्ट झाला असून आपल्या बरोबरीच्यांचा व वरिष्ठांचा अपमान करीत आहेस. विराट नगरीमध्यें द्रोण, द्रौणि, कृपाचार्य, भीष्म आणि इतर कौरव हे तुझें रक्षण करीत असतां तुझ्या हातून अर्जुनाचा वध कसा झाला नाहीं ? सिंह ज्याप्रमाणें कोल्ह्याची दुर्दशा करून टाकतो, त्याप्रमाणें अर्जुनानें तुम्हांला जर्जर केलें असतां तुझें सामर्थ्य कोठें होतें ? तुझ्या बंधूला सव्यसाची अर्जुनानें रणांत मारल्याचें पाहून सर्व कौरवांसमक्ष तूंच प्रथम पळून गेलास ना ? द्वैतवनांत देखील गंधर्व जेव्हां तुजवर चालून आले, तेव्हां तूंच प्रथम पळालास ! चित्रसेनादि गंधर्वांना जिंकून व त्यांचा वध करून दुर्योधनाला भार्येसह अर्जुनानेंच सोडविलें ! राजसभेंत सर्व सभासदांसमक्ष परशुरामानें कृष्णार्जुनांचा पुराण पराक्रम सांगितला आहे. त्याचप्रमाणें भीष्म-द्रोणांच्या तोंडचे ‘ कृष्णार्जुन हे अवध्य आहेत ’ हेहि उद्गार तूं ऐकले आहेस ! कोणकोणत्या गोष्टींत म्हणून धनंजय तुझ्यापेक्षां बलवत्तर आहे म्हणून सांगूं ! ज्याप्रमाणें सर्व भूतांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहे, त्याचप्रमाणें अर्जुन सर्व गुणांमध्यें तुजपेक्षां श्रेष्ठ आहे. आतां लवकरच तो वसुदेवनंदन कृष्ण व कुंतीपुत्र अर्जुन हे उत्कृष्ट रथावर आरूढ झालेले तुझ्या नजरेला पडतील. त्या बुद्धिमान् कावळ्यानें ज्याप्रमाणें त्या हंसाचा आश्रय केला, तसा तूं कृष्णार्जुनांचा आश्रय कर. जेव्हां तूं त्या पराक्रमी कृष्णार्जुनांना एक रथांत पाहशील, तेव्हां असले उद्गार तुझ्या मुखावाटे बाहेर पडणार नाहींत. जेव्हां शतावधि बाणांनीं अर्जुन तुला जर्जर करील, तेव्हां तुला आपल्यामधील व अर्जुनामधील अंतर दिसून येईल. देव, असुर आणि मनुष्यें यांमध्यें ते नरोत्तम कृष्णार्जुन प्रसिद्ध आहेत. त्या वीरांपुढें तूं खद्योताप्रमाणें आहेस ! त्यांचा तूं मूर्खपणानें अपमान करूं नकोस ! हे केशवार्जुन सूर्यचंद्रांप्रमाणें महातेजस्वी आहेत. तूं त्यांच्यापुढें काजव्याप्रमाणें आहेस ! हे सूतपुत्रा, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून तूं कृष्णार्जुनांचा कधींहि तिरस्कार करूं नकोस ! ते नरसिंह महात्मे आहेत, असें समजून आत्मप्रौढी करणें सोडून दे आणि स्वस्थ रहा ! ८. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ कर्णाचें आत्मवृत्तनिवेदन. ]

(१) संजय—मद्रेश्वर शल्याचें तें अप्रिय भाषण ऐकून त्या महात्म्या कर्णाचा त्यावर किमपिहि विश्वास बसला नाहीं. तो शल्याला बोलला, "हे कृष्णार्जुन कशा प्रकारचे आहेत, तें मला पूर्ण अवगत आहे ! अर्जुनाचा सारथि श्रीकृष्ण व अर्जुन यांचीं महास्त्रें आणि बल हीं मला ज्ञात आहेत तितकीं तुला नाहींत ! शस्त्रधरांमध्यें त्या श्रेष्ठ कृष्णार्जुनांशीं मी निर्भयपणें युद्ध करीन ! परंतु त्या ब्राह्मणसत्तम परशुरामानें मला जो शाप दिला, त्यामुळें मात्र माझें चित्त अत्यंत व्याकुळ झालें आहे ! दिव्यास्त्राचे ज्ञानप्राप्तीकरितां मी पूर्वीं परशुरामाकडे ब्राह्मण आहें असें खोटें सांगून राहिलों होतों. हे शल्या, तेव्हां देवराज इंद्रानें अर्जुनाच्या कल्याणाच्या इच्छेनें मला विघ्न केलें ! इंद्रानें विद्रूप कीटकाचें रूप धारण केलें आणि माझ्या समीप येऊन गुरु परशुराम मांडीवर डोकें टेंकून निद्रित असतां ती त्यानें फोडली ! मांडी फुटल्यामुळें माझ्या शरीरांतून मोठा रक्तप्रवाह वाहूं लागला. परंतु गुरूचा निद्राभंग होईल, म्हणून मी मांडी किमपिहि ढळूं दिली नाहीं. नंतर थोड्या वेळानें तो विप्र जागा झाला. तो माझें धैर्य पाहून बोलला कीं, तूं ब्राह्मण खरोखर नाहींस तर कोण आहेस तें सांग ! तेव्हां 'मी सूत आहें' असें त्यानें सांगितलें. मी सूत आहें हें ऐकून तो क्रोधसंतप्त झाला आणि मला शाप देऊन म्हणाला कीं, 'ज्याअर्थीं तूं आपली सूत जात कळविली नाहींस, आणि हें अस्त्र मजपासून संपादन केलेंस, त्याअर्थीं याचा उपयोग करण्याचे वेळेस याचें तुला विस्मरण होईल !' ह्याचा उपयोग तुझ्या मृत्युकालींहि तुला होणार नाहीं. कारण ब्राह्मणाशिवाय ब्रह्म हें अन्यत्र स्थिर राहत नसतें ! शल्या, तें दिव्य अस्त्र आजच्या घोर व भयंकर संग्रामांत मला किमपिहि स्मरत नाहीं ! त्यामुळें समरांत सर्वशत्रुसंहारक भारतीय वीर अर्जुन ह्या सर्व क्षत्रियांचा नाश करील व मोठा भयंकर प्रसंग गुजरेल ! तथापि अशाहि स्थितींत हे शल्या, त्या असह्यविक्रमी व सत्यप्रतिज्ञ अर्जुनाला मी मृत्युमुखीं लोटीन ! शल्या, माझ्याजवळ दुसरें एक अस्त्र आहे, तें मी मोठमोठ्या शत्रूंवर फेंकीन आणि त्याच्या योगानें त्या बलवंत, प्रतापी, अस्त्रप्रवीण, अमितपराक्रमी आणि शूर धनंजयाचा रणांत वध करीन ! अगाध समुद्र अनंत प्राण्यांना आपल्या उदरांत बुडवितो, तथापि त्या अप्रमेय समुद्रालाहि त्याची

मर्यादा आहे, ती त्याला आंवरून धरिते! अर्जुनानें बाणसंघांनीं कौरववीरांचा वध केला, तरी मीहि त्याजवर बाण टाकून त्याचा प्रतिकार करीन! ज्याच्या बरोबरीचा दुसरा कोणी वीर आज पृथ्वीतलावर नाहीं, जो सुरासुरांना संग्रामांत जिंकणारा, अशा त्या श्वेतवाहन अर्जुनाबरोबर मी आज घोर युद्ध करीन! अतिअभिमानी व युद्धेच्छु अर्जुन मजवर दिव्यास्त्रांची वृष्टि करूं लागला म्हणजे मीहि त्याचें मस्तक धडापासून वेगळें करीन? त्या इंद्रसदृश अर्जुनाशीं एकरथानें युद्ध करील, असा एकहि वीरपुरुष माझ्यावांचून दिसत नाहीं.

आजच्या युद्धांत तो माझा वध करील, अथवा मी त्याचें मस्तक उडवीन! सहस्त्ररश्मि सूर्याप्रमाणें सर्व दिशा दग्ध करून टाकणाऱ्या त्या अर्जुनाला, अग्नीला पर्जन्यानें जसें शांत करावें, त्याप्रमाणें बाणांची वृष्टि करून मी शांत करीन! सर्पाप्रमाणें विषारी कुंतीपुत्रावर भल्ल बाणांची वृष्टि करून मी त्याचा आज पाडाव करीन! हिमाचलाप्रमाणें मी त्या क्रुद्ध धनंजयाची बाणवृष्टि सहन करीन! रथमार्गांमध्यें प्रवीण आणि सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ त्या अर्जुनानें मजवर केलेले बाणप्रहार मी सहन करीन! ज्या अर्जुनानें खांडवप्रस्थांत देवतांसह सर्व भूतगणांना जिंकलें, त्या रणधुरंधराशीं रणांत भिडून मी युद्ध करीन! तूं मूर्ख असल्यामुळें पांडवांचा पराक्रम मजपुढें सांगत बसला आहेस. तुझें बोलणें अप्रिय असून तूं निष्ठुर व क्षुद्र मनाचा आहेस! तूं सर्वदा क्षमाशील मनुष्यांची निंदा करीत असतोस! तुझ्यासारख्या शतावधि लोकांचा मीं वध केला असता, परंतु माझ्यामध्यें जी क्षमा वसत आहे, तीमुळें व कालाकडेहि नजर टाकून मी आज तुला क्षमा करीत आहें! हे पाप्या, पांडवांचें हित करण्याच्या उद्देशानें तूं मला अप्रिय बोललास! हे कुटिला, मी सरळपणानें वागत असतां तूं आज माझ्याशीं कपट केलेंस, आणि मित्रद्रोहहि केला आहेस!

मैत्री ही सात पावलांनीं होत असते. आज आमच्यावर मोठा दारुण प्रसंग आला आहे. कारण दुर्योधन राजा स्वतः युद्धार्थ आला आहे! त्या दुर्योधनाच्या अर्थसिद्धीकरितां मी स्वतः झटत असतां तूं मात्र त्याचें अकल्याण इच्छीत आहेस! मित्र म्हटला म्हणजे तो दुसऱ्यावर प्रेम करितो, त्याला आनंद देतो, त्याचें रक्षण करतो आणि त्याला सुखी पाहून आपणहि आनंदित होतो. शल्या, हे सर्व गुण माझ्या अंगीं आहेत व तें दुर्योधनालाहि कळत आहे. याच्या उलट जो दुसऱ्याच्या नाशास उद्युक्त होतो, त्याला सर्वदा दुःख देतो, त्याला रडायाला लावतो व सर्वप्रकारें पीडा करितो, त्याला शत्रु म्हणतात. हे सर्व

दुर्गुण तुझ्या ठिकाणीं आहेत ! शल्या, दुर्योधनाकरितां, तुझ्या आनंदाकरितां, कीर्तीकरितां, माझे कर्तव्यसिद्ध्यर्थ आणि परमेश्वरप्रीत्यर्थ मी आज कृष्णार्जुनांशीं यत्नपूर्वक युद्ध करीन ! शल्या, आज ब्राह्म, दिव्य आणि मनुष्य अशीं अस्त्रें तूं पहा ! मदोन्मत्त गज जसा दुसऱ्या उन्मत्त गजाला मारून टाकितो, त्याप्रमाणें मी त्या परमपराक्रमी अर्जुनाचा वध करीन ! आज मी त्या अर्जुनावर जयप्राप्तीकरितां ब्रह्मास्त्र टाकीन. जर तें युद्धाच्या वेळीं जमिनींत रुतलें नाहीं, तर त्या अस्त्रापासून अर्जुनाची सुटका होणें शक्य नाहीं. आज मी दंडधारी यमाला, पाशधारी वरुणाला, गदाधारी धनपति कुबेराला, वज्रधारी इंद्राला किंवा दुसऱ्या कोणत्याहि आततायी शत्रूला भिणार नाहीं ! शल्या, तसेंच पार्थ किंवा जनार्दन यांचीहि मला यत्किंचित् भीति वाटत नाहीं. कारण, ह्यांच्याबरोबर युद्धांत मला लढावयाचें आहे !

शल्या, एकदां मी माझें धनुष्य घेऊन अस्त्राभ्यासाकरितां फिरत होतों. त्यावेळीं माझे धनुष्यापासून सुटलेला एक घोररूप व भयंकर बाण अज्ञानानें निर्जन प्रदेशीं चरत असलेल्या एका ब्राह्मणाच्या होमधेनूच्या वांसराला लागला व तें त्यामुळें मेलें ! तेव्हां तो ब्राह्मण मला बोलला, "तूं प्रमत्त होऊन ज्या अर्थीं माझे होमधेनूच्या वांसराला मारलेंस, त्याअर्थीं ऐन युद्धप्रसंगीं तुझें रथचक्र भूमींत रुतेल. त्या ब्राह्मणाच्या शापवचनाची मला अद्याप फार भीति वाटत आहे ! मी त्या ब्राह्मणाला एक हजार गाई व सहाशें बैल देण्यास तयार झालों. परंतु मद्रकेश्वर शल्या, तो ब्राह्मण त्यानें संतुष्ट झाला नाहीं ! नंतर मी त्याला सातशें उत्तम गज आणि शतावधि दासदासी देण्यास सिद्ध झालों. त्यानेंहि त्याचें समाधान झालें नाहीं ! नंतर श्वेतवत्सांनीं युक्त अशा चवदा हजार कृष्णगाई देऊं लागलों; तरीहि त्या द्विजश्रेष्ठाची तृप्ति झाली नाहीं. त्यासमयीं सर्व उपभोग्य वस्तूंनीं भरलेलें माझें गृह व माझ्याजवळ जें कांहीं होतें, तें सर्व आदरपूर्वक त्या ब्राह्मणास मी देण्यास सिद्ध झालों, तरीहि तो घेईना. त्यावेळीं अत्यंत दीन होऊन मी अपराधक्षमेची याचना केली. तेव्हां तो म्हणाला, "हे सूता, मी जें एकदां बोललों, तें अन्यथा कधींहि होणार नाहीं ! अनृत भाषणानें जीवांचा नाश होऊन त्यामुळें मलाहि पाप लागेल ! धर्मरक्षणाकरितां मी असत्य भाषण कधींहि करीत नसतों. सूता, ब्राह्मणाच्या कल्याणाचे साधनाचा तूं नाश कधींहि करूं नकोस ! तुझ्या अपराधाचें फल तुला आज मिळालेंच आहे. माझें भाषण अन्यथा कर-

ण्यास ह्या जगांत कोणीहि समर्थ होणार नाहीं. म्हणून तूं आतां शापाचे परिणाम भोगण्यास तयार हो!"

शल्या, तूं जरी मला पुष्कळ टाकून बोलला आहेस, तरी तुला मी मित्रभावानें हें बोललों आहें ! तूं माझी सर्वदा निंदा करीत असतोस, हें मला ठाऊक आहे. म्हणून मी जें कांहीं आतां सांगणार आहें, तें मुकाट्यानें ऐक ! ८. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ कर्णकृत शल्यनिर्भर्त्सना. ]

( १ ) संजय—महाराजा, शल्यास याप्रमाणें निरुत्तर करून तो अरिंदम कर्ण पुनः त्यास म्हणाला, " हे शल्या, तूं जरी मला उदाहरणें देऊन पुष्कळ सांगितलेंस, तरी तुझ्या बोलण्यानें मी युद्धापासून भीतीनें कधींहि परावृत्त होणार नाहीं ! जरी इंद्रासह सर्व देव मजशीं युद्ध करण्याकरितां प्रवृत्त होऊन आले, तरीहि त्यांची मला भीति वाटणार नाहीं. तर मग कृष्णासह अर्जुनाची भीति कोठून वाटेल ? नुसत्या तुझ्या वचनानें भिणारा मी नव्हे ! तुझ्या बोलण्यानें रणांगणावर भिऊन जाणारा कोणी असेल, तर तो दुसरा कोणीतरी असेल, तो मी नव्हे ! कर्णा, तूं जे मला कठोर शब्द बोललास, त्यांवरून तुझें नीचपण मात्र उघडकीस आलें ! माझे सद्गुणांचें वर्णन करण्यास तूं असमर्थ आहेस ! दुर्मते, तुला वाटतील त्या वल्गना तूं चालविल्या आहेस ! हे मद्रकेश्वरा, कर्ण हा भयाकरितां म्हणून जन्मास आलेला नाहीं ! माझा जन्म विक्रम करून लोकांमध्यें कीर्तीला पात्र व्हावें, एवढ्याकरितां आहे ! कर्णा, तूं माझा सारथि आहेस, तूं माझा सुहृद् आहेस आणि मित्राचें–दुर्योधनाचें कार्य करण्यास मी उद्युक्त झालों आहें. या तीन कारणांनीं हे शल्या, तूं सांप्रत जीवंत आहेस ! राजा दुर्योधनाचें महत्कार्य मला पार पाडायाचें असल्यामुळेंहि शल्या, तूं आज जीवंत आहेस. शिवाय तूं जें कांहीं अप्रिय बोलशील, तें सोसून घेण्याचाहि मी करार केला आहे ! तुझ्यासारखे सहस्रावधि शल्य जरी मला येऊन मिळाले, तरी त्यांच्या साहाय्यावांचून मी शत्रूंना जिंकीन ! मित्रद्रोहापासून पाप लागत असतें आणि म्हणूनच सांप्रतकालीं तूं जीवंत आहेस. ८. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ कर्णकृत वाहीकनिर्भर्त्सना. ]

( १ ) शल्य—कर्णा, मी एकटा समरांगणावर सर्व शत्रूंना जिंकीन, म्हणून तूं जें बोललास, तो केवळ तुझा प्रलाप होय ! हजारों कर्णांच्या मदती-शिवाय मी मात्र शत्रूंना जिंकीन, ही गोष्ट खरी आहे !

संजय—धृतराष्ट्रा, याप्रमाणें शल्याचें कठोर भाषण ऐकून कर्ण द्विगुणित क्रोधाविष्ट झाला आणि शल्याला बोलला—

कर्ण—मद्रेशा शल्या, आतां तुला जें मी सांगत आहें, त्याचा लक्ष्यपूर्वक नीट विचार कर. राजा धृतराष्ट्राच्या समीप ब्राह्मणाच्या मुखानें हें मीं ऐकिलें आहे ! धृतराष्ट्राच्या वाड्यांत वेगवेगळ्या देशांचे व अनेक राजांचे इतिहास सांगण्याचा प्रघात असे. एकदां कोणी एक ब्राह्मण पूर्वींच्या गोष्टी निघाल्या असतां मद्र व वाहीक लोकांची निंदा करून बोलला, "हिमालय, गंगा, यमुना, सरस्वती आणि कुरुक्षेत्र यांपासून वेगळे राहणारे आणि सिंधु, शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा आणि वितस्था यांच्या मध्यभागीं राहणारे जे आहेत, ते वाहीक लोक होत. ते धर्मबाह्य आणि अशुचि असल्यामुळें त्यांच्याशीं कोणीं संबंध ठेवूं नये ! मला बालपणापासून जें स्मरण आहे, त्यावरून सांगतों कीं राजवाड्याजवळ एक गोवधशाळा व एक मद्यपानगृह म्हणून असावयाचेंच ! कांहीं गुप्त कामांकरितां मी वाहीक देशामध्यें राहिलों होतों. तेथें त्यांच्यांशीं माझा सहवास होऊन त्यांचे आचार मला कळून आले. शाकल नांवाचें नगर, आपगानामक नदी व जर्तिक म्हणून प्रसिद्ध असलेला वाहीकांचा प्रांत हे सर्व प्रदेश अतिनिंद्य आहेत ! येथील लोक अत्यंत शीलभ्रष्ट आहेत ! ते लोक एवढे दुराचरणी असल्यामुळें त्यांच्या देशांत कोणता विचारी मनुष्य मुहूर्तभर तरी राहील ? दुराचरणी वाहीक लोकांचें असें वर्णन त्या ब्राह्मणानें केलें. त्या लोकांच्या पापपुण्यांचा सहावा हिस्सा तूं ग्रहण करतोस. तेव्हां तूंहि तितक्या पापपुण्यांचा भागीदार आहेस, हें उघड आहे !

शल्या, याप्रमाणें त्या अविनीत वाहीकांचें असें वर्णन करून तो ब्राह्मण

आणखी काय बोलला तें ऐक! त्या [1]शाकलनगरींत नेहमीं कृष्णचतुर्दशीस रात्रौ दुंदुभि वाजवून एक राक्षसी ओरडून असें म्हणत असे कीं, 'गोमांस व गौड दारू यथेष्ट सेवन करून मी वाहीक लोकांचीं गाणीं या शाकल नगरांत केव्हां गाईन बरें!' शल्या, जे शाकल दारूनें मत्त होऊन अशीं गाणीं गात असतात, त्या नगरांत धर्म तरी कसा राहणार? ह्याशिवाय कौरवसभेंत आणखी तो ब्राह्मण काय बोलला तें ऐक! जेथें पीलुवनें आहेत, तेथें पंचनद्या वाहत असतात. शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा व वितस्था ह्या त्या पांच नद्या होत. सहावी हिमालयापासून दूर असणारी सिंधु नदी आहे. ह्यांच्या मधील प्रदेशास आरट्ट देश म्हणतात. धर्माचार नांवालाहि नसल्यामुळें तेथें कोणीं जाऊं नये! जे उपनयनादि संस्कारहीन असतात, शूद्रादिकांपासून अन्य स्त्रियांच्या ठिकाणीं जन्म घेतात व जे यज्ञादि क्रिया करीत नाहींत, अशा त्या वाहीक लोकांनीं देव, पितर व ब्राह्मण यांच्या प्रीत्यर्थ केलेलीं धर्मकृत्यें ते स्वीकारीत नाहींत, असें ऐकिवांत आहे. आणखी तो असेंहि म्हणाला कीं, हे वाहीक लोक काष्ठकुंडांतून किंवा मातीच्या भांड्यांतून जेवीत असतात. त्या भांड्यांला सक्तु किंवा मद्य यांचा जरी लेप असला, किंवा कुत्र्यानें जरी तीं भांडीं चाटलेलीं असलीं, तरी त्याचें त्यांना कांहींच वाटत नाहीं. वाहीक लोक मेंढीचें, उंटाचें व गाढवीचें दूध पितात. त्या दुधाचे घृतादि विकार हेहि वाहीक लोक भक्षण व प्राशन करितात. ते वाटेल तें अन्न खाणारे असतात, अभक्ष्य म्हणून कोणताच पदार्थ त्यांस नाहीं. जारजसंततिहि त्यांमध्यें बरीच असते. या कारणानें आरट्टदेशीय वाहीकांचा कोणींहि विद्वानानें त्यागच केला पाहिजे. यावरहि आणखी तो ब्राह्मण बोलला तें शल्या, तूं ऐक. तो म्हणाला कीं, युगंधरें [2]नगरांत दूध पिऊन, अच्युतस्थलांत वास करून आणि भूतिलयांत स्नान करून मनुष्य स्वर्गाला कसा जाईल? जेथें पर्वतापासून उगम पावलेल्या पांच नद्या

---

१ मागें ४० व्या अध्यायाप्रमाणें या अध्यायांतहि बरेच श्लोक स्त्रियांचें अनीतिकारक वर्तन दर्शविणारे आहेत. त्या श्लोकांप्रमाणें याहि श्लोकांचे भाषांतरास येथें जागा देणें प्रशस्त न वाटल्यावरून ते गाळले आहेत.

२ युगंधर नगरांत भक्ष्याभक्ष्यविचार नसतो. ते लोक अभक्ष्य भक्षण करितात. अच्युत नगरांत राहाणारे लोकांना अगम्यागमनाचा दोष वाटत नाहीं, आणि भूतिलयांत चांडाल व ब्राह्मण यांचे जलाशय एकच असतात.

वाहतात, त्या प्रदेशास आरट्टनामक वाहीक देश म्हणतात. त्या ठिकाणीं आर्यांनें दोन दिवसहि वसति करूं नये. विपाशेंत वहि आणि हीक नांवाचीं दोन पिशाचें वसतात. वाहीक ही त्या दोन पिशाचांची संतति होय. ही कांहीं प्रजापतीची सृष्टि नव्हे. त्या हीन कुलांत जन्मलेल्या लोकांना विविध धर्मांची माहिती कोठून असणार ? कारस्कर, माहिषक, कालिंग, केरल, कर्कोटक, वीरक इत्यादि दुर्धर्मी लोकांना टाळावें. याप्रकारचें भाषण तीर्थयात्रा करणारा कोणी ब्राह्मण एक रात्रभर वसतीस आला असतां त्यापाशीं एका भयंकर स्वरूपाच्या राक्षसीनें केलें. आरट्ट देशांत वाहीक तीर्थक्षेत्री ब्राह्मणाधमांची वसति फार पूर्वींपासून आहे. वेदाध्ययन किंवा यज्ञयाग यांची त्यांना किमपिहि आवड नाहीं. ते धर्मभ्रष्ट असून शूद्र पुरुषापासून अन्यजातीय स्त्रीच्या उदरीं जन्मल्यामुळें त्यांनीं दिलेलें अन्न देव घेत नाहींत ! प्रस्थल, मद्र, गांधार, आरट्ट, खश, वसाति, सिंधुसौवीर देशांतील लोक अत्यंत कुत्सित आचरणाचे असतात. ८. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ कर्ण व शल्य ह्यांनीं केलेली अन्योन्यनिर्भर्त्सना. ]

( १ ) **कर्ण**—शल्या, मी तुला फिरून सांगत आहें, त्याचा एकाग्र चित्तानें नीट विचार कर ! पूर्वीं आमच्या येथें एक ब्राह्मण अतिथि आला होता ! आमच्या येथील आचार पाहून तो संतुष्ट झाला आणि म्हणाला, " मी हिमाचलाच्या शिखरावर बरेच दिवस एकटा राहून नंतर वेगवेगळ्या धर्मांचे नानाविध देश पाहिले आहेत. परंतु येथील लोक धर्मविरुद्ध कर्माचरण करणारे नाहींत. वेदपारग ब्राह्मणांनीं जो सांगितला, तोच धर्म होय, असें येथील सर्व लोक मानतात. नाना प्रकारचे धर्म जेथें प्रचलित आहेत, अशा देशांतून फिरत असतां मी वाहीक देशांत आलों. तेथें मीं ऐकिलें कीं प्रथमतः मनुष्य ब्राह्मण असतो; नंतर क्षत्रिय, वैश्य व शूद्र होऊन शेवटीं तो वाहीक नापित होतो ! नापित झाल्यावर पुनः ब्राह्मण होतो ! अशाप्रकारें ब्राह्मण झाल्यावर तो दास होतो ! एकाच विप्रकुलांत जन्मलेले ते एक ब्राह्मण तर त्याचे बंधु वाटेल तें हीन कर्म करणारे असे निघतात. एकंदरींत गांधार, मद्रक आणि वाहीक हे अगदीं अल्पमतीचे लोक आहेत. सर्व पृथ्वी फिरून झाल्यावर मी वाहीक देशांत गेलों, तों तेथें सर्व धर्मसंकर असल्याचें मला दिसून आलें !

शल्या, तुला आणखी कांहीं सांगतों, तें ध्यानांत ठेव. वाहीकांच्या निंदेनें भरलेली ही गोष्ट मला दुसऱ्या एकानें सांगितली आहे. पूर्वी आरट्ट देशांत एक स्त्री राहत होती. चोरांनीं तिचें बळजबरीनें हरण केलें आणि त्यांनीं तिच्याशीं अनाचारानें वर्तन केलें. त्यायोगानें तिनें संतप्त होऊन त्यांस शाप दिला कीं, 'ज्या अर्थी तुम्ही माझ्या पातिव्रत्याचा नाश केला आहे, त्याअर्थी तुमच्या कुलांतील स्त्रिया यापुढें वेश्या होतील! नराधमांनो, या घोर पापापासून तुमची सुटका होणें कधींहि शक्य नाहीं,' तो आणखी पुढें असें म्हणाला कीं, "ह्यामुळेंच आरट्ट देशांतील भागिनेयास वारस हक्क प्राप्त होतो. पुत्रांना तो हक्क नाहीं. कुरु, पंचाल, शाल्व, मत्स्य, नैमिष, कोसल, काश, पौंड्र, कालिंग, मागध, चेदि हे देश मोठे भाग्यवान् असून सनातनधर्म जाणणारे आहेत. दुराचरणी लोक सर्वच आहेत, परंतु ते वाहीकांच्या इतके दुर्वर्तनी नाहींत. मद्र व पंच-नद्यांतील लोकांखेरीज मत्स्य, कुरु, पंचाल, नैमिष, चेदी इत्यादि देशांतील लोक शाश्वत धर्म जाणत असून त्याप्रमाणें वागत असतात."

शल्या, याप्रमाणें बोलून तो ब्राह्मण स्वस्थ बसला. मद्र, आरट्ट व वाहीक या देशांचा तूं राजा असल्यामुळें त्यांच्या पापपुण्याचा साहावा भाग तूं घेत असतोस; कारण तूं त्यांचें रक्षण योग्य रीतीनें करीत नसल्यामुळें सर्व ठिकाणीं होत अस-लेल्या पापाचा तूंच मालक आहेस! जो राजा प्रजांचें योग्य परिपालन करितो, तो त्यांच्या पुण्याचाहि भाग मिळवितो! तूं त्यांच्या पापांचाच भागीदार झाला आहेस! शल्या, पूर्वी सर्व देशांमध्यें शाश्वत धर्माची प्रशंसा होत असतां पांच-नदांतील धर्मलोप लक्ष्यांत आणून ब्रह्मदेवानें त्यांचा धिक्कार केला! कृतयुगांत देखील पांचनदांतील लोक धर्मबाह्य आचरण करणारे होते. ब्रह्मदेवानेंहि ज्या धर्मांचा धिक्कार केला, त्याचा पुरस्कर्ता तूं आहेस. तेव्हां तूं धर्मोपदेश करण्यास पात्र कसा होशील? शल्या, ह्याप्रमाणें पांचनदांतील लोकांच्या धर्मांची ब्रह्म-देवानें अवहेलना केली. पृथ्वीवरील सर्व धर्म यथास्थित चालले असतां ब्रह्म-देवानें पंचनदांची दुःस्थिति पाहून निंदा केली! शल्या, मी तुला आणखी थोडी हकीकत सांगतों, ती ऐकून घे.

शल्या, कल्माषपाद नांवाचा राक्षस सरोवरांत बुडत असतां म्हणाला, "भिक्षा मागणें हें जसें क्षत्रियाला लांछनास्पद आहे, तसेंच व्रतादिकांचा त्याग करणें हें ब्राह्मणाला लांछनास्पद आहे! वाहीक लोक पृथ्वीतलाला लांछनास्पद

आहेत, तशा मद्रस्त्रिया सर्व स्त्रीजातीला लांछनास्पद आहेत." त्या कल्माष्पाद राक्षसाला कोणी राजानें वर काढिलें व विचारिलें, तेव्हां तो म्हणाला, "पंचाल देशांतील लोक वेदांना, कौरवेय धर्माला, मत्स्य सत्याला आणि शूरसेन यज्ञांना फार मान देणारे आहेत. प्राच्य लोक शूद्रधर्मी, तसेच दाक्षिणात्य लोक धर्मद्रोही आहेत, वाहीक चौर्यवृत्ति करणारे आणि सुराष्ट्रांतील लोक संकरवृत्तीचे आहेत. कृतघ्नता, परवित्तापहार, मद्यपान, गुरुपत्नीगमन, वाक्पारुष्य, गोवध, रात्रिचर्या, बहिर्गेह व परवस्त्रोपभोग हाच ज्यांचा धर्म त्यांना अधर्म कोणताच नाहीं. अशा त्या आरट्ट व पांचनद देशांतील लोकांना धिक्कार असो!"

शल्या, पांचाल, कुरु, नैमिष आणि मत्स्य ह्या देशांतील लोकांना धर्मज्ञान आहे. उदीच्य, आंगक आणि मागध लोक हे स्वतः धर्मज्ञ नाहींत, तरीहि पूर्वीपासून चालत आलेल्या सनातन धर्माप्रमाणें वागणारे आहेत. अग्न्यादिक देवांनीं पूर्वदिशेचा आश्रय केला आहे. पुण्यकर्मे करणाऱ्या यमानें प्रतिपालित दक्षिण दिशेचा आश्रय पितरांनीं केला आहे. सुरांचा बलवान् पालक वरुण हा प्रतीची (पश्चिमे) चें पालन करीत असतो. भगवान् सोम ब्राह्मणांसह उत्तर दिशेचें रक्षण करितो. राक्षस आणि पिशाच्च हे नगोत्तम हिमालयाचें संरक्षण करितात. गुह्यक हे गंधमादन पर्वताचें संरक्षण करितात. भगवान् विष्णु सर्व भूतांचें प्रतिपालन करीत असतो, त्याअर्थीं तो वाहीकांचेंहि रक्षण करितो. वाहीकांची संरक्षक अशी देवता नाहीं. वाहीकांना कोणी हितप्रद गोष्ट सांगितली असतां ती त्यांना प्रतिकूल वाटते. मद्रकांचीहि तशीच स्थिति आहे. शल्या, तूंहि अशाच प्रकारचा आहेस. तूं ह्याला उत्तर काय देणार आहेस? पृथ्वीवरील सर्व देशांना मद्रक हे लांच्छनास्पद आहेत. मद्यपान, भ्रूणहत्या, इत्यादि अधर्म्य गोष्टी जे धर्म समजतात, त्या आरट्ट व पांचनदीय लोकांचा धिक्कार असो. हें जाणून तूं स्वस्थ बसून रहा. उलट बोलूं नकोस! तुझा वध करून मग कृष्णार्जुनांचा वध करण्याचा प्रसंग आणूं नकोस!

शल्य—कर्णा, ज्या अंगदेशाचा तूं अधिपति आहेस, तेथें दुःखितांचा त्याग आणि स्वस्त्री व पुत्र यांचा विक्रय करणें ह्या गोष्टी प्रचलित आहेत. रथ आणि अतिरथ ह्यांसंबंधीं सांगत असतां भीष्म तुला जें कांहीं बोलला, त्याचा नीट विचार कर, आपले दोष लक्ष्यांत आण आणि क्रोध सोडून दे. कर्णा, सर्वत्र

सच्छील ब्राह्मण, सच्छील क्षत्रिय, तसेच सद्वर्तनी वैश्य व शूद्र आणि सुव्रत व साध्वी स्त्रिया आहेत. मंडळींत दुसऱ्यांची निंदा करून आनंद पावणारे, परस्परांना पीडा देणारे व विषयोपभोगांत दंग होणारे लोक देशोदेशीं आहेत. दुसऱ्याचे दोष काढण्यांत सर्व लोक सर्वदा निपुण असतात. स्वतःचे दोष कोणालाच समजत नाहींत आणि समजले तरी त्याचें कांहीं वाटत नाहीं. आपापल्या धर्माला अनुसरून वागणारे आणि दुराचारी लोकांचा निग्रह करणारे राजे सर्वत्र आहेत. तसेच धार्मिक वृत्तीचे लोकहि ठिकठिकाणीं आहेत. कर्णा, देशांतील सर्वच लोक दुराचारी आहेत, असें कोठेंहि दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. आपल्या वर्तनानें देवांपेक्षांहि श्रेष्ठ असे सत्पुरुष ठिकठिकाणीं आहेत.

संजय—धृतराष्ट्रा, नंतर दुर्योधन राजानें मित्रभावानें कर्णाला सांगून आणि हात जोडून शल्याची प्रार्थना करून दोघांची समजूत घातली आणि त्यांचा कलह मिटविला. नंतर कर्ण कांहींएक बोलला नाहीं आणि शल्य शत्रूच्या अभिमुख निघाला. कर्णालाहि परम आनंद झाला आणि त्यानें ' शल्या, शत्रूकडे रथ शीघ्र चालव ' म्हणून त्याला सांगितलें. ८. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ व्यूहरचना. २ शल्याकडून पांडवसैन्याची प्रशंसा व कर्णाचा धिक्कार. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, नंतर शत्रुसैन्याला दुर्भेद्य असा अप्रतिम व्यूह पांडवांनीं रचला असून त्याचें रक्षण धृष्टद्युम्न करीत आहे, असें कर्णानें पाहिलें आणि रथघोष चालला आहे, रणवाद्यें वाजत आहेत आणि सर्वत्र सिंहनाद होत आहेत, अशा स्थितींत कर्ण जणुंकाय पृथ्वी कांपवीत पांडवांवर धांवून गेला. हे भरतर्षभा, कर्णानें क्रोधाविष्ट होऊन पांडवांच्या व्यूहाचा भेद करणारा दुसरा व्यूह रचला आणि आसुरी सेनेचा जसा इंद्रानें संहार केला, त्याप्रमाणें पराक्रमी कर्णानें पांडवसैन्याला जर्जर करून सोडलें, युधिष्ठिरावर बाणवृष्टि केली आणि त्याला डाव्या बाजूला घातलें !

धृतराष्ट्र—संजया, कर्णानें व्यूह रचला तो कसा होता ? पांडवांचा व्यूह देवांनाहि अजय्य जे महाधनुर्धर धृष्टद्युम्नादिक योद्धे व भीमसेनादिक पांडव यांजकडून रक्षण केलेला असून कर्ण तो व्यूह भेदण्यास समर्थ कसा झाला ? कर्णानें आपल्या सैन्याचे पक्ष आणि प्रपक्ष कसे केले ? नंतर त्या सैन्याची विभा-

गणी करून वीर युद्धांत कसे उभे राहिले ? पांडवांनींहि माझ्या पुत्रांच्या विरुद्ध युद्धरचना कशी केली होती ? आणि पुढें महाघोर आणि भयंकर युद्ध प्रवृत्त झालें तें कसें ? कर्ण युधिष्ठिरावर चालून गेला, तेव्हां अर्जुन कोठें होता ? अर्जुन समीप असतां युधिष्ठिरावर चालून जाण्यास कोण शक्त होता ? ज्या एकट्यानें पूर्वी खांडववनांत सर्व प्राण्यांना जिंकिलें, त्या अर्जुनाशीं युद्ध करून जीवंत राहण्याची इच्छा करणारा राधेयाशिवाय दुसरा कोण होता ?

संजय—धृतराष्ट्रा, व्यूहरचना कशी केली होती, अर्जुन कसा आला आणि आपापल्या राजासभोंवतीं उभें राहून सैनिकांनीं युद्ध कसें केलें, तें मी सांगतों. हे राजा, शारद्वत कृपाचार्य, वेगवान् मागध आणि सात्वत कृतवर्मा यांनीं उजव्या बाजूचा आश्रय केला. त्यांच्या प्रपक्षामध्यें शकुनि, महारथ उलूक हातांत प्रास घेऊन सज्ज झालेल्या सादींसह तुझ्या सैन्याचें रक्षण करीत होते. तसेच शलभांप्रमाणें अमर्याद पर्वतीय सैनिकहि जमले होते. ते युद्धांत अजिंक्य असून त्यांचें स्वरूप पिशाचांप्रमाणें भयंकर होतें. संग्रामांत कधींहि मागें न फिरणारे असे युद्धप्रवीण संशप्तकांचे चोवीस हजार रथ डाव्या बाजूचें रक्षण करीत होते. तुझे पुत्र त्या महारथ्यांस घेऊन कृष्णार्जुनांच्या वधास सज्ज झाले होते. त्यांच्या प्रपक्षांत कांबोज, शक आणि यवन हे होते. कर्णाच्या आज्ञेवरून ते योद्धे रथांत बसून अश्वसादींसह अर्जुन व महाबल श्रीकृष्ण यांस युद्धार्थ आह्वान करीत होते.

मध्यभागीं कर्ण हा अंगांत कवच घालून आणि अंगद व माला धारण करून सैन्याच्या अग्रभागाचें रक्षण करीत होता. त्याचे क्षुब्ध झालेले पुत्र त्यासभोंवतीं उभे होते. सूर्य किंवा अग्नि यांप्रमाणें तेजस्वी दुःशासन मोठ्या गजस्कंधावर आरूढ होऊन आपल्या सैन्यासह पृष्ठभागाचें रक्षण करीत होता. त्याचे नेत्र पिंगट असून रूप मोठें आल्हादजनक होतें. हे महाराजा, त्या दुःशासनाच्या मागें राजा दुर्योधन स्वतः होता. त्याचें रक्षण विचित्र अस्त्रें व कवचें धारण करणारे त्याचे बंधु आणि महावीर्यवान् भद्रक व केकयवीर करीत होते. तेव्हां तो देवपरिवेष्टित इंद्राप्रमाणें शोभत होता. रथसैन्याच्या पृष्ठभागीं अश्वत्थामा व कौरवांकडील प्रमुख वीर आणि मदोन्मत्त गज असून त्यांच्या सभोंवतीं शूर म्लेच्छ होते. ते जलवृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें मदवृष्टि करीत होते. त्या गजांवर ध्वजपताका फडकत असून त्यांवर आरूढ झालेल्या वीरांच्या

हातांत मोठमोठीं आयुधें होतीं. त्यायोगानें ते द्रुमवंत पर्वतांप्रमाणें शोभत होते. त्या व्यूहाला अश्व, स्यंदन आणि नाग ह्या तीन अंगांनीं विशेष शोभा आली होती आणि तो देव किंवा असुर यांच्या सैन्याप्रमाणें शोभत होता. बृहस्पतीच्या संमतीनें रचलेला तो व्यूह नाचतच आहे कीं काय असें वाटत होतें. त्याजकडे पाहून शत्रुसैन्याला मोठी भीति वाटत असे. त्या सैन्याच्या मुखभागीं कर्णाला पाहून युधिष्ठिर राजा शत्रुसंहारक अर्जुनाला म्हणाला "अर्जुना, रणांगणावर कर्णानें रचलेला सैन्याचा व्यूह पहा ! पक्षप्रपक्षांनीं युक्त ही सेना मोठी पराक्रमी दिसत आहे. ह्या अमर्याद सेनेकडून आमचा पराभव होणार नाहीं, असा कांहीं उपाय योज !" युधिष्ठिराचें भाषण ऐकून अर्जुनानें हात जोडले आणि म्हटलें, "धर्मा, तूं म्हणतोस, तें सर्व खरें आहे. त्या व्यूहाच्या नाशासाठीं जें विहित आहे, तें सर्व मी करीन. ह्याच्या नाशास्तव प्रथमतः प्रधान पुरुषांचा वध करणें इष्ट आहे. म्हणून त्यांचाच वध मी आधीं करीन !"

युधिष्ठिर—अर्जुना, असें आहे तर तूं राधेयावर, भीमसेनानें दुर्योधनावर, नकुलानें वृषसेनावर, सहदेवानें सौबल शकुनीवर, शतानीकानें दुःशासनावर, सात्यकीनें हार्दिक्यावर, धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्यावर आणि मी कृपाचार्यावर चाल करून जावें. शिखंडीसह द्रौपदेयांनीं अवशिष्ट धार्तराष्ट्रांवर चालून जावें !

संजय—धर्मराजाचें हें भाषण ऐकून अर्जुनानें 'ठीक आहे' असें उत्तर दिलें आणि आपल्या सैन्यास शत्रूवर चालून जाण्यास आज्ञा दिली आणि आपण स्वतः सैन्याच्या अग्रभागीं गेला. जो सर्व विश्वाचा नेता अग्नि तो प्रजापतीच्या मुखापासून उत्पन्न झाला असल्यामुळें ब्रह्म (ब्राह्मण), तोच पुढें इंदु अर्थात् जलाधीश सोमरस झाला, तोच पुढें अश्वरूप झाला. तो रथ म्हणजे आद्य अग्निच होय. त्यानें आपली शक्ति विभागून चार रूपें धारण केलीं. आणि ब्रह्मा, ईशान, इंद्र व वरुण यांस वाहून नेलें. अशा त्या आद्य रथांत बसून कृष्णार्जुन कर्णावर धांवून आले. तेव्हां तो अद्भुतदर्शन रथ येत असल्याचें पाहून शल्य त्या कर्णाला बोलला "कर्णा, हा त्या श्वेताश्व अर्जुनाचा रथ आला पहा ! ह्यावर कृष्ण सारथि आहे ! ह्याचें निवारण करणें कर्माच्या फलाप्रमाणें तुझ्या सर्व सैन्याला कठीण आहे ! हे कर्णा, ज्याचा तूं आतांपर्यंत शोध करीत आहेस, तो हा अर्जुन सर्व शत्रूंचा संहार करीत येत आहे ! मेघगर्जनेप्रमाणें त्याचा तुमुल शब्द कानीं पडत आहे ! खरोखर हेच वासुदेव आणि धनंजय असले पाहिजेत. ही धूळ

उडून तिनें आकाश अगदीं व्यापून टाकिलें आहे, चक्रनेमीनें भिन्न होऊनही पृथ्वी जणुंकाय कांपत आहे! तुझ्या सैन्याच्या सभोंवतीं हा भयंकर वारा सुटला आहे पहा! हिंस्र पशु मोठ्यानें आरोळ्या ठोकीत आहेत आणि मृग दीनपणें आक्रोश करीत आहेत! हा पहा केतु मेघासमान सूर्याला आच्छादून राहिला आहे. त्याचप्रमाणें सर्व दिशांना नानाविध पशूंचे गण व मदोन्मत्त शार्दूल सूर्याकडे लक्ष्य लावून राहिले आहेत. हे सहस्रशः गिधाड आणि कंकपक्षी एकत्र जमून राहिले आहेत पहा! ते पक्षी एकमेकांशीं बोलतच आहेत असें वाटतें!

( २ ) हे कर्णा, तुझ्या मोठ्या रथावरील चामरें जळत आहेत व ध्वजहि कांपूं लागला आहे! तुझे हे महाकाय व वेगवान् अश्व कांपूं लागले आहेत. हे अश्व म्हणजे आकाशांत उडून जाणारे गरुडपक्षीच होत! ह्या दुश्चिह्नांवरून शेंकडों हजारों राजे आज रणांत मरून पडतील, असें वाटत आहे. अंगावर कांटा उभा करणारा हा शंखध्वनि ऐकूं येत आहे पहा! हे राधेया, आनकांचा, मृदंगांचा, नानाविध बाणांचा, मनुष्यें, अश्व आणि गज ह्यांचा आणि प्रत्यंचांचा शब्द सर्व दिशा व्यापून टाकीत आहे पहा! कर्णा, महान् वीरांच्या रथांवर भरजरी वस्त्रांच्या वेगवेगळ्या रंगांच्या पताका फडकत आहेत. त्यांवर सोन्याचे चंद्र, सूर्य आणि तारे काढले असून त्यांस घागऱ्या लावल्या आहेत. त्या पताका वाऱ्यानें हालत असून मेघपटलावर चकाकणाऱ्या विजेप्रमाणें शोभत आहेत. वाऱ्यानें फडफड करणारे हे ध्वज पहा! आकाशांतील देवांच्या विमानांप्रमाणें हे रथावर शोभत आहेत. महात्म्या पांचालांचे हे सपताक रथ पहा! हा कुंती-पुत्र अर्जुन तुझ्यावर चाल करून येत आहे पहा! त्याच्या रथाचे ध्वजाग्रावर भयंकर कपि बसला असून तो शत्रूंचीं दुःखें वाढविणारा आहे. हें त्या बुद्धिमान् कृष्णाचें चक्र, ही गदा, हें शार्ङ्ग, हा शंख पहा! ह्या कृष्णाच्या शरीरावर अत्यंत शोभणारा हा कौस्तुभमणि पहा! हा पहा शार्ङ्ग-गदाधर कृष्ण वायुवेगानें शुभ्र अश्वांना चालवीत येत आहे! कर्णा, सव्यसाची अर्जुनाच्या गांडीव धनुष्याच्या प्रत्यंचेचा नाद ऐकूं येत आहे पहा! हे पहा अर्जुनाचे तीक्ष्ण बाण शत्रूंचा नाश करीत आहेत!

समरांत माघार न घेणाऱ्या राजांच्या मस्तकांनीं व्याप्त झालेली ही समरभूमि पहा! त्यांचीं मस्तकें विशाल, दीर्घ आणि आरक्त नयनांनीं युक्त

असून त्यांचीं मुखें पूर्णेंदूप्रमाणें शोभणारीं आहेत! हे वीरांचे सुवासिक तैलानें अवलिप्त परिघाकार बाहु आयुधांसह छिन्न झाले आहेत पहा! तसेच कित्येक अश्व व अश्वसादी नेत्र व जिह्वा नष्ट होऊन समरभूमीवर विव्हळत पडले आहेत, ते पहा! हे पहा अर्जुनानें मारलेले महागज प्रचंड पर्वतशिखरांप्रमाणें कोसळून भूमीवर पडत आहेत! मोठमोठे राजे वध पावून त्यांचे गंधर्वनगरांसारखे रथ पडतांना पाहून हीं क्षीणपुण्य स्वर्गीयांचीं विमानेंच पडत आहेत कीं काय, असा भास होतो! ह्या किरीटीनें तुझे सैन्याला अगदीं व्याकुल करून सोडलें आहे. त्याची स्थिति पाहून अरण्यांत सिंहानें सहस्रावधि व्याकुलित केलेल्या मृगांच्या कळपाची आठवण होते! हें तुझें चतुरंग सैन्य पांडवांनीं कसें व्याकुळ करून सोडलें आहे पहा! मेघांनीं व्याप्त झालेल्या सूर्याप्रमाणें हा अर्जुन आतां दिसत नाहीं! त्याचें ध्वजाग्र मात्र दिसत आहे आणि त्याच्या प्रत्यंचेचा शब्द ऐकूं येत आहे! ज्याची तूं चौकशी करीत आहेस, तो कृष्णसारथि श्वेताश्व अर्जुन आतां लवकरच रणांगणांत शत्रूंचा संहार करीत असतांना तुला दिसेल! आज तुला ते दोघे रक्तनेत्र पुरुषव्याघ्र कृष्णार्जुन एका रथांत बसलेले दिसतील! ज्याचा सारथि श्रीकृष्ण आहे, गांडीव ज्याचें धनुष्य आहे, हे राधेया, त्याचा जर तूं वध करशील, तर तूं आमचा राजा होशील. संशप्तकांनीं अर्जुनाला युद्धार्थ आह्वान केल्यामुळें तो त्यांजवर चालून गेला आहे व त्या शत्रूंचें तो चांगलेंच कंदन करीत आहे!"

असें शल्याचें भाषण ऐकून कर्ण क्रोधातिरेकानें बोलला, "अरे शल्या, हा पहा अर्जुन त्या क्रुद्ध संशप्तकांनीं चारी बाजूंनीं कसा वेष्टून टाकिला आहे? मेघाच्छादित सूर्यासारखा हा दिसेनासा झाला. शल्या, हा अर्जुन आज खरोखर वीरसागरांत बुडून गेला आहे!"

शल्य—वरुणाला कोण बरें उदकानें मारणार? अग्नीला इंधनानें कोण मारूं शकणार? वायूला कोण निग्रहण करूं शकेल? महार्णवाला पिऊन टाकील असा कोण आहे? पार्थाबरोबर समरांत युद्धार्थ उभें रहाणें म्हणजे अशा प्रकारचें आहे! इंद्र जरी सुरासुरांना घेऊन आला तरी त्यालाहि अर्जुनाला जिंकतां येणार नाहीं. असें बोलण्यानें जर तुला आनंद होत असेल तर खुशाल बोल, पण तो तुला जिंकतां येणें शक्य नाहीं. तूं दुसरा कांहींतरी मनोरथ कर! जो अर्जुनाला समरांत जिंकील, तो आपल्या बाहुबलानें

समग्र पृथ्वीला जिंकील किंवा क्रोधानें ह्या सर्व प्रजा जाळून टाकील. जो समरांगणीं अर्जुनाला जिंकील, तो स्वर्गापासून देवांना खालीं पाडील ! पहा, हा महाबाहु भीमसेन जणुंकाय दुसऱ्या मेरु पर्वतावरच उभा आहे ! हा सदोदित क्षुब्ध असून वैराचें स्मरण करीत असतो ! जयाची इच्छा करणारा हा वीर्यवान् भीमसेन युद्धार्थ उभा आहे पहा ! धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ हा धर्मराज युधिष्ठिर; ह्याचा युद्धांत पराभव करणें म्हणजे अत्यंत कठीण काम आहे. हे दोघे बंधु नकुल-सहदेव पहा, हे पुरुषव्याघ्र अश्विनीकुमारांप्रमाणें शोभत आहेत. हेहि समरांत दुर्जय आहेत. हे पांच पर्वतांप्रमाणें पांच द्रौपदेय पहा ! सर्व अर्जुनाप्रमाणेंच युद्धाकरितां सज्ज होऊन राहिले आहेत ! तसेच हे धृष्टद्युम्नादि द्रुपदपुत्र पहा ! हे मोठे तेजस्वी आणि महापराक्रमी आहेत ! सात्वतांमध्यें श्रेष्ठ व इंद्राप्रमाणें शत्रूंना असह्य हा सात्यकि पहा ! हा आपल्यावर क्रुद्ध यमासारखा चालून येत आहे पहा ! ह्याप्रमाणें पुरुषसिंह कर्ण व शल्य यांचें भाषण चाललें आहे, तों तीं सैन्यें गंगा-यमुनांप्रमाणें एकरूप झालीं. ८. ४६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ संकुलयुद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, तीं दोन्ही व्यूह करून राहिलेलीं सैन्यें एकमेकांत मिसळून गेल्यावर संशप्तकांवर पार्थ आणि पांडवांवर कर्ण कसा चालून गेला, तें मला सविस्तर सांग. तूं सांगण्यांत मोठा कुशल आहेस, म्हणून मी विचारतों. वीरांचे पराक्रम ऐकून माझी कधींच तृप्ति होत नाहीं !

( २ ) संजय—आपल्यासमोर शत्रूंचें मोठें सैन्य उभें असल्याचें पाहून अर्जुनानें आपल्या सैन्याचा व्यूह रचला. तुझ्या पुत्राची दुर्नीति हीच ह्या युद्धाचें कारण आहे. ह्या युद्धांत सर्व चतुरंग सैन्य सिद्ध असून त्यावर धृष्टद्युम्नाची योजना केली आहे. त्याच्या रथाच्या अश्वांचा वर्ण पारावतांप्रमाणें असून त्या धृष्टद्युम्नाची कांति चंद्रसूर्यांप्रमाणें होती. तो धनुष्य घेऊन उभा असतां प्रत्यक्ष देहधारी कालच पुढें उभा आहे, असा शोभत असतो. युद्धोत्सुक सर्व द्रौपदीपुत्र त्याचें चारी बाजूंनीं संरक्षण करीत होते. त्यांच्या अंगांत दिव्य कवचें व हातांत श्रेष्ठ आयुधें होतीं. त्याचा पराक्रम शार्दूलांसारखा होता. त्यांबरोबर त्यांचे अनुचरहि असून त्यांचीं शरीरें दिव्य होतीं. त्यामुळें तारकांनीं वेष्टित चंद्र जसा शोभतो,

तसा तो धृष्टद्युम्न शोभत होता. नंतर संशप्तकांना आपल्यापुढें युद्धांत सज्ज झालेले पाहून अर्जुन क्रोधाविष्ट झाला आणि आपल्या गांडीवानें बाणवृष्टि करीत तो त्यांवर धांवून आला. संशप्तकहि पांडवांच्या वधाची इच्छा करून त्यांवर चालून आले. संशप्तक हे विजयाच्या दृढनिश्चयानें युद्धार्थ आले होते. युद्धांत मृत्यु आला, तरी माघार घ्यावयाची नाहीं असा त्यांनीं संकल्प केला होता. त्यांच्या सैन्यांत नर, अश्व, गज आणि रथ यांची विपुलता असून सेनापति व शूर वीरहि अनेक होते. अर्जुनावर बाणवृष्टि करून त्यांनीं त्याला जर्जर केलें. त्यांचें व अर्जुनाचें तुमुल युद्ध झालें. अशा प्रकारचें अर्जुनाचें युद्ध निवातकवचांशीं मात्र झालें होतें. त्याशिवाय दुसऱ्या कोठें झाल्याचें आमच्या ऐकण्यांत नाहीं!

त्या युद्धांत पार्थानें शत्रूचे रथ, अश्व, ध्वज, गज, पदाति, बाण, धनुष्यें, खड्ग, चक्रें, कुऱ्हाडी, सायुध उभारलेले बाहु, विविध प्रकारचीं आयुधें आणि सहस्रशः शत्रुमस्तकें तोडून टाकिलीं! अर्जुनाचा रथ सैन्यमहावर्तामध्यें सांपडून पाताळाशीं गेल्याचें त्या संशप्तकांना वाटलें व त्यांनीं आपला विजय झाल्याचें मानून मोठ्या आनंदानें गर्जना केली. इकडे अर्जुनानें आपल्या पुढील, उजवीकडचे, डावीकडचे आणि पृष्ठभागाकडील शत्रुरूप पशूंचा क्रुद्ध रुद्राप्रमाणें वध केला! नंतर पांचाल, चेदी आणि सृंजय यांचें तुमच्या सैन्याशीं मोठें तुमुल युद्ध झालें. कृप, कृतवर्मा आणि सौबल शकुनि हे पांडवांच्या सैन्यावर प्रहार करण्याविषयीं उत्सुक झालेल्या आपल्या सैन्यासह कोशल, काश्य, मत्स्य, कारूष, केकय आणि शूरसेन यांवर धांवून गेले! त्यांचें तें युद्ध अत्यंत प्राणहारक होऊन त्यांत पुष्कळ क्षत्रिय, वैश्य आणि शूर योद्धे पतन पावले. त्यांचे देह, पाप आणि प्राण यांचा नाश होऊन त्यांस पुण्य व कीर्ति यांची प्राप्ति झाली आणि ते स्वर्गाला गेले! हे भरतर्षभा, पांचाल, पांडव, चेदी आणि सात्यक यांजबरोबर कर्ण युद्ध करीत असतां आपले बंधु, कौरवांचे महावीर आणि मद्रकांचे महारथ यांसह दुर्योधन राजा कर्णाचें साहाय्य व रक्षण करीत होता. तेव्हां कर्णानें मोठी बाणवृष्टि करून पांडवांच्या महासेनेचा वध केला, मोठमोठ्या रथिश्रेष्ठांना जर्जर केलें आणि राजा युधिष्ठिरालाहि व्याकुळ केलें! आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्यानें हजारों शत्रूंना वस्त्रहीन, आयुधहीन आणि प्राणहीनहि केलें! अशारीतीनें त्यानें स्वर्ग व कीर्ति मिळवून कौरवसैन्यांत सर्वत्र आनंद करून सोडला! धृतराष्ट्रा,

याप्रमाणें नर, अश्व आणि गज यांचा क्षय करणारा हा कुरु व सृंजय यांमधील संग्राम म्हणजे देवासुरांच्या संग्रामासारखाच भयंकर होता! ८. ४७.

## अध्याय ४८ वा.

[ १ धृतराष्ट्राच्या प्रश्नावरून संजय संकुलयुद्ध वर्णन करितो. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, कर्ण पांडवांच्या सैन्यांत प्रवेश करून जनक्षय करीत असतां दुर्योधनाची त्याची भेट होऊन त्यानें पुढें काय केलें, तें मला सांग! पार्थांचे कोणकोण प्रमुख वीर कर्णाचा प्रतिकार करीत होते आणि कर्णानें कोणत्या पांडव वीरांचें कंदन करून युधिष्ठिराला बाणांनीं जर्जर केलें तें मला सांग!

संजय—धृष्टद्युम्नप्रमुख पांडव वीर व्यवस्थित रीतीनें युद्धार्थ सज्ज असल्याचें पाहून कर्णानें त्या शत्रुकर्षक पांचालांवर त्वरित चाल केली. कर्ण आपल्यावर धांवून येत असल्याचें पाहून हंस जसे महार्णवाकडे मोठ्या आनंदानें जातात, त्याप्रमाणें ते पांचाल कर्णावर धांवून आले. नंतर हजारों शंखांचा हृदयंगम ध्वनि दोन्ही दळांतून निघूं लागला. त्यांबरोबरच दुंदुभि, बाणाघात, गज, अश्व व रथ यांचा निस्वन, तसाच वीरांचा भयंकर सिंहनाद होऊं लागला. त्यासमयीं पर्वत, वृक्ष आणि अर्णव यांसह सर्व भूमि, वायु आणि मेघ यांसह सर्व आकाश आणि सूर्य, चंद्र, ग्रह आणि नक्षत्रें यांसह सर्व अंतरिक्ष भीतीनें कांपूं लागलें. सर्व प्राणी व्यथित झाले. अल्प धैर्याचे प्राण्यांनीं तत्काल प्राण सोडले! हें पाहून कर्ण अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्यानें आपलें शस्त्र घेऊन इंद्रानें जसा आसुरी सेनेचा विध्वंस केला, त्याप्रमाणें पांडवसेनेचा भयंकर संहार केला! पांडवसेनेंत प्रवेश करून त्या कर्णानें तिजवर बाणवृष्टि केली आणि सत्याहत्तर प्रमुख प्रभद्रकांचा वध केला! नंतर पंचवीस तीक्ष्ण सुपुंख शर पंचवीस पांचालांवर टाकून त्यांना मारलें आणि परकायविदारक सुपुंख नाराचांनीं शेंकडो हजारों चेदींना यमलोकीं पाठविलें! अशाप्रकारें कर्ण समरांत अमानुष पराक्रम करीत असतां पांचालांच्या रथसमुदायांनीं त्याला वेढिलें! तेव्हां कर्णानें पांच बाण मारून भानुदेव, चित्रसेन, सेनाबिंदु, तपन व शूरसेन ह्या पांचालवीरांचा वध केला! पांचालवीरांचा वध झालेला पाहून त्या महारणांत पांचालांमध्यें मोठा हाहाकार झाला. नंतर पांचालांच्या दहा रथांनीं

कर्णाला पुनः वेष्टिलें असतां कर्णानें बाणांनीं त्यांचा संहार केला ! कर्णाचे रथचक्रांचे रक्षक सुषेण आणि सत्यसेन नांवाचे दोन कर्णपुत्र प्राणांचीहि पर्वा न करितां युद्धास उभे राहिले ! तसाच कर्णाचा पृष्ठरक्षक त्याचा वडील पुत्र महा-रथ वृषसेन कर्णाच्या पृष्ठभागीं उभा राहून त्याचें संरक्षण करूं लागला !

ह्याप्रमाणें कर्ण पांडवसेनेचा संहार करीत आहे, इतक्यांत धृष्टद्युम्न, सात्यकि, द्रौपदेय, भीम, जनमेजय, शिखंडी, प्रमुख प्रभद्रक वीर, चेदि, केकय, पांचाल, नकुल—सहदेव हे सर्व अंगांत कवचें घालून कर्णाचा वध करण्याच्या इच्छेनें त्याजवर धांवून गेले आणि वर्षाकालांतील पर्वतावरील मेघवृष्टीप्रमाणें त्यांनीं कर्णावर नाना प्रकारच्या शस्त्रांनीं प्रहार केले व बाणवृष्टीहि केली ! त्यावेळीं पित्याचे रक्षणाकरितां कर्णाचे पुत्र व तुझे दुसरे वीर यांनीं त्या वीरांचें निवारण केलें. भीमसेनाचें धनुष्य सुषेणानें भल्लानें छेदून टाकलें आणि सात नाराच त्याच्या वक्षःस्थलावर मारून मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां त्या भीमविक्रमी भीमसेनानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तें सज्ज करून सुषेणाच्या धनुष्याचा भंग केला आणि त्यावर दहा बाण टाकले. बाणवर्षाव करीत असतांना भीमसेन जणुंकाय नृत्यच करीत आहे, असें वाटलें ! त्यावेळीं भीमानें कर्णाला त्र्याहत्तर तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें आणि भानुसेननामक त्याच्या पुत्रावर दहा बाण टाकून त्याचे अश्व, सारथि, आयुधें आणि ध्वज यांसह त्याचा शिरच्छेद केला व त्यास त्याचे सुहृदांसमोर जमिनीवर पाडलें ! तेव्हां त्याचें तें सुंदर मुखक-मल नालापासून खुडलेल्या कमलाप्रमाणें भासत होतें. भीमानें कर्णसुताचा वध केल्यावर तो पुनः तुझ्या सैन्यावर चालून आला आणि कृप व हार्दिक्य यांचीं धनुष्यें छेदून त्यांना पीडा देऊं लागला ! तीन बाणांनीं दुःशासनाला आणि सहा बाणांनीं शकुनीला विद्ध करून उलूक आणि पतत्रि यांना त्यानें विरथ केलें. नंतर सुषेणावर बाणवर्षाव करून 'हा पहा तूं आतां मेलास' अशी त्यानें मोठ्यानें गर्जना केली !

हे राजन्, इतक्यांत कर्णानें त्याचें धनुष्य छेदून त्यावर तीन बाण टाकले. तेव्हां भीमसेनानें दुसरें धनुष्य घेऊन सुषेणावर पुनः बाणवृष्टि केली. कर्णानें या वेळींहि तें भीमाचें धनुष्य तोडून टाकलें ! आपल्या पुत्राचें रक्षण व भीमाचा वध करण्याच्या हेतूनें कर्णानें पुनः त्र्याहत्तर बाण भीमावर मारले ! सुषेणानेंहि भारक्षम दुसरें बळकट धनुष्य घेतलें आणि नकुलाच्या बाहूंवर

आणि उरःस्थळावर पांच बाण मारले! त्यावर नकुलानें वीस बळकट बाणांनीं त्याला विद्ध केलें आणि कर्णालाहि भीति वाटेल, एवढ्या मोठ्यानें गर्जना केली. सुषेणानें दहा बाण टाकून त्याचें धनुष्य छिन्न केलें. त्यामुळें नकुल क्रोधाविष्ट झाला आणि नऊ बाणांनीं रणांगणांत सुषेणाचें त्यानें निवारण केलें. त्यावेळीं शत्रु-संहारक नकुलानें बाणांनीं दाही दिशा आच्छादिल्या आणि सुषेणाच्या सारथ्याचा वध करून त्यालाहि त्यानें तीन बाणांनीं विद्ध केलें आणि त्याचे सुदृढ धनुष्याचे तीन भल्लांनीं तीन तुकडे केले! त्यावर सुषेणानें क्रोधसंतप्त होऊन दुसरें धनुष्य घेतलें आणि साठ बाण नकुलावर आणि सात सहदेवावर टाकले. तेव्हां त्यांचें जें युद्ध झालें तें देवासुरांच्या युद्धाप्रमाणें अत्यंत भयंकर झालें. अन्योन्यांच्या वधाच्या इच्छेनें ते परस्परांवर बाण टाकूं लागले. सात्यकीनें वृषसेनाच्या सारथ्यावर तीन बाण टाकून त्याचा वध केला, एका भल्लानें त्याचें धनुष्य छेदिलें आणि सात बाणांनीं त्याचे अश्व मारले!

धृतराष्ट्रा, नंतर सात्यकीनें एका बाणानें त्याचा ध्वज उपटून टाकला आणि तीन बाण त्याच्या वक्षःस्थळावर मारले. त्यामुळें वृषसेन मूर्च्छित होऊन रथांतच पडला. थोड्या वेळानें तो सावध झाला. सात्यकीनें त्याचा सारथि, अश्व, रथ आणि ध्वज यांचा संहार आधींच केल्यामुळें तो सात्यकीचा वध करण्याच्या इच्छेनें खड्गचर्म घेऊन त्यावर धांवून गेला! आपल्यावर वृषसेन धांवून येत आहे, असें पाहून सात्यकीनें दहा वाराहकर्ण बाणांनीं वृषसेनाच्या खड्गचर्मांचा छेद केला. इतक्यांत दुःशासनानें आयुधहीन व रथहीन वृषसेनाची ती स्थिति पाहून त्या युद्धोत्सुकाला आपल्या रथांत घेतलें आणि दूर नेलें! नंतर त्या वृषसेनानें दुसऱ्या रथांत बसून द्रौपदेयांवर त्र्याहत्तर, सात्यकीवर पांच, भीमावर चौसष्ट, सहदेवावर पांच, नकुलावर तीस, शतानीकावर सात, शिखंडीवर दहा आणि धर्मावर शंभर बाण मारले! दुसऱ्याहि जयेच्छु वीरांवर त्यानें बाणवृष्टि करून त्यांना अगदीं जर्जर करून सोडलें! इतकें करीत असतांहि त्यानें कर्णाच्या पृष्ठभागाचें रक्षण केलें!

इकडे सात्यकीनें नऊ पोलादी बाण मारून दुःशासनाचा सारथि व अश्व यांना मारलें, त्याच्या रथाचें चूर्ण केलें आणि त्याच्या ललाटप्रदेशीं तीन बाण मारले! नंतर दुःशासन दुसऱ्या रथावर आरूढ झाला आणि कर्णाच्या सैन्याचा आश्रय करून पांडवांशीं युद्ध करूं लागला! इतक्यांत धृष्टद्युम्नानें

दहा, द्रौपदेयांनीं त्र्याहत्तर, सात्यकीनें सात, भीमसेनानें चौसष्ट, सहदेवानें सात, नकुलानें तीस, शतानीकानें सात, शिखंडीनें दहा आणि धर्मानें शंभर बाण कर्णावर मारले ! आणि दुसऱ्या जयेच्छु प्रमुख वीरांनींहि मोठी बाणवृष्टि त्यावर केली ! कर्णानें त्या प्रत्येकावर दहा दहा बाण मारून त्यांचा पाठलाग केला. तेव्हां त्या महात्म्या कर्णाचें अस्त्रवीर्य आणि हस्तलाघव पाहून आम्हांला अत्यंत आश्चर्य वाटलें ! तो बाण केव्हां काढीत असे, केव्हां जोडीत असे आणि शत्रूवर केव्हां सोडीत असे, हें कोणालाहि समजत नसे; परंतु शत्रु मरून पडलेले मात्र दिसत असत. अंतरिक्ष, आकाश, पृथ्वी आणि दिशा ह्यांमध्यें सर्वत्र तीक्ष्ण बाण होऊन त्या ठिकाणीं आरक्त मेघांनीं आकाश व्याप्त झाल्याचें दिसत असे ! याप्रमाणें तो धनुर्धारी प्रतापी कर्ण बाणवृष्टि करीत असतां आपल्या रथांतच नृत्य करीत आहे, असें वाटत असे ! ज्यांनीं कर्णावर बाण टाकले होते, त्याच्या तिप्पट बाण कर्णानें त्यांवर टाकले ! शिवाय प्रत्येकावर शंभर आणि दहा बाण मारून त्यानें मोठ्यानें गर्जना केली. त्याच्या योगानें अश्व, सारथि आणि रथ यांचा नाश झाला आणि वीरांची फाटाफूट झाली. मग कर्णानें त्या धनुर्धरांवर बाणवृष्टि करून त्यांचा संहार केला आणि नंतर तो निर्भयपणें गजसैन्यांत शिरला ! त्यानें युद्धांत कधींहि माघार न घेणाऱ्या चेदी वीरांच्या तीनशें रथांचा भंग केला आणि युधिष्ठिरावर बाणवृष्टि केली. तेव्हां ते शिखंडी, सात्यकि वगैरे पांडववीर धर्मराजासभोंवतीं वेढा देऊन त्याच्या रक्षणाकरितां उभे राहिले. तुझ्या सैन्यांतील वीरहि तसेच त्या दुर्वारण कर्णाभोंवतीं त्याच्या संरक्षणार्थ उभे राहिले. त्यावेळीं नानाविध वाद्यें वाजूं लागलीं आणि मोठमोठ्या वीरांच्या सिंहासारख्या गर्जनाहि होऊं लागल्या. नंतर त्या युधिष्ठिरप्रभृति निर्भय पांडववीरांचा कर्णादिक धैर्यशाली कौरव योद्ध्यांशीं तुमुल संग्राम झाला ! ८. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ कर्णकृत युधिष्ठिरपराभव. २ युधिष्ठिरधिक्कार. ३ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा, त्या सैन्याची कर्णानें दाणादाण उडवून मग तो आपल्या चतुरंग सैन्यासह युधिष्ठिरावर धांवून गेला. त्यासमयीं शत्रूंनीं नाना प्रकारचीं सहस्रावधि आयुधें कर्णावर सोडलीं, परंतु त्यानें हजारों बाणांची वृष्टी करून

त्यांचें निवारण केलें! कित्येक पांडवपक्षीय वीरांचीं मस्तकें, बाहु आणि मांड्या कर्णानें तोडून त्यांस भूमीवर पाडलें, दुसरे कित्येक भग्न होऊन पळत सुटले! कर्णाचा वध करण्याच्या इच्छेनें द्राविड आणि निषाद पदाति यांची सात्यकीनें योजना करून त्यांना कर्णावर पाठविलें, परंतु कर्णानें बाणांच्या प्रहारानें त्यांचीं शिरस्त्राणें आणि भुज तोडून टाकिले! नंतर शालवृक्षवन तोडून टाकलें असतां जसें तें पृथ्वीवर कोसळून पडतें, त्याप्रमाणें ते पदाति पृथ्वीवर पडले! याप्रमाणें त्या रणांगणावर शेंकडों, हजारों आणि अयुतावधि वीरांनीं आपले देह टाकिले, तथापि त्यांनीं आपल्या कीर्तीनें सर्व दिशा भरून काढल्या. नंतर व्याधीच्या प्रतिकारार्थ जशी मंत्रौषधीची योजना करितात, त्याप्रमाणें पांडु व पांचाल वीर कर्णप्रतिकारार्थ त्यावर चालून आले, परंतु अतिभयंकर व जुनाट रोगावर जसें मंत्रौषधीचें कांहीं चालत नाहीं, त्याप्रमाणें त्या वीरांची कर्णानें दाणादाण उडवून पुनः युधिष्ठिरावर चाल केली! त्यावेळीं धर्माच्या संरक्षणाकरितां त्या पांडु, पांचाल आणि केकय वीरांनीं शर्थ केली, परंतु ब्रह्मवेत्त्यांपुढें जसें मृत्यूचें कांहीं चालत नाहीं, त्याप्रमाणें कर्णाचा प्रतिकार करण्यास ते समर्थ झाले नाहींत. तेव्हां कर्ण आपल्या अगदीं जवळ आल्याचें पाहून युधिष्ठिर क्रोधानें डोळे लाल करून त्याला म्हणाला, "हे सूतपुत्रा मूर्खा कर्णा, माझें म्हणणें ऐकून घे! अरे तूं त्या वेगवान् अर्जुनाशीं सर्वदा स्पर्धा करितोस आणि दुर्योधनाच्या मतानें नित्य वागून आम्हांला त्रास देतोस! तर तुझें जें बल, जें वीर्य आणि पांडवांविषयीं जो द्वेष तुझ्या ठिकाणीं असेल, तो सर्व आज मोठा पराक्रम करून दाखव! आज या घोर संग्रामांत तुझी युद्धाची सर्व हौस मी फेडतों!"

धृतराष्ट्रा, याप्रमाणें बोलून धर्मानें दहा लोहमय सुवर्णपुंख बाण कर्णावर सोडले. त्यावर त्या अरिंदम कर्णानें दहा वत्सदंत बाण हंसतहंसत त्या युधिष्ठिरावर मारले. अशारीतीनें अवज्ञा केल्यावर अग्नींत आहुति टाकल्या असतां तो जसा अधिकच प्रज्वलित होतो, तसा युधिष्ठिर क्रोधसंतप्त झाला! त्याच्या देहांतून जणुंकाय अग्निज्वालाच बाहेर पडत आहेत कीं काय असें वाटूं लागलें! युगांतीं सर्व विश्वाच्या क्षयाकरितां दुसरा संवर्ताग्निच पेटत आहे असें सर्वांस वाटलें! नंतर युधिष्ठिरानें आपलें सुवर्णमंडित धनुष्य घेतलें आणि त्याचा टणत्कार केला. नंतर पर्वतांचेंहि विदारण करील, असा तीक्ष्ण यमदंडासमान बाण त्याला जोडून कर्णाचा वध करण्याच्या इच्छेनें आकर्ण धनुर्ज्या ओढून तो कर्णावर टाकला! तेव्हां वज्रपाताप्रमाणें भयंकर आवाज होऊन तो बाण कर्णाच्या

डाव्या कुशींत शिरला ! त्या बाणानें कर्ण व्याकुळ होऊन त्याला मूर्च्छा आली, आणि त्याचीं गात्रें विगलित झालीं. तेव्हां त्याच्या हातांतील धनुष्य रथांतच पडलें आणि तो महाबाहु कर्ण शल्याच्या समोर निश्चेष्ट होऊन पडला ! तेव्हां कर्णाची ती स्थिति पाहून त्या कौरवसैन्यांत मोठा हाहाकार झाला आणि पांडव-सेनेंत धर्माच्या पराक्रमानें सर्वत्र सिंहनाद होऊन आनंदाच्या गर्जना होऊं लागल्या !

अल्पावकाशांत कर्ण सावध झाला आणि त्या क्रूर व पराक्रमी वीरानें धर्माचा आज वध करावयाचाच असा निश्चय केला. त्यानें तत्काल आपलें सुवर्णखचित विजयचाप विस्फारित केलें आणि त्या युधिष्ठिरावर बाणवृष्टि करून त्याला आच्छादून टाकलें ! आणि त्या महात्म्या युधिष्ठिराच्या रथचक्रांचे रक्षक चंद्रदेव व दंडधर यांस क्षुर बाणांनीं कर्णानें मारलें. चंद्राच्या समीपभागीं जसे पुनर्वसू तारे शोभत असतात, त्याप्रमाणें ते रथचक्ररक्षक युधिष्ठिराचे पार्श्वभागीं शोभत असत. युधिष्ठिरानें पुनः कर्णावर तीस बाण मारले, तसेच सुषेण आणि सत्यसेन यांवर प्रत्येकीं तीन तीन बाण टाकले. शल्यावर त्यानें नव्वद बाण व कर्णावर त्र्याहत्तर बाण टाकून त्याचे रक्षकांवर तीन तीन सरलगामी बाण टाकले. तेव्हां कर्णानें हंसून धर्मराजावर एक भल्ल बाण टाकून त्याला विद्ध केलें. आणि नंतर दुसरे साठ बाण टाकून मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां पांडवपक्षीय वीर क्रोधसंतप्त होऊन कर्णावर धांवून आले आणि त्यांनीं युधिष्ठिराचें रक्षण करण्याकरितां कर्णावर सारखी बाणवृष्टि चालविली. इतक्यांत सात्यकि, चेकि-तान, युयुत्सु, पांडव, धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदेय, प्रभद्रक, नकुल-सहदेव, भीम, शिशुपालाचा पुत्र, कारूष, मत्स्यशेष आणि केकयादिक सर्व वीरांनीं त्या कर्णावर बाणप्रहार केले ! तसेंच जनमेजय आणि पांचाल्य यांनींहि कर्णावर बाणवृष्टि केली. त्या सर्वांनीं वाराहकर्ण, नाराच, नालीक, वत्सदंत, क्षुरप्र, चटकामुख इत्यादि नानाप्रकारच्या बाणांनीं व दुसऱ्या अनेक उग्र आयुधांनीं कर्णावर प्रहार केले आणि कर्णाच्या वधाची इच्छा मनांत ठेवून रथ, अश्व, गज आणि सादी इत्यादिकांसह त्याजवर चालून जाऊन त्याला वेढिलें !

पांडवांच्या प्रमुख वीरांनीं आपणाला वेढिल्याचें पाहून कर्णानें ब्राह्मास्त्र प्रगट केलें आणि बाणांनीं सर्व दिशा व्यापून काढल्या. तेव्हां कर्णरूप अग्नि आपल्या शररूप ज्वालांनीं पांडवसैन्यवनाला दग्ध करीत चालला आहे असें सर्वांना वाटलें. त्या महाधनुर्धर महात्म्या कर्णानें हंसून मोठमोठ्या अस्त्रांची योजना केली

आणि शरांच्या योगानें त्या पुरुषेंद्र युधिष्ठिराचें धनुष्य छिन्न केलें; नंतर कर्णानें संनतपर्वं नव्वद बाण योजून रणांगणावर त्या युधिष्ठिराचें कवच भेदिलें. तें खालीं पडलेलें कवच म्हणजे नक्षत्रांनीं सुशोभित झालेलें नभोमंडळच आहे कीं काय, असा भास झाला. धर्मराज कवचहीन झाला असतां बाणप्रहारांनीं अगदीं रक्तबंबाळ होऊन गेला. तशा स्थितींतहि त्यानें एक लोहमयी शक्ति कर्णावर फेंकली. ती ज्वलित शक्ति आपणांवर येत आहे असें पाहून कर्णानें सात बाणांनीं तिचा छेद केला व ती खालीं पाडली. नंतर कर्णाच्या बाहुप्रदेशीं, ललाटप्रांतीं, हृदयावर धर्मराजानें चार चार तोमरांचा प्रहार करून मोठ्या आनंदानें गर्जना केली. कर्णाच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला व तो चवताळलेल्या सर्पाप्रमाणें फूत्कार टाकूं लागला! मग त्यानें एक भल्ल टाकून धर्माचा ध्वज छिन्न केला, तीन बाणांनीं त्या धर्माला विद्ध केलें, त्याचे बाणभाते छेदून टाकिले आणि त्याच्या रथाचे तिलतुल्य तुकडे उडवून दिले. नंतर धर्मराज युद्धपराङ्मुख होऊन दुसऱ्या रथांत बसला व पळूं लागला. त्याचा पार्ष्णिसारथि हत झाल्यामुळें त्याच्यानें कर्णासमोर उभें राहवेना. कर्णानें धर्माचा पाठलाग करून वज्र, छत्र, अंकुश, मत्स्य, ध्वज, कूर्म आणि अंबुज इत्यादि लक्षणांनीं युक्त आपला हस्त स्वतःला पवित्र करून घेण्यासाठीं त्याच्या स्कंधदेशीं ठेवला. त्या धर्मराजाला कर्ण आतां बलानें धरणार, तों त्याला कुंतीला दिलेल्या वचनाची आठवण झाली व शल्यानेंहि त्याला सांगितलें कीं, "कर्णा, या राजश्रेष्ठाला तूं धरूं नकोस. तूं याला धरलें असतां तो तुलाच नव्हे, तर मलाहि भस्म करून टाकील!"

(२) धृतराष्ट्रा, तेव्हां कर्णानें त्या युधिष्ठिराला धिक्कारपूर्वक हंसत म्हटलें, "अरे धर्मा, क्षत्रियकुलांत जन्म घेणारा व क्षत्रियधर्म पाळणारा वीर समरांत भिऊन प्राणरक्षणार्थ कसा बरें पळून जाईल? तूं क्षत्रधर्मांत कुशल नाहींस असें मला वाटतें, तूं ब्रह्मबलसंपन्न असल्यामुळें स्वाध्याय व यज्ञकर्मांत सर्वदा निमग्न असावेंस! हे कौंतेया, तूं युद्ध करूं नकोस, वीर पुरुषांवर चालून जाऊं नकोस! त्यांना अप्रिय बोलूं नकोस, महारणापासून निवृत्त हो! तुला कांहीं अयोग्य बोलायाचें असल्यास तें सोसून घेणारे दुसरे लोक आहेत! माझ्या सारख्याशीं तसलें भाषण कधीं करूं नकोस! माझ्यासारख्याला अप्रिय बोलण्यानें हा असा परिणाम होत असतो! हे कौंतेया, तूं आतां स्वगृहीं जा किंवा ते केशवार्जुन जेथें आहेत, तेथें जा! राजन्, हा कर्ण कांहीं झालें तरी

तुला समरांत कधीं मारणार नाहीं." असें बोलून त्या महाबलवान् कर्णानें युधिष्ठिराला सोडून दिलें आणि वज्रहस्त इंद्र ज्याप्रमाणें आसुरी सेनेचा नाश करून टाकतो, त्याप्रमाणें त्या पांडवसेनेचा कर्णानें संहार केला !

( ३ ) धृतराष्ट्रा, नंतर तो धर्मराज मोठ्या लज्जेनें तेथून त्वरेनें मागें फिरला ! त्याबरोबरच चेदी, पांडव, पांचाल, सात्यकी, द्रौपदेय, माद्रीपुत्र नकुल-सहदेव हेहि सर्व त्याच्या मागून निघाले. पांडवसैन्य पळून जात असल्याचें पाहून कर्णाला मोठा आनंद झाला व तो कौरवसैन्यासह त्याचा पाठलाग करूं लागला. तेव्हां कौरवसैन्यांत भेरी, शंख, मृदंग आणि धनुष्यें यांचा आवाज होऊं लागला व वीरांच्या सिंहगर्जनाहि होऊं लागल्या. धर्मराज श्रुतकीर्तीच्या रथावर चढला आणि तो तेथून कर्णाचा पराक्रम पाहूं लागला. आपले सैन्याचा शत्रुहस्तें संहार होत असल्याचें पाहून त्याला संताप आला आणि तो आपल्या योद्धयांना म्हणाला, 'ह्या शत्रूंना आधीं मारून टाका, बसलां काय ?' धर्मराजाची अनुज्ञा घेऊन पांडवांचे भीमसेनप्रमुख सर्व महारथ तुझ्या पुत्रांवर धांवून आले. त्यावेळीं वीरांच्या आणि रथ, गज, अश्व आणि पदाति यांच्या शस्त्रास्त्रांचा तुमुल शब्द होऊं लागला. दोन्ही सैन्यांतील योद्धे 'उठा, मारा, पाडा' असें परस्परांना बोलून एकमेकांचा वध करूं लागले ! भयंकर शरवृष्टि होऊन अभ्रांप्रमाणें आकाश व्याप्त होऊन गेलें ! वीर परस्परांना मारूं लागले आणि पताका, ध्वज, छत्रें, सारथि, अश्व आणि आयुधें यांचा चुराडा झाला ! मोठमोठे राजे शरीरावयव तुटून क्षीण होऊन भूतलावर पडले ! पर्वतांच्या कड्यावरून मोठमोठे गज वरील योद्धयांसह पडूं लागले ! तें पाहून वज्रप्रहारांनीं पर्वतशिखरेंच तुटून पडत आहेत असें वाटलें. सर्वत्र रणपराक्रमी योद्धयांच्या मस्तकांनीं ती रणभूमि व्याप्त होऊन गेली ! पृथ्वीवर तसा आकाशांतहि भयंकर कोलाहल ऐकूं येऊं लागला !

राजा धृतराष्ट्रा, यावेळीं विमानारूढ होऊन अप्सरा गायनवादन करीत तें युद्ध मोठ्या कौतुकानें पहात होत्या. रणांत पतन पावलेल्या शेंकडों हजारों वीरांना विमानांत घालून त्या स्वर्गास नेत होत्या ! हा चमत्कार पाहून स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें ते शूर वीर परस्परांवर धांवून गेले आणि मोठ्या आवेशानें युद्ध करूं लागले ! रथ्यांनीं रथ्यांशीं, पत्तींनीं पदातींशीं, गजांनीं गजांशीं व हयांनीं हयांशीं युद्ध आरंभिलें. अशाप्रकारें भयंकर रणसंग्राम होऊन

त्यांत गज, अश्व आणि नर यांचा मोठा क्षय होऊं लागला. सैन्यांत जिकडे-तिकडे एकच धूळ होऊन दिसेनासें झालें. त्या रणोत्सुक वीरांना अंधकारामुळें आपल्या पुढील वीर स्वकीय आहे किंवा परकीय आहे हेंहि समजेनासें झालें! कोणी एकमेकांचे केश ओढून, कोणी दांतांनीं चावून, तर कोणी नखांनीं ओरबडून एकमेकांस व्याकुल करीत होते! कित्येकांनीं मुष्टियुद्ध आरंभिलें तर कित्येकांनीं बाहुयुद्धाला प्रारंभ केला ! मनुष्यें, गज व अश्व यांच्या शरीरांतून रक्त वाहूं लागून त्याची मोठी नदी झाली! कित्येक विजयेच्छु वीर ती नदी ओलांडून परतीराला गेले, कितीएक पोहून जातांना धडपडूं लागले, कित्येकांनीं त्या नदींत स्नान केलें, कित्येकांनीं केवळ जलप्राशन केलें, तर कित्येक म्लान होऊन पतन पावले ! रथ, अश्व, नर, नाग, आयुधें, आभरणें, वसनें, कवचें, भूमि, आकाश, अंतरिक्ष आणि दिशा ह्या सर्व लालभडक होऊन गेलेल्या दिसत होत्या! त्या रक्ताच्या गंधानें, स्पर्शानें व वाहत असतां होणाऱ्या शब्दानें त्या सैन्याला मोठा विषाद वाटला!

इतक्यांत त्या युद्धविमुख झालेल्या कौरवसैन्यावर भीमसेन, सात्यकि आदिकरून प्रमुख पांडववीर पुनः चाल करून आले! त्यांचा तो आवेश पाहून तुझ्या सैन्याची दाणादाण उडून तें अगदीं धैर्यहीन झालें. त्या युद्धसंमर्दांत तुझ्या सैन्यांतील रथ, अश्व, गज आणि मनुष्यें यांचा भयंकर नाश झाला. त्यांचीं आयुधें आणि अंगांवरील कवचें ह्यांचाहि शत्रूंनीं विध्वंस केला. अरण्यांत सिंहांनीं गजकुलांवर झडप घातली असतां तीं जशीं सर्वत्र मरून पडलेलीं दिसतात, तशी तुझ्या सैन्याची स्थिति होऊन गेली! ८. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ कर्णापयान. ]

(१) संजय—धृतराष्ट्रा, पांडवांनीं याप्रमाणें तुझ्या सैन्याची दुर्दशा केल्याचें पाहून दुर्योधनराजानें चारी बाजूंनीं त्यास आंवरिलें. हे भरतर्षभा, आसमंतात् भागीं जे जे पळून गेले होते, त्यांचें तुझ्या पुत्रानें ओरडून निवारण केलें, तरी ते मागें फिरले नाहींत. तेव्हां सौबल शकुनि आणि सर्व सशस्त्र कौरव त्या भीमावर रणांत धांवून गेले. कौरव भीमावर चालून गेल्याचें पाहून कर्णानें त्याच विचारानें शल्याला म्हटलें, 'भीमाच्या रथाकडे माझा रथ चालव!' मग

शल्यानें ज्या बाजूला भीम होता, तिकडे कर्णाचे ते हंसवर्ण अश्व शीघ्र हांकले ! आपल्यावर कर्ण चालून येत असल्याचें पाहून भीम क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें कर्णाच्या वधाविषयीं संकल्प केला. नंतर त्यानें सात्यकि आणि धृष्टद्युम्न यांस बोलावून म्हटलें, " या धर्मात्म्या युधिष्ठिराचें रक्षण तुम्ही करा. आतांच हा माझ्या देखत मोठ्या संकटांतून मुक्त झाला आहे ! माझ्यासमोरच दुर्योधनाच्या संतोषाकरितां त्या दुष्ट कर्णानें ह्याचें कवच छिन्न करून त्याला कवचहीन केलें. म्हणून त्या कर्णाचा आधीं वध करून ह्याच्या दुःखाचा शेवट करितों ! आजच्या युद्धांत मी कर्णाचा वध करीन, किंवा तो माझा घोर संग्राम करून वध करील ! हें मी तुम्हांला सत्यपूर्वक सांगत आहें ! युधिष्ठिराला ठेवीप्रमाणें तुमच्या स्वाधीन मी करीत आहें ! तरी तुम्ही सर्व त्याचें संरक्षण मोठ्या दक्षतेनें करा !"

ह्याप्रमाणें भाषण करून तो महाबाहु भीमसेन मोठ्यानें सिंहनाद करीत व त्यायोगानें सर्व दिशा नादित करीत अधिरथि कर्णावर धांवून गेला. रणाभिलाषी भीम कर्णावर धांवून येत असल्याचें पाहून तो मद्राधिपति शल्य कर्णाला बोलला.

शल्य—हा पांडुनंदन भीमसेन तुझ्यावर चालून येत आहे पहा. दीर्घ कालपर्यंत सांचविलेल्या क्रोधाला तो तुझा बलि घेणार, असा त्याचा विचार दिसत आहे. अशाप्रकारचें ह्याचें उग्ररूप मीं पूर्वीं कधीं पाहिलेलें नाहीं ! अभिमन्यूच्या किंवा घटोत्कचाच्या वधप्रसंगींहि हा इतका क्रोधाविष्ट झाला नव्हता. सध्यां हा प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें शोभत आहे ! सर्व त्रैलोक्य जरी ह्याच्यावर चालून आलें तरी त्याचें निवारण हा एकटा करील !

संजय—हे धृतराष्ट्रा, अशाप्रकारें तो मद्राधीश शल्य कर्णाशीं बोलत असतां तो क्रोधसंतप्त भीम कर्णावर चालून आला. भीम आल्याचें पाहून राधेय कर्ण हंसतहंसतच शल्याला बोलला " शल्या, तूं जें आतां मला भीमासंबंधीं बोललास, तें सत्य आहे यांत संशय नाहीं. हा वृकोदर शूर, वीर आणि क्रोधिष्ट आहे ! शरीराची हा कधीं पर्वा करीत नाहीं. ह्याचें बल कोणाहि प्राण्याच्या बलापेक्षां अधिक आहे. विराटनगरींत अज्ञातवासांत असतां ह्यानें द्रौपदीची इच्छा तृप्त करण्याकरितां केवळ आपल्या बाहुबलावर अवलंबून राहून कीचकाला त्याच्या गणांसह मारलें ! तोच हा भीम क्रोधाविष्ट होऊन माझ्या-

बरोबर युद्ध करण्याच्या हेतूनें रणाग्रभागीं सिद्ध होऊन राहिला आहे. साक्षात् दंडधारी यम जरी याबरोबर युद्ध करण्यास सज्ज होऊन आला, तरी ह्यास त्याचें किमपि भय वाटणार नाहीं. हा त्याजबरोबरहि निर्भयपणें युद्ध करील. माझा फार दिवसांपासूनचा मनोरथ आहे कीं मी अर्जुनाला युद्धांत वधीन, किंवा तो तरी मला वधील ! तो मनोरथ कदाचित् भीमसमागमानें आजच सिद्धीला जाईल ! भीमाचा जर आज मीं वध केला, किंवा त्याला विरथ केलें, तर पार्थ मजवर चालून आल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. तसें झाल्यास ती गोष्ट मला हितप्रदच होईल ! तरी तुला ह्यावेळीं जें उचित वाटत असेल तें तूं कर !" कर्णाचें अशा प्रकारचें भाषण ऐकून शल्य त्याला म्हणाला, "महाबाहो कर्णा, तूं त्या बलवान् भीमावर चालून जा. भीमाचा पराभव करून नंतर तूं अर्जुनावर चालून जा. ही तुझी फार दिवसांपासूनची इच्छा आहे व ती आज सिद्धीला जाईल ! हें मी तुला सत्य सांगत आहें !" शल्याचें भाषण ऐकून कर्ण पुनः शल्याला बोलला 'आज युद्धामध्यें मी अर्जुनाचा वध करीन, किंवा तो तरी मला वधील ! तर तूं मन शांत ठेव आणि जेथें तो वृकोदर असेल, तेथें चल !'

हे विशांपते, नंतर शल्य भीम ज्या ठिकाणीं कौरवसेनेची दाणादाण करीत होता, तेथें कर्णाचा रथ शीघ्र घेऊन गेला. तेथें कर्ण पोंचतांच तूर्य, भेरी इत्यादि रणवाद्यें वाजूं लागलीं ! भीमसेनानें क्रुद्ध होऊन कर्णाचें सैन्य बाणवृष्टि करून चारी बाजूंनीं पळविलें ! राजेंद्रा, त्यावेळीं कर्ण व भीमसेन यांमध्यें रणांगणांत फारच भयंकर युद्ध झालें ! क्षणभर भीमाचा विजय होऊन त्या महाधनुर्धरानें कर्णाला मागें सारलें, परंतु भीम आपल्यावर चालून आल्याचें पाहून कर्ण क्रोधाविष्ट झाला व त्यानें भीमाच्या वक्षःस्थळावर नाराच बाण टाकून पुनः त्याच्यावर बाणवृष्टि केली. भीमानेंहि उलट कर्णावर नऊ नतपर्व बाण मारले ! नंतर कर्णानें बाणांची वृष्टि करून भीमाचें धनुष्य छेदून टाकलें आणि एक तीक्ष्ण बाण त्या धनुष्यहीन भीमाच्या छातीवर एवढ्या आवेशानें मारला कीं त्यानें भीमाचें कवच भेदून तो त्याच्या शरीरांत घुसला ! तेव्हां भीमसेनानें दुसरें धनुष्य घेतलें आणि कर्णाच्या मर्मस्थळावर तीक्ष्ण बाण मारून त्याला विद्ध केलें ! आणि पृथ्वी व आकाश थरारून जातील एवढ्या मोठ्यानें त्यानें गर्जना केली ! तें पाहून कर्णानें भीमावर पंचवीस बाण मारले. त्यावेळीं मदोत्कट दृप्त कुंजरावर जणुंकाय उल्कांचाच वर्षाव होत आहे असें वाटलें ! तेव्हां कर्णाच्या बाणांनीं भीमाचें शरीर भिन्न होऊन गेलें. मग तो

भीम क्रोधमूर्च्छित होऊन गेला आणि कर्णाच्या वधाचा निश्चय करून त्या वायुपुत्रानें अत्यंत वेगवान्, भारक्षम व पर्वतांचाहि भेद करणारा एक उत्तम बाण धनुष्याला जोडला आणि धनुष्याची दोरी आकर्ण ओढून तो कर्णावर फेंकला! वज्रवेगानें पर्वत जसा भिन्न होऊन जातो, त्याप्रमाणें त्या बाणानें कर्णाच्या शरीरांत शिरून त्याला विद्ध केलें. त्यामुळें कर्ण संज्ञाहीन होऊन रथांतच पडून राहिला. हे कुरूद्वहा, सेनापति कर्ण भीमसेनाच्या बाणांनीं विव्हल झाला असतां सारथि शल्य ह्यानें त्या मूर्च्छित कर्णाला रथांतून रणांगणावरून शीघ्र दूर नेलें! अशारीतीनें भीमाकडून कर्णाचा पराजय झाला आणि इंद्रानें पूर्वी जसें दानवसैन्याला जर्जर करून सोडलें होतें, त्याप्रमाणें भीमानें त्या मोठ्या कौरवसैन्याचा संहार केला! ८. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ भीमाकडून सहा धृतराष्ट्रपुत्रांचा वध. २ भीम व कर्ण यांचें पुनः युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, भीमानें आज रथोपस्थावर कर्णाला पाडलें, ही मोठी अत्यंत दुष्कर गोष्ट होय. संजया, कर्ण एकटाच सृंजयांसह रणांत पांडवांचा वध करील, असें दुर्योधन मला वरचेवर सांगत असे. असें असून भीमानें राधेयाचा पराभव केला, हें पाहून माझ्या दुर्योधन पुत्रानें पुढें काय केलें?

संजय—राजा धृतराष्ट्रा, सूतपुत्र कर्ण महारणांत विद्ध होऊन विमुख झाल्याचें पाहून दुर्योधनानें आपल्या बंधूंस बोलावलें आणि म्हटलें, 'अहो, तुम्ही लवकर जाऊन कर्णाचें आधीं रक्षण करा, भीमानें उत्पन्न केलेल्या संकटार्णवांत कर्ण बुडत आहे! तुमचें कल्याण होवो!' राजाची आज्ञा होतांच त्याचे बंधु भीमसेनाला मारण्याच्या इच्छेनें क्रोधसंतप्त होऊन पतंग अग्नीवर जसे घालून घेतात, तसे ते त्या भीमसेनावर धांवून गेले! श्रुतर्वा, दुर्धर, क्रोध, विवित्सु, विकट, सम, निषंगी, कवची, दुष्प्रधर्ष आदिकरून वीर्यवंत महाबलवान् दुर्योधनाचे बंधूंनीं रथांत भीमसेनाला वेढून त्याजवर नानाप्रकारच्या बाणांची वृष्टि केली! हे जनाधिपा, ते आपल्यावर चालून आल्याचें पाहून त्या बलवान् भीमसेनानें एक बाण विवित्सूवर टाकून त्याचें मस्तक उडविलें! पूर्णचंद्राप्रमाणें शोभायमान तें मस्तक कुंडलशिरस्त्राणांसह भूमीवर पडलें! भीमानें त्याचे पन्नास रथांचाहि विध्वंस केला! आपला बंधु हत झाल्याचें पाहून त्याचे इतर भ्राते त्या भीमपराक्रमी भीमावर चालून आले. तेव्हां भीमानें दोन भल्ल

बाण टाकून तुझे देवपुत्रतुल्य दोघे मुलगे विकट व सह यांचा वध केला! तेव्हां ते वाऱ्यानें उडविलेल्या वृक्षांप्रमाणें तत्काल भूमीवर पडले! नंतर भीमानें क्रोथाचाहि तसाच शीघ्र वध केला. तो रणांगणांत पडल्याचें पाहून हे राजा, सर्वत्र हाहाकार झाला! तुझ्या धनुर्धर पुत्रांचा अशारीतीनें संहार करून त्या महाबल भीमानें तुझ्या सैन्याचीहि दाणादाण केली. नंतर भीमानें तुझे पुत्र नंदोपनंद यांनाहि यमलोकीं पाठविलें!

राजा धृतराष्ट्रा, तें पाहून तुझे पुत्र भयभीत होऊन पळून गेले! प्रलयकालीन यमाप्रमाणें भीमाला रणांत पाहून आणि तुझ्या पुत्रांचा वध ध्यानांत आणून सूतपुत्र कर्णाला वाईट वाटलें! त्यानें आपले अश्व जेथें पांडव भीमसेन असेल, तेथें त्वरित नेण्याविषयीं शल्याला सूचना दिली. त्याप्रमाणें शल्यानें कर्णरथ भीमसेनाच्या रथाजवळ शीघ्र आणला. मग हे विशांपते, कर्ण व भीम यांमध्यें अतितुमुल व परम घोर रण माजला. फिरून ते महारथ भीम व कर्ण हे एकमेकांच्या अगदीं जवळ येऊन युद्ध करूं लागले! तेव्हां आज या युद्धाचा शेवट कसाकाय होतो, इकडे सर्वांचें लक्ष्य लागून राहिलें. नंतर तुझ्या पुत्रांच्या समक्ष त्या रणोत्सुक भीमानें बाणांनीं कर्णाला आच्छादून टाकिलें! कर्णानेंहि अत्यंत क्षुब्ध होऊन नऊ नतपर्व बाणांनीं भीमाला विद्ध केलें! अशाप्रकारें तो भीमपराक्रमी भीम विद्ध झाला असतां त्यानें आकर्ण धनुष्याची दोरी ओढून सात बाण कर्णावर टाकले! तेव्हां कर्णानें सर्पाप्रमाणें दीर्घ उसासे टाकीत त्या भीमावर मोठी शरवृष्टि केली! भीमानेंहि कर्णावर तशीच शरवृष्टि करून तीयोगें त्या शत्रुसंहारक कर्णाला आच्छादिलें आणि कौरवसैन्यादेखत मोठी भयंकर गर्जना केली! हें पाहून कर्णाला अधिकच त्वेष चढला. त्यानें आपलें धनुष्य घेतलें, दहा कंकपत्र बाणांनीं भीमाला विद्ध केलें आणि एका भल्लानें त्याचें धनुष्य छिन्न केलें! नंतर भीमानें जणुं दुसरा कालदंडच कीं काय, अशी आपली सुवर्णमंडित गदा घेतली आणि कर्णाच्या निधनाची इच्छा करून ती त्याच्यावर फेंकली व मोठी आरोळी दिली! मग कर्णानें सर्पसदृश भयंकर बाणांची वृष्टि करून त्या गदेचे तुकडे तुकडे करून टाकले. अशाप्रकारें भीम व कर्ण यांच्यामध्यें सुग्रीव व वाली यांच्या युद्धाप्रमाणें मोठें निकराचें युद्ध जुंपलें! भीमानें कर्णाच्या शरीराचें विदारण करून जाईल, असा एक घोर बाण कर्णावर फेंकला! कर्णाच्या कवचाचा आणि शरीराचा भेद करून तो सर्प जसा वारुळांत शिरतो, त्याप्रमाणें भूमींत शिरला. कर्णाला त्या बाणाच्या वेदना

सहन झाल्या नाहींत. क्षितिकंप झाला असतां पर्वत जसा कंपायमान होतो, त्याप्रमाणें कर्ण कांपूं लागला ! नंतर कर्ण क्रोधतप्त झाला आणि त्यानें पंचवीस नाराच बाण भीमावर टाकले. कर्णानें सारखी बाणवृष्टि करून एका बाणानें भीमाचा ध्वज छिन्न केला, एका भल्लानें त्याच्या सारथ्याचा वध केला आणि एका बाणानें त्याचें धनुष्य छेदून टाकिलें आणि विशेष कांहीं श्रम न करितां सहज त्याला विरथ केलें !

( २ ) राजा धृतराष्ट्रा, नंतर त्या विरथ भीमानें आपली गदा हातांत घेतली आणि हंसतहंसत रथांतून खालीं उडी टाकली. शरत्कालच्या मेघांना वारा जसा उडवून टाकतो, त्याप्रमाणें भीमानें गदाप्रहारांनीं तुझ्या सैन्याला अगदीं जर्जर करून सोडलें ! हे राजा, त्यावेळीं शत्रूकडील सातशें मदोन्मत्त गजांना त्या क्षुब्ध भीमानें गालांवर, डोळ्यांवर, मस्तकांवर, गंडस्थळावर आणि दुसऱ्या मर्मस्थळीं प्रहार करून मारलें ! त्यावेळीं भयभीत होऊन ते गज पळूं लागले. तेव्हां हस्तिपकांनीं त्यांना आंवरिलें. ते गज पुनः भीमावर जाऊन जसे मेघ सूर्याला आच्छादून टाकतात, त्याप्रमाणें त्यांनीं त्याला आच्छादिलें. त्यावेळीं इंद्र जसा पर्वतांचा वज्रानें संहार करितो, त्याप्रमाणें भूमीवर उभें राहून भीमसेनानें त्या गजांचा त्यांवरील सादी, आयुधें आणि ध्वज यांसह विध्वंस केला ! नंतर सुबलपुत्र शकुनीचे बावन बलाढ्य गजांचा संहार करून त्या अरिंदम भीमानें शत्रूंचे शंभर रथांचा चुराडा केला. त्यानें शेंकडों शत्रुपक्षीय पदातींना यमलोकीं पाठविलें आणि तुझ्या सैन्याला त्रस्त करून सोडलें ! नंतर प्रखर उन्हाकडून, त्याप्रमाणें त्या महात्म्या भीमाकडून संतप्त झालेलें तुझें सैन्य अग्नीवर टाकलेल्या चर्माप्रमाणें संकुचित झालें आणि भीमाच्या भीतीनें रणांगण टाकून दशदिशांना पळून गेलें! इतक्यांत चर्म-कवचें परिधान केलेले पांचशें रथ भीमावर गर्जना करीत चालून आले आणि त्यांनीं भीमावर तीव्र शरवृष्टि केली. परंतु विष्णूनें जसा असुरांचा संहार केला, त्याप्रमाणें भीमानें आपल्या गदेनें त्या सर्व रथाधिष्ठित वीरांचा, पताकांचा, ध्वजांचा आणि आयुधांचा निःपात केला. मग शकुनीनें प्रेरणा केलेले तीन हजार अश्वसादी शक्ति, ऋष्टि, प्रास इत्यादि आयुधें हातांत घेऊन भीमावर चालून आले. ते आपल्यावर चालून येत आहेत, असें पाहून भीम त्यांवर धांवून गेला आणि त्यानें गदाप्रहार करून त्यांस यमलोकीं पाठविलें. नगावर पाषाणवृष्टि झाली असतां जसा मोठा आवाज होतो तसा त्या भीमाच्या गदाप्रहारांचा त्यावेळीं

मोठा आवाज झाला. त्या अश्वसादींचा अशारीतीनें वध करून मग भीमसेन दुसऱ्या रथांत बसला आणि राधेयावर चालून गेला !

हे राजन्, इकडे कर्णानें युधिष्ठिरावर चाल करून त्यास बाणांनीं आच्छादित केलें; तसेंच त्याच्या सारथ्यास मारून तो धर्माच्या मागें लागला. तें पाहून भीमसेन अत्यंत क्रुद्ध झाला आणि त्यानें कर्णावर बाणवृष्टि केली. आपल्यावर भीम चाल करून येत आहे असें पाहून कर्णानें धर्मराजाचा नाद सोडून दिला आणि भीमसेनाला चोहों बाजूंनीं बाणवृष्टीनें आच्छादून टाकिलें ! कर्णानें भीमाला बाणांनीं आच्छादित केलेला पाहून भीमाच्या मागें असलेल्या सात्यकीनें कर्णावर बाणवृष्टि करण्यास आरंभ केला ! कर्ण बाणांनीं अत्यंत व्याकुल झाला होता, तरी तो सात्यकीवर धांवून गेला. नंतर त्या दोघांचें मोठें तुमुल युद्ध झालें ! त्यांच्या बाणवृष्टीनें आकाशांत क्रौंच पक्ष्यांच्या पृष्ठांप्रमाणें अरुणवर्णाचें भयंकर बाणजाल पसरल्यासारखें दिसूं लागलें ! सर्वत्र बाण पसरल्यामुळें सूर्याची प्रभा, दिशा किंवा उपदिशा कांहींच समजेनासें झालें ! त्या कर्ण-भीमांच्या शरौघांमुळें भरमध्याह्नींचें सूर्याचें तेजहि नष्ट झालें. कर्णाच्या साहाय्यास सौबल, कृतवर्मा, अश्वत्थामा व कृप हे आले. मग पुनः तें फांकलेलें कौरवसैन्य एकत्र झालें आणि पांडवांशीं आवेशानें युद्ध करूं लागलें ! समुद्र क्षुब्ध झाला असतां त्याचा जसा मोठा भयंकर शब्द होतो, त्याप्रमाणें तीं उभय सैन्यें एकत्र होऊन युद्ध करीत असतां मोठा आवाज होऊं लागला. ती सैन्यें मोठ्या हर्षानें भरमध्याह्नाचे वेळीं परस्परांना भिडून त्यांचा जो रणसंग्राम झाला, तशाप्रकारचा कोणीं कधीं पूर्वीं पाहिलाहि नाहीं किंवा ऐकिलाहि नाहीं. सागराच्या लाटांचा जसा मोठा आवाज होतो, त्याप्रमाणें परस्परांच्या बाणौघांचा नाद होत असे. त्या सेना एकत्र झाल्या असतां नद्यांच्या समागमाप्रमाणें अगदीं एकजीव होऊन गेल्या.

हे विशांपते, उत्तम यश मिळविण्याच्या इच्छेनें युद्ध करणाऱ्या त्या कुरुपांडवांचें त्या समयीं अत्यंत घोर युद्ध झालें. ते वीर आपापल्या प्रतिस्पर्ध्यांचीं नांवें घेऊन मातृवंशांत किंवा पितृवंशांत त्यांचें जें व्यंग किंवा नीच आचरण अथवा दुष्ट शील असेल तें ओरडून सांगत असत. अशाप्रकारें एकमेकांस दटावून ते युद्ध करीत असतां हे आतां या युद्धांत जीवंत राहत नाहींत, असें मला वाटूं लागलें ! त्या अमिततेजस्वी क्रुद्ध वीरांचीं शरीरें पाहून आतां या युद्धाचा

शेवट कसा होणार, याविषयीं माझ्या मनांत मोठी भीति उत्पन्न झाली! त्यावेळीं ते पांडव आणि कौरव महारथ परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें एकमेकांवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागले! ८. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—महाराजा, परस्परांच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या क्षत्रियांनीं एकमेकांवर शस्त्रास्त्रांचे प्रहार सुरू केले. रथ, हय, गज आणि नर ह्यांचें परस्परांशीं भिडून अगदीं निकरानें युद्ध प्रवृत्त होऊन त्यांत वीर गदा, परिघ, कणप, प्रास, भिंदिपाल व भुशुंडी या आयुधांचे प्रहार एकमेकांवर करूं लागले! तेथें बाणवृष्टि एवढी मोठी झाली कीं, लोकांना चारी बाजूंनीं टोळच आले आहेत असें वाटूं लागलें. गजांनीं गजांवर, अश्वांनीं अश्वांवर, रथींनीं रथांवर व पदातींनीं पदातींवर चाल करून एकमेकांचा वध केला! त्या भयंकर संग्रामांत शूर वीर मोठ्यानें आक्रोश करून परस्परांचा प्राण घेत असत. त्यावरून तें रणांगण म्हणजे वधभूमीच आहे कीं काय असें वाटूं लागलें! सर्व पृथ्वी रक्तानें भरून गेलेली दिसत होती. पावसाळयांत इंद्रगोपांच्या समुदायांनीं व्याप्त पृथ्वी जशी भासते, किंवा लाल रंग दिलेलीं शुक्लवस्त्रें परिधान केलेली तरुणी जशी दिसते, त्याप्रमाणें पृथ्वी आरक्तवर्ण होऊन शोभत होती! रणांगणावर सर्वत्र छेदलेलीं मस्तकें, बाहु व मांड्या, जिकडेतिकडे पडलेलीं कुंडलें, अलंकार, शूरांचे सुवर्णहार, धनुर्धरांचीं शरीरें, ढाली आणि पताका हीं सर्व भूमीवर पडलेलीं दिसत होतीं!

हे राजा, त्या युद्धांत गजांनीं गजांवर चाल करून आपल्या दंतांनीं त्यांस विद्ध केलें. तेव्हां ते गज विशेषच शोभूं लागले! त्यांच्या अंगांतून रक्तस्राव होऊं लागला. त्यावेळीं धातुमंडित पर्वत गैरिका (काव) स्रावानें जसे शोभतात, तसे ते दिसूं लागले! त्या गजांवर जे तोमर सादींनीं मारले होते किंवा त्यांच्या देहांत भोंसकले होते, ते त्यांनीं आपल्या दंतांनीं उपटून काढिले किंवा मोडून टाकिले. हिंवाळ्याच्या आरंभीं अभ्ररहित पर्वत जसे दिसतात, त्याप्रमाणें नाराच बाणांनीं अंगांवरील कवचें भिन्न होऊन कित्येक गज दिसत होते! शरीरांत सुवर्णपुंख बाण रुतून मोठमोठे गज उल्कांनीं प्रज्वलित झालेल्या पर्वतांसमान

दिसत होते ! कित्येक मोठमोठे गज दुसऱ्या गजांनीं प्रहार केला असतां पक्ष-धर पर्वतांप्रमाणें नाश पावले ! अंगांत शल्य रुतून आर्त झालेले कित्येक कुंजर व्यथित होऊन रणांगणांत पडले होते. दुसरे कित्येक सिंहांसारख्या भयंकर गर्जना करीत होते. कित्येक दुःखार्त होऊन इतस्ततः फिरत होते तर कित्येक आक्रोश करीत होते !

हे राजा, सुवर्णविभूषित कित्येक अश्व बाणांनीं विद्ध होऊन रणांगणावर मरून पडले होते, कित्येक विह्वल होऊन पडून राहिले, तर कित्येक दशदिशांना पळून गेले ! कित्येक अश्व शत्रूंकडून शरतोमरांनीं विद्ध झाले असतांहि अश्वसादींनीं पुढें चालविले, परंतु अखेर ते देहभान नष्ट होऊन भूतलावर मरून पडले ! राजा, पदातींचीहि स्थिति तशीच झाली. हत झालेले कित्येक सैनिक विवळत होते, कित्येकांचे कनकभूषणालंकृत बाहूंची अनेक प्रकारें चळवळ चालू होती. कित्येक खालीं पडत, कित्येक वर उडत, कित्येक स्फुरण पावत असत, तर कित्येक पंचास्य नागांप्रमाणें वेगानें निश्वास टाकीत असत. सर्पांच्या शरीरां-प्रमाणें पुष्ट आणि चंदनाच्या उटीनें लिप्त झालेले ते भुज रुधिरार्द्र होऊन सुव-र्णध्वजांप्रमाणें शोभत असत !

धृतराष्ट्रा, असें तें अत्यंत घोर युद्ध प्रवृत्त झालें असतां एकच रणकल्लोळ माजून राहिला आणि कांहीं कळेनासें होऊन ते वीर प्रहार करून एकमेकांचा वध करूं लागले ! सर्वत्र धूळ होऊन राहिल्यामुळें आणि शस्त्रप्रहारांची एकच गर्दी झाल्यामुळें आपला कोण आणि परकी कोण हें कांहींच समजेनासें झालें. त्यावेळीं रक्ताच्या मोठ्या नद्या वाहूं लागल्या. वीरमस्तकें हीं त्या नद्यांना आच्छादून टाकणारे पाषाण झालीं ! वीरांचे केश हे त्या नद्यांच्या पृष्ठावरील शेवाळ झाले ! वीरांच्या अस्थि ह्या त्या नद्यांतील मासे झाल्या ! आणि मांस व शोणित मिळून त्या नद्यांतील कर्दम झाला. त्या नद्यांच्या रक्तरूप उदकाला सर्वदा भरती येत असे. भीरूंना भय देणाऱ्या व शूरांचा हर्ष वाढ-विणाऱ्या त्या नद्या होत्या. हिंस्र प्राणी त्या ठिकाणीं आक्रोश करीत व भ्रमण करीत असत ! हे राजा, शूरपुरुष मात्र सर्व भीति सोडून निर्भयपणें योधव्रत मनांत आणून तीं कर्में करीत असत ! त्या रणांत शूरवीर आपलें पौरुष गाज-वीत आणि आपलें गोत्र, नाम आणि पितृनाम सांगत फिरतांना शक्ति, तोमर आणि पट्टे यांचे प्रहार करून परस्परांना मारीत असत ! त्यामुळें पुनः भयंकर

व अत्यंत घोर युद्ध सुरू झालें. मग ती कौरवीय सेना समुद्रांत भिन्न नौका जशी नाश पावते, त्याप्रमाणें समरांत नाश पावली ! ८. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ संशप्तकवध. ]

( १ ) **संजय**—धृतराष्ट्र राजा, अशाप्रकारें क्षत्रियांचा क्षत्र करणारें दारुण आणि अतिघोर युद्ध प्रवृत्त झालें असतां रणांगणावर जेथें संशप्तक, कोसल आणि नारायणसैन्य यांचें कंदन अर्जुन करीत होता, तेथून गांडीवाचा ध्वनि ऐकूं येऊं लागला ! चवताळलेल्या जयेच्छु संशप्तकांनीं अर्जुनावर जी बाणवृष्टि केली, ती सर्व त्यानें मोठ्या धैर्यानें सहन केली, आणि संशप्तकांच्याच रथ्यांवर कंकपत्र बाणांचा सारखा वर्षाव केला ! नंतर अर्जुनानें त्यांच्या रथसेनेंत शिरून उत्तम आयुधें धारण करणाऱ्या सुशर्म्यावर चाल केली. तेव्हां त्या रथ्यानें आणि संशप्तकांनींहि बाणांनीं अर्जुनाला आच्छादून टाकिलें. सुशर्म्यानें दहा बाण अर्जुनावर व वासुदेवाच्या उजव्या बाहूवर तीन बाण मारून त्यांना विद्ध केलें. एका भल्लानें त्यानें अर्जुनाचा ध्वज छिन्न केला. तेव्हां विश्वकर्म्यानें निर्मित त्या ध्वजावरील वानरानें मोठ्यानें गर्जना केली. त्यामुळें तुझें सैन्य भयभीत होऊन निश्चेष्ट झालें. कांहीं वेळानें तें सैन्य सावध झाल्यावर पर्वतावर जशी मेघ वृष्टि करतात, त्याप्रमाणें त्यांनीं अर्जुनावर बाणवृष्टि केली आणि त्या सर्व योद्ध्यांनीं अर्जुनाच्या रथाला वेढिलें. अर्जुनानें त्यांवर तीक्ष्ण शरांचा मारा सुरू केला, तरी त्यांनीं माघार न घेतां क्रोधाविष्ट होऊन अर्जुनाचा रथ, व त्यांचीं रथचक्रें हीं भग्न करून टाकलीं. अशाप्रकारें तुझ्या सैन्यांतील सहस्रावधि योद्ध्यांनीं अर्जुनाच्या रथाचें निग्रहण केलें असतां त्या सर्वांनीं मोठी सिंहगर्जना केली. त्यावेळीं कित्येकांनीं केशवाचे महाभुज तर कित्येकांनीं रथाधिष्ठित झालेल्या अर्जुनाला मोठ्या जोरानें धरिलें. कृष्णानें दुष्ट हत्ती जसा आपल्या हस्तिपकाला खालीं पाडतो, त्याप्रमाणें त्या सर्वांस खालीं पाडलें. अर्जुनानें त्या महारथांनीं आपणाला वेढा दिला आहे आणि कृष्णालाहि धरिलें आहे, असें पाहतांच त्याला मोठा क्रोध आला आणि त्यानें आपल्या रथावर चढलेल्या पदातींना खालीं लोटलें. नंतर बाणवृष्टींनीं शत्रुसैन्याला आच्छादून कृष्णाला म्हटलें, "महाबाहो कृष्णा, सहस्रावधि संशप्तकांचा मी वध करीत असतांहि

त्यांनीं केवढें भयंकर कर्म आरंभिलें आहे पहा ! हे यदुपुंगवा, हें घोर युद्ध चाललें असतां यांच्याशीं सामना देण्यास माझ्याशिवाय दुसरा कोणीहि भूतलावरील वीर सज्ज होईल असें वाटत नाहीं !"

राजा धृतराष्ट्रा, असें बोलून धनंजयानें आपला देवदत्त शंख व कृष्णानें पांचजन्य शंख वाजविला. त्याचा ध्वनि पृथ्वी व आकाश यांमध्यें भरून संशप्तकांचें सैन्य अगदीं भयभीत होऊन गेलें व पळून जाऊं लागलें ! हे राजन्, नंतर अर्जुनानें नागास्त्राचें अभिमंत्रण केलें आणि कौरवसैन्याचे पाय सर्परज्जूंनीं बांधले. त्याच्या योगानें ते संशप्तक अगदीं दगडांनीं खिळून गेल्याप्रमाणें जागच्याजागीं स्वस्थ राहिले ! पूर्वीं तारकासुराचे वधप्रसंगीं इंद्रानें दैत्यांस जसें मारलें, त्याप्रमाणें अर्जुनानें त्या निश्श्रेष्ट संशप्तकांचा वध केला ! समरामध्यें ते मारले जाऊं लागल्यामुळें त्यांनीं रथ सोडून दिला आणि हातांतील आयुधेंहि टाकण्यास आरंभ केला ! त्यांचे पाय अर्जुनानें निगडित केल्यामुळें त्यांना कांहींच चळवळ करितां येईना. मग अर्जुनानें त्यांवर सन्नतपर्व बाणांचा प्रहार करून त्यांचा अगदीं संहार उडविला. ज्यांवर अर्जुनानें नागास्त्र टाकलें होतें, ते सर्व सर्पांनीं वेष्टित झालेले पाहून सुशर्म्यानें गरुडास्त्राची योजना केली. त्याबरोबर सर्वत्र गरुड उत्पन्न होऊन ते सर्पांचें भक्षण करूं लागले. त्या गरुडांना पाहून सर्प भिऊन पळूं लागले ! राजा, मेघवृंदापासून मुक्त झालेला सूर्य प्रजांना जसा तापदायक होतो त्याप्रमाणें ते पादबंधापासून मुक्त झालेले वीर बाणांचा वर्षाव व शस्त्रांचा मारा अर्जुनाच्या सैन्यावर करूं लागले !

अर्जुनानें ती शस्त्रवृष्टि उलट बाणांच्या वृष्टीनेंच निवारण केली आणि त्या परवीरांतकानें पुष्कळ वीरांचा वध केला ! हे राजा, नंतर सुशर्म्यानें एक बाण अर्जुनाच्या हृदयावर मारला आणि दुसऱ्या तीन बाणांनीं त्याला विद्ध करून सोडलें ! त्यामुळें अर्जुन अत्यंत व्यथित झाला आणि रथोपस्थावरच पडून राहिला ! कौरववीर 'पार्थ निधन पावला' अशी एकच ओरड करूं लागले ! शंख, भेरी यांचे ध्वनि सर्वत्र होऊं लागले. इतर रणवाद्यांचाहि आवाज होऊं लागला आणि सिंहनादहि झाले. नंतर तो श्वेताश्व अर्जुन सावध झाला आणि त्यानें शीघ्र ऐंद्रास्त्राची योजना केली. तेव्हां हजारों बाण उत्पन्न झाले आणि सर्व दिशांनीं तुझ्या सैन्याला ते मारीत सुटले ! त्यांनीं लक्षावधि हय आणि रथ यांचा चुराडा केला. अशारीतीनें संहार होत असतां त्या संश-

सकसमूहांना व गोपालांना मोठें भय उत्पन्न झालें ! अर्जुनाला विद्ध करण्याची एकालाहि शक्ति नव्हती. शेवटीं तुझ्या वीरांच्या समक्ष अर्जुनानें तुझ्या सैन्याचा संहार केला आणि अयुतावधि योद्धयांना यमसदनीं पाठविलें ! नंतर विधूम अग्नीप्रमाणें तो दैदीप्यमान शोभूं लागला ! त्या प्रसंगीं अर्जुनानें चौदा हजार वीर, दशसहस्र रथ व तीन सहस्र गज यांचा संहार केल्यावर फिरून संशप्तकांनीं अर्जुनाला वेढिलें आणि मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें युद्ध करूं लागले ! हे राजेंद्रा, नंतर त्या शूर व बलवान् किरीटी पांडवाबरोबर संशप्तकांचें युद्ध प्रवृत्त झालें. ८. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ शिखंडीचा पराभव. २ सुकेतूचा वध. ३ कृतवर्मा आणि धृष्टद्युम्न यांचें युद्ध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, नंतर कृतवर्मा, कृप, अश्वत्थामा, कर्ण, उलूक आणि सौबल शकुनि हे आपापल्या बंधूंसह समुद्रांत फुटक्या नावेप्रमाणें कौरवसेनेचा होणारा विध्वंस लक्ष्यांत आणून मोठ्या वेगानें धांवून आले. नंतर भीरूंना त्रासजनक व शूरांना हर्षवर्धक असें घोर युद्ध थोडा वेळ झालें. त्यावेळीं रणांगणांत कृपाचार्यानें मोठी शरवृष्टि करून टोळांच्या वृष्टीप्रमाणें सृंजयांना आच्छादून टाकिलें. तेव्हां शिखंडीचा क्रोध अनावर होऊन तो गौतमावर चालून आला. त्यानें त्या ब्राह्मणश्रेष्ठावर सारखी बाणवृष्टि केली. महास्त्रवेत्त्या गौतमानें शिखंडीचे बाणांचें निवारण करून त्यावर दहा बाण सोडले. शिखंडीनेंहि क्रोधावेशानें कृपाचार्यावर सात सरलगामी बाण टाकून त्याला विद्ध केलें. त्यावर त्या कृपाचार्यानें क्रोधायमान होऊन तीक्ष्ण शरांनीं शिखंडीचे अश्व, सारथि आणि रथ यांचा संहार केला. नंतर तो अश्वहीन महारथ शिखंडी रथांतून उतरून आपलें खड्ग-चर्म घेऊन कृपाचार्यावर धांवून गेला. आपल्यावर शिखंडी चालून येत आहे असें पाहून कृपाचार्यानें त्यावर सन्नतपर्व बाणांनीं एवढी मोठी वृष्टि केली कीं ती शिलावृष्टिच होत आहे असें आम्हांला वाटलें. हे राजा, त्या वेळीं शिखंडी रणांत निश्चेष्ट उभा राहिला ! तेव्हा कृपाचार्यानें शरवृष्टीनें शिखंडीला आच्छादित केलेलें पाहून महारथ

धृष्टद्युम्न त्वरित तेथें आला. तेव्हां कृतवर्म्यानें मोठ्या वेगानें येऊन त्याचें निवारण केलें. हें पाहून युधिष्ठिरानें आपले पुत्र व सैन्य यांसह कृपाचार्यांवर चाल केली. परंतु द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें त्याचा प्रतिकार केला. नंतर महारथ नकुल-सहदेव हे मोठ्या आवेशानें चालून आले. त्यांचेंहि तुझ्या पुत्रानें निवारण केलें. मग कारुष, केकय आणि सृंजय यांसह भीमसेन, युद्धाला आला असतां त्याचें निणारण वैकर्तन कर्णानें केलें !

इकडे शारद्वत कृपाचार्यानें शिखंडीवर इतकी बाणवृष्टि केली कीं, जणुंकाय तिच्या योगानें तो शिखंडीला जाळूनच टाकीत आहे कीं काय असें वाटलें. चोहों बाजूंनीं येणारे ते सुवर्णभूषित बाण शिखंडीनें आपली तरवार फिरवून तोडून टाकिले. इतक्यांत कृपाचार्यानें पुनः बाण टाकून त्याच्या हस्तांतील शत-चंद्र चर्मांचा ( ढालीचा ) भंग केला. तेव्हां सर्वत्र कौरवसैन्यांतील लोकांनीं हर्षभरानें आरोळ्या दिल्या. तेव्हां नुसतें खड्ग घेऊन तो शिखंडी कृपाचार्यांवर चालून गेला ! त्यावेळीं एखाद्या आतुर रोग्यानें जसें मृत्युमुखांत पडावें, तसा तो शारद्वताच्या हातांत आयताच सांपडल्यासारखें झालें. कृपाचार्यानें शिखं-डीला अगदीं बाणग्रस्त करून सोडल्याचें पाहून चित्रकेतूचा पुत्र सुकेतु हा त्याच्या साहाय्याकरितां म्हणून धांवत आला आणि त्यानें कृपाचार्यांच्या रथावर एकसारखी बाणवृष्टि केली. मग सुकेतु आणि कृपाचार्य यांचें युद्ध सुरू झालें असें पाहून शिखंडी पळून गेला !

( २ ) नंतर सुकेतु आणि कृपाचार्य यांमध्यें युद्ध प्रवृत्त झालें असतां सुके-तूनें नऊ बाण गौतमावर मारले. नंतर त्यानें त्या गौतमावर सारखी शरवृष्टि सुरू ठेवून त्याचें सशर धनुष्य तोडून टाकिलें. एका बाणानें त्याच्या सारथ्याचा वध केला आणि त्याच्या मर्मस्थळीं बाण मारून त्याला विद्ध केलें ! कृपाचार्यानें क्रोधयुक्त होऊन नवें बळकट धनुष्य घेतलें आणि सुकेतूच्या सर्व मर्मस्थळीं तीस बाण मारले. त्यायोगानें त्याचीं सर्व गात्रें विगलित होऊन भूमिकंप होऊन वृक्ष जसा भूमीवर पडतो तसा तो रथांत पडला. तो व्यथित झाल्याचें पाहून गौत-मानें त्यावर क्षुरप्र बाण टाकून व शिरस्त्राण, कुंडलें आणि किरीट यांनीं युक्त त्याचें मस्तक तोडून टाकिलें ! राजा, सुकेतूचें मस्तक श्येनमुखांतील मांसाच्या गोळ्याप्रमाणें प्रथम पडलें, नंतर त्याचा देह पडला ! सुकेतूचा वध झालेला पाहून त्याचे सर्व सैनिक भयभीत झाले आणि त्यांनीं गौतमाबरोबर युद्ध करण्याचें सोडून देऊन ते दाही दिशांना पळून गेले !

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, महारथ कृतवर्म्यानें धृष्टद्युम्नाला अडवून मोठ्या उद्धट-पणानें 'थांब थांब' म्हणून सांगितलें. दोन श्येन पक्ष्यांमध्यें मांसपिंडाकरितां जसें मोठें भांडण जुंपतें, त्याप्रमाणें तेव्हां धृष्टद्युम्न आणि कृतवर्मा यांमध्यें मोठें तुमुल युद्ध झालें! धृष्टद्युम्न अत्यंत क्रुद्ध झाला आणि त्यानें कृतवर्म्याच्या उरावर नऊ बाण मारले! कृतवर्म्यानेंहि धृष्टद्युम्नाला त्याचे रथ आणि अश्व यांसह बाणांनीं आच्छादून टाकिलें! पावसाळ्यांत पर्जन्याच्या धारा पडत असतां मेघाच्छादित सूर्य जसा दृग्गोचर होत नाहीं, त्याप्रमाणें हे राजा, बाणाच्छादित धृष्टद्युम्नहि दिसेनासा झाला. धृष्टद्युम्नानें आपल्या कनकभूषण बाणांनीं त्या बाणप्रहारांचा प्रतिकार केला आणि स्वतः व्रणयुक्त होऊन रणांगणावर शोभूं लागला! त्यानें अत्यंत संतप्त होऊन कृतवर्म्यावर भयंकर बाणवृष्टि केली! कृत-वर्म्यानेंहि आपल्या सहस्रावधि बाणांनीं धृष्टद्युम्नाचें निवारण केलें. आपले बाण व्यर्थ गेल्याचें पाहून धृष्टद्युम्न कृतवर्म्याच्या जवळ आला आणि एक तीक्ष्ण धारेचा भल्ल बाण मारून त्याच्या सारथ्याला यमसदनीं पाठविलें! अशा रीतीनें त्या बलिष्ठ धृष्टद्युम्नानें बलवान् कृतवर्म्याला जिंकून व बाणांनीं कौरवांवर प्रहार करून त्यांचा प्रतिकार केला. नंतर तुझ्या सैन्यांतील मोठमोठे वीर सिंहनाद करून धृष्टद्युम्नावर चालून गेले आणि पुनः भयंकर युद्धास आरंभ झाला! ८. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ युधिष्ठिराचा पराजय व अश्वत्थाम्याचा पराक्रम. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, इकडे युधिष्ठिराचें रक्षण सात्यकि व द्रौपदेय हे करीत असतां अश्वत्थामा युधिष्ठिरावर मोठ्या हर्षानें चालून गेला. अश्वत्थाम्यानें यावेळीं सुवर्णपुंख बाणांची घोर वृष्टि युधिष्ठिरावर केली आणि आपलें अपूर्व युद्धनैपुण्य दाखविलें. त्यानें दिव्यास्त्रमंत्रित बाणांनीं आकाश व्याप्त करून टाकलें. त्या महास्त्रवेत्त्या अश्वत्थाम्यानें रणांग-णावर धर्माला आच्छादून टाकिलें. अश्वत्थाम्याच्या बाणांनीं तें सर्व रणांगण व्यापून गेल्यामुळें बाणांशिवाय कांहींएक दिसत नव्हतें! आकाश बाण-जालानें व्याप्त होऊन सर्वत्र जरीचें छत लावल्याचा भास होऊं लागला. त्यावेळीं आकाशांत एक चमत्कार दिसला. तो हा कीं, अंतरिक्षांतील कोणीहि प्राणी बाणसमूहाखालीं येऊं शकला नाहीं. अश्वत्थाम्याच्या बाणांनीं दशदिशा

व्याप्त झाल्यामुळें सात्यकि, धर्मराज आणि इतर सैन्येंहि कांहींच पराक्रम करून दाखवूं शकलीं नाहींत. द्रोणपुत्राचें हस्तलाघव पाहून सर्व महारथ आश्चर्यचकित होऊन गेले आणि प्रखर सूर्याकडे ज्याप्रमाणें कोणाच्यानें पाहवत नाहीं, तसें त्या अश्वत्थाम्याकडे कोणाच्यानेंहि पाहवेना ! नंतर तें सैन्य मारलें जात असतां द्रौपदेय, सात्यकि, धर्मराज, पांचाल हे सर्व वीर एकत्र झाले आणि भयंकर मृत्यूची भीति सोडून देऊन त्या अश्वत्थाम्यावर चालून गेले. सात्यकीनें शिलीमुख व नाराच बाण मारून अश्वत्थाम्याला विद्ध केलें, नंतर युधिष्ठिर, प्रतिविंध्य, श्रुतकर्मा, श्रुतकीर्ति, सुतसोम व शतानीक यांनीं व दुसऱ्याहि पुष्कळ शूर वीरांनीं समंततः बाणवृष्टि करून त्याला विद्ध केलें. नंतर अश्वत्थामा क्रोधाविष्ट झाला आणि सर्पासारखे दीर्घ निश्वास टाकूं लागला. त्यानें श्रुतकीर्ति, सात्यकि, सुतसोम इत्यादि वीरांवर बाणवृष्टि केली आणि आपल्या तीक्ष्ण बाणांनीं श्रुतकीर्तीचें धनुष्य छिन्न करून टाकिलें. तेव्हां श्रुत-कीर्तीनें दुसरें धनुष्य घेतलें आणि अश्वत्थाम्यावर अनेक बाण टाकून त्याला विद्ध केलें. नंतर त्या द्रौणीनें शरवर्षाव करून तें सर्व सैन्य बाणांनीं आच्छा-दित केलें. त्या अश्वत्थाम्यानें धर्माचें धनुष्य छिन्न केलें आणि त्याला तीन बाणांनीं विद्ध केलें ! नंतर त्या धर्मसुत युधिष्ठिरानें दुसरें मोठें धनुष्य घेतलें आणि त्या अश्वत्थाम्याच्या बाहूंवर आणि उरःस्थलावर अनेक बाण मारले. रणांगणांत युधिष्ठिरावर अश्वत्थाम्यानें बाण टाकलेला पाहून सात्यकि क्षुब्ध झाला. त्यानें एका तीक्ष्ण अर्धचंद्र बाणानें अश्वत्थाम्याचें धनुष्य भग्न केलें आणि मोठ्यानें गर्जना केली. याप्रमाणें अश्वत्थामा धनुष्यहीन झाला, तरी त्यानें आपली शक्ति फेंकून सात्यकीच्या सारथ्याला रथावरून खालीं पाडलें. नंतर दुसरें धनुष्य घेऊन त्या प्रतापी अश्वत्थाम्यानें सात्यकीला शराच्छादित केलें. सारथि नसल्यामुळें सात्यकीच्या रथाचे अश्व वाटेल तिकडे स्वेच्छेनें पळत सुटले !

इकडे युधिष्ठिर वगैरे वीर त्या महाधनुर्धर अश्वत्थाम्यावर मोठ्या आवेशानें जाऊन तीक्ष्ण बाणांची त्यावर वृष्टि करूं लागले. परंतु आपल्यावर चालून येणाऱ्या त्या सैन्याचा अश्वत्थाम्यानें हंसतहंसतच प्रतिकार केला. ज्याप्रमाणें अरण्यांत अग्नि भडकला असतां तो तृणादिकांचें भस्म करून टाकतो, त्याप्रमाणें शतावधि बाणज्वालांनीं प्रज्वलित झालेल्या अश्वत्थामाग्नीनें पांडवसैन्यतृणाचें भस्म करून टाकलें ! द्रोणपुत्राचा तो पराक्रम पाहून सर्वांना वाटलें कीं आज

ह्या अश्वत्थाम्याच्या हातून सर्व पांडव हत झाले असावेत! नंतर द्रोणशिष्य महारथ युधिष्ठिर हा क्रोधाविष्ट झाला आणि अश्वत्थाम्याला बोलला, "हा अश्वत्थामन्, तुझ्या ठिकाणीं प्रीति आणि कृतज्ञता किमपिहि दिसत नाहींत! कारण, हे पुरुषव्याघ्रा, तूं माझा देखील वध करूं पाहत आहेस! ब्राह्मणानें खरोखर म्हटलें असतां तपश्चर्या करावी, दान करावें किंवा अध्ययन करावें! धनुष्य धारण करणें हा क्षत्रियांचा धर्म होय. तेव्हां तूं केवळ नांवाचा ब्राह्मण आहेस, इतकेंच. तुझ्यासमक्ष मी कौरवांना जिंकून टाकतों. तुझ्या ठिकाणीं जो कांहीं पराक्रम असेल, तो करून दाखीव! तूं ब्राह्मणाधम आहेस!"

धर्मराजाचें भाषण श्रवण करून द्रोणपुत्रानें हास्य केलें. धर्मराजाचें बोलणें सत्य आहे असें वाटूनच तो कांहीं बोलला नाहीं. नंतर क्रुद्ध अंतक ज्याप्रमाणें प्राण्यांचा क्षय करतो, त्याप्रमाणें पांडवसेनेचा क्षय करण्याचें मनांत आणून अश्वत्थाम्यानें बाणवृष्टि करून धर्माला आच्छादून टाकिलें. बाणाच्छादित होतांच धर्म युद्धपराङ्मुख होऊन रणभूमि सोडून गेला. धर्म गेल्याचें पाहून अश्वत्थामाहि तेथून निघून गेला. राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें धर्मराज अश्वत्थाम्याला रणांगणांत सोडून गेला, तरी कांहीं क्रूर कर्म करून तुझ्या सैन्याचा नाश करण्याचा हेतु धरून तो पुनः कौरवसैन्यावर धांवून आला. ८. ५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—इकडे पांचाल्य, चेदि आणि केकय यांसह भीमसेन कर्णावर चालून गेला असतां त्यावर कर्णानें बाणवृष्टि करून त्या सर्वांचें निवारण केलें. नंतर त्यानें भीमासमक्ष चेदि, कारुष आणि सृंजय यांच्या महारथांना मारलें. हें पाहून भीमसेन कर्णाला सोडून, तृणाला जसा अग्नि जाळून टाकितो, त्याप्रमाणें कौरवसैन्याचा संहार करण्याच्या इच्छेनें त्यावर धांवून गेला! कर्णानेंहि समरांत पांचाल, केकय, सृंजय यांच्या हजारों धनुर्धरांचा वध केला! त्यावेळीं अर्जुनानें संशप्तकांचा संहार केला, कौरवांचा नाश वृकोदरानें केला, तसाच कर्णानेंहि पांचालांचा क्षय केला! याप्रमाणें ते तिघे अग्नितुल्य योद्धे समरांत विध्वंस करूं लागून क्षत्रियांचा संहार होऊं लागला आणि त्याला कारण म्हटलें म्हणजे हे राजा, तुझी दुष्ट मसलत होय!

इतक्यांत दुर्योधन क्रुद्ध होऊन त्यानें नऊ बाणांनीं नकुलाला आणि त्याच्या चारहि अश्वांना विद्ध केलें आणि एका क्षुर बाणानें सहदेवाचा कांचनध्वज छिन्न करून टाकिला. नंतर क्रुद्ध होऊन तुझ्या पुत्रावर नकुलानें सात बाण आणि सहदेवानें पांच बाण मारले ! त्यावेळीं दुर्योधनानें त्या दोघांहि धनुर्धरांच्या वक्षःस्थळावर पांच पांच बाण मारले, आणि दुसऱ्या दोन भल्लांनीं त्यांचीं धनुष्यें छिन्न करून टाकलीं ! तेव्हां रणांगणांत ते दोघे इंद्रधनुष्यांप्रमाणें दिव्यचाप धारण करून युद्धाला सिद्ध झालेले पाहून हे देवपुत्रच आहेत कीं काय असें सर्वांस वाटलें ! नंतर पर्वतावर जशी मेघ वृष्टि करतात, त्याप्रमाणें त्यांनीं दुर्योधनावर बाणवृष्टि केली. तें पाहून दुर्योधनाचा क्रोध अनावर झाला आणि त्यानें सारखी बाणवृष्टि करून त्या धनुर्धर पांडुपुत्रांचा प्रतिकार केला. सूर्याच्या किरणांप्रमाणें बाणवर्षाव करून त्यानें दहाहि दिशा व्याप्त करून टाकल्या. त्यामुळें सर्वत्र अंधकार पडला. त्यावेळीं त्या दुर्योधनाचा पराक्रम पाहून हा जणुं प्रलयकालचा अंतकच आहे असें त्या माद्रीसुत नकुल-सहदेवांना वाटलें आणि ते आतां खरोखर मृत्युमुखांत पडले असल्याचें सर्व महारथ्यांस वाटूं लागलें. इतक्यांत पांडवांचा सेनापति महारथ धृष्टद्युम्न जेथें दुर्योधन आपला पराक्रम गाजवीत होता, त्या ठिकाणीं आला. त्यानें त्या नकुल-सहदेवांच्या पुढें होऊन दुर्योधनावर बाणवृष्टि करून त्याचें निवारण केलें. नंतर तुझ्या पुत्रानें हंसूनच त्या धृष्टद्युम्नावर पंचवीस बाण मारले आणि पुनः मोठ्यानें गर्जना करून पांसष्ट बाण त्यावर मारून एका क्षुरप्र बाणानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य, त्याचा बाण आणि त्याचें तलत्राण हीं छेदून टाकिलीं !

त्या समयीं त्या शत्रुमर्दक पांचाल्यानें आपलें धनुष्य फेंकून दिलें आणि दुसरें बळकट व भारक्षम धनुष्य घेतलें. मग रुधिरासारखे लाल डोळे करून त्या विद्ध झालेल्या धृष्टद्युम्नानें दुर्योधनावर पंधरा बाण मारले. त्या बाणांनीं दुर्योधनाचें हेमविभूषित कवच भेदून त्याच्या शरीरांत प्रवेश केला व तेथून ते भूमींत शिरले. त्या योगानें दुर्योधन वसंतऋतूंत फुललेल्या पळसाप्रमाणें शोभूं लागला ! नाराच बाणाच्या प्रहारांनीं छिन्न झालेल्या दुर्योधनानें क्रोधयुक्त होऊन एक भल्ल टाकून धृष्टद्युम्नाचें धनुष्य छेदून टाकिलें आणि त्वरा करून त्याचे दोन भिवयांमध्यें दहा बाण मारले. ते बाण त्याच्या कपाळांत रुतल्यामुळें जणुंकाय मधुप्राशनाच्या इच्छेनें कमळावर भ्रमरच बसले आहेत असें वाटूं लागलें. नंतर धृष्टद्युम्नानें तें छिन्न धनुष्य फेंकून दिलें आणि दुसरें एक

धनुष्य आणि सोळा बाण घेतले. पांच बाणांनीं त्यानें दुर्योधनाचा सारथि आणि रथाचे अश्व यांना मारलें. दुसऱ्या एका बाणानें त्याचें सुवर्णालंकृत धनुष्य छिन्न केलें. बाकीच्या दहा बाणांनीं तुझ्या पुत्राचा रथ, छत्र, शक्ति, खड्ग, गदा आणि ध्वज यांचा नाश केला. अशाप्रकारें दुर्योधन विरथ होऊन कवचहीन व आयुधहीनहि झाला. धृष्टद्युम्नानें त्याच्या सुवर्णविभूषित, चित्रविचित्र आणि मंगलकारक ध्वजाचाहि सर्व राजे लोकांसमक्ष भंग केला ! तेव्हां दुर्योधनाचे बंधु त्याच्या संरक्षणाकरितां आले आणि मग दंडधार राजानें मोठ्या धीटपणानें धृष्टद्युम्नाचे समक्ष त्याला रथांत घालून एकीकडे नेलें !

इतक्यांत कर्ण सात्यकीला जिंकून राजा दुर्योधनाला सोडविण्याकरितां रणांत त्या द्रोणघातक धृष्टद्युम्नावर बाणवृष्टि करीत धांवून आला. त्याच्या पाठीमागें सात्यकि त्याजवर बाणवर्षाव करीत निघाला. तेव्हां कर्ण आणि सात्यकि या दोन वीरांकडील प्रमुख योद्ध्यांमध्यें भयंकर रणसंग्राम झाला. त्यावेळीं जयेच्छु पांचाल वृक्षावर धांवून जाणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें कर्णावर चालून गेले. कर्णानेंहि आपल्यावर चालून येणाऱ्या सर्व पांचालांवर बाणांचा भडिमार केला आणि पांचालांतील व्याघ्रकेतु, सुशर्मा, चित्र, उग्रायुध, जय, शुक्ल, रोचमान आणि सिंहसेन नांवाच्या ज्या आठ प्रमुख योद्ध्यांनीं कर्णावर बाणवृष्टि करून त्याला वेष्टिलें होतें, त्यांना आठ तीक्ष्ण बाण टाकून त्रस्त केलें. तसेंच त्यानें हजारों युद्धकलानिपुण योद्ध्यांचा आणि जिष्णु, जिष्णुकर्मा, देवापि, दंड इत्यादि चेदिमहारथांचाहि रणांत वध केला ! ह्या महारथ्यांच्या वधप्रसंगीं त्याच्या अंगावर रक्ताचें सिंचन होऊन रुद्राच्या देहाप्रमाणें त्याचें शरीर अतिभयंकर दिसूं लागलें. त्या समयीं कर्णानें शत्रुपक्षांतील मातंगांवर बाणांचा इतका कहर उडवून दिला कीं ते भयभीत होऊन चोहोंकडे पळत सुटले ! ते रणांत कर्णाच्या बाणप्रहारांनीं पीडित होऊन शेवटीं नानाप्रकारचा आक्रोश करीत वज्रहत पर्वताप्रमाणें भूमीवर धाडकन् पडले.

कर्णाच्या मार्गांत सर्वत्र गज, वाजी आणि मनुष्यें हीं सारखीं मरून सर्व पृथ्वी आच्छादित होऊन गेली होती ! त्या युद्धांत कर्णानें जसें अद्भुत व भयंकर कृत्य केलें, तशा प्रकारचें कृत्य भीष्म, द्रोण किंवा तुझ्या पक्षांतील दुसऱ्या कोणींहि केलें नाहीं ! समरांत कर्णानें गज, अश्व, रथ आणि नर यांचें कंदन केलें ! मृगांमध्यें सिंह जसा निर्भयपणें संचार करीत असतो, त्याप्रमाणें कर्ण पांचालांमध्यें संचार करीत असे. सिंहाच्या तोंडांत एकदां मृग पडला असतां

तो जसा जीवंत राहत नाहीं, त्याप्रमाणें कर्णाच्या तावडींतून कोणीहि महारथी जीवंत सुटला नाहीं. अग्नींत पडून जसे प्राणी जळून भस्म होऊन जातात, त्याप्रमाणें हे धृतराष्ट्रा, कर्णरूप दावाग्नींत ते सृंजय जळून खाक झाले! त्यानें चेदि, कैकेय आणि पांचाल यांच्या वीरांना 'मी कर्ण आहें' असें सांगून वधिलें! हे राजा, कर्णाचा तो पराक्रम पाहून माझी मति अशी झाली कीं, आज कर्णाच्या हातून एकहि पांचाल वीर जीवंत सुटणार नाहीं! कर्णानें पांचालांचा पुनःपुनः संहार केला. तें पाहून धर्मराज युधिष्ठिराला अत्यंत संताप आला आणि तो कर्णावर धांवून आला. त्याबरोबर धृष्टद्युम्न, द्रौपदेय आणि शेंकडो दुसरे वीर यांनीं कर्णाच्या रथाला वेष्टिलें. शिखंडी, सहदेव, नकुल, नाकुली, जनमेजय, शैनेय, पुष्कळ प्रभद्रक वीर आणि सेनापति धृष्टद्युम्न यांनीं कर्णावर बाणवृष्टि सुरू केली. कर्णहि त्यांवर उलट शरवर्षाव करूं लागला. गरुड जसा सर्पांवर उडी घालून त्यांचा संहार करितो, त्याप्रमाणें कर्णानें चेदि, पांचाल आणि पांडव वीरांचा विध्वंस चालविला! नंतर देवदानवांप्रमाणें त्यांचें भयंकर युद्ध सुरू झालें! त्या एकट्या कर्णानें दिवाकर जसा अंधकाराचा नाश करून टाकतो, तसा आपल्यावर शरवृष्टि करणाऱ्या त्या शत्रुसैन्याचा संहार केला!

पांडव आणि राधेय कर्ण हे युद्धांत निमग्न झाले असतां भीमसेन क्रोधसंतप्त होऊन यमाच्या दंडाप्रमाणें कुरुसैन्यावर चारी बाजूंनीं तीक्ष्ण शरांचा वर्षाव करूं लागला. एकट्या भीमसेनानें वाह्लीक, कैकेय, मत्स्य, वासात्य, मद्र आणि सैंधव यांजवर मोठी शरवृष्टि करून गजांच्या मर्मस्थानीं बाणांचा असा प्रखर प्रहार केला कीं ते गज आपल्यावर बसलेल्या वीरांसह रणांत पडूं लागले! त्यामुळें पृथ्वी कंपायमान झाली! अश्वसादींसह अश्व मरून पडले. पदाति बाणांनीं हत होऊन रक्त ओकूं लागले. भीमानें बाणवृष्टि करून शतावधि रथी आयुधहीन केले व रणभूमीवर पाडिले. ते भीमाला पाहतांच मृतप्राय होऊन गेले. रथी, सादी, सूत, पदाति, अश्व व गज हे भीमबाणांनीं विद्ध होऊन निधन पावले! दुर्योधनाचें सर्व सैन्य भीमाच्या बाणांनीं अगदीं स्तंभित होऊन निरुत्साह झालें. तें त्या महारणामध्यें अगदीं दीन व निश्चेष्ट होऊन राहिलें. तुझ्या सैन्याच्या ठिकाणीं क्रोध, वीर्य आणि बल हीं असूनहि भीमानें त्याचा दर्प नाहींसा केल्यामुळें तें अगदीं निष्प्रभ होऊन राहिलें! तीं सैन्यें परस्परांचा वध करीत असतां सर्व रणांगण रक्तमय होऊन गेलें आणि त्यांनीं रक्ताचें स्नान केलें आहे कीं

काय असा भास झाला. रणांगणांत असा प्रकार चालला असतां कर्णानें पांडव-सैन्यावर व भीमानें कौरवसैन्यावर चाल केली. तेव्हां ते दोघेहि वीर परस्पर सैन्यांची दाणादाण करीत असतां फारच शोभले !

इकडे अर्जुन व संशप्तक वीर यांमध्यें अद्भुतदर्शन संग्राम सुरू असतां अर्जुनानें बऱ्याच संशप्तकांचा रणांगणीं वध केल्यावर तो वासुदेवाला बोलला, " जनार्दना, या संशप्तकांचें बहुतेक सैन्य आतां नष्ट झालें आहे ! हे संशप्तकांचे महारथ आपापलें सैन्य घेऊन पळून जात आहेत पहा ! सिंहाचा शब्द जसा मृगांला सहन होत नाहीं, तसे हे संशप्तक वीरहि माझे बाण सहन करण्यास आतां समर्थ नाहींत ! कृष्णा, या महारणामध्यें सृंजयांच्या सैन्याचा बराच नाश झाल्याचें दिसत आहे. बुद्धिमान् कर्णाचा गजकक्षांकित ध्वज धर्माच्या सैन्यांत आनंदानें फडकत आहे पहा ! कृष्णा, कर्णाला जिंकण्याला अन्य महारथ समर्थ नाहींत. पराक्रमांत कर्णाची योग्यता केवढी आहे, हें तुला ठाऊक आहेच. तर सर्व संशप्तकांना सोडून जेथें कर्ण आपल्या सैन्यास जर्जर करून सोडीत आहे, तिकडे जावें हें मला योग्य दिसतें. यावर तुला जें योग्य वाटेल, तें तूं कर !"

अर्जुनाचें हें भाषण ऐकून कृष्ण हंसला आणि अर्जुनाला म्हणाला ' अर्जुना, आतां तूं कौरवांना शीघ्र मारून टाक !' असें बोलून कृष्णानें अर्जुनाच्या त्या हंसवर्ण अश्वांस प्रेरणा दिली व ते अर्जुन व कृष्ण यांस कौरवसैन्यांत घेऊन गेले. तुझ्या सैन्यांत त्या रथाचा प्रवेश होतांच तें सैन्य चारी दिशांना पळूं लागलें ! त्या रथाचा आवाज मेघगर्जनेप्रमाणें होत होता. त्याच्या ध्वजावर मारुति आरूढ झाला होता आणि त्याच्या पताका फडकत होत्या ! असा तो रथ विमान आकाशांत शिरतें, त्याप्रमाणें कौरवसैन्यांत शिरला. त्या महासेनेचा भंग करून कृष्णार्जुनांनीं आंत प्रवेश केला तेव्हां त्यांचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते ! त्यामुळें ते अत्यंत तेजस्वी दिसूं लागले ! कर्णानें आह्वान केल्यावरून ते दोघे युद्धविशारद कृष्णार्जुन ऋत्विजांच्या यथाविधि हवनामुळें प्रकट झालेले साक्षात् अश्विनीकुमारच होत असें वाटलें ! नंतर अर्जुनानें रथसमूह व अश्वसेना यांची दाणादाण उडविली व तो पाशहस्ती यमाप्रमाणें सैन्यामध्यें संचार करूं लागला. त्या पराक्रमी अर्जुनाला सैन्यांत पाहून तुझ्या पुत्रानें संशप्तकगणांना पुनः अर्जुनावर चालून जाण्यास आज्ञा केली.

नंतर एक हजार रथ, तीनशें गज, चौदा हजार अश्व आणि दोन लक्ष शूर व अचूक नेम मारणारे पायदळ यांसह संशप्तक महारथी अर्जुनावर चालून गेले आणि त्यांनीं अर्जुनाला बाणाच्छादित करून टाकलें. अर्जुनानेंहि संशप्तकांवर बाणवृष्टि करून त्यांचा असा संहार केला कीं जणुंकाय तो पाशपाणि यमच आहे असें सर्वांस भासलें. त्यावेळीं अर्जुनाच्या अंगावर विशेषच तेज झळकत होतें. त्यानें एकसारखी बाणवृष्टि करून सर्व आकाश व्याप्त करून टाकलें. तेव्हां सर्व पृथ्वी जणुंकाय सर्पांनींच आवृत झालेली दिसूं लागली ! सर्व दिशांना सुवर्णपुंख व सन्नतपर्व बाण टाकून पार्थाच्या तलनिस्वनानें पृथ्वी, आकाश, समुद्र, पर्वत आणि दाही दिशा फुटून जात आहेत असा भास होऊं लागला ! त्या महारथ अर्जुनानें संशप्तकांचे दहा हजार पार्थिवांचा वध केला आणि तो कांबोजांनीं रक्षित संशप्तकांच्या तुकडीवर धांवून गेला आणि इंद्रानें ज्याप्रमाणें दैत्यांचा वध केला, त्याप्रमाणें बाणांनीं शत्रुसैन्याचीं आयुधें, हात, बाहु आणि मस्तकें तोडून त्या संशप्तकांचा नाश केला. त्यावेळीं हातपाय इत्यादि अवयव तुटून व हातांतील आयुधें गळून सोसाट्याच्या वाऱ्यानें फांद्यांसह पडलेल्या वृक्षांप्रमाणें ते संशप्तक वीर समरभूमीवर पडले !

राजा, अशाप्रकारें अर्जुनानें संशप्तकांचे गज, रथ, हय आणि नर यांच्या गणांचा भयंकर संहार केला. तेव्हां सुदक्षिणाचा कनिष्ठ बंधु अर्जुनावर अतिबाणवृष्टि करीत धांवून आला ! त्याचे परिघसदृश बाहू अर्जुनानें दोन अर्धचंद्राकार बाणांनीं व पूर्णचंद्रासमान मुख एका क्षुर बाणानें छेदून टाकलें ! तेव्हां रक्तस्राव होत असतां तो मनःशिलापर्वताचें वज्रहत शिखर जसें कोसळून पडावें, त्याप्रमाणें आपल्या अश्वावरून खालीं भूमीवर पडला ! ह्याप्रमाणें सुंदर, कमलनेत्र आणि सुवर्णस्तंभासमान देदीप्यमान सुदक्षिणाचा धाकटा बंधु छिन्न झालेल्या हेमगिरीप्रमाणें रणांत हत झाला ! तेव्हां पुनः घोर, अत्यंत अद्भुत आणि तुमुल संग्राम सुरू झाला. प्रत्येक योद्ध्याच्या शरीरांत बाण घुसून ते कांबोज, यवन आणि शक आपापल्या अश्वांसह रणांत मरून पडले. सर्वत्र रक्ताचा सडा पडून सर्व प्रदेश लाल झाला ! या संग्रामांत दोन्ही दळांतील अश्व, रथ, सारथि, अश्वांवरील वीर, तसेच गज आणि गजांवरील योद्धे मरून पडले आणि मोठा जनसंहार झाला. अशारीतीनें कौरवांच्या पक्षप्रपक्षांचा अर्जुनानें संहार केल्याचें पाहून अश्वत्थामा त्या धनुर्धर अर्जुनावर त्वरित धांवून आला !

राजा धृतराष्ट्रा, अश्वत्थाम्यानें आपलें सुवर्णविभूषित धनुष्य आणि सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी बाण धारण केले. नंतर त्या क्रोधाविष्ट द्रौणीनें सूड घेण्याच्या इच्छेनें डोळे लाल केले. तेव्हां प्रलयकालीन घोरदंड धारण करून साक्षात् क्रुद्ध यमच पुढें उभा आहे, असें सर्वांस वाटलें. कृष्णाला रथांत पाहून अश्वत्थाम्यानें त्यावर तीक्ष्ण बाणांचा प्रहार सुरू केला आणि पुनः त्या रथाधिष्ठित कृष्णार्जुनांस चोहोंकडून बाणाच्छादित केलें. त्यामुळें तें पांडवसैन्य अगदीं विह्वल होऊन गेलें. हे राजेंद्रा, त्या अश्वत्थाम्यानें नंतर कृष्णार्जुनांस बाणवर्षावानें अगदीं निश्चेष्ट करून टाकिलें. ते चराचर विश्वाचे रक्षक बाणपीडित झाल्याचें पाहून सर्व स्थावरजंगमात्मक विश्वांत एकच हाहाकार उडाला ! त्यावेळीं लोकांचें कल्याण कशानें होईल, हें एकच चिंतन करणारे सिद्धचारणसंघ तेथें आले. हे राजा, कृष्णार्जुनांस बाणाच्छादित करून टाकणाऱ्या अश्वत्थाम्याचा पराक्रम जसा मला दिसला, तसा पराक्रम मीं पूर्वीं कधींहि पाहिला नव्हता. शत्रूला त्रासदायक असा धनुष्याचा टणत्कार जेव्हां जेव्हां अश्वत्थामा करीत असे, तेव्हां तेव्हां सिंहाच्या गर्जनेप्रमाणें त्याची अत्यंत भीति वाटत असे ! समरांत अश्वत्थामा संचार करीत वामदक्षिण बाणवर्षाव करीत असतां त्याची प्रत्यंचा मेघावर शोभणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें दिसत असे ! अर्जुन हा त्वरित शरवृष्टि करणारा आणि दृढहस्त वीर असतांहि त्या द्रोणपुत्र अश्वत्थाम्याला पाहून त्याच्या मनाला मोह उत्पन्न झाला आणि आपला पराक्रम अश्वत्थाम्यापुढें कांहींच नाहीं, असें त्याला वाटलें. त्यासमयीं द्रौणीच्या शरीराकडे त्याच्या उग्र पराक्रमावरून कोणाच्यानेंहि पाहवेना !

अशाप्रकारें अश्वत्थामा व अर्जुन यांमध्यें युद्ध प्रवृत्त झालें असतां आणि त्यांत द्रोणपुत्राचा विजय आणि अर्जुनाचा अपजय होत असल्याचें पाहून कृष्णाला अत्यंत संताप आला आणि क्रोधानें सुसकारे टाकीत व नेत्रांनीं दशदिशा जाळीत तो अर्जुन आणि अश्वत्थामा यांकडे वरचेवर पाहूं लागला. तो संतप्त कृष्ण अर्जुनाला प्रणयपूर्वक बोलला, “ हे पार्था, आज मला मोठा चमत्कार वाटत आहे. तो हा कीं, आजच्या संग्रामांत द्रोणपुत्राचा पराक्रम तुझ्यापेक्षां श्रेष्ठ दिसत आहे. हे अर्जुना, तुझा पराक्रम आणि तुझें बाहुबल पूर्वीप्रमाणें आहेना ? तुझ्या हस्तांत गांडीव धारण करून तूं रथाधिष्ठित आहेसना ? तुझे बाहू धडधाकट असून तुझी मुष्टि भंग झाली नाहींना ? आज रणामध्यें द्रौणीचें वीर्य वृद्धिंगत होत असल्याचें दिसत आहे ! हे भरतर्षभा, हा आपला

गुरुपुत्र आहे, म्हणून तूं याची उपेक्षा करूं नकोस! हा उपेक्षा करण्याचा काल नव्हे!"

असें कृष्णानें सांगितल्यावर अर्जुनानें चवदा भल्ल घेतले आणि मोठ्या त्वरेनें अश्वत्थाम्याचें धनुष्य छिन्न केलें आणि ध्वज, छत्र, पताका, रथ, शक्ति आणि गदा ह्यांचा त्यानें संहार उडवून दिला! त्यानें अश्वत्थाम्याच्या जत्रुदेशीं वत्सदंत बाण मारला! त्यायोगानें अश्वत्थाम्याला मूर्च्छा आली आणि तो ध्वजयष्टि धरून राहिला! अश्वत्थाम्याला मूर्च्छा आल्याचें पाहून त्याच्या सारथ्यानें धनंजयापासून त्याचें रक्षण करण्याच्या हेतूनें त्याला दूर नेलें! नंतर त्या शत्रुतापन अर्जुनानें तुझ्या सैन्यांतील शतशः आणि सहस्रशः वीरांचा तुझ्या पुत्राच्या देखत वध केला! हे राजा, अशाप्रकारें तुझा व शत्रुसैन्याचाहि संहार झाला आणि ह्याला कारण म्हटलें म्हणजे तुझी दुष्ट मसलतच होय! राजा, कुंतीपुत्रानें संशप्तकांना, वृकोदरानें कुरूंना आणि कर्णानें पांचालांना रणांत मारून टाकिलें. असा सारखा वीरवरांचा क्षय त्या रणांत झाल्यामुळें समरांत चारी बाजूंनीं अगणित कबंधें उठलीं! भरतसत्तमा धृतराष्ट्रा, संग्रामांत युधिष्ठिर बाणप्रहारांच्या वेदनांनीं अतिविव्हल झाला. त्यामुळें तो रण सोडून एक कोसभर लांब जाऊन राहिला! ८. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ अश्वत्थाम्याची प्रतिज्ञा. ]

( १ ) संजय—हे भरतर्षभा, नंतर दुर्योधन कर्णाजवळ गेला आणि त्याला, मद्रराज शल्याला आणि दुसऱ्याहि राजांना उद्देशून म्हणाला, "वीरांनो, हें स्वर्गद्वार आपणाला अनायासेंच मोकळें मिळालें आहे! कर्णा, भाग्यवान् क्षत्रियांनांच अशाप्रकारचें युद्ध प्राप्त होत असतें. युद्ध करीत असतां शूरांना त्यांच्या सदृश शूर क्षत्रियांची गांठ पडली असतां आनंद होतो. असा काल आम्हांला आज प्राप्त झाला आहे. युद्धामध्यें पांडवांचा वध केला असतां समृद्ध पृथ्वी तुम्हांला प्राप्त होईल! जर कदाचित् तुम्हांला युद्धांत शत्रुहस्तें मृत्यु आला तर तुम्हाला वीरलोक मिळेल!" दुर्योधनाचें तें भाषण ऐकून सर्व क्षत्रियश्रेष्ठांना मोठा आनंद झाला. त्यांनीं परम हर्षानें गर्जना केल्या आणि रणवाद्येंहि वाजूं लागलीं. त्यावेळीं सर्व दुर्योधनाचे सैन्याला स्फुरण चढलें असतां अश्वत्थाम्यानें

तुझ्या सर्व वीरांस अत्यंत आनंदजनक असें भाषण केलें. तो म्हणाला, "वीरहो, सर्व सैन्याच्या समक्ष आणि तुम्ही सर्व पहात असतां धृष्टद्युम्नानें माझ्या पित्यानें शस्त्रन्यास केला असतांहि त्याचा वध केला ! तर त्याचा सूड घेण्याकरितां व मित्र दुर्योधन ह्याचे कल्याणाकरितां हे राजांनो, मी प्रतिज्ञा करीत आहें. ती श्रवण करा ! धृष्टद्युम्नाचा वध केल्याशिवाय माझ्या अंगांतील कवच मी केव्हांहि काढणार नाहीं ! माझी प्रतिज्ञा सत्य न झाल्यास मला स्वर्गप्राप्ति होणार नाहीं. अर्जुन, भीमसेन, किंवा दुसरा जो कोणी वीर त्याच्या संरक्षणाकरितां धांवून येईल, त्याला मी बाणांनीं मारीन !"

धृतराष्ट्रा, याप्रमाणें अश्वत्थाम्याचें भाषण झाल्यावर तें सर्व कौरवसैन्य पांडवांवर चालून गेलें. आणि पांडवसैन्यहि तसेंच कौरवसैन्यावर धांवून आलें. तेव्हां दोन्ही पक्षांतील महारथांचें मोठें तुमुल युद्ध झालें. नंतर कुरु आणि सृंजय यांमध्यें भयंकर युद्ध सुरू होऊन परस्परांचा क्षय होऊं लागला असतां त्या नरवीरांना पाहण्याकरितां देव, अप्सरा आणि सर्व भूतें एकत्र झालीं. त्या-वेळीं युद्धांत आपापलें कर्म उत्तम रीतीनें करून ज्यांनीं उत्तम पराक्रम केला, तो पाहून त्या अप्सरांना आनंद झाला आणि त्यांनीं त्या वीरांवर दिव्य माला, विविध गंध आणि नानाप्रकारचीं दिव्य रत्नें ह्यांची वृष्टि केली. वायूनें तो सुगंध सर्व वीरवरांना पोंचविला. अशा रीतीनें वायूनें सेविलेले ते योद्धे परस्परांचा वध करून धरणीवर पडले ! राजा, दिव्य माला, सुवर्णपुंख बाण आणि मोठमोठे वीर यांनीं सर्व क्षितितल आच्छादिलें जाऊन जणुंकाय नक्षत्रसमूहानें चित्रित केलेलें तें आकाशच होय, असें वाटलें ! त्या समयीं अंतरिक्षांत 'उत्तम, उत्तम' असा शब्द निघून सर्वत्र रणवाद्यें वाजूं लागलीं, जयघोष होऊं लागले आणि त्यांत रथनेमींचा आवाज मिसळला. त्यामुळें एकच भीतिजनक कोलाहल होऊन राहिला ! ८. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ श्रीकृष्णकृत युद्धवर्णन. २ कृष्ण अर्जुनाला युधिष्ठिराकडे घेऊन जातो. ]

( १ ) **संजय**—राजा, अशा प्रकारें अर्जुन, कर्ण आणि भीमसेन हे क्रुद्ध होऊन त्या राजे लोकांमध्यें मोठा संग्राम झाला. द्रोणपुत्र आणि दुसऱ्याहि महारथ्यांस जिंकून अर्जुन वासुदेवाला बोलला "महाबाहो कृष्णा, ही पांडवांची

सेना कशी पळून जात आहे, पहा! हा कर्ण रणभूमीवर महारथांना कसा जर्जर करून सोडीत आहे, तें लक्ष्यांत आण! हे दाशार्हा, आज धर्मराज युधिष्ठिर कोठें दिसत नाहीं व त्याचा उत्तम ध्वजहि कोठें आढळत नाहीं! हे जनार्दना, दिवसाचा तिसरा भाग मात्र आतां राहिला आहे. आज माझ्याबरोबर कोणीहि कौरव वीर युद्धास तयार नाहीं म्हणून जेथें युधिष्ठिर असेल, तेथें आधीं मला घेऊन चल, म्हणजे मला बरें वाटेल. कृष्णा, युधिष्ठिर बंधु भीमसेनासह कुशल आहे, असें कळल्यावर मग मी पुनः युद्ध करीन!" नंतर अर्जुनाच्या बोलण्याप्रमाणें कृष्ण जेथें धर्म आणि सृंजय तुझ्या पुत्रांबरोबर जिवावर उदार होऊन युद्ध करीत होते तेथें अर्जुनास घेऊन आला. त्या संग्रामभूमीवर चाललेला भयंकर जनक्षय पाहून कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "अर्जुना, दुर्योधनाकरितां हा क्षत्रियांचा भयंकर नाश कसा होत आहे, तें पहा! हे भारता, धनुर्धरांच्या हातून पडलेलीं हीं सुवर्णपृष्ठ धनुष्यें व अमूल्य तूणीर पहा! हे कात टाकलेल्या पन्नगांप्रमाणें नाराच बाण दिसत आहेत पहा! हीं सोन्याचीं कोंदण केलेलीं खड्गें पहा! हीं आंतून सोन्याचें काम केलेलीं चर्में (ढाली), अवलोकन कर! तसेंच सुवर्णभूषित हे प्रास, शक्ति, प्रचंड गदा, ऋष्टि, पट्टे, परश्वध (कुऱ्हाडी), पोलादी कुंत, मोठमोठीं मुसळें, चित्रविचित्र शतघ्नी, विपुल परिघ, चक्रें, तोमरें आणि नानाविध शस्त्रें पडलीं आहेत, तीं पहा! अर्जुना, हे वीर पडले आहेत, तरी त्यांचीं जवळ पडलेलीं आयुधें पाहून ते जीवंतच आहेत, असें वाटतें! अर्जुना, हे गदेनें चूर्ण झालेले, मुसळांनीं मस्तकें भग्न झालेले, गज-वाजि-रथांनीं तुडविलेले सहस्रावधि वीर मरून पडले आहेत ते पहा! तसेंच शर-शक्ति इत्यादिकांच्या प्रहारांनीं छिन्न होऊन ज्यांच्या शरीरांतून रक्ताचे ओघ वाहत आहेत अशीं मनुष्यें, अश्व आणि गज मरून पडले असून त्यांच्या योगानें ही रणभूमि कशी व्यापून गेली आहे पहा! हे येथें चंदनदिग्ध, अंगदयुक्त, हेमविभूषित आणि केयूरमंडित बाहु सर्वत्र पडून पृथ्वी कशी शोभत आहे पहा! अर्जुना, हातपाय तुटून, नुसतीं रक्तानें माखलेलीं कबंधें पडलीं आहेत, तीं पाहून ज्यांतील ज्वाला शांत होऊन गेल्या आहेत, असें अग्नियुक्त यज्ञकुंडच आपण पहात आहों असा भास होतो. ज्यावर सोन्याच्या घंटा लावल्या आहेत, असे हे भग्न रथ पहा! हे शरप्रहारांनीं हत झालेले अश्व अवलोकन कर! ह्या पताका, विविध ध्वज, रथ्यांचे मोठमोठे शंख, चामरें, जिव्हा बाहेर काढून मेलेले हे पर्वतोपम गज, त्यांजवरील विचित्र निशाणें आणि हत झालेले अश्व, गजांवरील अंबाऱ्या, त्यांच्या अंगा-

वरील फाटून गेलेलीं भरजरी वस्त्रें, फुटलेल्या अनेक घंटा, इतस्ततः भूमीवर पडलेले वैदूर्यदंड आणि अंकुश, सादींच्या हस्तांतील सुवर्णभूषित कशा (चाबूक), राजे लोकांचे चूडामणि, कांचनमाला, छत्रें, चामरें आणि व्यजनें सर्वत्र पडलीं आहेत तीं पहा! जिकडेतिकडे पडलेलीं चंद्र-नक्षत्रांप्रमाणें शोभणारीं, सुंदर कुंडलांनीं विराजित आणि सुंदर केशकलापांनीं शोभणारीं हीं वीरांचीं मुखकमलें पहा! तसेंच हे सजीव वीर आपसांत कुजबुजत आहेत पहा! हे राजेंद्रा, हे वीर हातांतील शस्त्रें टाकून आपल्या ज्ञातिवर्गाबरोबर रडत बसले आहेत पहा! जयेच्छु वीर क्रोधसंतप्त होऊन पुनः युद्धाकरितां जात आहेत! दुसरे कित्येक दांतओठ चावीत व आपल्या भ्रुकुटि चढवीत चारी बाजूंवर दृष्टी टाकीत चालले आहेत पहा!

(२) असें भाषण करून युधिष्ठिर जिकडे होता, तिकडे कृष्णानें रथ हांकला. अर्जुनहि नृपतिदर्शनार्थ 'कृष्णा, चल, चल' असें वारंवार म्हणत असे. पार्थाला ती रणभूमि दाखवून युधिष्ठिराकडे जाण्यास कृष्ण त्वरित निघाला. मग तो वाटेंत अर्जुनाला हळूच बोलला, 'तो पहा तेथें युधिष्ठिर आणि ते त्याजवर चालून जाणारे राजे पहा! आणि तो अग्नीप्रमाणें प्रज्वलित समरभूमीवर कर्ण पहा! हा भीम युद्धाकरितां येत आहे पहा! त्याच्या मागून पांचाल, सृंजय आणि पांडव यांचें केवळ मुखच असे हे धृष्टद्युम्नादि वीर येत आहेत, ते पहा! हें शत्रूंचें मोठें सैन्य पांडवांनीं रणांत पुनः येऊन भग्न केलें पहा! हा कर्ण पळून जाणाऱ्या कौरवसैनिकांना आंवरून धरण्याकरितां कसा प्रयत्न करीत आहे पहा! तो यमासारखा वेगवान्, शक्रासारखा पराक्रमी महाधनुर्धर द्रौणि चालला आहे पहा! रणांगणांत त्याच्यावर हा महारथ धृष्टद्युम्न चालून गेला आहे पहा! अरे हा इकडे सृंजयांचा नाश होत आहे, तो अवलोकन कर!"

याप्रमाणें रणांगणांतील सर्व हकीकत श्रीकृष्णानें अर्जुनाला निवेदन केली. हे राजा, मग तेथें महाघोर युद्ध सुरू झालें. जिवावर उदार होऊन उभय दळांतील वीर एकमेकांवर धांवून गेले आणि हे राजा, त्या युद्धांत मोठा भयंकर जनक्षय झाला. हें सर्व केवळ तुझ्या दुर्मंत्रिताचें फळ होय! ८. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ कर्ण-धृष्टद्युम्नयुद्ध. २ कर्ण-सात्यकियुद्ध. ३ अश्वत्थाम्याचें धृष्टद्युम्नाशीं युद्ध. ४ अश्वत्थाम्याचा पराजय. ]

( १ ) **संजय**—राजा, नंतर कुरु आणि सृंजय हे निर्भयपणें पुनः एकमेकांवर धांवून आले. पांडवांकडे युधिष्ठिरादिक तर कौरवांकडे कर्णादिक प्रमुख योद्धे होते. यमराज्याची वृद्धि करणारा असा घोर संग्राम त्या दोन सैन्यांत होऊन प्रेक्षकजनांच्या अंगावर कांटा उभा राहिला ! तो तुमुल संग्राम सुरू होऊन रक्ताचे प्रवाह वाहूं लागले आणि शूर संशप्तकांचा थोर संहार होऊन त्यांच्या सैन्यापैकीं फारच थोडें सैन्य अवशिष्ट राहिलें. नंतर हे महाराजा, सर्व राजांसह धृष्टद्युम्न आणि महारथ पांडव कर्णावर धांवून आले ! तेव्हां पर्वत जसा जलौघाला अडवून धरितो, त्याप्रमाणें एकट्या कर्णानें त्या विजयेच्छु प्रहृष्ट वीरांना अडवून धरिलें ! कर्णाचें व त्या महारथ्यांचें युद्ध होऊन, पर्वतावर जसे जलौघ फुटून त्यांची सर्व दिशांना फांकाफांक होऊन जाते, त्याप्रमाणें कर्णापुढें त्यांची स्थिति झाली ! अंगावर कांटा उभें करणारें असें तें युद्ध होऊन त्यांत धृष्टद्युम्नानें एका बाणानें कर्णाला विद्ध केलें आणि ‘ थांब, थांब ’ म्हणून मोठ्यानें आरोळी दिली. मग त्या महारथ कर्णानें क्रुद्ध होऊन आपल्या विजय धनुष्यानें मोठी बाणवृष्टि करून त्या धृष्टद्युम्नाचें धनुष्य छिन्न केलें व त्याजवर सर्पतुल्य नऊ तीक्ष्ण बाण मारले ! त्या बाणांनीं धृष्टद्युम्नाचे सुवर्णविभूषित कवचाचा भेद केला आणि हे अनघा, ते रक्तसिंचित बाण इंद्रगोपांप्रमाणें शोभूं लागले. धृष्टद्युम्नानें त्या छिन्न धनुष्याचा त्याग केला आणि दुसरें धनुष्य घेऊन कर्णावर सत्तर प्रखर बाण टाकले ! मग त्या शत्रुतापन धृष्टद्युम्नावर कर्णानें तीक्ष्ण बाणवृष्टि केली. कर्णावरहि त्या द्रोणशत्रु धृष्टद्युम्नानें प्रखर बाणांचा वर्षाव केला ! नंतर कर्णानें दुसरा मृत्युदंडच कीं काय असा एक सुवर्णविभूषित बाण धृष्टद्युम्नावर टाकला. तो घोररूप बाण हे राजेंद्रा, धृष्टद्युम्नावर येत असतां सात्यकीनें बाणवृष्टि करून मार्गांतच त्याचे शतशः तुकडे केले !

( २ ) कर्णानें सात्यकीवर बाणवृष्टि करून त्याला सात नाराच बाणांनीं विद्ध केलें व सात्यकीनेंहि हेमविभूषित बाणांनीं कर्णाला विद्ध केलें ! तेव्हां त्या दोघांमध्यें असें भयंकर युद्ध झालें कीं तें ऐकण्याला व पाहाण्यालाहि भीति वाटूं लागली ! त्यावेळीं रणांगणावर त्या कर्ण-सात्यकींनीं जो पराक्रम करून दाखविला, त्यानें तेथें जमलेल्या सर्व प्राण्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला !

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, मध्यंतरीं अश्वत्थाम्यानें धृतराष्ट्रावर चालून येऊन क्रोधावेशानें त्याला म्हटलें, 'थांब, थांब, हे ब्रह्मघ्ना, माझ्याकडून तूं आज जीवंत सुटणार नाहींस!' असें बोलून अश्वत्थाम्यानें तीक्ष्ण व घोर बाण मारून त्या धृष्टद्युम्नास आच्छादून टाकिलें. तेव्हां त्या दोघां वीरांनीं एकमेकांस मारण्याचा सारखा तडाका सुरू ठेवला. रणांत धृष्टद्युम्नाला पाहून जशी द्रोणाला मोठी भीति वाटून हा आपला मृत्युच होय, असें वाटत होतें, त्याप्रमाणें ह्या वेळीं त्या द्रोणपुत्राला पाहून धृष्टद्युम्नाला मोठी भीति वाटली व आपला हा मृत्युच होय असें त्याला वाटलें. शेवटीं आपणाला समरांत कोणीहि शस्त्रानें मारूं शकणार नाहीं, हें ध्यानांत आणून तो धृष्टद्युम्न अश्वत्थाम्यावर क्षयकालीं कालावर कालानें धांवून जावें त्याप्रमाणें चालून गेला. आपल्यावर चालून येणाऱ्या धृष्टद्युम्नाला पाहून अश्वत्थाम्याला संताप आला आणि तोहि धृष्टद्युम्नावर धांवून गेला! नंतर तो प्रतापवान् अश्वत्थामा धृष्टद्युम्नाला बोलला, "हे पंचालाधमा, आज तुला मी यमलोकीं पाठवितों! द्रोणवधानें पूर्वीं जें पातक तूं केलें आहेस, त्याचें दुःखदायक फल आज तुला प्राप्त होईल! तुझ्या रक्षणाला जर अर्जुन आला नाहीं किंवा तूं जर पळून गेला नाहींस, तर मी बोलतों तसें सत्य घडून येईल!"

राजा, अश्वत्थाम्याचें तें भाषण श्रवण करून धृष्टद्युम्न त्याला बोलला, 'अश्वत्थामन्, समरांत तुझा पिता युद्ध करीत असतां त्याला माझ्या खड्गानें जें उत्तर दिलें, तेंच उत्तर आजहि तुला माझें खड्ग देईल. जर मी त्या युद्धांत पराक्रम गाजविणाऱ्या तुझ्या पित्याचा वध केला आहे, तर तुझ्यासारख्या ब्राह्मणब्रुवाचा मला वध कसा बरें करतां येणार नाहीं? असें बोलून त्या धृष्टद्युम्नानें एका तीक्ष्ण बाणानें अश्वत्थाम्याला विद्ध केलें! तेव्हां अश्वत्थाम्यानें संतप्त होऊन संनतपर्व बाणांची वृष्टि करून त्या धृष्टद्युम्नाला आच्छादून टाकिलें! त्याच्या सहस्रावधि बाणांनीं सर्व दिशा व्याप्त होऊन आकाश, दिशा व समंतात् भागाचे योद्धेहि दिसत नाहींसे झाले. हे राजा, त्यावेळीं धृष्टद्युम्नानेंहि कर्णाच्या समक्ष त्या अश्वत्थाम्याला बाणाच्छादित करून टाकिलें. पांडव, पांचाल, द्रौपदेय, युधामन्यु आणि महारथ सात्यकि यांचें त्या एकट्या कर्णानें मोठ्या पराक्रमानें निवारण केलें. तें त्याचें कृत्य पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्याचें धनुष्य छेदून टाकिलें. तेव्हां अश्वत्थाम्यानें तें धनुष्य फेंकून दिलें व दुसरें घेतलें आणि त्यानें मोठे तीक्ष्ण सर्पतुल्य बाणांची वृष्टि करून धृष्टद्युम्नाचें

धनुष्य, शक्ति, गदा, ध्वज, हय, सारथि यांवर बाण टाकून त्यांचा संहार केला. तेव्हां तो चापहीन, रथहीन, अश्वहीन आणि सारथिहीन धृष्टद्युम्न सूर्यासारखें तेजस्वी खड्ग व शतचंद्र चर्म हातांत घेऊन पुढें उभा राहतो तोंच त्या महारथ अश्वत्थाम्यानें भल्ल बाण टाकून तत्काल तीं तोडून टाकिलीं! नंतर त्या धृष्टद्युम्नावर बाण टाकून अश्वत्थाम्यानें त्याला विद्ध केलें. त्या महारथ अश्वत्थाम्यानें अनेक प्रयत्न केले—त्याला विरथ केलें, त्याचे अश्व मारून टाकिले, त्याचें कार्मुक छिन्न केलें—तरीहि तो त्याचा वध करूं शकला नाहीं, तेव्हां त्या वीरानें हातांतील धनुष्य फेंकून दिलें आणि गरुड जसा पन्नगावर उडी मारतो, त्याप्रमाणें त्या अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाचा वध करण्याकरितां त्यावर एकदम उडी टाकिली!

(३) इतक्यांत श्रीकृष्ण अर्जुनाला बोलला, "धृष्टद्युम्नाच्या वधार्थ या अश्वत्थाम्यानें केवढा प्रयत्न चालविला आहे, तें पहा! हा धृष्टद्युम्नाला मारील यांत संशय नाहीं! तर हे शत्रुकर्शना, या द्रोणरूप मृत्यूच्या मुखांत सांपडलेल्या या धृष्टद्युम्नाला त्याच्या हातून आधीं सोडीव!" असें बोलून त्या प्रतापवान् वासुदेवानें जेथें द्रोणपुत्र धृष्टद्युम्नाशीं युद्ध करीत होता, तेथें अश्वांना हांकलें. ते चंद्रासमान शुभ्र अश्व जणुंकाय आकाशाचें प्राशन करीत अश्वत्थाम्याच्या रथानिकट आले. अश्वत्थाम्यानें कृष्णार्जुन आल्याचें पाहून धृष्टद्युम्नाच्या वधाविषयीं मोठा प्रयत्न केला! हे नरेश्वरा, आतां हा अश्वत्थामा धृष्टद्युम्नाचे प्राण ओढून काढणार, असें पाहतांच अर्जुनानें अश्वत्थाम्यावर बाणांची वृष्टि केली. ते बाण वारुळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें अश्वत्थाम्याचे शरीरांत शिरले. त्या बाणवेदनांनीं अश्वत्थामा विह्वल झाला. त्यानें धृष्टद्युम्नाला सोडलें आणि रथारूढ होऊन व बळकट धनुष्य हातांत घेऊन अर्जुनावर बाणवृष्टि करण्यास आरंभ केला. इकडे सहदेवानें अश्वत्थाम्याच्या हातून मुक्त झालेल्या त्या धृष्टद्युम्नाला आपल्या रथामध्यें घालून एकीकडे नेलें! अर्जुनानें देखील अश्वत्थाम्यावर बाणवृष्टि केली. द्रोणपुत्रानें संतप्त होऊन अर्जुनाचे बाहूंवर व उरःस्थलावर बाण मारिले! नंतर त्या क्रोधाविष्ट अर्जुनानें दुसरा कालदंडच कीं काय असा एक नाराच बाण घेऊन तो अश्वत्थाम्यावर सोडला. तो बाण अश्वत्थाम्याच्या स्कंधदेशीं येऊन पडला! त्या बाणाघातानें अश्वत्थामा विह्वल होऊन रथोपस्थावर पडून राहिला. त्या बाणप्रहारानें तो अगदीं मूर्च्छित झाला!

(४) हे महाराजा, इकडे अर्जुनाशीं बाहुयुद्ध करण्याच्या इच्छेनें कर्णानें आपल्या विजय धनुष्याचे टणत्कार केले. इतक्यांत अश्वत्थामा रणांत विह्वल झाल्याचें

पाहून त्याच्या सारथ्यानें त्याला दूर नेलें. याप्रमाणें धृष्टद्युम्नाची सुटका आणि अश्वत्थाम्याची ती पीडितावस्था पाहून त्या विजयेच्छु पांचालांना मोठा आनंद झाला आणि त्यांनीं मोठे सिंहनाद केले ! हजारों दिव्य वाद्येंहि वाजूं लागलीं. इतकें झाल्यावर धनंजयानें त्या कृष्णाला म्हटलें, 'कृष्णा, तूं आतां माझा रथ संशप्तकांकडे घेऊन चल ! त्यांच्यांशीं सामना देणें हें माझें अवश्य मोठें कार्य आहे.' अर्जुनाचें भाषण ऐकून कृष्णानें त्याचा रथ वायुवेगानें आणि मनोवेगानें तिकडे नेला ! ८. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ कृष्णकृत समरवर्णन. ]

( १ ) संजय—हे राजन्, इतक्यांत कृष्णानें युधिष्ठिराकडे बोट दाखवून अर्जुनाला म्हटलें, " तो तुझा बंधु धर्मराज युधिष्ठिर पहा ! त्याचा वध करण्याकरितां धनुर्धर कौरव त्याच्या मागें लागले आहेत ! त्यामुळें हे बलवान् पांचाल त्याचें रक्षण करण्याकरितां त्याचे मागून चालले आहेत. हा राजा दुर्योधन त्याच्या नाशाकरितां अंगांत कवच घालून व रथांत बसून निघाला आहे. त्याच्या बरोबर त्याचे युद्धविशारद बंधु आहेत. दात्या श्रीमंताकडे जशी याचकांची गर्दी जमत असते, त्याप्रमाणें कौरवांकडील गज, अश्व, रथ आणि नर हे धर्मावर चालले आहेत पहा ! इंद्र आणि अग्नि यांनीं वारंवार निवारण केलें असतांहि दैत्य जसे अमृतप्राप्त्यर्थ पुढें गेले, त्याप्रमाणेंच सात्यकि व भीमसेन यांनीं त्यांचा निरोध केला असतांहि, ते धर्मावर जात आहेत ! त्यांचें सैन्य मोठें असल्याकारणानें वर्षाकालांत जसे जलौघ समुद्रावर चालून जातात त्याप्रमाणें हे महारथ कौरव धर्मावर चालले आहेत ! हे धनुर्धर कौरव सिंहनाद करीत आहेत, आपलीं धनुष्यें गरगर फिरवीत आहेत व शंख फुंकीत आहेत ! आज हा युधिष्ठिर जणुंकाय मृत्युमुखांतच सांपडला आहे ! अग्नींतील आहुतीप्रमाणें ह्याची आतां स्थिति झाली आहे ! हा दुर्योधनाच्या हातांत सांपडला आहे. दुर्योधनाची सैन्यरचना उत्तम रीतीची असल्यामुळें प्रत्यक्ष इंद्र जरी त्याच्या बाणाच्या टप्प्यांत आला, तरी तो त्यापासून सुटणार नाहीं ! अंतकाप्रमाणें हा दुर्योधन क्रुद्ध होऊन एकदां बाणप्रहार करूं लागला असतां तो वेग रणांत कोण बरें पुरुष सहन करील ? ह्या दुर्योधन वीराचा, अश्वत्था-

म्याचा, शारद्वत कृपाचा आणि कर्णाचा बाणवेग इतका प्रखर आहे कीं तो पर्वतांचाहि भंग करील ! ह्या शत्रुतापन युधिष्ठिराला कर्णानें युद्धांतून मागें जाण्याला लाविलें. हा कर्ण युद्धकलाविशारद आहे, शिवाय त्याला त्या शूर आणि बलवान् कौरवांचें साहाय्य आहे, त्यामुळें रणांत युधिष्ठिराला तो पीडा देईल, यांत संशय नाहीं.

हे भरतसत्तमा, हा युधिष्ठिर अनेक उपवास करून अत्यंत क्षीण झाला आहे. हा ब्राह्मबलामध्यें जितका प्रवीण आहे, तितका क्षात्रविद्येंत नाहीं. कर्णाच्या हातांत सांपडला असतां ह्या युधिष्ठिराची सुटका आतां कशी होईल, ही मला मोठी काळजी लागली आहे. हे पार्था, हा अत्यंत संतापी भीमसेनहि कौरवांचे सिंहनाद निमूटपणें सोशीत आहे, त्याअर्थी युधिष्ठिर हा जीवंत राहील, असें मला वाटत नाहीं. धार्तराष्ट्रांच्या गर्जना आणि शंखनादहि सारखे ऐकूं येत आहेत, त्यांवरून युधिष्ठिराचा अंत झाला असावा, असें मला वाटत आहे. हा कर्ण महाबलवान् धार्तराष्ट्रांना धर्मावर जाण्यास सांगत आहे व ते स्थूणाकर्ण, इंद्रजाल आणि पाशुपत यांचें अभिमंत्रण करून शस्त्रजालांनीं धर्माला आच्छादून टाकीत आहेत ! अशा वेळीं त्या दुःखग्रस्त युधिष्ठिराची स्थिति लक्ष्यांत आणून पांचाल आणि पांडव त्याच्या रक्षणाकरितां धांवत जात आहेत. युधिष्ठिराच्या रथावर त्याचा ध्वज दिसत नाहीं ! कर्णानें बाणांच्या प्रहारानें तो तोडून टाकिला. नकुल, सहदेव, सात्यकि, शिखंडी, धृष्टद्युम्न, भीम, शतानीक, पांचाल आणि चेदि ह्या सर्वांदेखत कर्णानें तो ध्वज तोडून टाकिला आहे. गजानें ज्याप्रमाणें कमलिनीचा संहार करावा, त्याप्रमाणें कर्णानें पांडवांच्या सैन्याचा बाणांनीं नाश केला आहे. हे पांडुनंदना अर्जुना, हे तुझे रथी पळून जात आहेत पहा ! हे तुझे सैन्यांतील गज कर्णानें बाणांच्या मारानें विद्ध केल्यामुळें आर्तस्वर काढून दशदिशांना कसे पळून जात आहेत पहा ! कर्णानें हा तुझा रथसमूह उडवून दिल्यामुळें चारी दिशांना कसा धांवत सुटला आहे पहा ! आज कर्णाचा हा श्रेष्ठ ध्वज सर्वत्र संचार करीत आहे ! हा कर्ण तुझ्या सैन्यावर शतावधि बाण टाकीत आणि त्याचा संहार करीत भीमसेनाच्या रथावर धांवून जात आहे पहा ! इंद्रानें शस्त्रप्रहार करून जसें दैत्यांना मारलें, त्याप्रमाणें हे पांचाल महारथ कसे पळत सुटले आहेत पहा ! हा कर्ण रणांत पांचाल, पांडव आणि सृंजय यांना जिंकून सर्व दिशांकडे नजर टाकीत राहिला आहे. त्यावरून तो तुझीच वाट पहात राहिला आहे, असें मला वाटतें. शत्रूंला जिंकून

देवांनीं परिवेष्टित इंद्र जसा शोभतो, त्याप्रमाणें हा कर्ण आज आपलें धनुष्य ओढीत असतां शोभत आहे! कर्णाचा पराक्रम पाहून हे कौरव मोठ्यानें गर्जना करीत सुटले आहेत, त्यामुळें पांडव आणि सृंजय हे भयभीत होऊन गेले आहेत. हा कर्ण महारणांत सर्व बाजूंनीं पांडवांना त्रस्त करून आपल्या सैनिकांना म्हणत आहे कीं "कौरवहो, तुमचें कल्याण होवो, आज तुम्ही इतक्या त्वरेनें धांवून जा कीं एकहि सृंजय तुमच्या हातून सुटून जीवंत राहणार नाहीं! तुम्ही सर्व एकमतानें शत्रूंवर चाल करा! आम्ही तुमच्या मागून येतोंच!"

अर्जुना, कर्णानें असें बोलून पाठीमागून बाणवृष्टि करण्यास आरंभ केला! अर्जुना, हा श्वेत छत्रानें विराजित कर्ण उदयगिरीवर शोभणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसत आहे पहा! हा कर्ण तुझ्यावर नेत्रकटाक्ष टाकीत आहे. हा आतां मोठ्या वेगानें तुझ्यावर धांवून येईल! महाबाहो अर्जुना, हा आपलें धनुष्य घेऊन सर्पविषाप्रमाणें तीक्ष्ण बाण सोडीत आहे पहा! तुझा वानरध्वज पाहून तो मागें वळला! तो तुझ्याबरोबर युद्धाची इच्छा करीत आहे! अर्जुना, मला वाटतें कीं प्रदीप्त अग्नीच्या मुखांत उडी घालून येणाऱ्या टोळांची जी स्थिति होते, तशीच याची होईल! कर्ण एकटा निघाला आहे, हें पाहून त्याच्या संरक्षणाकरितां दुर्योधन आपलें रथसैन्य घेऊन मागें वळला आहे पहा! तरी तुम्ही सर्वांनीं प्रयत्नपूर्वक ह्या दुष्टात्म्याचा वध करावा! तेणेंकरून तूं यश, राज्य, सुख हीं मिळवावीं! तुम्ही दोघेहि मोठे पराक्रमी असल्यामुळें तुमचें हें युद्ध देवदानवांच्या युद्धाप्रमाणें मोठें भयंकर होईल. हे पार्था, आज सर्व कौरवांना तुझा पराक्रम पाहूं दे! तूं व कर्ण दोघेहि क्षुब्ध होऊन युद्ध जुंपलें असतां दुर्योधन कांहीं करणार नाहीं! अर्जुना, तूं कृतात्मा आहेस, परंतु हा कर्ण धर्माचा अपराधी आहे, असें लक्ष्यांत आणून नंतर तुला योग्य वाटेल तें तूं कर! युद्धामध्यें उदार मन ठेवून तूं महारथ कर्णावर चालून जा! अर्जुना, हे पहा पांचशें उत्तम रथ, पांच हजार गज, दशसहस्र वाजी आणि लक्षावधि पदाति एकत्र होऊन अश्वत्थाम्याच्या हाताखालीं परस्परांचें रक्षण करीत तुजवर चालून येत आहेत. म्हणून तूं या सर्व सैन्याचा शीघ्र घात कर! हें बलवान् रथसैन्य तूं आधीं नष्ट करून टाक आणि मग त्या महाधनुर्धर सूतपुत्र कर्णावर चालून जा व त्याला आपला पराक्रम दाखीव! हे भरतर्षभा, तूं मोठ्या वेगानें त्यांवर धांवून जा. हा पहा कर्ण क्रोधयुक्त होऊन पांचालांवर धांवून येत आहे. त्याचा ध्वज धृष्टद्युम्नाच्या रथानिकट दिसत आहे!

(२) अर्जुना, आतां तुला एक आनंदाची प्रियवार्ता सांगतों. राजा धर्मपुत्र युधिष्ठिर खुशाल आहे आणि हा महाबाहु भीमसेन मार्गे वळून रणाग्रभागीं राहिला असून त्याच्या सभोंवतीं सृंजयसैन्य आणि सात्यकि हे आहेत. भीमसेन आणि महात्मे पांचाल हे तीक्ष्ण शरांचा भडिमार करून सर्व कौरवसेना मारून टाकीत आहेत! हें कौरवसैन्य भीमाच्या शरांनीं विमुख होऊन पळून जात आहे पहा! पिकें गळून गेल्यामुळें क्षेत्रभूमीला जसें घोर स्वरूप प्राप्त होतें, त्याप्रमाणें त्या समरभूमीवर रक्ताचा सडा पडून ती भयंकर दिसत आहे! हा भीमसेन सर्पाप्रमाणें खवळून जाऊन कौरवसैन्याचा कसा संहार करीत सुटला आहे पहा! कौरवसेनेचीं चंद्र, सूर्य आणि तारका यांनीं मंडित केलेलीं पीत, रक्त, कृष्ण व शुभ्र पताका आणि छत्रें हीं जिकडेतिकडे पडत आहेत पहा! हे पहा सोन्याचे, रुप्याचे आणि तसेच इतर धातूंचेहि ध्वज कसे पडत आहेत! हे पहा अश्व आणि गज रणांत मरून कसे पडले आहेत! पांचालांनीं अनेक प्रकारचे बाण मारून गतप्राण झालेले हे रथी रथांतून पडत आहेत! हे धनंजया, कौरवांच्या निर्मनुष्य गजांवर, अश्वांवर आणि रथांवर हे वेगवान् पांचाल कसे धांवून जात आहेत पहा! ह्या नरव्याघ्रांनीं भीमाचा आश्रय करून प्राणांचीहि पर्वा न धरून शत्रुसैन्याचा कसा संहार चालविला आहे, तें पहा! हे पांचाल मोठ्यानें गर्जना करीत व शंख वाजवीत बाणांच्या प्रहारांनीं रणांत शत्रूंवर धांवून येत आहेत पहा! ह्या पांचालांचें माहात्म्य केवढें आहे, तें पहा! क्रुद्ध सिंह जसे गजांच्या शरीरांचे लचके तोडून टाकतात, त्याप्रमाणें हे धार्तराष्ट्रांच्या शरीरांचे तुकडे करून टाकीत आहेत. हे पांचाल स्वतः निरायुध असून शत्रूंचींच आयुधें घेऊन त्यांना मारून गर्जना करीत असतात! ते शत्रूंचीं मस्तकें तोडतात आणि बाहु छेदून टाकितात. हें पांचालांचें चतुरंग सैन्य सर्वच विजयी होऊन संचार करीत आहे. आणि हें धार्तराष्ट्रांचें महासैन्य दुःखमग्न होऊन गेलें आहे! मानससरोवरावरून आलेले हंस जसे गंगेंत प्रवेश करितात, त्याप्रमाणें हे पांचालवीर कौरवसैन्यांत येऊन राहिले आहेत. त्यांचें निवारण करणें आतां कौरवसैन्यास शक्य नाहीं. कौरवांचे कृपकर्णादि महावीरांनीं पांचालांच्या निवारणाकरितां पुष्कळ प्रयत्न केला, परंतु भीमाज्ञापुढें त्या महारथांचा पुरा पराभव झाला व धृष्टद्युम्नादिकांनींहि हजारों शत्रूंचा संहार केला!

अर्जुना, पांचालांचा पराजय झाल्याचें पाहून शत्रूंनीं पुनः त्यांस वेढिलें,

पण तितक्यांत वायुपुत्र भीमसेनानें त्या शत्रूंवर चाल करून त्यांस अगदीं विषण्ण करून सोडलें ! भीमाच्या भयानें कौरवांचे रथ अत्यंत त्रस्त होऊन गेले आणि त्याच्या नाराच बाणांनीं गज छिन्न होऊन खालीं पडूं लागले ! तें पाहून इंद्राच्या वज्रानें हत पर्वतशिखरेंच कोसळून पडत आहेत कीं काय असें सर्वांस वाटलें ! भीमसेनाच्या सन्नतपर्व बाणांनीं विद्ध केलेले महागज आपल्या सैन्याला आपल्याच पायांनीं तुडवूं लागले ! विजयेच्छु भीम आतां मोठ्यानें सिंहनाद करीत आहे ! हा पहा निषादांचा राजा क्रुद्ध होऊन दंडहस्त यमाप्रमाणें आपल्या श्रेष्ठ गजावर बसून हातांत तोमर घेऊन भीमसेनाला मारण्याकरितां त्याजवर धांवून आला, परंतु भीमानें नाराच बाणांनीं त्याचे हातच तोमरांसह तोडून त्याचा वध केला ! अर्जुना, हा पहा भीमसेन त्या नैषादीचा वध करून दुसऱ्या गजांवर प्रहार करीत आहे ! नील अंबुदाप्रमाणें शोभणाऱ्या त्या गजांवर हस्तिपक बसले आहेत पहा ! त्यांवर भीमानें शक्ति व तोमरें यांची वृष्टि चालविली आहे ! तीक्ष्ण बाणवर्षावानें तुझा वडील बंधु प्रत्येक वेळीं सात सात गज ध्वजपताकांसहित मारीत आहे ! आतां कौरवांच्या त्या गर्जना किमपिहि ऐकूं येत नाहींतशा झाल्या ! तीन अक्षौहिणी सैन्य कौरवांचें होतें, परंतु त्याचें त्या क्रुद्ध भीमसेनानें निवारण केलें ! दुर्बलचक्षु मनुष्य ज्याप्रमाणें दुपारच्या सूर्याकडे पाहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें त्या राजे लोकांना भीमावर नजर टाकवेना ! सिंहाला पाहून मृग जसे भयत्रस्त होऊन जातात, त्याप्रमाणें ते सर्व राजे भीमाला पाहून त्रास पावले ! युद्धभूमीवर त्याच्या बाणांनीं ते इतके व्यथित झाले कीं त्यांची सुखाची सर्व आशा आतां नष्ट झाली !

संजय—त्या महाबाहु अर्जुनानें कृष्णाचें हें भाषण श्रवण करून आणि भीमसेनाचें तें दुष्कर कर्म पाहून, तीक्ष्ण बाणांनीं अवशिष्ट राहिलेल्या कौरव-सैन्याचा निःपात उडविला आणि नंतर तो संशप्तकांचा संहार करूं लागला ! त्यावेळीं पुष्कळ संशप्तक वीर सर्वत्र पळून गेले. जे बलिष्ठ वीर समरभूमीवर पडले, ते इंद्राच्या आतिथ्यास पात्र होऊन शोकविरहित झाले ! धृतराष्ट्रा, त्यावेळीं त्या पुरुषव्याघ्र पार्थानें सन्नतपर्व बाणांनीं धृतराष्ट्राचे चतुरंग सैन्याचा संहार केला ! ८. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ संकुलयुद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, युधिष्ठिर आणि भीमसेन हे परतल्यावर पांडव व सृंजय माझे सैन्याचा विध्वंस करूं लागले, त्यामुळें तें सैन्य उदास होऊन पळून जात असतां कौरवांनीं काय केलें तें मला सांग !

(२) संजय—महाबाहु भीमाला पाहून त्या प्रतापवान् कर्णानें क्रोधानें डोळे लाल केले व तो भीमावर धांवून गेला. भीमसेनाला पाहून तुझें सैन्य युद्धविमुख होऊन पळून जात असल्याचें त्याला आढळून आलें. तेव्हां त्यानें मोठा यत्न करून त्याची स्थिरस्थावर केली आणि नंतर तो त्या युद्धदुर्मद पांडवांवर चालून गेला. तेव्हां पांडवांचे महारथ आपलीं धनुष्यें फिरवीत व बाण टाकीत त्याच्यावर चाल करून आले. भीमसेन, सात्यकि, शिखंडी, जनमेजय, बलवान् धृष्टद्युम्न आणि सर्व प्रभद्रक वीर जयाची आशा धरून कर्णाच्या वधाच्या इच्छेनें तुझ्या सैन्यावर धांवत आले. त्याबरोबर तुझ्या सेनेंतील महारथहि पांडवांचा वध करण्याची इच्छा धरून त्यांजवर चालून गेले. नंतर तीं दोन्हीं चतुरंग सैन्यें एकत्र मिळालीं, तेव्हां तें सैन्य अत्यंत अद्भुत दिसूं लागलें ! त्यावेळीं शिखंडी कर्णावर चालून गेला, धृष्टद्युम्न तुझ्या दुःशासन पुत्रावर धांवून गेला, नकुल वृषसेनावर, युधिष्ठिर चित्रसेनावर व सहदेव उलूकावर धांवला. तसेंच सात्यकीनें शकुनीवर, द्रौपदेयांनीं कौरवांवर आणि महारथ द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें अर्जुनावर चाल केली. महाधनुर्धर युधामन्यूवर गौतम, उत्तमौजावर कृतवर्मा आणि तुझ्या पुत्रांवर व कौरवसेनेवर भीमसेन चालून आला. एकट्या भीमसेनानें त्या सर्व कौरवसेनेचें निवारण केलें. समरभूमीवर भयरहित कर्ण संचार करीत असतां भीष्माचा हननकर्ता जो शिखंडी त्यानें बाणांची वृष्टि करून त्याचें निवारण केलें. तेव्हां कर्ण क्रोधाविष्ट झाला आणि त्याच्या भुंवयांच्यामध्यें तीन बाण मारून त्याला विद्ध केलें. त्या बाणांनीं विद्ध होऊन रौप्यपर्वतावर तीन शृंगें वाढलीं आहेत कीं काय अशी शोभा त्याला आली. शिखंडीनें नव्वद बाण कर्णावर मारले. तें पाहून महारथ कर्णानें तीन बाण टाकून शिखंडीचा सारथि व अश्व मारून टाकिले ! आणि एका क्षुरप्रानें त्याच्या ध्वजाचाहि भंग केला ! नंतर त्या अश्वहीन शिखंडीनें रथांतून खालीं उडी टाकली आणि कर्णावर शक्ति सोडली. कर्णानें तीन बाणांनीं ती शक्ति तोडली. कर्णानें नऊ बाण शिखंडीवर मारले. त्यांपैकीं

एका बाणानें शिखंडी विह्वल झाल्यामुळें तो युद्ध सोडून गेला. नंतर कर्णानें पांडुसैन्यावर जाऊन त्याची दुर्दशा केली आणि सोसाट्याचा वारा ज्याप्रमाणें कापसाला वाटेल तिकडे उडवून टाकितो, त्याप्रमाणें त्याचा विध्वंस केला !

इकडे दुःशासनाच्या वक्षःस्थळीं धृष्टद्युम्नानें तीन बाण मारले. तें पाहून दुःशासनानें त्याचा डावा हात बाण मारून विद्ध केला. त्यावर धृष्टद्युम्नानें एक भयंकर बाण दुःशासनावर टाकला. दुःशासनानेंहि तीन बाण धृष्टद्युम्नावर टाकिले. त्यानें आणखी कित्येक बाण मारून त्याचें वक्षःस्थळ व बाहु विद्ध केले. यामुळें धृष्टद्युम्न अत्यंत क्रोधतप्त झाला आणि एका तीक्ष्ण बाणानें त्यानें दुःशासनाचें धनुष्य तोडून टाकिलें ! दुःशासनानें त्यावर दुसरें धनुष्य घेतलें आणि हंसतच चारी बाजूंनीं धृष्टद्युम्नाला बाणांनीं आच्छादित केलें. तो तुझ्या पुत्राचा पराक्रम पाहून सर्व योद्धे, अप्सरांचे गण आणि सिद्ध आश्चर्यचकित होऊन गेले ! सिंहानें ज्याप्रमाणें गजाला कुंठित करून ठेवावें, त्याप्रमाणें त्या बलवान् धृष्टद्युम्नाला दुःशासनानें एकाच जागीं अडवून ठेविलें ! नंतर रथ, गज आणि अश्व घेऊन ते पांचाल सेनापति धृष्टद्युम्नाला सोडविण्याकरितां म्हणून तुझ्या पुत्रावर धांवून आले ! नंतर तुझ्या पुत्राचें पांचालांशीं भयंकर युद्ध झालें. त्या युद्धांत होणारा नाश प्रलयकालीं होणाऱ्या प्राणहानीप्रमाणें होता !

धृतराष्ट्रा, नकुलाला वृषसेनानें पांच बाणांनीं विद्ध केलें आणि पित्यासन्निध असतां त्यानें आणखी तीन बाण त्यावर मारले ! मग त्या नकुलानें एक नाराच बाण हृदयावर मारून वृषसेनाला विद्ध केलें. दोघेहि वीर अत्यंत खवळून परस्परांवर बाण टाकून एकमेकांस विद्ध करूं लागले ! दोन्ही सैन्यांनीं परस्परांवर मोठी भयंकर बाणवृष्टि केली, त्यामुळें तीं सैन्यें भंग पावून सर्वत्र पळत सुटलीं ! हे राजेंद्रा, आपलें सैन्य पळून जात असल्याचें पाहून कर्ण तेथें आला आणि त्यानें मोठ्या प्रयत्नानें आपल्या सैन्यास आळा घातला ! कर्ण निघून गेल्यावर त्या सैन्यावर नकुल चालून आला. कर्णपुत्र वृषसेनहि नकुलाला सोडून कर्णाच्या रथाजवळ आला आणि त्याच्या रथचक्राचें रक्षण करूं लागला !

इतक्यांत क्रुद्ध उलूक पांडवसैन्यावर चालून आला असतां सहदेवानें त्याचें निवारण केलें. त्या प्रतापी सहदेवानें उलूकाचे चार अश्व मारले आणि त्याच्या सारथ्यालाहि यमलोकीं पाठविलें ! हे राजा, नंतर उलूक रथांतून उडी टाकून त्रिगर्तांवर धांवून गेला ! इकडे सात्यकीनें वीस तीक्ष्ण बाणांनीं शकुनीला विद्ध

केलें आणि त्या सौबलाचा ध्वज हंसतहंसतच तोडून टाकला. तेव्हां त्या प्रतापी शकुनीनें सात्यकीचें कवच भेदून त्याचा कांचनमय ध्वज छिन्न केला! नंतर सात्यकीनें तीन बाण टाकून शकुनीच्या सारथ्याला विद्ध केलें आणि त्याच्या अश्वांवरहि बाण टाकून त्यांना यमलोकीं पाठविलें! सारथिहीन शकुनीनें रथांतून खालीं उडी मारली आणि तो महात्म्या उलूकाच्या रथावर आरूढ झाला. त्या पराक्रमी सात्यकीपासून त्याचें संरक्षण करण्याकरितां उलूकानें त्याला दूर नेलें. सात्यकी रणांत तत्काल तुझ्या सैन्यावर धांवून आला आणि त्यानें कौरवसैन्याचा भंग केला. त्यामुळें तें सैन्य भयभीत होऊन सर्वत्र पळत सुटलें! इतक्यांत तुझ्या पुत्रानें भीमसेनाचा रणांगणांत प्रतिकार केला. मग भीमानें त्या दुर्योधनाला एका क्षणांत अश्वहीन, सारथिहीन, रथहीन आणि ध्वजहीन करून सोडलें! तें पाहून पांडवसैन्यांत लोकांना मोठा आनंद झाला आणि दुर्योधन भीमसेनाच्या नजरेआड झाला. नंतर तें सर्व कौरवसैन्य भीमरथावर चालून गेलें आणि भीमाचा वध करण्याच्या इच्छेनें तें मोठमोठ्या आरोळ्या देऊं लागलें. मग दोन्ही सैन्यांमध्यें मोठें निकराचें युद्ध झालें. युधामन्यूनें कृपाचार्याला बाणानें विद्ध करून त्याचें धनुष्य छिन्न केलें. तेव्हां कृपाचार्यानें दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या युधामन्यूचा ध्वज, सूत, छत्र, हीं सर्व भग्न करून भूमीवर पाडलीं. नंतर महारथ युधामन्यु भीतीनें रथ घेऊन दुसरीकडे गेला!

राजा धृतराष्ट्रा, उत्तमौजानें त्या भीमपराक्रमी व भयंकर हार्दिक्यावर—कृतवर्म्यावर—चाल करून मेघ वृष्टीनें ज्याप्रमाणें पर्वताला आच्छादून टाकतो, त्याप्रमाणें त्याला बाणांनीं आच्छादिलें! त्यावेळीं त्या दोघांमध्यें जसें घोर व तुमुल युद्ध झालें, त्या प्रकारचें युद्ध मीं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें! हे राजन्, कृतवर्म्यानें रणांत त्या उत्तमौजाच्या हृदयावर असा बाणप्रहार केला कीं, त्याच्या योगानें तो विद्ध होऊन रथांतच पडून राहिला! तेव्हां त्याच्या सारथ्यानें त्याला एकीकडे नेलें आणि नंतर तें सर्व कौरवसैन्य भीमावर धांवून गेलें. तेव्हां दुःशासन आणि सौबल शकुनि यांनीं त्या भीमाला गजसेनेसह वेढून त्यावर बाणांची वृष्टि केली. भीमानें शेंकडो बाण दुर्योधनावर टाकले आणि त्याला हटवून मोठ्या वेगानें तो गजसैन्यावर चालून गेला! ती गजसेना आपल्यावर एकाएकीं चालून येत असल्याचें पाहून भीमानें दिव्यास्त्राची योजना करून आपले गज शत्रूच्या गजांशीं भिडविले आणि देवेंद्रानें जसा असुरांचा संहार

केला, त्याप्रमाणें त्या कौरवांच्या गजांचा नाश केला ! त्या कौरवांच्या गज-सेनेचा संहार करीत असतां, भीमसेनानें टोळ जसे वृक्षाला झांकून टाकितात, त्याप्रमाणें सर्व आकाश बाणांनीं आच्छादून टाकिलें ! तेव्हां कौरवांकडील हजारों गजांचे कळप भीमसेनावर चालून आले ! तेव्हां वायु जसा मेघसमुदायाला पळ-वितो, त्याप्रमाणें भीमसेनानें त्या गजांला उधळून लाविलें. त्यावेळीं सुवर्ण व मणिजालांनीं विभूषित विद्युद्युक्त मेघांसमान सुशोभित अशा गजांवर भीम-सेनानें चालून जाऊन संहार सुरू केला असतां ते दशदिशांना पळून गेले ! कित्येक गज वक्षःस्थळ विदीर्ण होऊन भूमीवर मृत होऊन पडले ! तेव्हां त्या सुवर्णविभूषित मृत गजांनीं ती सर्व समरभूमि व्याप्त होऊन जणुंकाय पर्वतच कोसळून तिजवर पसरले आहेत, असें वाटूं लागलें ! हे राजा, त्यावेळीं दिव्य रत्नांनीं शोभणारे गजसादी रणांत पडलेले पाहून ते क्षीणपुण्य ग्रहच पडले आहेत असें भासूं लागलें. भीमसेनाच्या शरांनीं शतावधि गजांचीं गंडस्थळें भग्न झालीं, मस्तकें छिन्न होऊन गेलीं व शुंडा तुटून पडल्या ! शेंकडों गज रणांगणांतून पळून जाऊं लागले ! कित्येक पर्वतप्राय गज भयार्त होऊन रक्त ओकूं लागले ! बाणवृष्टि करणाऱ्या त्या भीमाचे चंदनागरूची उटी दिलेले भुज रणांगणांत महाभुजंगांप्रमाणें वाटले ! त्याच्या प्रत्यंचेचा शब्द वज्रघोषा-सारखा होत असल्यामुळें रणांतील गज भिऊन जात व मलमूत्र विसर्जन करीत पळत सुटत ! त्या एकट्या भीमसेनाचें तें अघोर कर्म पाहून हा प्रत्यक्ष रुद्रच सर्व भूतांचा क्षय करीत आहे, असें सर्वांस वाटलें ! ८. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—नंतर ज्याला शुभ्र अश्व जोडले आहेत व ज्यावर श्रीकृष्ण सारथि आरूढ झाला आहे, अशा दिव्य रथांत बसून अर्जुन रणभूमीवर आला. त्यानें येतांच समुद्रास जसा वारा क्षुब्ध करून टाकतो, त्याप्रमाणें तुझ्या सर्व सज्ज सैन्याचा क्षोभ केला ! ह्यावेळीं तुझा पुत्र दुर्योधन ह्यानें अर्जुनाचें आपल्याकडे दुर्लक्ष्य आहे हें लक्ष्यांत आणून आपल्या अर्ध्या सैन्यासह युधिष्ठिरावर चाल केली आणि त्यानें त्यावर अनेक बाण मारून त्यास विद्ध केलें ! तेव्हां कुंतीपुत्र युधि-ष्ठिरास अनावर क्रोध उत्पन्न झाला आणि त्यानेंहि तुझ्या पुत्रावर अनेक भल्ल

बाण मारले. नंतर कौरव युधिष्ठिराचा वध करण्याचें योजून त्याजवर धांवून गेले, परंतु त्याचे रक्षणार्थ सज्ज असलेले महारथ त्या कौरवांचा दुष्ट हेतु ओळखून तत्काळ त्या धर्मराजाजवळ गोळा झाले. त्यांत नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न व भीमसेन हे अक्षौहिणी सैन्यासह आले. त्यांनीं येतांच कौरवांच्या महारथांवर बाण-वृष्टि केली. तेव्हां त्या सर्व धनुर्धरांवर कर्णानें उलट मोठी शरवृष्टि करून त्यांचें निवारण केलें. नंतर त्या पांडववीरांनीं शरतोमरांचा वर्षाव करून त्या कर्णाला मागें हटविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्या पराक्रमी कर्णावर नजर टाकण्याचेंहि कोणाला धैर्य होईना. त्या सर्व महाधनुर्धरांस त्या शस्त्रास्त्रवेत्त्या कर्णानें मोठी शरवृष्टि करून मागें हटविलें ! तेव्हां त्या प्रतापी सहदेवानें अस्त्राचें आवाहन करून दुर्योधनावर वीस बाण मारले ! तेव्हां विद्ध झालेल्या रुधिरक्लिन्न गजा-प्रमाणें तो पर्वतप्राय योद्धा शोभूं लागला. तुझ्या पुत्राच्या शरीरांत बाण गाढ रुतलेले पाहून कर्ण क्रोधाविष्ट होऊन धांवत आला. त्यानें अस्त्र अभिमंत्रित करून युधिष्ठिराच्या आणि धृष्टद्युम्नाच्या सैन्यांवर शीघ्र बाणवृष्टि केली व त्यांचा नाश केला. कर्णाच्या बाणांनीं विह्वल झालेलें तें युधिष्ठिरसैन्य पळूं लागलें ! नंतर कर्णानें आपले बाण शलभांप्रमाणें सर्व दिशांस शत्रूंवर सोडले असतां ते त्यांच्या अंगांत घुसले. रक्तचंदनाची उटी दिलेले आणि सुवर्णालंकारांनीं विभूषित झालेले कर्णाचे बाहु अस्त्रक्षेपण करतांना हालत असत, तें पाहून त्याचें अस्त्रविद्या-कौशल्य उत्तम दिसून येत असे. नंतर त्या कर्णानें सर्व दिशा बाणाच्छा-दित करून त्या धर्मराज युधिष्ठिराला अगदीं विह्वल करून सोडलें ! त्यामुळें युधिष्टिर अत्यंत संतप्त झाला आणि त्यानें कर्णावर पन्नास निशित बाण टाकले ! त्यावेळीं त्या दोघांमध्यें घोर युद्ध झालें आणि त्या बाणांनीं सर्वत्र अंधकार झाला ! त्या धर्मपुत्र युधिष्ठिरानें तुझ्या सैन्याचा सारखा संहार केल्यामुळें त्यामध्यें एकच हाहाकार झाला ! युधिष्ठिरानें वेगवेगळ्या कंकपत्र व भल्ल बाणांनीं आणि शक्ति, ऋष्टि आणि मुसळें इत्यादिकांनीं शत्रूंवर वृष्टि करून त्यांची अगदीं दाणादाण करून टाकिली ! जिकडे म्हणून युधिष्ठिराची क्रोधदृष्टि पडली, तिकडे तुझ्या सैन्याचा विध्वंस तत्काल झाला ! तें पाहून कर्ण अत्यंत चवताळला आणि मोठ्या आवेशानें व संतापानें नाराच, अर्धचंद्र, वत्सदंत इत्यादि बाणांनीं प्रहार करीत समरांत त्या युधिष्ठिरावर चालून गेला ! युधिष्ठिरानें देखील सुवर्णपुंख तीक्ष्ण शरांनीं कर्णावर प्रहार केले. नंतर कर्णानें हंसतहंसतच कंकपत्र बाणांनीं व तीन भल्लांनीं युधिष्ठिराच्या

उरःप्रदेशावर एवढ्या जोरानें प्रहार केला कीं तो रथोपस्थावरच टेंकून राहिला आणि त्यानें आपल्या सारथ्याला बोलाविलें आणि रथ एकीकडे नेण्यास त्याला सांगितलें !

हे राजा, त्यावेळीं दुर्योधनप्रमुख सर्व कौरवांनीं आनंदानें आरोळ्या दिल्या आणि 'धर्मराजाला धरा, धर्मराजाला धरा,' अशी गर्जना करून ते त्याजवर धांवले. इतक्यांत सतराशें केकय पांचालांसह कौरवांवर धांवून आले आणि त्यांनीं कौरवांचा प्रतिकार केला ! मग त्या दोन सैन्यांमध्यें बलवान् भीम व दुर्योधन यांचा घोर संग्राम सुरू झाला ! ८. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ युधिष्ठिराचा पराजय. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्या कर्णानें केकय महारथांवर आपलें शरजाल पसरून आपल्या समोर येणाऱ्या वीरांना उधळून लाविलें ! राधेय कर्णाचें निवारण करण्याची खटपट त्यांनीं चालविली असतां कर्णानें त्यांचे पांचशें रथी यमलोकीं पाठविले ! तेव्हां कर्णाचा दुःसह पराक्रम पाहून त्या कर्णबाणांनीं पीडित झालेल्या केकयवीरांनीं कर्णाबरोबर युद्ध करणें सोडून दिलें आणि ते भीमसेनाला जाऊन मिळाले. अनेक बाण मारून पांडवांच्या रथनेमींचा चुराडा कर्णानें केला आणि तो एकटाच युधिष्ठिरावर धांवून गेला ! त्यावेळीं युधिष्ठिर बाणविद्ध होऊन हळूहळू आपल्या छावणीकडे निघाला होता व नकुल-सहदेव हे त्याच्या दोन्ही बाजूंस राहून त्याचें संरक्षण करीत होते. अशा स्थितींत त्या युधिष्ठिरास गांठून दुर्योधनाचें हित करण्याच्या इच्छेनें त्यावर कर्णानें तीन बाण मारले. त्यावेळीं धर्माचे चक्ररक्षक नकुल-सहदेव हे धर्मावर कर्णानें बाण टाकूं नये म्हणून त्याच्यावर धांवून गेले ! त्यांनीं कर्णावर पृथक् पृथक् शरवृष्टि केली. परमप्रतापी कर्णानें त्या अरिंदम नकुल-सहदेवांवर दोन भल्ल बाण टाकले व त्यांस विद्ध केलें. नंतर त्यानें दंतवर्णाप्रमाणें शुभ्र, मनोवेगाचे व कृष्णपुच्छांचे युधिष्ठिराच्या रथाचे अश्व मारून टाकिले आणि तसाच दुसरा एक बाण मारून त्याचें शिरस्त्राण खालीं पाडलें. तसेंच त्यानें नकुलाच्याहि रथाचे अश्व मारले व त्याचें धनुष्य व रथाची धुरीहि तोडून टाकली. याप्रमाणें युधिष्ठिर व नकुल हे दोघे बंधु विरथ व अश्वहीन होऊन सहदेवाच्या रथावर चढले. तेव्हां त्या शत्रु-

संहारक शल्यानें कर्णाला म्हटलें, " कर्णा, तुला आज पृथापुत्र अर्जुनाशीं युद्ध करावयाचें आहे, मग विनाकारण क्रोधाला पेटून युधिष्ठिराशीं काय म्हणून युद्ध करीत आहेस ! तुझीं शस्त्रास्त्रें, तुझें कवच, तुझे भाते, तुझे बाण क्षीण झाले असतां आणि सारथि आणि अश्व थकून गेले असतां जर अर्जुनाशीं युद्ध करण्याचा तुला प्रसंग येईल, तर तूं खरोखरच उपहासास्पद होशील !"

राजा धृतराष्ट्रा, शल्यानें असें सांगितलें असतांहि कर्णानें युधिष्ठिरावर बाण-वृष्टि सुरू ठेविली. त्यानें त्या माद्रीपुत्र नकुल-सहदेवांना बाणांनीं विद्ध केलें आणि युधिष्ठिराला युद्धविमुख केलें. तेव्हां शल्य हंसून पुनः कर्णाला बोलला, " कर्णा, तुझ्या मनांतून आज युधिष्ठिराचा वध करावा असें आहे. ज्याच्या वधाकरितां दुर्योधन राजा सर्वदा तुझा एवढा सन्मान ठेवीत आहे, त्या अर्जु-नाचा तूं आधीं वध कर ! ह्या युधिष्ठिराला मारण्यांत तुला कोणता लाभ होणार आहे ? हा कृष्णार्जुनांच्या शंखाचा ध्वनि, त्याप्रमाणेंच अर्जुनचापाचा हा घोष प्रावृट्कालांत होणाऱ्या मेघगर्जनेप्रमाणें ऐकूं येत आहे. हें पहा, अर्जुनानें तुझे मोठमोठे रथ बाणवृष्टि करून विद्ध केले आहेत ! आज रणांगणांत हा अर्जुन तुझी सर्व सेना बाणांनीं व्याप्त करून टाकीत आहे ! हे युधामन्यु आणि उत्तमौजा त्याचे पृष्ठरक्षक आहेत. शूर सात्यकि त्याच्या रथाच्या उत्तर चक्राचें संरक्षण करीत आहे आणि त्याचें दक्षिण रथचक्र धृष्टद्युम्न संभाळीत आहे. तिकडे भीमसेन दुर्योध-नाशीं युद्ध करीत आहे तर जेणेंकरून आम्हांदेखत तो भीम दुर्योधनाचा वध कर-णार नाहीं, असा यत्न प्रथम केला पाहिजे. कर्णा, ह्या रणशोभी दुर्योधनाला भीमानें कसें ग्रस्त करून ठेवलें आहे पहा ! तुझ्या हातून जर आज त्याची सुटका होईल, तर तूं मोठें आश्चर्यकारक कृत्य केल्यासारखें होईल ! म्हणून संकटांत पडलेल्या त्या दुर्योधनाकडे आधीं धांवत जा व त्याचें रक्षण कर ! या नकुल-सहदेवांना आणि राजा युधिष्ठिराला मारून तूं काय साधणार आहेस ? "

शल्याचें हें भाषण कर्णानें मान्य केलें. त्यानें माद्रीसुत नकुल-सहदेव आणि राजा युधिष्ठिर यांना तत्काल सोडून दिलें आणि रणांत जेथें दुर्योधन भीम-ग्रस्त होऊन राहिला होता, तेथें जाण्यास त्वरित निघाला. तेव्हां शल्य-प्रेरित ते अश्व दुर्योधन जेथें होता, त्या ठिकाणीं कर्णाला घेऊन शीघ्र आले. मग धर्मराज आणि नकुल-सहदेव हेहि आपल्या शिबिराला गेले ! शिबिरांत येतांच तो विद्ध व लज्जित राजा युधिष्ठिर रथांतून उतरला व शय्येवर पडून राहिला ! मग शरीरांत रुतलेले बाण काढल्यावर त्या युधिष्ठिरानें हृदयांत

शल्य टोंचल्याप्रमाणें दुःखग्रस्त होऊन त्या महारथ माद्रीसुतांना म्हटलें, “ पांडवहो, आधीं तुम्ही भीमसेनाच्या सैन्याला जाऊन मिळा; तेथें तो भीम मेघाप्रमाणें गर्जना करीत दुर्योधनाशीं युद्ध करीत आहे ! ”

नंतर ते रथपुंगव नकुल व तेजस्वी सहदेव दुसऱ्या रथांत बसले. ते दोघे परम पराक्रमी व शत्रुसंहारक बंधु रथांतून जेथें भीमसेन होता, तेथें सेनेसह त्वरेनें येऊन पोंचले ! ८. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ अर्जुन व अश्वत्थामा यांचें युद्ध. २ अर्जुनाचा विजय. ३ कर्णपराक्रम. ४ धर्मराजशोधन. ]

( १ ) **संजय**—राजा, अश्वत्थामा बरोबर बरेच रथसमूह घेऊन जेथें अर्जुन होता तेथें सत्वर चालून आला. द्रौणी आपल्यावर धांवून आल्याचें पाहून मकरालय समुद्राला जशी मर्यादा अडवून ठेविते, त्याप्रमाणें त्या अर्जुनानें अश्वत्थाम्याला अडवून धरिलें. त्यामुळें द्रोणपुत्र अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्यानें कृष्णार्जुनांवर बाणवृष्टि करून त्यांस आच्छादून टाकिलें. तें पाहून कौरवसैन्यास फार विस्मय वाटला ! नंतर अर्जुनानें हंसतच दिव्य अस्त्र अभिमंत्रित केलें आणि अश्वत्थाम्यावर सोडलें ! परंतु त्या ब्राह्मणानें त्याहि अस्त्राचें निवारण केलें ! अश्वत्थाम्याला मारण्याच्या इच्छेनें ज्या ज्या अस्त्राची योजना अर्जुन करीत असे, तें तें अस्त्र द्रोणपुत्र छिन्न करून टाकीत असे ! अश्वत्थामा व अर्जुन यांमध्यें अशाप्रकारें अस्त्रयुद्ध चालू असतां अश्वत्थामा हा एक तोंड वांसून असलेला अंतकच होय, असें वाटत असे ! अश्वत्थाम्यानें सरलगामी बाणांनीं सर्व दिशा आणि उपदिशा व्यापून त्या वासुदेवाच्या उजव्या बाहूवर तीन बाण टाकिले. तेव्हां अर्जुनानें त्या अश्वत्थाम्याच्या सर्व अश्वांना मारून त्या समरभूमीवर रक्ताची नदीच वाहविली. ती नदी वीरांना परलोकाला नेणारी असून तिच्यांत अर्जुनानें शरप्रहार करून वधिलेले सर्व रथी रथांसह वाहत चालले होते ! त्या दोघांमध्यें—अर्जुनाश्वत्थामा यांमध्यें—दारुण युद्ध होऊन भयंकर जनक्षय झाला. पार्थचापापासून सुटलेल्या बाणांनीं हत झालेले वीर सर्वत्र पडले होते. अश्व व सारथि हत होऊन कित्येक रथ निकामी झाले, तर अश्वसादींच्या हननानें कित्येक अश्व उघडे पडले. कित्येक गज सादी हत होऊन अनावर झाले,

तसे कित्येक गज मारले जाऊन त्यांवरील वीर हताश झाले ! अर्जुनानें अश्वांचे रथी मारल्यामुळें ते अश्व तोंडें वर करून उधळून गेले ! तो अर्जुनाचा पराक्रम पाहून वीर्यवान् अश्वत्थामा त्याच्यावर धांवून गेला आणि आपल्या सुवर्णविभूषित धनुष्याच्या वेगानें त्यावर चारी बाजूंनीं बाणांची वृष्टि करून त्याला आच्छादून टाकिलें. त्या द्रौणीनें पुनः एकदां त्या अर्जुनाच्या हृदयप्रदेशीं अत्यंत निर्दयतेनें बाणप्रहार केला ! त्या बाणाघातांनीं अर्जुन फार विह्वल झाला व त्यानें गांडीवाच्या प्रहारानें अश्वत्थाम्याचें धनुष्य छिन्न करून टाकलें ! नंतर अश्वत्थाम्यानें वज्रतुल्य परिघ अर्जुनावर टाकला ! अर्जुनानें त्याचेंहि बाणांची वृष्टि करून हंसतहंसत चूर्ण करून टाकिलें ! तेव्हां तो परिघ वज्रहत पर्वताप्रमाणें भूमीवर पडला. तें पाहून अश्वत्थामा संतप्त झाला व त्यानें ऐंद्रास्त्र अभिमंत्रित करून मोठ्या आवेशानें अर्जुनावर बाणवृष्टि केली. तेव्हां अर्जुनानें गांडीव धनुष्य घेतलें आणि महेंद्रानें उत्पन्न केलेलें अस्त्र अभिमंत्रित करून अश्वत्थाम्याच्या ऐंद्रास्त्राचा संहार केला. ऐंद्रास्त्राचा नाश करून क्षणांत अर्जुनानें त्याचा रथ बाणाच्छादित करून टाकला. त्या बाणांचा प्रतिकार करून अश्वत्थाम्यानें कृष्णावर शंभर व अर्जुनावर तीनशें बाण मारले ! तें पाहून अर्जुनानें गुरुपुत्राला शंभर बाणांनीं विद्ध करून त्याचे अश्व, सारथि आणि धनुर्ज्या ह्यांवर सर्व सैन्यादेखत मोठी बाणवृष्टि केली ! अर्जुनानें द्रौणीच्या मर्मस्थानीं पुनः बाण मारले व एक भल्ल बाण मारून त्याच्या सारथ्याला रथांतून पाडलें ! अश्वत्थामा सारथिहीन झाला, तरी सारथ्य करून त्यानें कृष्णार्जुनांस बाणांनीं आच्छादून टाकिलें. तो द्रौणीचा पराक्रम अत्यद्भुतच होता. अश्वांचें स्वतः नियमन करून तो अर्जुनाशीं युद्धहि करीत होता, हें पाहून सर्व वीरांनीं त्याचें अत्यंत गुणगौरव केलें !

(२) धृतराष्ट्रा, नंतर अर्जुनानें हास्यपूर्वक रणांत द्रोणपुत्राच्या अश्वांचे रज्जु क्षुरप्र बाणांनीं तोडून त्यांजवर मोठी बाणवृष्टि केली, तेव्हां ते शरांनीं पीडित होऊन पळत सुटले. तें पाहून तुझ्या सैन्यानें भयग्रस्त होऊन मोठा आक्रोश केला. याप्रमाणें पांडव विजयी झाले. जयप्राप्तीच्या आशेनें तुझे सैन्यावर त्यांनीं एकसारखा बाणवर्षाव सुरू केला. पांडवांनीं ती कौरवसेना तुझ्या पुत्रांच्या, सौबल शकुनीच्या आणि कर्णाच्या समक्ष उधळून लावली. हे जनेश्वरा, तिला थांबविण्याचा तुझ्या पुत्रांनीं मोठा प्रयत्न केला, परंतु चारी बाजूंनीं पांडवबाणांनीं व्यथित झाल्यामुळें ती रणांत थांबली नाहीं ! तुझ्या सैन्यांतील योद्धे

पळत सुटल्यामुळें तुझें सैन्य भयभीत व व्याकुल होऊन गेलें आणि 'थांबा, थांबा,' म्हणून कर्णानें त्यांना कितीहि ओरडून सांगितलें तरी पांडववीरांकडून त्यांचा वध होऊं लागल्यामुळें ते रणांत राहिले नाहींत! कौरवसैन्य अशा-प्रकारें वाताहत होत असल्याचें पाहून दुर्योधन कर्णाला प्रेमपूर्वक बोलला, "कर्णा, ह्या पहा कौरवसेनेची पांडवांनीं कशी दुर्दशा करून सोडली आहे ती! तूं पुढें असतां तुझ्यादेखत ती पळत सुटली आहे पहा! हें लक्ष्यांत आणून तुला योग्य वाटेल तें तूं कर! पांडवांच्या भीतीनें पळून जात असतां तुझें नांव घेऊन ते ओरडत आहेत पहा!"

(३) ह्याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून हंसतहंसतच त्या कर्णानें मद्राधीश शल्याला म्हटलें, "हे जनेश्वरा, माझ्या भुजांचें आणि अस्त्राचें बल पहा! आज सर्व पांचाल आणि पांडव यांचा वध मी करणार आहें! हे नरव्याघ्रा, तूं रथ चालव! आपणाला खात्रीनें जय मिळणार यांत संशय नाहीं!" असें म्हणून कर्णानें आपलें श्रेष्ठ विजय नांवाचें धनुष्य हातांत घेतलें आणि तें सज्ज केलें. नंतर त्यानें शपथपूर्वक पळणाऱ्या त्या कौरववीरांचें निवारण केलें! नंतर त्या पराक्रमी कर्णानें भार्गवास्त्राची योजना केली. त्या धनुष्यापासून सहस्रावधि, लक्षावधि आणि कोट्यवधि बाण निघूं लागले आणि त्या कंकमुख व मयूरमुख बाणांच्या योगें सर्व सेना झांकून जाऊन सर्वत्र दाट अंधकार पडला! हे राजेंद्रा, भार्गवास्त्रानें रणांत पीडित होऊन त्या पांचालांच्या सैन्यांत मोठा हाहाकार उत्पन्न झाला! हजारों गज, अश्व, रथ व नर हे चोहों बाजूंनीं पडूं लागले व त्यामुळें सर्व पृथ्वी कांपूं लागली! पांडवांचें तें प्रचंड सैन्य व्याकुल होऊन गेलें! तेथें एकटा योधश्रेष्ठ कर्ण धूमरहित पावकाप्रमाणें सर्व शत्रूंचें भस्म करीत शोभूं लागला! कर्णानें चेदी व पांचाल यांचा विध्वंस केला, तेव्हां वनदाह होऊन विह्वल झालेल्या गजांप्रमाणें ते देहभान विसरून मोठ्यानें ओरडूं लागले! त्या सूतपुत्र कर्णानें जेव्हां त्यांचा संहार करण्यास आरंभ केला, तेव्हां त्यांचा आक्रोश प्रलयकालीं सर्व प्राणिवर्ग जसा आर्तनाद करितात तसा होता. हे मारिषा, त्या सूतपुत्रानें जेव्हां सृंजयांचा वध करण्यास आरंभ केला, तेव्हां तें पाहून पशुपक्षीहि भिऊन गेले! आणि ते अर्जुन व कृष्ण यांच्या नांवानें मोठ्यानें हांका मारूं लागले!

(४) कर्णानें सोडलेल्या भार्गवास्त्रानें उडविलेला अनर्थ पाहून अर्जुन वासुदेवाला म्हणाला, "महाबाहो कृष्णा, पहा ह्या भार्गवास्त्राचा विक्रम केवढा आहे तो!

रणांत ह्या अस्त्राचा प्रतिकार करणें अगदीं अशक्य होय. हा सूतपुत्र कर्ण रणांत किती क्षुब्ध झाला आहे पहा ! यानें यमाप्रमाणें दारुण कर्म रणांत आरंभिलें आहे ! अश्वांना चालवीत हा मजकडे टवकारून पाहत आहे ! या कर्णापासून पळूनहि जाणें मला शक्य दिसत नाहीं ! मनुष्य जीवंत असला तर त्यास युद्धांत जयापजय ह्यांपैकीं एक प्राप्त होईल, परंतु तो मेलाच तर त्याचा भंग झालाच. मग जय कोठून मिळणार ?" याप्रमाणें अर्जुनाचें भाषण श्रवण करून त्याला अगदीं समयोचित उत्तर कृष्णानें दिलें. तो म्हणाला, 'पार्था, कर्णानें कुंतीपुत्र युधिष्ठिराला अतिविद्ध केलें आहे. म्हणून आधीं तूं त्याला भेट आणि त्याला आश्वासन दे ! नंतर कर्णाला वध !' याप्रमाणें युधिष्ठिराच्या भेटीकरितां कृष्णानें रथ चालविला. कर्ण हा दमून गेला असतां स्वल्प प्रयत्नानें मारतां येईल, असाहि विचार त्याच्या मनांत आला. नंतर अर्जुन केशवाज्ञेनें त्या बाणविद्ध युधिष्ठिरास शोधण्याकरितां रथानें जात असतां त्यानें सर्व सैन्यांत धुंडून पाहिलें, परंतु त्याला धर्मराज युधिष्ठिर कोठेंहि आढळला नाहीं ! ८. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[१ धर्म व कृष्णार्जुन यांची भेट.]

(१) संजय—राजा धृतराष्ट्रा, द्रोणपुत्र अश्वत्थाम्याचा पराजय करून आणि महादुष्कर असा पराक्रम रणांत गाजवून अर्जुन स्वसैन्य पाहण्याकरितां आला. नंतर त्या सव्यसाची अर्जुनानें तेथील शूरांना प्रशंसून आणि अनेक वीरांच्या पूर्व पराक्रमाची स्तुति करून 'युधिष्ठिर कोठें आहे' म्हणून चौकशी केली. नंतर तो भीमाजवळ त्वरेनें गेला आणि 'युधिष्ठिर कोठें आहे' म्हणून त्यानें भीमास विचारलें.

भीमसेन—कर्णाच्या बाणप्रहारांनीं तप्त होऊन धर्मपुत्र युधिष्ठिर येथून गेला. त्याची स्थिति मोठी चिंताजनक झाली असावी, असें मला वाटतें !

अर्जुन—तर मग तूं त्या राजसत्तमाची खुशाली काढण्याकरितां येथून त्वरित जा ! मला वाटतें कीं कर्णाच्या बाणांनीं तो अतिशय विद्ध होऊन शिबिराला गेला असेल ! त्या बलवान् वीरावर द्रोणाचार्यानें तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली असतांहि त्यानें सहन केली आणि द्रोणवधापर्यंत जयाची आशा

बाळगून जीवंत राहिला ! तो पांडवाग्रणी आज कर्णाच्या बाणांनीं विव्हल होऊन मोठ्या संकटांत पडला असेल. तर त्याचा समाचार आणण्याकरितां तूंच सत्वर निघून जा ! तोंपर्यंत येथें राहून शत्रूचें नियमन मी करितों !

भीमसेन—हे महानुभावा, धर्मराजाचा समाचार काढून आणण्यास तूंच जा. हे अर्जुना, मी जर जाईन, तर हे शत्रूंकडील वीर म्हणतील कीं 'हा भीमसेन शत्रूला भ्याला.' तेव्हां अर्जुन भीमाला म्हणाला, 'संशप्तक वीर माझेपुढें युद्धार्थ सिद्ध झाले असतां त्यांच्या वधावांचून शत्रुसैन्यापुढून मला जातां येणार नाहीं.' त्यावर भीमसेन म्हणाला, 'रणांगणावर संशप्तकांशीं युद्ध करण्यास मी एकटा तयार आहें. तूं शिबिरांत जाऊन धर्मराजाचा समाचार घेऊन ये !' भीमसेनाचें तें भाषण श्रवण करून तो धैर्यशाली अर्जुन धर्मराजाच्या भेटीकरितां निघाला. तो वृष्णिप्रवर श्रीकृष्णाला म्हणाला—

अर्जुन—हृषीकेशा, हा सैन्यसागर सोडून त्या अजातशत्रु धर्मराजाकडे मला घेऊन चल. त्याला भेटण्याची मला फार इच्छा आहे.

संजय—राजा धृतराष्ट्रा, सर्व दाशार्हांमध्यें श्रेष्ठ असा तो श्रीकृष्ण रथ चालविण्याच्या वेळीं भीमाला बोलला, 'हें तूं पत्करलेलें काम तुला कांहीं दुष्कर नाहीं. मी आतां जातों. तूं या रिपुसंघांचा संहार कर!' नंतर तो श्रीकृष्ण जेथें धर्मराज होता, तेथें आपल्या गरुडसमान अश्वांना घेऊन शीघ्र गेला. नंतर ते कृष्णार्जुन रथांतून उतरले आणि जेथें युधिष्ठिर धर्मराज एकटा शय्येवर पडलेला होता, तेथें जाऊन त्याचें पादाभिवंदन त्यांनीं केलें ! त्या पुरुषश्रेष्ठाच्या समीप जेव्हां कृष्णार्जुन गेले, तेव्हां अश्विनीकुमार इंद्र याच्या भेटीस गेले आहेत कीं काय असें भासलें ! सूर्यानें जसें अश्विनीकुमारांचें, किंवा बृहस्पतीनें महासुर जंभ याच्या वधानंतर जसें शक्र-विष्णूंचें अभिनंदन केलें, त्याप्रमाणें धर्मराजानें कृष्णार्जुनांचें अभिनंदन केलें ! धर्मराज युधिष्ठिराला कर्ण हा रणांगणावर हत झाला असें वाटून मोठा संतोष झाला आणि प्रेमानें सद्गदित होऊन तो कृष्णार्जुनांना बोलला. ८. ६५.

## अध्याय ६६ वा.

[ १ युधिष्ठिरभाषण. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे देवकीपुत्रा, हे अर्जुना, तुमचें स्वागत असो ! अच्युतार्जुनहो, आज तुमचें दर्शन मला अत्यंत प्रियकारक वाटत आहे. तुम्ही दोघे अक्षत राहून महारथ कर्ण हत झाला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. कर्ण हा युद्धांत सर्पाप्रमाणें असून सर्वशस्त्रविशारद होता. धार्तराष्ट्रांचा पुढारी आणि त्यांचें सुख व आश्रयहि तोच होता. धनुर्धारी वृषसेन व सुषेण हे त्याचें सर्वदा तत्परतेनें रक्षण करीत असत. भार्गवरामानें त्याच्यावर अनुग्रह करून त्याला दुर्जय अस्त्र दिलें होतें. सर्व लोकांचा पुढारी आणि लोकविश्रुत रथीहि तो होता. तो धार्तराष्ट्रांचा त्राता आणि कौरवसेनेचा नायक होता. तो परसैन्यविदारक असून अहितकारक मंडळीचा संहारक होता. दुर्योधनाचें हित करण्यांत तो सर्वदा जितका तत्पर असे, तितकाच तो आम्हांला दुःख देण्याला उद्युक्त असे ! महायुद्धांत इंद्रप्रमुख देवांसहि तो अजिंक्य होता. त्याचें तेज आणि बल हीं अग्नि आणि वायूसारखीं होतीं. पातालाप्रमाणें तो गंभीर असून सुहृदांचा आनंदवर्धक आणि माझ्या मित्रांचा तो अंतक होता. अशा कर्णाचा महारणांत वध करून सुदैवानें तुम्ही मजजवळ आलांत, ह्यावरून असुरांस मारून तुम्ही दोन देवच आलांत; असें मला वाटत आहे ! अच्युतार्जुनहो, त्याचें आज माझ्याशीं अत्यंत भयंकर युद्ध झालें. सर्व प्रजांचा घात करणाऱ्या यमाप्रमाणें तो आज माझ्याशीं युद्ध करीत होता. त्यानें माझा ध्वज छेदिला आणि माझे पार्ष्णिसारथिहि मारून टाकिले ! त्यानें युयुधान, धृष्टद्युम्न, नकुलसहदेव, शिखंडी, द्रौपदेय आणि पांचाल यांच्या देखत माझे अश्व मारून टाकिले ! आज ह्या शत्रुगणांना प्रथम जिंकून महावीर्यशाली कर्णानें मलाहि जिंकिलें ! त्यानें माझा पाठलाग केला आणि मला अनेक दुरुत्तरेंहि बोलला. आज मी जो जीवंत आहें, तो त्या भीमसेनाच्या प्रभावामुळेंच होय. विशेष बोलून काय करायाचें आहे ? त्याचें आजचें वर्तन मला सहन होण्यासारखें नाहीं !

धनंजया, त्याच्या भयानें मीं तेरा वर्षेपर्यंत रात्रींत कधीं निद्रा घेतली नाहीं, कीं कधीं दिवसालाहि मला सुख मिळालें नाहीं ! त्याच्या द्वेषानें मी सारखा

पेटत आहें ! आणि त्याच्या हातीं मरणाची वेळ येतांच वाध्रीणस[1] पक्ष्याप्रमाणें मी येथें पळून आलों ! माझा सर्व वेळ त्याच्या चिंतनांत गेला. हा कर्ण मजकडून कसा मारला जाईल, ह्या विचारांतच माझा सर्वकाळ जात असे. जागेपणीं व निद्रावस्थेंत मला जिकडेतिकडे सर्वदा कर्णच दिसत असे. कर्णाला भिऊन मी जेथें जेथें जात असें तेथें तेथें सर्वदा कर्णच माझ्यासमोर दिसत असे ! शेवटीं त्या वीरानें हय, रथ आणि गज यांसह जिंकून मला जीवंत सोडून दिलें ! आतां मला ह्या जीविताचा किंवा राज्याचा तरी काय उपयोग ? भीष्म, द्रोण किंवा कृप ह्यांच्याशींहि युद्ध करतांना ज्या प्रकारचें दुःख मला झालें नाहीं, तसलें दुःख आज कर्णाशीं युद्ध करतांना मला झालें आहे ! अर्जुना, आज मी तुला तुझें कुशल विचारीत आहें, त्याचें कारण तरी हेंच आहे. आतां तूं त्या कर्णाचा वध कसा केलास, तें मला सविस्तर सांग ! जो युद्धामध्यें शक्रासारखा, पराक्रमामध्यें यमासारखा, अस्त्रांमध्यें परशुरामासारखा, त्याला तूं कसें बरें मारलेंस ?

अर्जुना, तो कर्ण म्हणजे सर्वयुद्धविशारद, लोकांत प्रख्यात महारथ, धनुर्धरश्रेष्ठ, जगांत ज्याच्यासारखा दुसरा कोणी नाहीं, असा होता. त्याच्या हातून तुझा वध होईल, ह्या श्रद्धेनेंच धृतराष्ट्र व त्याचे पुत्र त्याला इतका मान देत असत. अर्जुना, दुर्योधन सर्व कौरवांत तुला मारण्यास योग्य असा कोणी पुरुष असेल, तर तो एक कर्णच होय, असें सर्वदा मानीत असे. अशा त्या कर्णाचा तूं युद्धांत कसा बरें वध केलास ? त्याशीं युद्ध करीत असतां रुरुहरिणाचें ज्याप्रमाणें सिंहानें मस्तक उडवावें, त्याप्रमाणें सर्व सुहृदांच्या समक्ष हे पुरुषशार्दूला, तूं त्याचें मस्तक कसें बरें छेदलेंस ? तुला शोधण्याकरितां ज्या कर्णानें सर्व दिशा आणि उपदिशा धुंडल्या आणि तूं कोठें आहेस, हें सांगणाऱ्याला गजांप्रमाणें सहा बैल देण्यास जो रणांगणांत सिद्ध झाला, तो दुरात्मा कर्ण तुझ्या तीक्ष्ण कंकपत्र बाणांनीं विद्ध होऊन भूमितलावर पडला आहे काय ? तूं आज रणांत कर्णाला मारलेंस, ही गोष्ट मला अत्यंत आवडली ! कारण, तो शौर्याच्या अभिमानानें गर्विष्ठ होऊन एकसारखा तुझ्या शोधांत गुंतून गेला होता आणि तदर्थ दुसऱ्यांस सौवर्ण रथ, गज, व अश्व देत होता.

---

१ कृष्णग्रीवो रक्तशिराः श्वेतपक्षो विहंगमः ।
स वै वाध्रीणसः प्रोक्तो याज्ञिकैः पितृकर्मणि ॥

जो दुष्ट तुझ्याशीं नित्य स्पर्धा करीत असे, तो आज तुझ्या हातून कसा मारला गेला ? जो कौरवांच्या सभेंत शौर्यमदानें मोठी प्रौढी मिरवीत असे आणि जो सुयोधनाचा मोठा प्रिय मित्र होता, तो पापी आज तुझ्याकडून वध पावलाना ? तुझ्या धनुष्यापासून सुटलेल्या रक्तवर्ण बाणांनीं शरीर भिन्न होऊन तो पापी कर्ण जमिनीवर पडलेला पाहून दुर्योधनाचे दोनहि भुज तुटून पडलेना ? राजसभेंत 'अर्जुनाला मी मारीन' असें म्हणून ज्यानें दुर्योधनाला संतोषविलें, ते शब्द अखेरीला खोटे ठरलेना ? 'अर्जुन जीवंत असेपर्यंत मी माझे पाय कधींहि धुणार नाहीं' असा नेम करून तो ज्यानें आजपर्यंत पाळला, तो कर्ण आज तुझ्या हातून मारला गेलाना ? ज्या दुष्टबुद्धि कर्णानें द्रौपदीला भरसभेंत म्हटलें होतें कीं 'द्रौपदि, ह्या दुर्बल, पतित आणि सत्त्वहीन अशा पतींना तूं कां बरें सोडीत नाहींस ?' तसेंच ज्यानें प्रतिज्ञा केली होती कीं 'कृष्णासह पार्थाचा वध केल्याशिवाय मी युद्धांतून येथें कधींहि येणार नाहीं,' तो आज तुझ्या बाणांनीं विद्ध होऊन समरांत पडला आहेना ?

अर्जुना, सृंजय-कौरवांचा जो घोर संग्राम झाला, त्यांत माझी ही अशी दुर्दशा होणार हें तुला समजल्यामुळेंच तो दुष्ट तुझ्या हातून मारला गेला नाहींना ? हे सव्यसाचिन्, त्या मंदबुद्धि कर्णावर गांडीवापासून तीक्ष्ण बाणांची मुक्त वृष्टि करून तूं त्याचें सकुंडल शोभिवंत मस्तक देहापासून वेगळें केलेंस काय ? माझ्यावर कर्ण बाणप्रहार करीत असतां त्याच्या वधाकरितां मीं तुझें ध्यान केलें, तें ध्यान या कर्णपतनानें सफल करून दाखविलेंस नाहींना ? ह्या दुर्योधन ज्या कर्णाच्या आश्रयानें गर्विष्ठ होऊन आमचा धिक्कार करीत असे, त्या कर्णाला आज मारून तो दुर्योधनाचा आश्रय तूं आज भग्न करून टाकलासना ? ज्यानें पूर्वीं आम्हांला कौरवसभेंत षंढ असें म्हटलें होतें, त्या दुर्मति कर्णाला समरांत गांठून तूं त्याचा वध केलास, काय ? पूर्वीं ज्यानें सौबलानें जिंकलेल्या द्रौपदीस 'त्वरा करून ओढीत आण' म्हणून सांगितलें, ह्या कर्णाला आज तूं वधिलेंसना ? पितामहानें अर्धरथ म्हटल्यावरून ज्या अल्पमति कर्णाला मोठा क्रोध आला आणि ज्यानें सर्व भूमंडळावरील श्रेष्ठ अशा त्या भीष्माची अवहेलना केली, त्याला तूं आज वधिलेंसना ? अर्जुना, माझ्या हृदयांत संतापानें अग्नि उत्पन्न झाला आहे आणि तो अपमानरूप वायूनें सारखा भडकत आहे तर 'आज मीं युद्धांत कर्णाला मारिलें' इतकें सांग आणि तो अग्नि विझवून टाक ! कर्णवधाची गोष्ट मला अशक्य वाटत आहे, तर तूं कर्णाला कोणत्या प्रकारानें

मारलेंस हें मला सांग ! हे प्रवीरा, इंद्रानें वृत्राचें वधवृत्त आपणाला सांगावें, म्हणून भगवान् विष्णु जसा चिंतामग्न होऊन बसला होता, त्याप्रकारें मीहि तुजपासून कर्णवधवृत्त ऐकण्याची अत्यंत चिंता करीत आहें ! ८. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

### [ १ अर्जुनाचें उत्तर. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें त्या धर्मशील व धैर्यशाली धर्मराजानें कर्णाविषयीं जे संतापाचे उद्गार काढले, ते ऐकून तो अतिरथ महात्मा अर्जुन धर्माला बोलला—

**अर्जुन**—हे धर्मराजा, मी आज संशप्तकांशीं युद्ध करीत असतां कौरववीर अश्वत्थामा हा एकाएकीं मजवर धांवून आला आणि सर्पसदृश बाणांची वृष्टि करूं लागला. मेघगर्जनेप्रमाणें आक्रोश करणाऱ्या माझ्या सैन्यासभोंवतीं त्यानें वेढा दिला. अश्वत्थाम्याच्या पांचशें वीरांचा मीं वध केला आणि अश्वत्थाम्यावर चालून गेलों. मला पाहतांच द्विपेंद्र जसा सिंहावर उडी घालतो, त्याप्रमाणें मोठ्या आवेशानें उडी टाकून तो मजवर आला आणि माझे रथ्यांनीं चालविलेला कौरवसंहार थांबविण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. त्या अश्वत्थाम्यानें माझ्यावर आणि श्रीकृष्णावर विषाग्निसमान अत्यंत तीक्ष्ण बाण टाकून आम्हांला अगदीं विह्वल करून सोडलें. त्या अश्वात्थाम्याबरोबर आठ आठ बैल जुंपलेल्या आठ बैलांच्या गाड्या बाणांनीं भरलेल्या होत्या ! ते सर्व बाण त्यानें मजवर सोडले. मींहि वायु जसा अभ्रजाल उधळून टाकतो, त्याप्रमाणें त्याच्या सर्व बाणांचा विध्वंस केला ! नंतर धनुष्याची दोरी आकर्ण ओढून पुष्कळ बाण त्यानें मजवर सोडले आणि आपलें सर्व अस्त्रनैपुण्य आणि बल यांचा उपयोग करून वर्षाकालांतील कालमेघाप्रमाणें मजवर वृष्टि केली ! त्यासमयीं तो भात्यांतून बाण केव्हां काढी, धनुष्यावर केव्हां जोडी आणि ते उजव्या किंवा डाव्या हातानें शत्रूवर केव्हां सोडी हें मला कांहींच समजत नसे ! समरांत एकसारखी बाणवृष्टि करतांना त्याचें तें मंडलाकार धनुष्य मात्र फिरतांना दिसत असे ! त्यानें मजवर पांच व वासुदेवावर पांच तीक्ष्ण बाण टाकले ! आम्हींहि निमिषमात्रांत तीस तीक्ष्ण बाण त्यावर मारले ! ते त्याच्या शरीरांत शिरूने तो साळपक्ष्यासारखा दिसूं लागला ! त्याच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं

लागला ! इतर योद्धयांवरहि मीं बाणवर्षाव केला व त्यांच्याहि शरीरांतून रुधिरप्रवाह वाहूं लागले ! नंतर अश्वत्थामा कर्णाच्या रथसेनेंत शिरला.

आपल्या सैन्याचा पराभव झाल्याचें आणि त्यांतील अश्व आणि गज हत झाल्याचें पाहून त्या कर्णानें पन्नास निवडक रथ्यांसह मजवर चाल केली. मी त्या सर्व रथ्यांचा संहार केला आणि तुला पाहण्यासाठीं त्वरेनें येथें निघून आलों. पांडवसेनेची भयंकर स्थिति झाली. सिंहाला पाहून गाईंची जशी अनाथ स्थिति होते, तशी कर्णाला पाहून पांचालांची झाली ! हे राजा, त्या प्रभद्रक योद्धयांनीं जणुंकाय मृत्यूच्या जबड्यांत शिरत असल्याप्रमाणें कर्णावर चाल केली ! त्यावेळीं कर्णानें त्यांचे सातशें रथ भग्न केले आणि त्या प्रभद्रक वीरांना यमसदनीं पाठविलें ! राजा, त्या सूतपुत्रानें आम्हांला पाहतांच युद्धाचें स्वरूप बदललें ! आम्हीं असें ऐकिलें आहे कीं तुझी गांठ पडतांच त्यानें व अश्वत्थाम्यानें पूर्वीपेक्षां तुला अधिक बाणविद्ध केलें, म्हणून तूं त्या दुष्ट कर्णाशीं युद्ध करण्याचें सोडून रणांगणांतून पळून गेलास !

हे राजा, त्यानंतर मीं युद्धांतील विविध स्वरूपाचें कर्णाचें अस्त्रकौशल्य पाहिलें. कर्णाशीं आज तोंड देईल असा सृंजयांमध्यें कोणीहि महारथी वीर नाहीं. म्हणून हे राजा, जर तो आज रणभूमीवर दिसला, तर आज मी त्याच्याशीं युद्ध करीन. त्यावेळीं शैनेय, सात्यकि व धृष्टद्युम्न यांनीं माझ्या रथाच्या चाकांचें रक्षण करावें, शूर राजपुत्र युधामन्यु व उत्तमौजा यांनीं माझ्या मागें राहून माझें संरक्षण करावें व मीं शत्रुसैन्यामध्यें अजिंक्य रथांत बसून प्रवेश करावा ! नरश्रेष्ठा, ज्याप्रमाणें इंद्रानें वृत्रासुराशीं युद्ध केलें, तशाच प्रकारचें युद्ध आज मी कर्णाशीं करीन ! रणांगणावर जय मिळण्याकरितां सूतपुत्राशीं लढतांना आज माझा पराक्रम पहा, चल ! आज प्रभद्रक वीरांची जणुंकाय मदोन्मत्त बैलांच्या झुंजींत सांपडल्याप्रमाणें कर्णाशीं युद्ध करतांना स्थिति झाली आहे. भारतकुलोत्पन्न धर्मराजा, स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें सहा हजार राजपुत्र आज युद्धांत गुंतलेले आहेत. जर आज माझें सर्व बळ खर्च करून बांधवांसहित युद्ध करणाऱ्या कर्णाचा मी वध करणार नाहीं, तर राजश्रेष्ठा, कर्णवधाबद्दल प्रतिज्ञा करून ती पार न पाडतां आल्यामुळें मला दुःखकारक स्थिति प्राप्त होईल ! राजा, मी तुझा निरोप घेतों, मला युद्धांत जय मिळेल, असा आशीर्वाद दे ! कारण ती पहा कौरवांनीं भीमावर चाल केली

आहे ! राजश्रेष्ठा, मी आतां, कर्णाचा, त्याच्या सैन्याचा व त्याचप्रमाणें सर्व शत्रुपक्षांतील वीरांचा वध करितों ! ८. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ युधिष्ठिरानें केलेली अर्जुनाची निर्भर्त्सना. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, महापराक्रमी कर्ण जीवंत आहे, असें ऐकून कर्णाच्या बाणांनीं विद्ध झालेला अत्यंत तेजस्वी युधिष्ठिर अर्जुनावर रागावून त्याला म्हणाला, 'अर्जुना, तुझें सैन्य सैरावरां पळत असून सर्व वीर त्याचा धिक्कार करीत आहेत, हें चांगलें नाहीं ! भीमाला रणांगणावर टाकून कर्णाचा वध न करितां भीतीनें तूं येथें आलास हें तूं योग्य केलें नाहींस ! पार्था, कुंतीच्या पोटीं जन्माला येऊन भीमावर आजपर्यंत सहोदर या नात्यानें केलेलें तुझें प्रेम व्यर्थ गेलें ! द्वैतवनांत असतांना मी एकटाच कर्णाचा वध करीन, असें तूं म्हणालास, मग आज भीमसेनाला एकटा रणांत टाकून कर्णाच्या भीतीनें तूं कां पळून आलास ? अर्जुना, कर्णाशीं युद्ध करण्याला मी समर्थ नाहीं, असें जर तूं मला द्वैतवनांत सांगितलें असतेंस, तर त्या प्रसंगाला उचित असें आम्हीं सर्वांनीं केलें असतें ! तेव्हां कर्णाचा वध आपण करीन, असें वचन देऊन तो न करितां आज आम्हांला शत्रूंच्या गोटांत सोडून आणि दगडावर आपटून आमचा कां बरें नाश केलास ? अर्जुना, तुझ्यावर विश्वास ठेवल्यामुळें आमचें कल्याण होऊन इष्ट हेतु सिद्धीस जाईल, असा आम्हां सर्वांना भरंवसा होता, तो आज निष्फल ठरला ! फळांची इच्छा करणाऱ्या लोकांना फलवृक्ष न मिळतां पुष्पभारानें लवलेला असा वृक्ष प्राप्त व्हावा, तशी आमची स्थिति झाली ! ज्याप्रमाणें आमिषानें झांकलेला गळ मिळावा, अगर विषयुक्त अन्न प्राप्त व्हावें, त्याप्रमाणें राज्याची इच्छा करणाऱ्या आम्हांला हा अनर्थकारक राज्यरूपी विनाश तूं दाखविलास ! धनंजया, गेलीं तेरा वर्षें मोठ्या आशेनें आम्ही तुझ्यावर विसंबून होतों. शेतांत बीं पेरल्यानंतर योग्य वेळीं पाऊस पडेल अशा भरंवशानें जसा शेतकरी स्वस्थ बसतो, तसें आम्ही तुजवर विश्वास ठेवून होतों; परंतु तूं आम्हां सर्वांना नरकांत लोटून दिलेंस ! मंदबुद्धे अर्जुना, तूं जन्माला येऊन सात दिवस झाल्यानंतर आकाशवाणीनें कुंतीला सांगितलें कीं, "हे कुंति, ह्या तुझ्या मुलाचा इंद्राप्रमाणें पराक्रम आहे ! हा महापराक्रमी होऊन

सर्व वीरांना जिंकील ! ह्याचे ठिकाणीं दिव्य तेज असल्यामुळें खांडववनामध्यें ह्या देवांच्या समूहांना व इतर सर्व प्राण्यांना जिंकील ! हा मद्र, कलिंग, केकय हे देश काबीज करून सर्व राजांमध्यें कौरवांचा वध करील ! ह्यापेक्षां श्रेष्ठ प्रतीचा धनुर्धर पुढें होणार नाहीं, कोणीहि याला जिंकूं शकणार नाहीं. सर्व विद्यांत नैपुण्य मिळवून मनोनिग्रहाच्या सामर्थ्यानें हा सर्व प्राणिमात्रांना वश करून घेईल ! हे कुंति, हा तुझा मुलगा कांतीनें चंद्राप्रमाणें, वेगानें वायूप्रमाणें, स्थैर्यानें मेरूप्रमाणें, क्षमाशीलतेनें पृथ्वीप्रमाणें, तेजानें सूर्याप्रमाणें, संपत्तीनें कुबेराप्रमाणें, शौर्यानें इंद्राप्रमाणें व बलानें विष्णूप्रमाणें आहे. अदितीचा मुलगा विष्णु यानें ज्याप्रमाणें शत्रूंचा नाश केला, त्याप्रमाणें हाहि शत्रुविध्वंसक होईल. अमर्याद बल असलेला हा तुझा पुत्र आप्तेष्टांना जय देऊन व शत्रूंचा वध करून प्रसिद्धीस येईल व याचेमुळें तुझें कुल प्रसिद्धीला येईल !"

याप्रमाणें शतशृंग पर्वतावर मुनिजन ऐकत असतांना आकाशवाणी कुंतीला बोलली. ज्याअर्थीं तशाप्रकारचें अद्याप कांहींच घडून आलें नाहीं, त्याअर्थीं देवहि असत्य भाषण करीत असावेत असा तर्क होतो ! तसेंच सदोदित तुला मान देणाऱ्या इतर मुनिश्रेष्ठांचें तुझ्याबद्दलचें मत ऐकून सुयोधनाची इतकी उन्नति कशी झाली व कर्णाला तूं इतका कसा भ्यालास, हें मला समजेनासें झालें आहे ! महाशक्तिमान् अशा कर्णासमोर अर्जुनाची समरांत उभें रहाण्याची छाती नाहीं, असें पूर्वीं सुयोधनानें सांगितलें असतांहि, मीं मूर्खपणानें त्याकडे दुर्लक्ष्य केलें; म्हणून आज मला फारच पश्चात्ताप होत आहे व शत्रूंच्या समुदायांत नरकांत प्रवेश करणें प्राप्त झालें आहे. अर्जुना, मी कर्णाशीं युद्ध केव्हांहि करणार नाहीं असें जर मला तूं त्याच वेळीं सांगतास, तर मी युद्धांत मदत करण्यासाठीं सृंजय, केकय व इतर आप्तेष्टांना बोलावलें नसतें! कर्णाशीं, राजा सुयोधनाशीं, किंवा जे युद्धाच्या इच्छेनें आले आहेत, त्यांच्याशीं युद्ध करितांना मला आज काय करतां येणें शक्य आहे? कौरव, माझे आप्तेष्ट व युद्धाच्या इच्छेनें जे जमले आहेत, त्यांच्यासमोर आज मी कर्णाच्या तावडींत सांपडलों, त्याअर्थीं हे कृष्णा, माझ्या जिण्याला धिक्कार असो ! अर्जुना, जर तुझा पुत्र रथिश्रेष्ठ, महारथी, योद्ध्यांचाहि वध करणारा अभिमन्यु आज जीवंत असता, तर माझा युद्धांत पराभव झाला नसता. त्याचप्रमाणें घटोत्कच जर समरांत असता तर मी रणभूमीवर कधींहि पराभूत झालों नसतों ! पूर्वीं मीं जीं दुष्ट पातकें केलीं तींच समरांत आज बलिष्ठ ठरल्यामुळें युद्धांत तूं तृणाप्रमाणें निर्वीर्य ठर-

लास व त्या दुष्ट कर्णानें माझा अपमान करून, आप्तेष्टविरहित दीन मनुष्याप्रमाणें मला दुर्बल केलें! जो कोणी विपत्तीनें ग्रस्त झालेल्याला मुक्त करील तोच बांधव व प्रेमळ मित्र होय असें पुरातन कालापासून मुनि सांगत आले आहेत व नेहमीं सज्जनांचें वर्तनहि त्याचप्रमाणें आहे. पार्था, प्रत्यक्ष विश्वकर्म्यानें तुझा रथ निर्माण केला आहे, त्याचे आंस एकमेकांवर घांसत नाहींत, त्याच्या ध्वजाचे ठिकाणीं हनुमान् बसलेला आहे व तुझें सारथ्य कृष्ण करीत आहे! तूं हातांत सुवर्णविभूषित खड्ग व तालवृक्षाइतकें उंच असें गांडीव धनुष्य धारण केलें आहेस! त्या तुला कर्णाला भिऊन रणांगणांतून पळ काढावा लागला; तेव्हांच अर्जुना, तें धनुष्य कृष्णाला देऊन, युद्धांत तूं त्याचें सारथ्य करतास, तर ज्याप्रमाणें वज्रधारी इंद्रानें वृत्राचा वध केला, त्याप्रमाणें कृष्णानें त्या उग्र कर्णाचा रणांत वध केला असता! आज देखील जर त्या उग्र कर्णाला तोंड देण्याला तुला शक्ती नसेल, तर जो राजा तुझ्यापेक्षां अस्त्रविद्येंत श्रेष्ठ असेल त्याला तें गांडीव देऊन टाक, म्हणजे तो कर्णाचा वध करील! तसें न करशील तर अर्जुना, स्त्रीपुत्रविरहित, सुखाला आंचवलेले, राज्याला अंतरलेले आम्ही पांडव दुष्ट पापी लोकांचें वसतिस्थान जो नरक त्यांत पडलों आहोंत असें जगाला आढळून येईल! दुरात्म्या अर्जुना, जर तूं कुंतीच्या उदरीं जन्मला नसतास, अगर पांचव्या महिन्यांत गर्भपात होऊन नष्ट झाला असतास, तर समरांगणांतून पळून जाण्यापेक्षां तें श्रेयस्कर झालें असतें! अर्जुना, तुझ्या गांडीवाला, तुझ्या बाहुवीर्याला, तुझ्या असंख्य बाणांना, तुला स्वतःला, तुझ्या ध्वजस्थित मारुतीला, त्याप्रमाणें अग्निदत्त अशा तुझ्या रथालाहि धिक्कार असो! ८. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ अर्जुनाचा कृष्णास प्रश्न. २ कृष्णकृत सत्यासत्यनिर्णय. ३ कृष्णानें सांगितलेल्या बलाककौशिककथा. ४ धर्माधर्मकथनानें कृष्णानें अर्जुनाला केलेला बोध.]

( १ ) **संजय**—राजा, ह्याप्रमाणें युधिष्ठिरानें केलेला धिक्कार कानीं पडतांच क्रोधानें लाल होऊन त्या श्वेतवाहन अर्जुनानें धर्मराजाचा वध करण्याच्या हेतूनें हातांत खड्ग घेतलें. तेव्हां त्याची क्रोधयुक्त मुद्रा पाहून, दुसऱ्यांचे मनांतील आशय जाणणारा कृष्ण त्याला म्हणाला, "धनंजय अर्जुना, येथें तुझ्याशीं

युद्ध करणारा कोणी मला दिसत नाहीं; मग तूं खड्ग हातांत कां घेतलें आहेस ? बुद्धिमान् भीमसेनानें त्या कौरवांना जर्जर करून टाकलें आहे. कौंतेया, धर्मराजाला भेटण्याचे इच्छेनें तूं निघून आलास, युधिष्ठिर खुशाल आहे, असें तुला दिसून आलें. सिंहाप्रमाणें ज्याचा पराक्रम आहे अशा राजश्रेष्ठ धर्मराजाला पाहून तुला वास्तविक हर्ष होणें उचित होतें; परंतु तूं हें वेड्यासारखें काय करीत आहेस ? ज्याचा तूं वध करणें इष्ट आहे असा कोणी येथें मला दिसत नाहीं. तूं कोणावर प्रहार करण्याची इच्छा करीत आहेस ? तुझा बुद्धिभ्रंश तर झाला नाहींना ? तूं त्वरेनें हातांत खड्ग कां बरें घेतलेंस ? काय करण्याची तुझी इच्छा आहे ? रागावलेल्या मुद्रेनें तूं ही तरवार कां परजीत आहेस तें मला सांग ! ” हा कृष्णाचा प्रश्न ऐकून युधिष्ठिराकडे पहात अर्जुन रागावलेल्या सर्पाप्रमाणें फूत्कार टाकीत कृष्णाला म्हणाला, “ गोविंदा, दुसऱ्याला गांडीव दे, असें जो मला सांगेल त्याचा शिरच्छेद करीन असा माझा पण आहे. कृष्णा, धर्मराजानें तुझ्या समक्ष दुसऱ्यास गांडीव दे अशी मला आज्ञा केली; ती सहन न झाल्यामुळें ह्या धर्मभीरु राजाचा वध करून मी माझा पण शेवटास नेणार आहें. याकरितां यदुनंदना, मीं हातांत खड्ग घेतलें आहे ! जनार्दना, युधिष्ठिराचा वध करून मी सत्यप्रतिज्ञ होईन व माझा शोक व दुःख नाहींसें करीन ! कृष्णा, तूं सर्व जगाचें भूतभविष्य जाणतोस. तर या प्रसंगीं काय करणें उचित आहे तें मला सांग. जसें तूं मला सांगशील तसें मी करीन ! ”

( २ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, अर्जुनाचें भाषण ऐकून त्याचा धिक्कार करीत कृष्ण म्हणाला, “ अर्जुना, तुझा हा अकालीं क्रोध पाहून मला असें वाटतें कीं, तूं कधींहि वृद्धांची सेवा केली नाहींस ! तूं धर्मभीरु व मूर्ख असून आज जें कृत्य करण्यास उद्युक्त झाला आहेस तसलें अविचाराचें कृत्य करण्यास कोणी धर्मज्ञ मनुष्य कधींहि तयार होणार नाहीं ! जो मनुष्य निषिद्ध कार्यें व अक्रिय असलीं तरी योग्य कार्यें यांतील भेद न जाणतां त्यांची मिसळ करितो, तो मनुष्य अत्यंत अधम होय. शिष्यांनीं विनंति केल्यावरून गुरूंनीं विस्तारानें, पण संक्षेपानें धर्माला अनुसरून कार्याकार्याबद्दलचें आपलें निश्चित मत त्यांना सांगितलें, तें तूं जाणत नाहींस ! कार्याकार्यनिर्णयाबद्दल पंडितांचीं निश्चित मतें ज्याला अवगत नाहींत, असा मनुष्य, अर्जुना, तुझ्याप्रमाणें मोहित होऊन वेड्यासारखा वागतो ! कोणती गोष्ट करणें योग्य व कोणती अयोग्य हें समजणें सोपें नाहीं. श्रुतीचें अध्ययन केल्यानें तें समजतें. तुला श्रुतीचें

ज्ञान मुळींच नाहीं. कारण अर्जुना, स्वतःला धर्मज्ञ असें समजून देखील अज्ञानामुळें तूं हें कृत्य करण्यास उद्युक्त झाला आहेस ! प्राण्याचा वध करणें हें पाप आहे, हें तूं धर्मज्ञ असून देखील जाणत नाहींस. बाबा, अहिंसा ही मला सर्व धर्मांत श्रेष्ठ वाटते. मनुष्य एक वेळ खोटें बोलला तरी चालेल, परंतु त्यानें केव्हांहि हिंसा करूं नये. दुसऱ्या प्राकृत मनुष्याप्रमाणें, हे नरश्रेष्ठा, तूं आपल्या वडील भावाचा–धर्मशील राजा युधिष्ठिराचा–वध करण्यास कसा सरसावलास ? आपल्याशीं युद्ध न करणाऱ्या, युद्धांतून माघार घेऊन पळणाऱ्या, शरण आलेल्या, हात जोडून असलेल्या, त्याचप्रमाणें विचारशक्ति नष्ट झालेल्या मनुष्याचा वध करणें सज्जनांना संमत नाहीं. या सर्व गोष्टी तुझ्या वडील भावाचे ठिकाणीं आहेत, म्हणून तूं त्याचा वध करणें युक्त नाहीं !

पार्था, पूर्वी बाल व अज्ञानी असतांना तूं हा पण केला आहेस ! तो अधर्मयुक्त आहे; म्हणून मूर्खपणानें तूं हें कर्म करण्यास उद्युक्त झाला आहेस ! अर्जुना, धर्माचीं सूक्ष्म व अगाध तत्त्वें न जाणल्यामुळें तूं वडील बंधूचा नाश करण्यास प्रवृत्त झाला आहेस, म्हणून मी आतां तुला धर्माचें रहस्य सांगतों. तें तुला पूर्वी भीष्मानें, युधिष्ठिरानें किंवा कुंतीनें सांगितलें असेल. धनंजया, तें आतां लक्ष देऊन ऐक ! सत्यवक्ता तोच साधु होय, सत्यापेक्षां श्रेष्ठ कांहींच नाहीं. सत्य-पालन कसें करावें हें जाणणें कठीण आहे. कारण केव्हां केव्हां सत्य अधर्माला कारण होतें. क्वचित् प्रसंगीं सत्य गोष्ट बोलणें अयुक्त असेल, तर असत्य गोष्ट बोलावी लागेल; अशा प्रसंगीं सत्य तें असत्य व असत्य तें सत्य असें होईल. विवाहसमयीं, संभोगकालीं, प्राणांवर बेतलें असतां, सर्व धनाचा नाश होण्याचा विपरीत प्रसंग आला असतां, व त्याचप्रमाणें ब्राह्मणाचें कल्याण साध-ण्यासाठीं असत्य भाषण करणें पाप नाहीं असें शास्त्रें सांगतात. सर्वस्वाचा नाश होण्याचे प्रसंगीं असत्य भाषण हेंच योग्य व सत्य आणि सत्यभाषण हेंच अयुक्त ठरेल. याची समजूत नसल्यामुळें अज्ञ लोक केवळ सत्यालाच धरून वागतात. प्रसंगीं सत्य बोलतां येत नाहीं व अनुष्ठित कर्म सांगतां येत नाहीं, अशीहि स्थिति येते. म्हणून सत्यासत्य यांतील सूक्ष्म भेद ज्याला समजेल, तोच धर्मज्ञ होय. बुद्धिमान् बलाकानें अत्यंत भयंकर अंधवधासारखें कर्म करून महत्पुण्य संपादन केलें, त्याचप्रमाणें कौशिकासारख्या मूर्ख, परंतु धार्मिक मनुष्यानें नदीसंगमावर चोरांना खरा मार्ग सांगून महत्पाप जोडलें यांत आश्चर्य तें कसलें ?”

अर्जुन—कृष्णा, बलाकानें व कौशिकानें कोणत्या रीतीनें पुण्य व पाप संपादन केलें तें सविस्तर सांग !

(३) वासुदेव—पूर्वीं बलाक नांवाचा एक व्याध स्त्री व मुलें यांच्या उदरभरणाकरितां मृगया करीत असे. वस्तुतः मृगांची हत्या करावी असा त्याचा हेतु नव्हता. नेहमीं स्वधर्माप्रमाणें वागून सत्यवचनी व कोणाचाहि हेवा न करणारा असा तो व्याध आपल्या वृद्ध मातापितरांचें व इतर आश्रितांचें पालनपोषण करीत असे. एकदां शिकारीला गेला असतांना एकहि मृग त्याला आढळला नाहीं; परंतु पाणी पीत असलेलें, अंध असें एक श्वापद त्याला दिसलें. तसलें श्वापद त्यानें पूर्वीं पाहिलें नव्हतें, तरी त्यावर बाण सोडून त्या अंध श्वापदाला त्यानें वधिलें. त्याबरोबर स्वर्गांतून त्यावर पुष्पवृष्टि झाली, अप्सरांच्या सुस्वर गाण्यानें व वादनानें सर्व आकाश दुमदुमून गेलें व स्वर्गांतून व्याधाला स्वर्गलोकीं नेण्यासाठीं विमान खालीं उतरलें ! अर्जुना, त्या श्वापदानें उग्र तपश्चर्या करून सर्व प्राण्यांचा नाश करण्यासाठीं वर मिळविला होता व म्हणून ब्रह्मदेवानें त्याला अंध केलें होतें. अशा त्या सर्व प्राण्यांचा नाश करण्यासाठीं निश्चय केलेल्या अंध श्वापदाचा वध करून तो बलाक व्याध स्वर्गाला गेला. तेव्हां धर्माचें तत्त्व किती गूढ आहे हें लक्षांत घे. असो. कौशिक नांवाचा एक तपस्वी ब्राह्मण, श्रुतीचें फारसें ज्ञान नसलेला, गांवाच्या जवळच नदीसंगमावर रहात असे. धनंजया, 'मी नेहमीं सत्यच बोलेन' अशी त्याची प्रतिज्ञा असे, म्हणून सत्यवचनी अशी त्याची कीर्ति होती. एकदां चोरांच्या भयानें कांहीं लोक त्या वनांत शिरले. त्या क्रुद्ध झालेल्या चोरांनीं मोठ्या प्रयत्नानें त्यांना शोधण्याचा प्रयत्न केला. हिंडतांहिंडतां ते चोर सत्यवादी कौशिकाजवळ येऊन 'भगवन्, इकडून पुष्कळ लोक कोणत्या मार्गानें गेले तें बरोबर माहीत असल्यास सांगा पाहूं, खोटें सांगूं नका!' असें त्याला म्हणाले. तेव्हां तो कौशिक त्यांना म्हणाला, 'ह्या वनांत वृक्ष व वेली यांची गर्द झाडी आहे. त्या झाडींत ते लपले आहेत.' हें ऐकल्याबरोबर त्या क्रूर चोरांनीं त्यांना शोधून त्यांचा वध केला, अशी कथा आहे. धर्माच्या सूक्ष्म तत्त्वाविषयीं अनभिज्ञ असा तो कौशिक सत्य, परंतु असें दुरुक्त बोलल्यामुळें दुःखद नरकांत पडला. ज्याप्रमाणें अर्धवट शिकलेला मनुष्य धर्माचीं सूक्ष्म तत्त्वें न जाणून संशय उत्पन्न झाला असतां त्याचें निराकरण वृद्धांकडून करून न घेतां नरकांत पडतो,

तशी अवस्था त्या कौशिकाची झाली ! तर अर्जुना, धर्माधर्म किंवा सत्यासत्य जाणण्याचें सूक्ष्म तत्त्व काय आहे तें ऐक !

(४) धर्माधर्माचें हें ज्ञान समजण्यास अत्यंत कठीण असल्यामुळें केवळ तर्कानें जाणावें लागतें. पुष्कळ लोकांचा असा समज आहे कीं, श्रुतींतच धर्म सांठविलेला आहे. ही त्यांची समजूत फारशी चुकीची नाहीं, परंतु सर्वच गोष्टींचा विचार श्रुतींत केलेला नाहीं. प्राणिमात्राच्या उन्नतीसाठींच धर्म आहे असें धर्माचें स्पष्टीकरण श्रुतींत केलें आहे. अहिंसायुक्त असें कर्म म्हणजेच धर्म हा सिद्धांत आहे हें लक्षांत ठेव. हिंसा करणाऱ्या पुरुषांच्या हातून परपीडन होऊं नये हाच धर्माचा हेतु होय. धर्म शब्दाचा अर्थ धारण-बंधन-होय व हें बंधन सर्व लोकांना आहे, किंबहुना सर्व लोक या बंधनामुळेंच जगतात. जे लोक रूढीवर विसंबून वेदबाह्य नियमांचा स्वीकार करून अधर्माची इच्छा करतात, त्यांच्याशीं संभाषण देखील करूं नये. परहित ज्यानें साधेल असें कर्म म्हणजेच धर्म असा श्रुतीचा आदेश आहे. धर्म कोणता, अधर्म कोणता यांबद्दल संशय पडला असतां, जर श्रुतींच्या ज्ञानानें किंवा लौकिक युक्तीनें—जनरूढीवरून—आपल्या संशयाची निवृत्ति होत नसेल, तर दुसऱ्याचें कल्याण होत असल्यास मौन स्वीकारावें हा उत्तम पक्ष, तें नच साधल्यास प्रसंगीं खोटें बोलणें देखील श्रेयस्कर होय. कांहीं कार्य मनांत आणून तें साधण्यासाठीं कित्येक लोक नियम करतात व त्या नियमाचें समर्थन दुसऱ्याच हेतूनें करूं लागतात. त्यांना त्या कार्याचें फल प्राप्त होत नाहीं असें ज्ञाते म्हणतात. प्राणांवर बेतलें असतां, विवाहप्रसंगीं, सर्व जातींचा नाश होण्याचे समयीं, किंवा विनोद चालू असतांना असत्य भाषण केलें तरी तें पाप नव्हे. धर्माविषयीं सूक्ष्म विचार करणाऱ्या तत्त्ववेत्त्या लोकांना त्यांत कांहीं अधर्म वाटत नाहीं. चोरट्यांशीं गांठ पडली असतां खोटी शपथ घेऊन जर सुटका होत असेल, तर अशा प्रसंगीं असत्य भाषण हेंच श्रेयस्कर ठरेल. केव्हांहि चोरांच्या हातीं धन देणें इष्ट नव्हे. कारण दुष्ट लोकांना दिलेलें धन दात्याला नरकांत पाडतें. म्हणून अर्जुना, धर्मपालनासाठीं असत्य भाषण करणारा मनुष्य असत्यवादी ठरत नाहीं. तुझें हित व्हावें, या इच्छेनें माझ्या बुद्धीला आकलन झालें, त्याप्रमाणें श्रुतींनीं प्रतिपादिलेला हा धर्माधर्मविचार—कार्याकार्यविवेक—मीं तुला स्पष्ट करून सांगितला आहे. तो लक्ष्यांत घेऊन युधिष्ठिराचा वध करणें योग्य कीं अयोग्य तें सांग !

अर्जुन—कृष्णा, ज्याप्रमाणें एखादा महामतिमान् व दूरदर्शी मनुष्य हिताचा उपदेश करितो तसाच तूं मला केला आहेस. तूं आम्हांला मातापितरां-सारखा आहेस. तूंच आम्हांला मोठा आधार आहेस. त्रैलोक्यांत तुला माहीत नाहीं असें कांहींच नाहीं. म्हणून कृष्णा, तूं उत्तम प्रकारचा धर्मज्ञ आहेस, असें मला वाटतें. धर्मराज युधिष्ठिराचा वध करणें उचित नाहीं, अशी माझी खात्री पटली. तथापि मीं केलेल्या पणासंबंधानें माझ्या मनांत एक शंका आली आहे, ती तुला सांगतों. दाशार्हा, भीमाला 'खादाड, अधाशी' असें जो म्हणेल, त्याचा ज्याप्रमाणें भीम वध करील, त्याप्रमाणें जो कोणी मला, 'अर्जुना, तुझ्या अंगांत पराक्रम नाहीं, तुझ्यापेक्षां अस्त्रविद्येत व पराक्रमानें श्रेष्ठ अशा अन्य पुरुषाला हें गांडीव धनुष्य देऊन टाक,' असें म्हणेल, त्याचा वध करण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे, हें तूंहि जाणतोस. हे वृष्णिवीरा, तुझ्या समक्षच राजा युधिष्ठिर तसें मला म्हणालाना ? युधिष्ठिराला मारून मला या जगांत एक क्षण देखील जिवंत रहाणें अशक्य आहे. राजाचा वध करण्याचें मीं ठरवि-ल्यास माझें सर्व वीर्य लोपून मी वेडा होईन; यासाठीं भ्रातृहत्येचें पाप मला न लागतां माझें प्रतिज्ञापालनहि होईल अशी युक्ति, धर्मज्ञ कृष्णा, मला विचार करून सांग !"

कृष्ण—अर्जुना, युधिष्ठिर अत्यंत श्रांत व दुःखित झाला आहे. युद्धांत वारंवार सूतपुत्र कर्णाच्या असंख्य तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झाल्या-मुळें क्रोधयुक्त होऊन केवळ दुःखानें त्याचे तोंडून असे उद्गार निघाले आहेत. प्रस्तुत समयीं अर्जुनाला जर क्षोभ उत्पन्न केला नाहीं, तर युद्धांत तो कर्णाला मारणार नाहीं, अशा समजुतीनें त्यानें तुला 'गांडीव दुसऱ्यास दे,' असें सांगितलें. पार्था, तुझ्याशिवाय त्या दुष्ट कर्णाशीं युद्ध करण्याला कोणी समर्थ नाहीं, हें युधिष्ठिराला पक्कें माहीत आहे; म्हणूनच माझ्या समक्ष अत्यंत क्रोधा-विष्ट झालेला धर्मराज तुला तशीं कठोर वचनें बोलला. पांडवांचा नाश करण्या-साठीं नेहमीं सज्ज असलेल्या पराक्रमी कर्णाशीं आज रणांत युद्धरूपी द्यूतच खेळलें पाहिजे. त्या द्यूतांत एकदां कर्ण मृत झाला म्हणजे सर्व कौरवांना सहज जिंकतां येईल, असें धर्मराजाला वाटतें. म्हणून अर्जुना, या सर्व गोष्टींचा विचार करतां धर्मराजाचा वध करणें योग्य नाहीं आणि तुझी प्रतिज्ञा तर तडीस गेली पाहिजे; म्हणून हा धर्मराज जीवंत राहून मृत कसा होईल, तें ऐक !

अर्जुना, सन्मान्य मनुष्याला जगांत मान मिळत असतो, तोंपर्यंतच तो या लोकांत जीवंत असतो, परंतु जर त्याचा मोठा अपमान झाला तर तो जीवंत असूनहि मेल्याप्रमाणें होतो! अर्जुना, धर्मराजाला नेहमीं तूं, भीम, नकुल-सहदेव व जगांतील सर्व शूर व वृद्ध पुरुष मान देत आहेत. त्याचा अपमान तूं युक्तीनें कर म्हणजे त्याचा वध केल्यासारखें होईल. पार्था, पूज्य युधिष्ठिराला 'अहो' न म्हणतां 'अरे' असें म्हण म्हणजे त्या सन्मान्य पुरुषाचा तूं वध केलास असें होईल. कौंतेया, अशाप्रकारें युधिष्ठिराशीं तूं आचरण केलें असतां तुला पाप लागणार नाहीं. श्रुतीमध्यें श्रेष्ठ अशा अथर्वांगिरसीनामक श्रुतीचा वरील वचनाला आधार आहे. श्रेयस्काम मनुष्यानें अशाच प्रकारचें वर्तन निःसंशय करावें. राजा युधिष्ठिराला अरे तुरे करून बोलल्यानें तुला त्याचा शस्त्राशिवाय वध करतां येईल आणि धर्मराजाला तुझ्याकडून अशा प्रकारचा वध होणें अयोग्य वाटेल. म्हणून अर्जुना, नंतर तूं त्याच्या पायां पडून त्याचें सांत्वन कर! म्हणजे अर्थांतच असत्यापासून तूं मुक्त होशील, तसेंच भ्रातृवधाचेंहि पाप तुला लागणार नाहीं. मग तूं मोठ्या आवेशानें कर्णावर धांवून जा आणि त्याचा वध कर! ८. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ अर्जुनकृत युधिष्ठिरनिर्भर्त्सना. २ युधिष्ठिराचें आश्वासन. ]

( १ ) **संजय**—राजन्, याप्रमाणें कृष्णाचें भाषण ऐकून त्याचा विचार अर्जुनाला आवडला आणि पूर्वीं कधींहि केलें नाहीं, असें कठोर भाषण त्यानें धर्माशीं केलें.

**अर्जुन**—राजा, रणापासून कोसभर लांब राहून असें भाषण करणें हें तुझ्या सारख्याला शोभण्यासारखें नाहीं. भीमानें माझी निंदा केली असती, तर तें शोभलें असतें. कारण तो रणांत प्रमुख योद्ध्यांशीं युद्ध करीत आहे! त्यानें वेळचेवेळीं अनेक शूर राजांना, प्रमुख रथ्यांना, उत्तमोत्तम गजांना, पराक्रमी अश्वसादींना आणि असंख्यात दुसऱ्या वीरांना वधिलें आहे. याशिवाय त्यानें सहस्रावधि गजांना, कित्येक दशसहस्र कांबोज व पार्वतीय वीरांना मारून सिंह जसा हरिणांचा वध करून गर्जना करितो, त्याप्रमाणें गर्जना केली आहे! त्या वीरानें जसें दुष्कर कर्म करून पराक्रम गाजविला आहे, तसें तुझ्या हातून कधींहि

होणार नाहीं. त्यानें रथांतून उडी टाकून व हातांत गदा घेऊन रणांत शत्रूंचे अश्व, रथ आणि गज यांना मारलें आहे. आपल्या खड्गानें ज्यानें गज, अश्व, रथ यांचा संहार करून रथाचे अवयव व धनुष्य यांच्या योगें शत्रूंचें भस्म करून टाकिलें आहे, ज्या इंद्रतुल्य पराक्रमी भीमानें शत्रूंना पायांखालीं तुडवून व दंडांनीं मारून अनेक शत्रूंना यमसदनीं पाठविलें आहे, त्यानें माझी निंदा केली असती, तर मीं सोशिली असती! ज्या यमसदृश बलवानानें आवेशानें शत्रूवर धांवून जाऊन त्यांच्या सैन्यांचा अनेकदां संहार केला आहे, त्यानें माझी निंदा केली तर ती चालेल; परंतु ज्या तुला रक्षणाकरितां सुहृज्जनांची आवश्यकता लागते, त्याला माझी निंदा करण्याचा अधिकार कसा पोंचतो? जो भीमसेन शत्रूंकडील महारथ, मोठमोठे गज, अश्व आणि पदातिवीरांना वधून त्यांच्या सैन्यांत एकटा शिरतो; तसेंच ज्यानें कलिंग, वंग, अंग, निषाद व मागध देशांतील सैन्यसमुदायांचा संहार करून मदोन्मत्त व नीलमेघसदृश भव्य गजांचा नाश केला, त्यानें माझी निंदा केली असती, तर ती मी सोसली असती! ज्यानें रथांत अधिरूढ होऊन समरांगणांत वर्षाकालांतील पर्जन्याप्रमाणें बाणांचा वर्षाव करून शत्रूंच्या आठशें गजांचीं शुंडाग्रें भग्न केलीं, त्यानें जर मला दोष दिला असता, तर हरकत नव्हती! ब्राह्मणांचें बल त्यांच्या वाणींत असतें, क्षत्रियांचें बल त्यांच्या बाहूंत असतें, असें शहाणे लोक म्हणतात. तुझें बल केवळ बोलण्यांतच असून तूं मोठा निष्ठुर आहेस, आणि तूं आपणांप्रमाणेंच मलाहि दुर्बल समजतोस!

राजा, मीं आपल्या स्त्रिया, पुत्र, जीवित यांवर व स्वतःवरहि तुझ्याकरितां लाथ मारून तुझ्या कल्याणाकरितां झटत असतां जर तूं अशा प्रकारचे वाक्प्रहार करणार, तर तुझ्यापासून मला सुखप्राप्ति यत्किंचितहि होणार नाहीं. तुझ्यासाठीं मी शत्रूंचे महारथांचा वध करीत असतां तूं द्रौपदीच्या शय्येवर बसून माझी निंदा केलीस हें योग्य केलें नाहींस! युद्धांत सत्यवचनी भीष्मानें आपणाला कोणाच्या हातीं मृत्यु आहे, हें मला सांगितलें, तेव्हां त्या शिखंडीचें रक्षण मीं केलें, तें तुझ्याकरितांच होतें! पुढें मीं त्या शिखंडीच्याच हातून भीष्माला मारविलें! आतां तुला राज्य मिळावें, अशी माझी इच्छा नाहीं, कारण तूं द्यूतासक्त आहेस आणि द्यूत हें आमचें अहित करणारें आहे! अनार्य पापाचें आचरण स्वतः करून त्यांतून तुझी सुटका आम्हीं करावी असें इच्छितोस! द्यूतामध्यें अनेक प्रकारचे दोष आहेत, असें तुला बंधु सहदे-

वानें सांगितलेलें तूं ऐकिलेंस, तरीहि तूं नीच लोकांप्रमाणें द्यूतास प्रवृत्त झालास आणि त्यामुळें आम्ही सर्व आज नरकाला पात्र झालों आहों! तूं द्यूत खेळ-ल्यामुळें आमचें सर्व सुख नाहींसें झालें आहे. हें सर्व संकट तूंच उत्पन्न केलें आहेस आणि आतां आम्हांला कठोर शब्द बोलत आहेस. आमच्या हातून वध पावलेलें हें शत्रुसैन्य हातपाय तुटून भूमितलावर आक्रोश करीत पडलें आहे पहा! हें सर्व पातक तुझें असून त्याचा दोष कौरवांवर येऊन ते वधाला पात्र झाले आहेत! दोन्ही सैन्यांतील मोठमोठे उत्तरेकडील वीर हत झाले, पश्चिमेकडील नष्ट झाले आणि पूर्व व दक्षिणेकडचे योद्धे विध्वस्त झाले आहेत. ह्या महावी-रांनीं रणांत लोकोत्तर पराक्रम गाजविला आहे. राजा, तूं जुगारी, तुझ्यामुळें हा राज्यनाश झाला आहे, तुझ्यामुळेंच हें मोठें संकट आमच्यावर आलें आहे! असें असतां क्रूर वाक्प्रहारांनीं आम्हांला दुःख देत आहेस याला काय म्हणावें?

( २ ) संजय—धृतराष्ट्रा, अशा प्रकारचें कठोर भाषण केल्यावर तो धर्म-भीरु अर्जुन विमनस्क झाला आणि आपल्या हातून हें दुष्कर्म झालें असें त्याला वाटूं लागून त्याला पश्चात्ताप झाला आणि तो दुःखाचे सुसकारे टाकूं लागला. त्यानें आपली तरवार कोशांतून एकदम उपसली! तें पाहून कृष्ण त्याला बोलला 'आकाशासारखी लकलकणारी ही तरवार उपसण्यासारखें आतां काय घडलें आहे? तें कारण मला आधीं सांग, मग तुझ्या अर्थसिद्धीचा उपाय मी सांगेन!' कृष्णाचें हें भाषण ऐकून तो अत्यंत दुःखी झालेला अर्जुन श्री-कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, जिच्या योगानें मीं अहिताचरण केलें, त्या तरवा-रीनें मी आपला देह आतां तोडून टाकणार आहें!'

अर्जुनाचें भाषण ऐकून तो महाधर्मनिष्ठ कृष्ण त्याला बोलला, "तूं धर्मरा-जाला जें बोललास त्यांत तुला इतकें वाईट वाटण्याजोगें काय होतें? हे अरिघ्ना, तूं आत्महत्या करून घेण्याला प्रवृत्त झाला आहेस! हे किरीटिन्, हा मार्ग सत्पुरुषांनीं आदरिलेला नाहीं! हे नरश्रेष्ठा, अधर्माकरितां तूं जर खड्गानें आपल्या ज्येष्ठ बंधूचा वध केला असतास, मग तुझी स्थिति काय झाली असती, व तूं काय उत्तर दिलें असतेंस? धर्म हा अत्यंत सूक्ष्म व दुर्बोध आहे; विशेषें-करून अज्ञानांना त्याचें स्वरूप कळणें कठीण आहे. म्हणून मी तुला आतां जें सांगतों तें ऐक! अर्जुना, तूं आत्महत्या केल्यानें भ्रातृवधापेक्षां भयंकर पातक तुला लागेल आणि अतिघोर नरकाची प्राप्ति तुला होईल! म्हणून तूं आतां आपले गुण गात रहा, म्हणजे आत्महत्या केल्यासारखेंच होईल!"

अर्जुनानें कृष्णाचें म्हणणें मान्य केलें आणि आपलें धनुष्य वांकवून त्यानें आत्मस्तुति करण्यास प्रारंभ केला. तो युधिष्ठिराला म्हणाला " धर्मराजा, पिनाकी शंकरावांचून माझ्यासारखा दुसरा धनुर्धर कोणी नाहीं ! तो वारंवार माझी स्तुति करीत असतो ! मी एका क्षणांत सर्व चराचर सृष्टीचा संहार करीन ! हे राजा, मींच सर्व राजांना जिंकून दाही दिशांना तुझें आधिपत्य प्रस्थापित केलें ! माझ्याच पराक्रमामुळें राजसूय यज्ञ शेवटास गेला आणि माझ्याच वीर्यानें ती दिव्य सभा तुला प्राप्त झाली ! माझ्या हातांत सदैव तीक्ष्ण बाण आणि बाण लावलेलें सज्ज धनुष्य सर्वदा असतें ! माझ्या पायांवर रथांचीं व ध्वजांचीं चिन्हें आहेत ! मला युद्धांत जिंकण्यास कोणीहि समर्थ नाहीं. उत्तरेकडील, पश्चिमेकडील, पूर्वेकडील आणि दक्षिणेकडील सर्व वीरांचा मीं संहार केला आहे ! आतां संशप्तक मात्र अवशिष्ट आहेत ! मी एकट्यानेंच त्यांचे अर्ध्या सैन्याचा विध्वंस केला आहे ! देवांच्या सैन्याप्रमाणें पराक्रमी असें हें कौरवसैन्य माझ्या हातून वध पावून रणभूमीवर मरून पडलें आहे. जे अस्त्रज्ञ असतात, त्यांचा मी अस्त्रांनीं वध करितों. याप्रमाणें सर्व त्रैलोक्याचें मी भस्म करीन. ह्या मोठ्या विजयी रथांत बसून, कृष्णा, आपण दोघे कर्णाचा वध करण्याकरितां त्वरित जाऊं ! रणांत आज मी कर्णाचा वध केल्यामुळें धर्मराजाला अत्यंत आनंद होईल." असें बोलून अर्जुन पुनः धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ अशा युधिष्ठिराला म्हणाला, "आज कर्णमाता तरी पुत्रवियोगाचें दुःख भोगील किंवा कुंतीला तरी तसें दुःख सहन करावें लागेल; कारण आजच्या युद्धांत तो मला मारील किंवा मी तरी त्याला मारीन ! आज बाणांनीं युद्धांत कर्णाचा वध माझ्या हातून होणार नाहीं, तर मी अंगांतून कवच काढणार नाहीं, हें तुला निश्चित सांगतों !"

संजय—धृतराष्ट्रा, याप्रमाणें धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ अशा युधिष्ठिराला बोलल्यानंतर अर्जुनानें शस्त्रें खालीं ठेवलीं, गांडीव बाजूला ठेवलें व ताबडतोब खड्ग कोशांत घालून लज्जेनें खालीं मान घातली. तो हात जोडून युधिष्ठिराला म्हणाला 'राजा, तुला नमस्कार असो; कृपा कर, माझ्या बोलण्याची क्षमा कर, मी असें कां बोललों, तें तुला योग्य वेळीं समजेल.' याप्रमाणें शत्रूंचा उत्कर्ष सहन करणाऱ्या धर्मराजाला बोलून तो वीरश्रेष्ठ पार्थ पुनः त्याला म्हणाला, 'राजा, लवकरच माझ्या बोलण्याचें कारण तुला विदित होईल. आतां रणांतून भीमाची सुटका करण्याकरितां व माझी सर्व शक्ति खर्च करून सूतपुत्र

कर्णाचा वध करण्याकरितां जातों. राजा, तुझें कल्याण साधण्याकरितांच माझें जीवित आहे, हें तूं निश्चयानें जाण!'

याप्रमाणें बोलून त्या पराक्रमी अर्जुनानें युधिष्ठिराचें पदवंदन केलें व जाण्यासाठीं तयार झाला. तेव्हां अर्जुनाचें तें कठोर भाषण ऐकून युधिष्ठिर शय्येवरून उठून खिन्न मनानें त्याला म्हणाला, "पार्था, मीं कांहीं चांगलें केलें नाहीं. कारण माझ्या कृत्यांमुळें तुम्हांवर मोठें संकट ओढवलें आहे, म्हणून मी दुष्ट कुलांगार आहें; माझा शिरच्छेद कर! मी पापी, आळशी, भित्रा बनलों असून माझ्या बुद्धीला भ्रंश झाला आहे. मी वृद्धांचा अपमान करणारा आहें. तेव्हां ह्या दुष्टाच्या सतत बोलण्याप्रमाणें वागून तुला काय लाभ? म्हणून पापी, दुष्ट असा मी आजच वनांत निघून जातों. माझ्याशिवाय तूं सुखानें रहा! महात्मा भीम तुम्हांला योग्य असा राजा आहे. मी क्लीब असल्यामुळें मला राज्य घेऊन काय करावयाचें आहे? अर्जुना, तुझें हें रागाचें कठोर भाषण सहन करण्यास मी समर्थ नाहीं! भीमच राजा होवो! माझा आज अवमान झाल्यामुळें मला जगून काय करावयाचें आहे?" राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें बोलून शयनावरून एकदम उठून तो वनांत जाऊं लागला, तेव्हां हात जोडून कृष्ण त्याला म्हणाला, "राजा, सत्यप्रतिज्ञ अर्जुनाची गांडीव धनुष्याबद्दलची प्रतिज्ञा काय आहे तें तुला विदित आहे. जो कोणी अर्जुनाला 'गांडीव दुसऱ्याला दे, असें म्हणेल, त्याचा वध करीन,' अशी ती प्रतिज्ञा आहे. तूं तशा प्रकारचें भाषण त्याच्याशीं केलेंस, म्हणून आपल्या प्रतिज्ञापालनार्थ अर्जुनानें माझ्या सांगण्यानें तुझी निर्भर्त्सना केली आहे; कारण गुरूंची निंदा केल्यानें त्यांचा वध केल्यासारखा होतो असें सांगतात. म्हणून हे महाबाहो, युधिष्ठिरा, आम्ही दोघेहि तुला शरण आलों आहोंत! प्रतिज्ञापालनार्थ आम्ही दोघांनीं हा जो तुझा अपमान केला, त्याबद्दल क्षमा कर! आज ही भूमि पापी कर्णाच्या रक्ताचें प्राशन करील, हें मी तुला खचित सांगतों! आज रणांत कर्णाचा वध झालाच, हें तूं पक्कें जाण. ज्याच्या वधाची तूं इच्छा करतोस, त्याचें जीवित संपुष्टांत आलें आहे!"

याप्रमाणें प्रणत अशा कृष्णाचें भाषण ऐकून राजा युधिष्ठिरानें नम्रतेनें त्याला तत्काळ उठवून, त्याजपुढें हात जोडले आणि तो त्याला म्हणाला, "कृष्णा, तूं म्हटल्याप्रमाणें माझ्या हातून मर्यादेचें उल्लंघन झालें खरें. गोविंदा, माधवा, ह्या

भयंकर संकटांतून तूं आज अज्ञानानें मूढ झालेल्या आम्हां दोघांना मुक्त केलेंस! केवळ तूं आमचा नाथ असल्यामुळें तुझ्या बुद्धिसामर्थ्यानें आम्ही ह्या शोकसागरांतून अमात्यांसह व आप्तेष्टांसह पार पडलों ! माधवा, तुझी आमच्यावर फारच कृपा आहे व तूंच आमचा रक्षणकर्ता आहेस ! ८. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १ कृष्णाकडून अर्जुनाचें सांत्वन. २ धर्माचे दुःखोद्वार. ३ अर्जुनप्रतिज्ञा. ४ धर्माचा आशीर्वाद. ]

(१) संजय—धृतराष्ट्रा, राजा युधिष्ठिराचें तें प्रेमळ भाषण ऐकून धर्मात्म्या कृष्णानें अर्जुनाला शोक करतांना पाहून सांत्वनपर शब्दांनीं त्याचें समाधान केलें. कृष्णाच्या सांगण्यावरून युधिष्ठिराची निर्भर्त्सना केल्यामुळें अर्जुनाला एकादें पातक आपल्या हातून व्हावें त्याप्रमाणें खेद झाला. तेव्हां हंसत कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "पार्था, तीक्ष्ण खड्गानें जर आज तूं धर्मज्ञ, धर्मशील अशा युधिष्ठिराचा वध करितास, तर कसें झालें असतें ? राजाला 'अरे' असें संबोधिल्यानें तुझ्या समजुतीप्रमाणें तूं या संकटांत पडला असशील; परंतु तुझ्या हातून त्याचा वध झाला असता, तर नंतर तुला काय करतां आलें असतें ? याप्रमाणें मंदबुद्धि लोकांना कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें तें कळत नाहीं. अर्जुना, ज्येष्ठ भ्रात्याचा वध तुझ्या हातून झाला असता, तर तूं घोर नरकांत पडला असतास. म्हणून आतां तूं कुरुश्रेष्ठ, धर्मवेत्त्यांत श्रेष्ठ, अशा युधिष्ठिराला भक्तीनें प्रसन्न कर ! युधिष्ठिर संतुष्ट झाल्यानंतर त्वरित कर्णाच्या रथावर आपण चाल करून जाऊं ! आज आपल्या तीक्ष्ण बाणांनीं रणांत कर्णाचा वध करून युधिष्ठिराला हर्ष होईल असें कर ! महाबाहो अर्जुना, हेंच करणें या प्रसंगीं उचित आहे असें मला वाटतें आणि असें केल्यानें तुझा कार्यभाग होईल !

(२) राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें कृष्णानें अर्जुनाला उपदेश केल्यानंतर, लज्जायुक्त होत्सात्या अर्जुनानें धर्मराजाला साष्टांग नमस्कार घालून 'राजा, प्रतिज्ञापालनार्थ मीं जीं तुला दुरुत्तरें केलीं त्यांबद्दल क्षमा कर !' अशी त्याची वारंवार विनवणी केली. अर्जुनानें साष्टांग नमस्कार घातलेला पाहून त्याला युधिष्ठिरानें उठविलें, तों अर्जुन रडत आहे, असें त्याला आढळून आलें. तेव्हां त्याला प्रेमानें आलिंगन देऊन धर्मराजाहि त्याच्याबरोबरच रडूं लागला. याप्रमाणें ते

महापराक्रमी बंधु बराच वेळ शोक करीत होते. नंतर आपलें दुःख आंवरून व अश्रु पुसून ते एकमेकांवर प्रसन्न झाले. नंतर युधिष्ठिरानें अर्जुनाला पुनः आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व आश्चर्यानें चकित होऊन तो त्याला म्हणाला, "महाबाहो पार्था, सर्व सैन्याच्या देखत कर्णानें आपल्या बाणांनीं, मी त्याच्याशीं लढण्याची पराकाष्ठा करीत असतांना, माझें कवच, ध्वज, धनुष्य, शक्ति, अश्व आणि शर यांचा विध्वंस केला! तो त्याचा रणांतील अद्भुत पराक्रम पाहून मला खेद होतो, मला जगण्यांत आनंद वाटत नाहीं! म्हणून अर्जुना, जर आज युद्धांत तूं त्या वीराचा वध करणार नाहींस, तर मी खचित प्राण देईन. कारण अशा स्थितींत माझा जगून तरी काय उपयोग?"

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, युधिष्ठिरानें याप्रमाणें खेदाचे उद्गार काढतांच अर्जुन त्याला म्हणाला, "राजा भरतश्रेष्ठ युधिष्ठिरा, मी सत्याची, तुझी, भीमाची व नकुलसहदेवांची शपथ घेऊन प्रतिज्ञा करतों कीं, आज मी युद्धांत कर्णाचा वध करीन किंवा धारातीर्थीं मरून पडेन, या निश्चयानें हातांत शस्त्र धारण करीत आहें!" याप्रमाणें युधिष्ठिराला बोलून तो अर्जुन कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, आज रणांत मी निःसंशय कर्णाचा वध करीन! त्या दुरात्म्याचा वध करणें तुझ्या उपदेशानें सोपें होईल!'

राजा धृतराष्ट्रा, अर्जुनाचें भाषण श्रवण करून कृष्ण म्हणाला, 'महारथे अर्जुना, महाबलवान् अशा कर्णाचा वध करण्यास तूं समर्थ आहेस. युद्धांत तूं कर्णाचा वध कसा करशील याचा विचार माझ्या मनांत नेहमीं घोळत असतो.' नंतर पुनः तो बुद्धिमान् कृष्ण धर्मराजाला म्हणाला, "युधिष्ठिरा, तूं अर्जुनाचें सांत्वन कर व त्या दुरात्म्या कर्णाचा वध करण्याची त्याला अनुज्ञा दे. कर्णाच्या बाणांनीं तूं विद्ध झालेला ऐकून तुझें कुशल जाणण्याकरितां, हे पांडुपुत्रा, आम्ही दोघे येथें आलों. हे अनघा, सुदैवानें युद्धांत तुझा वध झाला नाहीं किंवा तूं शत्रूच्या हातीं सांपडला नाहींस. आतां अर्जुनाचें सांत्वन करून त्याला उत्तेजन दे व जयप्राप्तीकरतां त्याला आशीर्वाद दे!"

युधिष्ठिर—पार्था, जवळ येऊन मला प्रेमालिंगन दे. तूं मला योग्य व माझ्या हितासाठींच बोललास; याकरितां मी तुला त्या तुझ्या कठोर बोलण्याची क्षमा केली आहे. धनंजया, जा, कर्णाचा वध कर, माझी तुला पूर्ण अनुज्ञा आहे. मी तुला कठोर भाषण बोललों, याचा राग धरूं नको!

संजय—राजा धृतराष्ट्रा, नंतर धनंजयानें ज्येष्ठ भ्रात्याचें पदवंदन केलें, तेव्हां धर्मराजानें त्याला स्वहस्तानें उठवून, त्याचे मस्तकाचें अवघ्राण करून आणि आलिंगन देऊन म्हटलें, 'महाबाहो धनंजया, तूं मला अतिशय मान दिलास; तुला नेहमीं माहात्म्य व विजय प्राप्त होवो !' यावर अर्जुन म्हणाला, " धर्मराजा, बलानें गर्विष्ठ बनलेल्या त्या पातकी राधेयाचा व त्याच्या अनुयायांचा आज रणांत मी माझ्या बाणांनीं वध करीन ! ज्यानें तुला आकर्ण धनुष्य ओढून आपल्या बाणांनीं जर्जर केलें त्या दुष्ट कर्णाला त्याच्या कृत्याचें फळ आज प्राप्त होईल. राजा, आज युद्धांत कर्णाचा वध करून नंतर मी तुला भेटण्यास येईन, हें निश्चित जाण ! आज जर कर्णाचा वध माझ्या हातून झाला नाहीं तर मी युद्धभूमीवरून परतणार नाहीं, हें तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों !"

धृतराष्ट्रा, याप्रमाणें अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून युधिष्ठिराला अत्यंत हर्ष झाला व त्याचें अभिनंदन करून तो म्हणाला, " अर्जुना, तुला अक्षय कीर्ति, पुष्कळ आयुष्य, सदा युद्धांत विजय व विपुल वीर्य मिळून तुझ्या हातून शत्रूंचा नाश होवो ! जा, देवता तुला यशाचा मार्ग दाखवितील व माझ्या मनाप्रमाणें तुला रणांत यश मिळेल. सत्वर जा व ज्याप्रमाणें इंद्रानें वृत्रासुराचा वध करून कीर्ति मिळविली, त्याप्रमाणें तूंहि रणांत कर्णाचा वध करून यश संपादन कर ! ८.७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ रथ सज्ज ठेवण्याविषयीं अर्जुनाची कृष्णप्रार्थना. २ कृष्णाचें प्रोत्साहनपर भाषण. ]

(१) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें युधिष्ठिर आनंदित झालेला पाहून कर्णवधाविषयीं उत्सुक असा अर्जुन हर्षभरित अंतःकरणानें कृष्णाला म्हणाला, " महारथे कृष्णा, पुनः माझा रथ सज्ज करून उत्तम अश्व त्याला जोड, त्याचप्रमाणें माझीं सर्व शस्त्रें तयार ठेव. अश्वसादींनीं शिकवून तयार केलेले अश्व आणवून त्यांजवर रथोपकरणें घालून तयार कर ! त्यांना तावडतोब रथाला जोडून कर्णवधाच्या उद्देशानें सत्वर चल !"

धृतराष्ट्रा, महात्म्या अर्जुनानें याप्रमाणें विनंति केल्यावरून कृष्णानें दारुकाला 'धनुर्धरश्रेष्ठ अर्जुनाच्या इच्छेप्रमाणें कर' अशी आज्ञा केली. राजश्रेष्ठ

कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें दारुकानें सर्व व्यवस्था करून तो शत्रुनाशक व व्याघ्रचर्मवेष्टित अर्जुनरथ सज्ज केला व रथ सज्ज आहे असें अर्जुनाला सांगितलें. तेव्हां त्या महात्म्या दारुकानें सज्ज केलेला रथ पाहून अर्जुनानें धर्मराजाचा निरोप घेतला, ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें व नंतर तो त्या मंगल रथावर चढला. तेव्हां त्या महाबुद्धिवान् धर्मराजानें अर्जुनाला आशीर्वाद दिले. मग अर्जुन कर्णाच्या रथाकडे जाण्यासाठीं निघाला. धृतराष्ट्रा, त्या धनुर्धर पार्थाला कर्णावर मोठ्या आवेशानें चाल करीत असतांना पाहून, “ह्या महात्म्या अर्जुनाचे हातून कर्णाचा वध निःसंशय होणार” असें सर्व वीरांना व इतर प्राण्यांना वाटलें. राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं सभोंवार सर्व दिशा स्वच्छ दिसूं लागल्या व चाष, शतपत्र व क्रौंच हे पक्षी अर्जुनाच्या रथाच्या उजवीकडून जाऊं लागले. आणि पुंनामक पुष्कळ पक्षी आनंदित होत्साते अर्जुनाला त्वरा करण्याबद्दल प्रोत्साहन देऊं लागले. राजा, कंक, गृध्र, बक, श्येन, वायस इत्यादि भयंकर पक्षी मृत वीरांचें मांस सेवन करण्याच्या आशेनें त्याच्या रथासमोरून जाऊं लागले. हे सर्व शुभ शकुन पाहून अर्जुनाला कर्णवधाविषयीं उत्साह उत्पन्न झाला, परंतु त्याच वेळीं हें महत्कार्य आपल्या हातून कसें पार पडेल याविषयीं त्याला चिंताहि उत्पन्न झाली !

(२) अर्जुनाला कर्णवध कसा होईल याची फारच चिंता लागली आहे, असें पाहून मधुसूदन त्याला म्हणाला, “ अर्जुना, रणांत आजपर्यंत ज्या वीरांना तूं आपल्या गांडीव धनुष्याचे साह्यानें जिंकिलेंस, त्यांना तुझ्यावांचून अन्य पुरुषाला जिंकतां आलें नसतें. इंद्रतुल्य पराक्रम करणारे पुष्कळ वीर मीं पाहिले आहेत; परंतु समरांत तुझ्याशीं गांठ पडल्यामुळें त्यांना मृत्यु येऊन उत्तम गति प्राप्त झाली ! मारिषा, द्रोण, भीष्म, भगदत्त, अवंतीचे विंदानुविंद, कांबोजाधिपति सुदक्षिण, महापराक्रमी श्रुतायुष व अच्युतायुष अशा वीरांशीं गांठ पडली असतां त्यांजवर चाल करून तुझ्यावांचून कोण बरें सुरक्षित राहूं शकेल ? अर्जुना, तुझ्याजवळ दिव्य अस्त्रें, युद्धकौशल्य, शक्ति, युद्धप्रसंगीं प्रसंगावधान, ज्ञानयुक्त विनय, लक्ष्याचा अचूक वेध घेऊन बाण सोडणें व दूरदर्शित्व इत्यादि गुण असल्यामुळें, तूं देवांचा, गंधर्वांचा व विश्वाचाहि लीलेनें नाश करशील ! अर्जुना, पृथ्वीतलावर रणांत तुझ्या बरोबरीचा कोणीही वीर नाहीं. जे कित्येक धुरंधर व युद्धांत अजिंक्य असे क्षत्रिय वीर आहेत, त्यांमध्यें किंवा देवलोकांतहि तुझ्या तोडीचा वीर माझ्या पहाण्यांत अगर ऐकण्यांत नाहीं ! कारण पार्था,

ज्या ब्रह्मदेवानें सर्व प्रजा उत्पन्न केली त्यानेंच तुझें गांडीव धनुष्य निर्माण केलें आहे! म्हणून तुझ्यासारखा पराक्रमी अन्य वीर नाहीं. पांडवा, तुला हित-कारक असें मी सांगत आहें तें ऐक, तसें सांगणें माझें कर्तव्य होय!

पार्था, कर्ण हा शक्तिमान्, गर्विष्ठ, अस्त्रविद्येंत निपुण, महारथी, भाग्य-शाली, नानाप्रकारांनीं युद्ध करणारा, देशकालज्ञ असल्यामुळें रणभूषण आहे. त्याची योग्यता कमी आहे असें समजूं नको! जास्त काय सांगूं? अर्जुना, तो तुझ्या तोडीचा, किंवा तुझ्यापेक्षां श्रेष्ठ प्रतीचा महारथी आहे असें थोडक्यांत समज! मोठ्या प्रयत्नानें त्याचा वध तुला रणांत करावा लागेल! कारण तो कर्ण तेजानें अग्नीसारखा, वेगानें वायूसारखा, क्रोधानें यमासारखा, बलानें प्रत्यक्ष सिंहासारखा, भरदार छातीचा, आठ हात उंचीचा, आजानु-बाहु, अजिंक्य, मानी, शूर, सौंदर्यवान् असा वीर आहे. तो राधेय वीरगुणांनीं युक्त, मित्रांचें हित करणारा, नेहमीं पांडवांचा द्वेष करणारा व कौरवांच्या हितार्थ सतत जपणारा असा आहे. तुझ्याशिवाय कोणालाहि—प्रत्यक्ष इंद्रादिक देवांनाहि—त्याचा वध करणें शक्य नाहीं असें माझें मत आहे, म्हणून पार्था, आज तूं त्या कर्णाचा वध कर. मांसशोणितांनीं युक्त अशा प्राण्यांकडून अगर प्रत्यक्ष देवांकडूनहि रणांत सरथ कर्णाचा वध होणें शक्य नाहीं! अशा ह्या दुष्ट, पापी, क्रूर, नेहमीं पांडवांच्या नाशाविषयीं झटणाऱ्या व हीनस्वार्थी कर्णाचा आज युद्धांत वध करून सुखी हो! त्या अजय्य रथिश्रेष्ठ सूतपुत्राला यमसदनीं पाठवून धर्मराजाला संतुष्ट कर! पार्था, तुझें सामर्थ्य मी जाणतों. प्रत्यक्ष सुरासुरांनाहि तूं अजिंक्य आहेस, परंतु तो दुरात्मा कर्ण केवळ गर्वानें पांडवांचा अपमान करीत असतो. कर्णाचें साहाय्य असल्यामुळेंच पापी सुयो-धन स्वतःला शूर व अजिंक्य समजतो. अशा त्या पापमूलक, खड्गरूपी जिह्वा, धनुष्यरूपी तोंड व बाणरूपी दंष्ट्रा असणाऱ्या, गर्विष्ठ पुरुषव्याघ्राचा रणांत आज वध कर! अर्जुना, तूं आपल्या वीर्यानें व बलानें त्या शूर कर्णाचा रणांत वध कर! ज्याप्रमाणें सिंह हत्तीवर चाल करून जातो, त्याप्रमाणें तूं कर्णावर चाल करून जा! ज्याच्या पराक्रमाच्या जोरावर दुर्योधन तुझा धिक्कार करतो, त्या वैकर्तन कर्णाचा आज युद्धांत तूं वध कर! ८. ७२.

## अध्याय ७३ वा.

[ १ कृष्णाचें अर्जुनगौरवपर भाषण. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें अर्जुनाला कर्णाच्या वधासाठीं उत्तेजन देऊन, बुद्धिवान् कृष्ण कर्णवधाच्या इच्छेनें शत्रुसैन्यावर चाल करून जाणाऱ्या अर्जुनाला पुनः म्हणाला—" पार्था, नर, वारण व अश्व यांच्या संहाराला आरंभ होऊन आज सतरा दिवस झाले. तुझें सैन्य प्रथम पुष्कळ होतें, परंतु शत्रूंशीं युद्ध करून आतां थोडेंच शिल्लक राहिलें आहे. त्याचप्रमाणें कौरवांचेंहि पुष्कळसें सैन्य युद्धांत नष्ट झालें आहे ! हे तुझ्या सैन्यांतील राजे, सृंजय व इतर युद्धार्थ जमलेले वीर तुझ्यासारखा दुर्धर्ष सेनापति मिळाल्यामुळें कौरवांशीं व्यवस्थेनें युद्ध करीत आहेत ! पांचाल, पांडव, मत्स्य, कारूष व चेदि या शूर वीरांनीं तुझें पाठबळ असल्यामुळें शत्रुगणांचा संहार चालविला आहे पहा ! अर्जुना, रणांगणांत हातघाईच्या युद्धांत कौरवांचा कोणाला पराभव करतां येईल ? त्याचप्रमाणें महारथी पांडवांचें तूं संरक्षण करीत असतांना त्यांना जिंकण्याला कोण समर्थ होईल ? पार्था, युद्धार्थ सज्ज झालेल्या, देव-दैत्य-मानवादि त्रैलोक्यांतील सर्व वीरांना जिंकण्याला तूं समर्थ आहेस; तर कौरवसैन्याची ती काय कथा ? कौंतेया, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणत्या इंद्र-तुल्य पराक्रमी वीरानें भगदत्त राजाला जिंकलें असतें ? तसेंच ह्या अफाट सैन्याचें तूं संरक्षण करीत असतां त्याकडे नजर फेंकण्याला देखील कोण समर्थ आहे ! नेहमीं युद्धांत तुझें पाठबळ असल्यामुळें धृष्टद्युम्न व शिखंडी यांनीं द्रोण व भीष्म यांचा वध केला ! नाहींतर इंद्रतुल्य पराक्रमी अशा महारथी भीष्मद्रोणांना युद्धांत जिंकणें कोणाला शक्य होतें ? हे पुरुषश्रेष्ठा, शांतनव भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, अश्वत्थामा, सौमदत्ति, कृतवर्मा, जयद्रथ, मद्रराज शल्य, सुयोधन, त्याचप्रमाणें अस्त्रविद्येंत निपुण, युद्धांत माघार न घेणारे अनेक वीर, अक्षौहिणींचे अधिपति अशा पराक्रमी, युद्धदुर्मद वीरांना युद्धांत जिंकण्याला तुझ्याशिवाय येथें कोण समर्थ आहे ?

परंतपा, तूं पुष्कळ शत्रुसमूहांचा विध्वंस केलास; अनेक अश्व, रथ, गज यांचा संहार केलास व अनेक देशांतून आलेल्या शूर वीरांचा वध केलास ! गोवास, दासमीय, वसाति व अभिमानी भोज या सर्वांची अश्वगजयुक्त सेना रणांत तुझ्याशीं व भीमाशीं गांठ पडल्यामुळें नष्ट झाली ! भयंकर

पराक्रम करणारे तुषार, यवन, खश, दार्वाभिसार, दरद, शक, माठर, तंगण, आंध्रक, पुलिंद, किरात, म्लेच्छ, पर्वतीय, समुद्रतीरीं रहाणारे, युद्धनिपुण महाशक्तिमान् असे वीर हातांत दंड धारण करून सुयोधनाला मदत करण्याकरितां येथें जमले आहेत! पार्था, तुझ्याशिवाय त्यांना रणांत जिंकण्याला कोणीहि समर्थ नाहीं! कौरवांचें हें बलिष्ठ व अफाट सैन्य व्यूह रचून रणांत सज्ज असलेलें पाहून, जर तूं साहाय्य व संरक्षणकर्ता नसतास, तर दुसरा कोण त्या सैन्यावर चाल करून गेला असता! अर्जुना, तुझा आश्रय असल्यामुळेंच क्रुद्ध पांडवांनीं, समुद्राप्रमाणें विस्तृत व धुळीनें व्याप्त झालेल्या कौरवसैन्याचा नाश केला! मागधांचा बलिष्ठ राजा जयत्सेन ह्याचा युद्धांत अभिमन्यूनें वध केल्याला आज सात दिवस लोटले. त्या मागधराजाच्या संरक्षणासाठीं त्याच्या मागून चालणाऱ्या दहा हजार गजांचा संहार भीमानें गदाप्रहार करून केला व त्या आवेशांत अन्य शेंकडो रथ आणि गज नष्ट केले. पार्था, याप्रमाणें दारुण युद्ध चाललें असतां तुझ्यावर व भीमसेनावर कौरवांनीं चाल केली; परंतु अश्व, रथ, गज यांसहवर्तमान त्यांनीं मृत्युलोकाची वाट धरली!

त्या प्रसंगीं श्रेष्ठ प्रकारचीं अस्त्रें जाणणाऱ्या भीष्मानें भयंकर बाणांचा वर्षाव चालू केला आणि चेदि, काशि, कारूष, मत्स्य, केकय इत्यादि वीरांना बाणांनीं आच्छादित करून त्यांचा वध केला! त्यावेळीं भीष्माच्या धनुष्यापासून सुटणाऱ्या त्या सरळ गतीच्या रुक्मपुंख व शत्रुदेहविदारक बाणांनीं आकाश भरून गेलें! बाणांच्या भयंकर वृष्टीनें तो हजारों रथांचा नाश करूं लागला, व युद्धार्थ रणांत जमलेल्या लाखों वीरांचा व गजांचा वध करूं लागला! अर्जुना, तेव्हां तुझ्या वीरांनीं नऊ प्रकारांनीं युद्ध केलें, परंतु त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं, असें पाहून त्यांनीं त्या निष्फळ ठरलेल्या गती टाकून दिल्या व दहाव्या गतीचा आश्रय करून त्यांनीं कौरवांचे गज, रथ आणि अश्व यांचा नाश आरंभिला! त्याप्रसंगीं भीष्म पुनः पांडवसेनेवर बाणांचा वर्षाव करूं लागला व याप्रमाणें दहा दिवसपर्यंत तुझ्या सैन्याचा संहार करून आणि अनेक रथी, अश्व व गज यांचा वध करून भीष्मानें युद्धांमध्यें रुद्र आणि उपेंद्र यांसारखें आपलें उग्र स्वरूप दाखविलें! पांडवांच्या सैन्यावर वारंवार चाल करून त्या भीष्मानें सैन्याचा संहार उडविला व चेदि, केकय व पांचाल यांचा वध केला! रथ, अश्व आणि गज यांनीं युक्त अशा पांडवसेनेला भीष्म जाळूं लागला! आपत्सागरांत बुडणाऱ्या मंदमति सुयोधनाचा उद्धार करूं

पहाणाऱ्या भीष्माला मध्याह्नकाळीं तळपणाऱ्या सूर्याप्रमाणें समरांत पराक्रम करतांना पाहून, हातांत महान् आयुधें धारण करणारे अगणित सृंजयपदाति, व अन्य राजे गर्भगळित होऊन गेले ! काशिराजाला ज्यानें जिंकलें आहे असा तो भीष्म निकरानें रणांत लढत असतां एकदम त्यानें पांडवांवर व सृंजयांवर चाल करून त्यांची दाणादाण केली व आपलें रणांतील अलौकिक एकवीरत्व प्रस्थापित केलें ! अर्जुना, अशा त्या महाव्रत पुरुषश्रेष्ठ भीष्मावर शिखंडीनें तुझ्या साहाय्याचे जोरावर आनतपर्व बाणांचा वर्षाव करून, इंद्रानें वृत्रासुराचा वध केला, त्याप्रमाणें त्याचा वध केल्यामुळें तो पितामह आतां शरपंजरीं पडला आहे !

नंतर त्या उग्र व महारथ द्रोणानें पांच दिवसपर्यंत युद्ध करून शत्रुसेनेचा विध्वंस केला. त्यानें अभेद्य व्यूहाची रचना करून व पांडवांकडील अनेक महारथ्यांचा वध करून रणांत जयद्रथाचें संरक्षण केलें ! रात्रियुद्धांत त्यानें प्रत्यक्ष यमाप्रमाणें पराक्रम करून व बाणांचा वर्षाव करून पांडवसेना जाळून टाकली ! परंतु शेवटीं त्या प्रतापी भारद्वाजाची धृष्टद्युम्नाशीं गांठ पडतांच तो धारातीर्थीं पतन पावला ! अर्जुना, त्या प्रसंगीं जर तूं कर्णादि महारथ्यांना थांबवून न धरतास, तर खचित द्रोणाचा नाश झाला नसता ! कौरवांच्या सर्व सैन्याचा तूं एकट्यानें प्रतिकार केलास आणि म्हणूनच धृष्टद्युम्नाला द्रोणवध करतां आला ! पार्था, जयद्रथवधप्रसंगीं जो पराक्रम तूं दाखविलास, तसा पराक्रम तुझ्याशिवाय कोणत्या अन्य क्षत्रियाला करतां येईल ? कौरवांच्या प्रचंड सेनेचें निवारण करून व शूर राजांचा संहार करून तूं अस्त्रबलानें व वीर्यानें जयद्रथाचा वध केलास ! जयद्रथाचा वध हें सर्व राजांना मोठेंच आश्चर्य वाटत आहे. परंतु तत्त्वतः तें आश्चर्य नव्हे; कारण तुझ्यासारख्या महारथ्याशीं रणांत एक दिवस जरी गांठ पडली, तरी तेवढ्याहि सैन्याचा नाश होईल ! परंतु तसें न होतां त्या सैन्यानें टिकाव धरला, त्याअर्थीं तें खचित बलवान् असलें पाहिजे !

पार्था, ज्या वेळीं भीष्मद्रोणांचा वध झाला तेव्हांच दुर्योधनाच्या त्या घोर सैन्याचें सर्वस्व नष्ट झालें ! ही सेना आज त्यांतील महान् योद्धे, अश्व, रथ आणि गज यांचा नाश झाल्यामुळें, सूर्य, चंद्र व नक्षत्रें यांनीं विहीन अशा आकाशाप्रमाणें उदास दिसत आहे ! पूर्वी इंद्रानें ज्याप्रमाणें असुरसेनेचा नाश केला, त्याप्रमाणें तूं आपल्या पराक्रमानें ही कौरवसेना उध्वस्त केली

आहेस ! त्या सेनेंत आतां अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्ण, शल्य आणि कृप हे पांच महारथी अद्याप जीवंत आहेत; नरश्रेष्ठा अर्जुना, आज त्या पांच महारथ्यांचा रणांत वध करून, द्वीपें, नगरें, आकाश, जल, पाताल, पर्वत व महारण्यें यांसह सर्व पृथ्वी धर्मराजाला प्राप्त करून दे ! पूर्वी दैत्यदानवांना मारून ज्याप्रमाणें विष्णूनें इंद्राला त्रैलोक्यराज्य मिळवून दिलें, त्याप्रमाणें तूं आज अमितवीर्य श्रीमान् युधिष्ठिराला वसुंधरेचें राज्य मिळवून दे ! विष्णूनें दैत्यांचा संहार केल्यामुळें देवांना जसा आनंद झाला, त्याप्रमाणें आज तुझ्या हातून शत्रूंचा नाश होऊन पांचालांना आनंद होवो !

कमलनेत्रा अर्जुना, पुरुषश्रेष्ठ द्रोणगुरूचे ठिकाणीं तुझा आदर असल्यामुळें अश्वत्थाम्यावर जर तुझी कृपा असेल, पूज्य म्हणून कृपाचार्यांचा वध करण्याला तूं तयार नसशील, मातृबांधवांबद्दल आदरबुद्धि असल्यामुळें कृतवर्म्याचा नाश करण्यास तूं सिद्ध नसशील, मद्रराज शल्य याचा वध मातुल म्हणून तुझ्या हातून होत नसेल, तर निदान हे नरश्रेष्ठ अर्जुना, ह्या दुष्टमति, पांडवांविषयीं अत्यंत पापबुद्धि असलेल्या कर्णाचा अत्यंत तीक्ष्ण बाणांनीं आज वध कर ! हें तुझें कृत्य पुण्यकारक आहे. यांत कांहीं दोष नाहीं ! आम्हां सर्वांची ह्या कृत्याला अनुमति आहे. यांत किमपि पाप नाहीं ! अनघा अर्जुना, रात्रीचे वेळीं पुत्रांसहवर्तमान तुझ्या मातेला जीवंत जाळण्याचा दुर्योधनाचा प्रयत्न, दुर्योधनाचें द्यूताकरितां तुम्हांला आव्हान इत्यादि सर्व अनर्थांचें मूल कारण हा दुष्ट कर्णच होय ! नेहमीं सुयोधनाला असें वाटतें कीं, केवळ कर्णामुळेंच आपलें रक्षण होत आहे. तो मूर्ख दुर्योधन संतप्त होऊन मला बद्ध करण्यास प्रवृत्त झाला ! पार्था, राजा सुयोधनाची पूर्ण खात्री आहे कीं, कर्ण रणांत पांडवांना जिंकील यांत संदेह नाहीं ! कौंतेया, तुझ्या सामर्थ्याची कल्पना असून सुद्धां सुयोधनानें कर्णावर विसंबून तुझ्याशीं युद्ध आरंभिलें आहे. कारण दुष्टबुद्धि, दुरात्म्या दुर्योधनाला उत्तेजन देण्यासाठीं कर्ण नेहमीं म्हणतो कीं, 'मी सर्व पांडवांचा व दाशार्ह कृष्णाचाहि वध करीन !' पार्था, आज युद्धांत गर्जना करणाऱ्या त्या कर्णाचा वध कर !

अर्जुना, तुमचा नाश करण्यासाठीं जीं जीं दुष्टकृत्यें दुर्योधनानें केलीं, त्या सर्वांचें आदिकारण हा कुबुद्धि दुष्टात्मा कर्ण होय ! दुर्योधनाच्या त्या सहा क्रूर महारथ्यांनीं द्रोण, अश्वत्थामा, कृप, इत्यादि नरश्रेष्ठ वीरांशीं झुंजणाऱ्या, महारथींना रथहीन करून टाकणाऱ्या, गजांवरील वीरांचा संहार करणाऱ्या

अश्वसादींना वधणाऱ्या, पायदळाला शस्त्रहीन करणाऱ्या, कुरु व वृष्णि या कुलांचें यश वाढविणाऱ्या, कौरवांच्या सैन्यांतील महारथ्यांचा विध्वंस करणाऱ्या, अश्व, नर, गज यांना आपल्या बाणांनीं जर्जर करून यमलोकीं पाठविणाऱ्या व शत्रुसैन्य जाळणाऱ्या वृषभस्कंध अभिमन्यूला घेरून त्याचा वध केला, त्याला सुद्धां हा दुष्ट कर्णच कारण होय ! तो घोर प्रसंग आठवला म्हणजे माझ्या शरीराचा दाह होतो, हें तुला मी सत्याची शपथ घेऊन सांगतों ! अभिमन्यूशीं रणांत तोंड देण्यास असमर्थ असा कर्ण, त्याच्या बाणांनीं विद्ध झाल्यामुळें मूर्च्छित पडून त्याच्या शरीरांतून रक्ताचा प्रवाह सुरू झाला ! अभिमन्यूच्या बाणांनीं व्याकुल झाल्यामुळें पराभूत झालेला कर्ण क्रोधानें फूत्कार टाकूं लागला व जीविताविषयीं निराश होऊन रणांगणांतून निघून जावें, असा विचार करूं लागला, परंतु युद्धांत शरप्रहारांनीं विह्वल झाल्यामुळें श्रांत होऊन तसाच तेथें राहिला ! इतक्यांत द्रोणाची प्रसंगोचित क्रूर वाणी ऐकून कर्णानें अभिमन्यूचें धनुष्य तोडून टाकलें ! नंतर त्या निःशस्त्र वीरावर ते पांच दुष्टमति महारथी बाणांचा वर्षाव करूं लागले व त्यांनीं त्याचा वध केला ! हें दृश्य पाहून सर्वांना अतिशय दुःख झालें, परंतु तो दुष्ट कर्ण व सुयोधन यांना मोठा हर्ष होऊन ते मोठ्यानें हंसले !

पार्था, कौरवसभेंत कर्णानें कौरवांच्या व पांडवांच्या समक्ष द्रौपदीला जीं निर्दयपणानें कठोर भाषणें केलीं, तीं तुझ्या स्मरणांत असतील. कर्ण द्रौपदीला म्हणाला, " द्रौपदि, पांडवांचा नाश होऊन ते शाश्वत नरकांत पडले आहेत. हे मृदुभाषिणि, तूं आतां अन्य पति कर ! कृष्णे, तूं आतां दुर्योधनाची दासी होऊन त्याच्या मंदिरांत प्रवेश कर ! हे पद्माक्षि, पांडवांची पत्नी म्हणून तुझ्यावर आतां त्यांची मुळींच सत्ता राहिली नाहीं, कारण ते आतां मृतवत् झाले आहेत ! पांचालि, तूं दासांची पत्नी असून स्वतःहि दासी झाली आहेस ! आज सर्व पृथ्वीवर दुर्योधन हाच एकटा राजा आहे ! इतर सर्व राजे त्याची सेवा करून त्याचा योगक्षेम चालवितात ! ही पहा, सर्व पांडवांची कशी दुर्दशा झाली आहे ! हे पांडव दुर्योधनाच्या तेजापुढें फिकें पडून एकमेकांकडे पहात आहेत ! हे षंढ खचित आतां नरकांत बुडाले आहेत ! आतां दुर्योधन राजाची दासांप्रमाणें सेवा करणेंच यांना भाग आहे !"

अर्जुना, त्या प्रसंगीं तो अधर्मज्ञ, दुष्ट व अत्यंत दुर्बुद्धि कर्ण द्रौपदीला जें बोलला, तें तूं श्रवण केलें आहेस ! म्हणून आज तूं आपले सुवर्णमंडित,

शिलाधौत, तीक्ष्ण व प्राणघातक बाण कर्णावर सोड व त्याच्या दुष्ट भाषणाला कायमची शांति दे ! म्हणजे त्या दुष्ट कर्णाला अंतकालीं तरी भीष्म-द्रोणांच्या उपदेशाची स्मृति होईल ! तुझा नाश करण्याकरितां त्या दुष्टानें जीं दुष्कृत्यें केलीं, त्यांबद्दल तुझे शर त्याचें जीवित नष्ट करोत ! तुझ्या गांडीव-धनुष्यापासून सुटलेले सुवर्णपुंख, भयंकर, विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी असे नाराच बाण अंगांत शिरल्यावर कर्णाला भीष्मद्रोणांच्या भाषणाची आठवण होवो ! पार्था, आज तुझे बाण कर्णाचें कवच फोडून त्याचें रक्त प्राशन करोत ! ते महावेगवान् बाण, तुझ्या हातांतून सुटल्याबरोबर कर्णाला मर्मस्थळीं लागून त्याला यमलोकीं पाठवोत ! कर्णाला रथांतून खालीं पडतांना पाहून, तुझ्या शरांनीं विद्ध होऊन व्याकुल व मूर्च्छित झालेले राजे हळहळोत ! अर्जुना, आज रणांत लोळत पडलेल्या, रक्तानें माखलेल्या व निरायुध झालेल्या कर्णाला पाहून, त्याचे बंधुवर्ग दीन होत्साते शोक करोत ! कर्णाचा हस्तिकक्षध्वज तुझ्या भल्ल बाणांनीं भग्न होऊन भूमीवर पडो ! तुझ्या शेंकडो बाणांनीं विद्ध झालेला कर्णाचा सुवर्णविभूषित रथ, अश्वहीन व वीरहीन झाल्यामुळें, रणांत टाकून भयानें शल्य पलायन करो ! पार्था, प्रतिज्ञापालनासाठीं कर्णाच्या देखत तूं जर कर्णपुत्राचा वध आपल्या बाणांनीं करशील, तर प्रियपुत्राला मरण आलेलें पाहून त्या दुरात्म्या कर्णाला भीष्म, द्रोण व विदुर यांचें भाषण आठवेल ! अर्जुना, याप्रमाणें तुझ्या हातून कर्णाचा वध झालेला पाहून, राज्या-विषयीं व स्वतःच्या जीविताविषयीं दुर्योधन निराश होईल !

भरतश्रेष्ठा अर्जुना, कर्णाच्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झालेले हे पांचाल वीर त्यावर चाल करून जात आहेत ! कर्णानें त्यांचा संहार चालविला असतांहि ते पांडव-जयार्थ त्याजवर तुटून पडत आहेत ! पांचाल वीर, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, शिखंडी, धृष्टद्युम्नाचे पुत्र, शतानीक, नकुलाचा पुत्र, नकुल, सहदेव, दुर्मुख, जनमेजय, सुधर्मा व सात्यकि हे कर्णाच्या स्वाधीन झाले आहेत पहा ! पार्था, रणांत कर्णानें पांचालांचा संहार केल्यामुळें तुझ्या बंधुवर्गाचा भयंकर शोकस्वर ऐकूं येत आहे ! महाधनुर्धर पांचाल युद्धांत मृत्यु आला तरी त्याची पर्वा करीत नसल्यामुळें भीतीनें रणांगणांतून केव्हांहि पराङ्मुख होणार नाहींत ! अर्जुना, ज्या एकट्यानें पांडवसेनेला बाणसंघातांनीं वेढून टाकलें, त्या भीष्माशीं रणांत गांठ पडल्यावर देखील जे पांचाल पराङ्मुख झाले नाहींत, ते महारथ पांचाल कर्णाशीं युद्ध करतांना कसे युद्धांतून पळून जातील ? अरिंदम पार्था, पांचा-

लांच्या रथसेनेंत घुसून यमाप्रमाणें पराक्रम गाजविणाऱ्या, दररोज सहस्रावधि पांचालांचा संहार करणाऱ्या, धनुर्धरश्रेष्ठ, दुर्धर अशा द्रोणाच्या प्रज्वलित अस्त्राग्नीस न जुमानतां पांडवांच्या विजयार्थ झटणारे ते वीर मोठ्या आनंदानें युद्धांत शत्रूंचा वध करण्यासाठीं त्यावर निकराचे हल्ले करीत असत! अशा प्रकारचा पराक्रम करणारे ते पांचाल वीर कर्णाला भिऊन कधींहि युद्ध-पराङ्मुख होणार नाहींत! ते वेगवान् पांचाल आपल्यावर हल्ला करीत आहेत, असें पाहून, अग्नि ज्याप्रमाणें पतंगांचा नाश करतो, त्याप्रमाणें त्या शूर कर्णानें बाणांनीं त्यांचा वध केला! पार्था, पहा, हे आणखी पांचाल वीर कौरवसेनेवर चाल करून जात आहेत व त्यांना कर्णाचे योद्धे पळवून लावीत आहेत! पांडवांच्या जयार्थ जे जिवावर उदार होऊन युद्ध करीत आहेत, त्या शेंकडो पांचालांचा वध हा राधेय आपल्या बाणांनीं करीत आहे पहा! भारता! ह्या कर्णपराक्रमरूपी अगाध महासागरांत बुडणाऱ्या ह्या धनुर्धर पांचाल वीरांना, नौका होऊन तूं अभय दे व त्यांचें संरक्षण कर! अर्जुना, ऋषिश्रेष्ठ भार्गव परशुरामाकडून कर्णानें जें अस्त्र प्राप्त करून घेतलें, त्याचें उग्र स्वरूप आतां दृग्गोचर होत आहे! तें घोरस्वरूप, सर्व सैन्याला भयप्रद आणि घोर अस्त्र आतां पांडवांच्या सैन्याला वेढून स्वतःच्या तेजानें जाळीत आहे! कर्णाच्या धनुष्यापासून सुटलेले हे बाण भ्रमरांच्या समूहाप्रमाणें तुझ्या सैन्याला पीडा देत आहेत! अर्जुना, कर्णाचें अस्त्र युद्धांत दुर्निवार्य ठरल्यामुळें हे पांचाल-वीर दशदिशांना पळून जात आहेत! पार्था, सृंजयांसहवर्तमान कर्णाशीं चोहों बाजूंनीं लढणारा व कौरवांबद्दल नित्य क्रोध दाखविणारा भीम, कर्णाच्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध होत आहे पहा! जर तूं कर्णाची उपेक्षा केलीस, तर ज्याप्रमाणें एकादा रोग शरीरांत प्रवेश करून त्याचा नाश करतो, त्याप्रमाणें तो कर्ण पांडव, पांचाल व सृंजय यांचा वध करील! अर्जुना, पांडवांच्या सैन्यामध्यें, कर्णाशीं युद्ध करून जो सुरक्षित आपल्या गृहीं परत येईल, असा तुझ्याशिवाय कोणीहि वीर दिसत नाहीं! म्हणून हे नरश्रेष्ठा पार्था, आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें तूं आज आपल्या तीक्ष्ण बाणांनीं कर्णाचा वध करून प्रतिज्ञा पूर्ण कर व कीर्ति मिळव! अर्जुना, कर्णासह सर्व कौरवांना युद्धांत जिंकण्याला एकटा तूंच समर्थ आहेस; तुझ्याशिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं, हें मी तुला खचित सांगतों. नरोत्तम पार्था, महारथी कर्णाचा तूं आज वध करून हें महत्कार्य पार पाड व कृतार्थ आणि सुखी हो! ८. ७२.

---

## अध्याय ७४ वा.

[ १ अर्जुनाचें वीरश्रीयुक्त स्वपराक्रमकथन. ]

( १ ) **संजय**—याप्रमाणें कृष्णाचें भाषण ऐकतांच क्षणांत अर्जुनाचा सर्व शोक नाहींसा झाला व त्याला मोठा आनंद झाला. नंतर आपले गांडीव धनुष्यावर हात फिरवून व तें कर्णावर रोखून तो कृष्णाला बोलला—

**अर्जुन**—गोविंदा, मला सर्व आधार तुझा असल्यामुळें जय निःसंशय मिळणार, यांत संशय नाहीं. जगांतील सर्व भूतभविष्य गोष्टी तूंच घडवून आणणारा आहेस. तूं माझ्यावर प्रसन्न झाल्यामुळें तुझ्या साहाय्यानें तिन्ही लोक एकत्र होऊन मजवर आले, तरी त्यांना जिंकून मी त्यांचा वध करीन! मग कर्णाची ती कथा काय ? हे जनार्दना, पांचालांचें सैन्य पळत सुटलें आहे, कर्ण रणांत निर्भयपणें संचार करतांना दिसत आहे आणि कृष्णा, इंद्राच्या अशनीसारखें कर्णानें सोडलेलें हें भार्गवास्त्र सर्वत्र पेटत आहे. हे कृष्णा, आज मी माझ्या गांडीवाच्या योगें बाणांच्या वृष्टीनें कर्णाचा असा वध करीन कीं ह्या संग्रामाची कथा जोंपर्यंत पृथ्वी आहे तोंपर्यंत तिजवरील सर्व प्राणी गात राहतील! राजा धृतराष्ट्र आज आपल्या बुद्धीला दोष देईल आणि राज्याला नालायक अशा दुर्योधनाला राज्यावर बसविल्याबद्दल दुःख करील ! आज धृतराष्ट्र राज्य, सुख, संपत्ति, राष्ट्र, पुर आणि पुत्र या सर्वांना अंतरेल ! जो गुणवंतांचा द्वेष करितो व निर्गुणी पुरुषाला प्रभु करितो, तो सर्वांच्या क्षयाला कारण होतो, आणि मग स्वतःच शोक करीत राहतो ! एकाद्या मनुष्यानें आम्रवन तोडून टाकलें, तर शेवटीं त्याबद्दल त्याला दुःख झाल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं ! आज सूतपुत्र कर्णाचा वध केला असतां राजा दुर्योधनाला अत्यंत दुःख होईल ! त्याचा वध केल्यानें दुर्योधनाच्या सर्व आशा विफळ होतील ! त्याची राज्याची, तशी जीविताचीहि आशा नाहींशी होईल ! आज कर्णाचा मीं शरांनीं वध केला असतां तुझ्या शमवाक्यांचें त्याला स्मरण होईल ! कृष्णा, आज सौबल शकुनीला शररूप फांसे, गांडीवरूप पिशवी आणि रथरूप पट दाखवितों !

कृष्णा, आज मी तीक्ष्ण शरांनीं कर्णाचा वध करून कुंतीसुत युधिष्ठिराला फार दिवस जी भयंकर काळजी लागली आहे, ती सर्व नाहींशी करितों !

माझ्या हातून आज कर्णाचा वध झाला असतां धर्मराजा आनंदित होऊन सुखानें झोंप घेईल ! आज मी कर्णावर असा अप्रतिम बाण टाकतों कीं त्याच्या योगानें तो तत्काल मरून जाईल ! ह्या दुरात्म्या कर्णानें माझ्या वधासंबंधीं असा पण केला आहे कीं, ‘ मी पार्थवध करणार नाहीं, तोंपर्यंत पाय धुणार नाहीं !’ आज मी तीक्ष्ण बाणांनीं कर्णाला रथांतून खालीं पाडीन आणि त्याचा तो पण खोटा करीन ! ज्याला आपल्या पराक्रमाचा एवढा मोठा गर्व आहे कीं, तो सर्वदा दुसऱ्याची निंदा करीत असतो, त्या कर्णाचें रक्त आज ही भूमि प्राशन करील ! जो कर्ण द्रौपदीला ‘ कृष्णे, तूं आतां अपति आहेस ’, म्हणून धृतराष्ट्राच्या संमतीनें आपले गुण गातांना जें कांहीं बोलला तें सर्व आज माझे बाण खोटें करून दाखवितील आणि सर्पाप्रमाणें क्रुद्ध होऊन त्याचें रक्त पितील ! आज माझे विजेसारखे शोभणारे बाण गांडीवापासून सुटून कर्णाला परम गतीला पोंचवितील ! त्यावेळीं कौरवसभेंत पांडवांची निर्भर्त्सना करीत कर्ण द्रौपदीला जें कांहीं बोलला, त्याचा त्याला आज पूर्ण पश्चात्ताप होईल ! कृष्णा, पांडव षंढ आहेत कीं मर्द आहेत हें आज त्या दुरात्म्या कर्णाच्या निधनानें सहजच कळणार आहे ! ‘ धृतराष्ट्रपुत्रांनो, तुमचें पांडवापासून मी रक्षण करीन,’ असें कर्णाचें आत्मश्लाघापर भाषण आज माझे हे बाणच खोडून टाकतील ! ‘कौरवहो, पांडवांचा आज पुत्रांसह वध करून त्यांचा सर्व उद्योग मी शेवटाला नेतों,’ असें जो गर्वानें सांगत असे, त्याचा सर्व धनुर्धरांसमक्ष आज मी वध करीन ! कृष्णा, ज्याच्या वीर्याचा आश्रय करून दुष्ट दुर्योधन आमचा नित्य अपमान करीत असे, त्या कर्णाचा रणांत आज वध करून मी धर्माला आनंदवीन !

माधवा, आज नानाविध बाणांचा शत्रूंवर असा वर्षाव करीन कीं, त्यांच्या योगानें त्रस्त होऊन ते तत्काल भूमीवर मरून पडतील ! आणि त्यांच्या मृत रथकुंजरांनीं पृथ्वीला विचित्र शोभा येईल ! मग तो युद्धदुर्मद कर्ण रणांत प्राप्त झाल्यावर तीक्ष्ण शरांनीं त्याचाहि वध करीन ! आज पुत्र आणि सुहृज्जन यांसह कर्णाचा वध केल्यावर सर्व कौरव आणि तत्पक्षीय राजेलोक सिंहांनीं पीडित मृगांप्रमाणें दशदिशांना पळून जातील ! आज कर्णवध झाल्याचें पाहून दुर्योधन स्वतःला दोष देऊन पश्चात्ताप पावेल ! कर्ण हत झाल्याचें पाहून आज दुर्योधन सर्व धनुर्धरांमध्यें मलाच श्रेष्ठ समजेल ! कृष्णा, आज मी पुत्र, पौत्र, अमात्य आणि सेवक यांसह धृतराष्ट्राला निराश

करून सोडीन! आज बगळे व इतर नानाविध मांसभक्षक पक्षी माझ्या शरांनीं हत कर्णाच्या गात्रांवर खुशाल संचार करतील!

हे मधुसूदना, आज सर्व धनुर्धरांदेखत मी माझ्या तीक्ष्ण विपाठ व क्षुरनामक शरांनीं त्या दुष्ट कर्णाचा शिरच्छेद करून त्याचे अवयव छिन्नभिन्न करीन, तेव्हां युधिष्ठिराची मानसिक चिंता दूर होऊन तो महत्संकटांतून मुक्त होईल! कृष्णा, आज मी बंधु भीमासह कर्णाचा वध करून धर्मपुत्र राजा युधिष्ठिराला प्रसन्न करीन. त्याचप्रमाणें कर्णाच्या नीच अनुयायांचा माझ्या सर्पविषतुल्य व अग्निसमान शरांनीं वध करीन! गोविंदा, सुवर्णकवचें व रत्नखचित कुंडलें धारण करणाऱ्या त्यांचा संहार करून मी ही रणभूमि झांकून टाकीन! कृष्णा, आज अभिमन्यूच्या सर्व शत्रूंचीं शिरें व गात्रें तीक्ष्ण बाणांनीं छेदून मी त्यांचा निःपात करीन आणि कौरवहीन पृथ्वी करून ती धर्मराजाला देईन! हें न घडलें तर पृथ्वी निरर्जुन होऊन तिजवर तुला संचारावें लागेल! कृष्णा, आज कर्णाचा वध करून सर्व धनुर्धर कौरवांबद्दल होणाऱ्या माझ्या संतापाच्या, व गांडीवापासून सोडलेल्या शरांच्या ऋणांतून मी मुक्त होईन! ज्याप्रमाणें इंद्रानें शंबरासुराचा वध केला, त्याप्रमाणें मी आज कर्णाचा वध करून आम्हांला तेरा वर्षें होत असलेल्या दुःखांतून मुक्त होईन! आज युद्धांत कर्णाचा वध झाल्यानंतर मित्रकार्यार्थ झटणाऱ्या सोमकांच्या महारथींना आपण कृतकृत्य झालों असें वाटेल! माधवा, कर्णाचा वध करून मीं जय मिळविला म्हणजे सात्यकीला केवढा हर्ष होईल व माझ्याबद्दल तो किती आदर दाखवील! आज रणामध्यें कर्णाच्या महारथ पुत्राचा व त्याचाहि वध करून भीम, नकुल, सहदेव व सात्यकि, यांना मी संतुष्ट करीन! आजच्या महायुद्धांत कर्णाचा वध करून मी धृष्टद्युम्न, शिखंडि व पांचाल यांच्या ऋणांतून मुक्त होईन! आज अमर्षण धनंजय, रणांगणांत कौरवांचा व कर्णाचा संहार करतांना, सर्व वीरांच्या नजरेस पडेल! आणि नंतर मी पुनः तुझ्याजवळ आत्मप्रौढि सांगेन! कृष्णा, ह्या लोकीं धनुर्विद्येंत किंवा पराक्रमांत माझ्या बरोबरीचा कोणी नाहीं; त्याचप्रमाणें माझ्यासारखा क्षमाशील व कोपी पुरुष दुसरा कोणी आहे काय? मी महान् धनुर्धर असल्यामुळें माझ्या बाहुवीर्यानें सुर, असुर व इतर प्राणिमात्र यांचा पराभव करीन! माझा पराक्रम इतरांपेक्षां श्रेष्ठ प्रतीचा आहे, हें जाण! कृष्णा, गांडीवापासून सोडलेल्या अग्नितुल्य बाणांचा, सर्व कौरवांवर, बाल्हीकांवर व त्यांच्या सेनेवर वर्षाव करून, हिमकालाच्या अन्तीं तृणराशीवर

पडलेल्या अग्नीप्रमाणें मी एकटा त्या सर्वांना मोठ्या आवेशानें जाळून टाकीन ! कृष्णा, माझ्या हातांवर बाणचिह्नें लिहिलेलीं आहेत व हें बाणयुक्त आकर्ण ओढलेलें दिव्य धनुष्य दिसून येत आहे ! पायांवर रथाचीं व ध्वजाचीं चिह्नें दिसत आहेत. अशा माझ्यासारख्या वीराला युद्धांत कोणीहि जिंकूं शकणार नाहीं !

संजय—धृतराष्ट्रा, तो अतुलपराक्रमी वीर अर्जुन याप्रमाणें कृष्णाला म्हणाला व तत्काल क्रोधानें रक्तवत् आरक्त नेत्र करून भीमाला सोडविण्याला आणि कर्णाचा शिरच्छेद करण्याकरितां रणामध्यें मोठ्या आवेशानें गेला ! ८. ७४.